# भारताचा स्वातंत्र्यलढा : १९३०-३४

लेखक : डॉ. वा. ना. कुबेर






महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# पुस्तकाविषयी चार शब्द

१९३० साली महात्मा गाधींनी केलेली दांडीयात्रा व मिठाचा प्रतिकात्मक सत्याग्रह ही भारतीय स्वातंत्र्य-लढ्याला नवा आशय देणारी अभूतपूर्व घटना होती. या ग्रंथात तत्कालीन परिस्थितीचे राजकीय व वैचारिक विश्लेषण लेखकाने केलेले आढळते. शिवाय १९३१ कराची काँग्रेस अधिवेशनात प्रकट झालेली काँग्रेस नेत्यांची लोकशाहीवादी व धर्मनिरपेक्ष दृष्टी ही स्वातंत्र्योत्तर काळातही कशी प्रेरक व मार्गदर्शक ठरणारी होती. याचेही विवेचन लेखकाने केले आहे.

एकीकडे परकीय सत्तेविरुद्ध लढा देत असतानाच जनआंदोलनांतून विकसित झालेली राष्ट्राच्या भावी जडणघडणीची धोरणात्मक दृष्टी हे भारताच्या स्वातंत्र्य लढ्याचे वैशिष्ट्य लेखकाने नेमकेपणाने या ग्रंथात मांडले आहे. अनेक संदर्भ, अचूक माहितीच्या नोंदी व मुलाखती यांमुळे ग्रंथाचे मूल्य निश्चितपणे वाढले आहे.

# भारताचा स्वातंत्र्यलढा : १९३०-३४

लेखक
डॉ. वा. ना. कुबेर




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

**प्रथमावृत्ती** : २००२

**प्रकाशक** : सचिव
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग, दादर, मुंबई ४०० ०१४.



**मुद्रक** : व्यवस्थापक
शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय
चर्नी रोड रेल्वे स्टेशनजवळ
नेताजी सुभाष रोड
मुंबई ४०० ००४.

**किंमत** : रुपये १०९

# निवेदन

डॉ. वा. ना. कुबेर यांनी या ग्रंथात भारताच्या स्वातंत्र्य लढ्यातील १९३०–१९३४ पर्यंतचा कालखंड घेतला आहे. डॉ. वा. ना. कुबेर यांनी आपल्या या ग्रंथाच्या प्रास्ताविकेत नमूद केल्यानुसार वरील कालखंडात घडलेल्या घटनांचे ते स्वतः साक्षीदार होते. इतकेच नव्हे तर, यातील काही घटनांत त्यांनी स्वतः भाग घेतलेला होता. त्यामुळे त्यांनी लिहिलेल्या या ग्रंथाची विश्वासार्हता निश्चित वाढलेली आहे.

खरे तर डॉ. वा. ना. कुबेर यांचा हा संशोधन प्रकल्पाचा अहवाल; परंतु सामान्य वाचकांची राष्ट्रीय चळवळीचा अभ्यास करण्याची आवश्यकता लक्षात घेऊन त्यांनी त्याचे पुस्तक तयार केले आहे. त्यामुळे हे पुस्तक निश्चितच महत्त्वाचे ठरणार आहे.

डॉ. वा. ना. कुबेर यांच्या हयातीत हे पुस्तक प्रकाशित व्हावे, असा आमचा प्रयत्न होता. परंतु ते शक्य झाले नाही, याचे आम्हाला वाईट वाटते.

डॉ. वा. ना. कुबेर यांच्या पावनस्मृतीस आमचे अभिवादन.

**रा. रं. बोराडे,**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

मुंबई,
दिनांक ११ जानेवारी २००२.

एन ४१८८–१अ

# अनुक्रमणिका



---

# प्रास्ताविक

माझ्या सातारच्या शालेय जीवनात सायमन कमिशनविरोधी चळवळ (१९२८), १९२९ मधील क्रांतिकारक घटना, १९३० चा पहिला स्वातंत्र्य-दिन (२६ जानेवारी १९३०) गांधीजींची दांडीयात्रा (१२ मार्च १९३०), मिठाचा सत्याग्रह, सोलापुरचा लष्करी कायदा (१९३०), सोलापुरच्या चार वीरांची फाशी, भगतसिंग, राजगुरू, सुखदेव यांची फाशी, त्यामुळे उठलेल्या जनसागराच्या लाटा, जंगल सत्याग्रह, गांधी-आयर्विन करार इत्यादी घटनांचा मी साक्षीदार आहे. इतकेच नव्हे, तर यातील काही घटनात मी भागही घेतला. १९३० मध्ये मुंबईच्या गव्हर्नरने सातारला भेट दिली. काही राजनिष्ठ त्याना भेटले. जनता रस्त्यावरच आली होती. आम्ही १०-१२ विद्यार्थ्यांनी '' अन्‌वॉन्टेड गेस्ट गो बॅक '' असा एक कापडी फलक सातारा-पुणे रस्त्यावर सातारपासून १०-१२ मैलावरील वीरमाड गावाजवळ रस्त्यावर लावला. रात्रभर हे काम करून सातारा येथील निदर्शनात भाग घ्यायला आम्ही पुनः तयार झालोच.

या सर्व घटनांचा माझ्या मनावर खोल परिणाम झाला आणि स्वतःला राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यात झोकून द्यायचा माझा निश्चय दृढ झाला.

१९६९ मध्ये सोलापूर ( आताचे वालचंद ) महाविद्यालयात अर्थशास्त्र व राज्यशास्त्र विषयाचा व्याख्याता म्हणून मी काम करू लागलो. थोडी स्थिरता झाल्यावर मी १९३० च्या लष्करी कायद्याचा व तत्कालीन चळवळींचा अभ्यास करण्याचे ठरविले. १९३० मधील घटना प्रत्यक्ष पाहिल्याने व काहीत सहभागी झाल्याने चळवळीचा आराखडा तयार होताच. सोलापुरचे डॉ. अंत्रोळीकर, भाई छन्नुसिंग, भाई विभूते, जाजू, कवी कुंजविहारी इत्यादींशी संबंध जोडले. मी भाई व्ही. डी. चितळे यांचा सहकारी, म्हणून छन्नूसिंग व विभूते यांच्याशी माझे दृढ

संबंध जमले. या बाबतीत मला माझे मित्र भाई हिरालाल बाकळे वकील यांचे मार्गदर्शन लाभले. सोलापुरच्या हिराचंद नेमचंद वाचनालयात १९३० सालच्या वर्तमानपत्रातील कात्रणे मिळाली.

मी एक योजना तयार केली व ती दिल्लीच्या भारतीय समाजशास्त्र अनुसंधान परिषदेकडे अनुदानासाठी पाठवली. त्यावेळी त्या परिषदेचे सदस्य-सचिव होते जे. पी. नाईक. सोलापूर प्रकरणाबाबतची साधने अपुरी आहेत, असे त्यांनी सांगितले. यासाठी १९३० सालची कायदेभंगाची चळवळच संपूर्ण अभ्यासली पाहिजे, या विचारावर मी स्थिर झालो. मी ' Peoples ' Participation in the Freedom Struggle of 1930-34 with special reference to Sholapur in 1930 ' या शीर्षकाची योजना तयार केली आणि माझे मित्र प्रा. डॉ. मनोरंजन झा (राज्यशास्त्राचे प्राध्यापक, बनारस विश्वविद्यालय) यांच्या सूचनेप्रमाणे ती भारतीय इतिहास अनुसंधान परिषदेकडे अनुदानासाठी पाठवली आणि परिषदेने मला फेलोशिप दिली. त्यावेळी परिषदेचे चेअरमन होते प्रा. आर. एस. शर्मा. ते एका सेमिनारसाठी पुण्यास आले असता त्यांना भेटलोही. मी एक प्रश्नावली तयार केली. शेकडो कार्यकर्त्यांना ती पाठवली. काहींच्या मुलाखती झाल्या (यादी परिशिष्टात आहे). त्यावरून चळवळीचे व्यापक स्वरूप लक्षात आले.

या संशोधन प्रकल्पाचा अहवाल मी भारतीय इतिहास अनुसंधान परिषदेकडे पाठविला. तरी पण सामान्य वाचकानी राष्ट्रीय चळवळ अभ्यासण्याची आवश्यकता आहे हे मला जाणवू लागले. म्हणून मी हे पुस्तक तयार केले. " भारताचा राष्ट्रवाद " कसा विकसित झाला याचे विवेचन करताना १९ व २० व्या शतकातील विचारवंतांचा मागोवा घेतला आहे. भारताचा राष्ट्रवाद हा वंशवादविरोधी, साम्राज्यशाहीविरोधी, धर्मनिरपेक्ष (सेक्युलर), लोकशाहीचा पुरस्कर्ता, आंतरराष्ट्रीय दृष्टी असलेला, मानवतावादी आणि विश्वबंधुत्ववादी असा विकसित झाला आहे असे प्रतिपादन केले आहे. त्यानंतरच्या प्रकरणातून १९१९ ते १९३० या काळातील चळवळीवर परिणाम करणाऱ्या सर्व घटना, विचारप्रवाह यांचा ऊहापोह केला आहे. कायदेभंग लढ्यातील चढउतार अखिल भारतीय घटनांच्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील काही घटनांचा (लढ्यांचा) ऊहापोह केला आहे. उदा. महाराष्ट्रातील विलेपार्ले, रत्नागिरी व शिरोडा येथील मिठाचे सत्याग्रह, चिरनेर, बिळाशी

आणि संगमनेर येथील जंगल सत्याग्रह इत्यादींचे सविस्तर विवेचन केले आहे. विवेचनाच्या ओघात काही व्यक्तींची नावे येणे अपरिहार्य आहे, सर्वांची येणे शक्य नाही याची जाणीव मला आहे. हा संपूर्ण इतिहास नाही. इतिहासाच्या मागे कोणते विचारप्रवाह होते हे शोधण्याचा हा नम्र प्रयत्न आहे. सोलापुरातील घटना स्वतंत्र प्रकरणात दिल्या आहेत. या सर्वच विवेचनात पक्षाभिनिवेश न आणता विचारांचा समतोल राखण्याचा प्रयत्न केला आहे.

कॉ. एस. जी. सरदेसाई व डॉ. अधिकारी यांच्याशी झालेली चर्चा मला उपयुक्त वाटली. कॉ. सरदेसाई हे संगमनेरच्या जंगल सत्याग्रहात आघाडीवर होते. डॉ. अधिकारी यांनी कॉ. पी. सी. जोशी यांच्या १९२९ मधील एका लेखाचा केलेला उल्लेख त्यावेळचे संदर्भ समजायला मला उपयुक्त वाटला. साबरमती, लाहोर व मीरत (गांधीवाद, सशस्त्र क्रांतिवाद व समाजवाद) या विचारांचा संघर्ष कसा होता हे त्या लेखात चांगले प्रतिपादन केले होते.

## ऋणनिर्देश

हे काम करण्यासाठी सरकारदरबारी असलेले गोपनीय कागदपत्र वाचण्याची परवानगी मला महाराष्ट्र सरकारच्या गृह खात्याने दिली. प्रा. न. र. फाटक हे त्यावेळी महाराष्ट्र स्वातंत्र्येतिहास समितीचे प्रमुख होते. त्यांचे सहकारी श्री. ह. मो. जोशी यांनी सोलापूर व इतर प्रकरणांच्या याचिका उपलब्ध करून दिल्या. श्री. बाळासाहेब फाटक यांनीही मदत केली. केसरी-मराठा ग्रंथालय, पुणे विद्यापीठाचे जयकर ग्रंथालय, हिंद सेवक संघाचे ग्रंथालय, मुंबई व दिल्ली येथील अभिलेखागारे, दिल्लीची नेहरू म्युझियम आणि लायब्ररी, मुंबई विद्यापीठाचे ग्रंथालय यांचा फार उपयोग झाला. त्याबद्दल त्या संस्थाचालकांचा मी ऋणी आहे.

मुंबई व दिल्ली येथे राहण्याची अत्यंत गैरसोय. पण मुंबई मराठी ग्रंथालयाच्या अभ्यागतगृहात ही सोय झाली. श्री. जयंतराव टिळक हे १९६८ ते १९८० या काळात राज्यसभेचे सभासद होते. त्यांनी त्यांच्या नॉर्थ ॲव्हेन्यूमधील फ्लॅटवर राहण्याची मला आनंदाने परवानगी दिली आणि अभ्यासकाला दिल्लीत भेडसावणारा एक प्रश्न सोडवला, याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

ग्रंथाची प्रुफे तपासणे व महत्त्वाचे संदर्भ पाहण्याचे काम प्रा. ए. व्ही. तथा मोहनराव देशपांडे (पाटण) यांनी केले. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने हा ग्रंथ

प्रकाशनार्थ स्वीकारला त्याबद्दल मंडळाचे तत्कालीन अध्यक्ष डॉ. य. दि. फडके व त्यांचे सहकारी, तसेच सचिव श्री. चंद्रकांत बडे व त्यांचे सहकारी तसेच शासकीय मध्यवर्ती मुद्रणालयाने हा ग्रंथ सुबक स्वरूपात आणला त्याबद्दल त्यांचाही मी आभारी आहे.

**डॉ. वा. ना. कुबेर**

'' आशियाना ''
२७ अ, सेनादत्त पेठ,
पुणे ४११ ०३०.
दिनांक २६ जानेवारी १९९८.

# १. भारतीय समाजाचे परिवर्तन

ब्रिटिश साम्राज्यशाही आक्रमणामुळे भारतीय समाजाचा कणाच मोडून पडला. त्यामुळे 'खरे बोलायचे झाले तर अभूतपूर्व अशी सामाजिक क्रांती घडवून आणली' असे कार्ल मार्क्सने वसाहतवादावर लिहिताना म्हटले आहे. त्यांच्या मते भारतात इंग्लंडचे कार्य दोन प्रकारचे होते : एक विनाशकारी व दुसरे नवचैतन्यदायी—पूर्वीच्या समाजपद्धतीचा पायाच न'हीसा करणारे व नवीन समाजाचा भौतिक पाया घालणारे.

ब्रिटिशपूर्व काळात स्वयंपूर्ण खेडेगाव हा भारतीय अर्थव्यवस्थेचा स्थिर पायाच होता. काही विशिष्ट गावातील सारा निश्चित करणे व तो वसूल करणे अशा प्रकारचे अधिकार असणारा सरंजामदार गावात होता. एखादी जमात किंवा तिचा विभाग म्हणजे ग्रामीण समाज किंवा गावात स्थिर झालेला भ्रातृभावाने युक्त असा एखादा वंश हाच जमिनीचा मालक होता. जमीन ही राजाची मालमत्ता आहे असे कधीच मानण्यात येत नव्हते. अनेक राजवटी आल्या तरी ग्रामीण समाजाला कोणी जमिनीपासून वंचित करू शकले नव्हते. शासनसंस्थेला वाधक उत्पन्नापैकी काही भाग गोळा करण्याचा फक्त हक्क होता. व्यक्तिगत शेतकरी हा जमिनीचा मालक कधीही नव्हता. याचा अर्थ ब्रिटिशपूर्व भारतात जमिनीची खाजगी मालकी कधीही अस्तित्वात नव्हती. ब्रिटिशांनी जमीनदार आणि व्यक्तिगत शेतकीचा मालक असे शेतकऱ्यांचे दोन वर्ग निर्माण केले, आणि शेतीव्यवस्थेत क्रांती घडवून आणली. जमिनीची मालकी वैयक्तिक झाली, आणि ती बाजारातील विक्रेय वस्तू झाली. पूर्वीच्या स्वयंपूर्ण खेडेगावातील शेतीविषयक व आर्थिक कार्येच नाहीशी झाली, इतकेच नव्हे तर त्यात चालणारी न्यायदानाची कार्येही बंद पडली. ग्रामीण शेतकऱ्याला गावाशी सामुदायिकपणे एकत्रित ठेवणारे बन्धही त्याने तोडून टाकले. सहकार्य आणि सामुदायिक जीवनाचा नाश झाला. मध्यवर्ती राजकीय सत्ता आणि राष्ट्रीय किंबहुना जागतिक अर्थव्यवस्थेवर अवलंबून असणारा प्रशासकीय विभाग असे त्याला स्वरूप आले. उत्पादन, विभाजन, विनिमय याबाबत नवे सामाजिक संबंध प्रस्थापित झाले आणि नवीन संस्था उदयाला आल्या. ही स्वयंपूर्ण खेडेगावे सामाजिक निष्क्रियता आणि बौद्धिक शैथिल्य वा प्रेरणाहीनत्व यांचे बालेकिल्लेच झाले होते. सर्व हिंदुस्थानचे ऐक्य घडवून आणण्याच्या मार्गात ही जबरदस्त धोंडच होती. त्यांचा विनाश झाला म्हणून अश्रू ढाळणे किंवा ती प्रस्थापित करण्याचा आशावाद निर्माण करणे हे प्रतिगामीपणाचे होईल.

व्यापारी भांडवलाचे रूपांतर होऊन औद्योगिक भांडवलशाही, खुला व्यापार, भांडवलाची परदेशी गुंतवणूक, वसाहतीसाठी आंतरराष्ट्रीय स्पर्धा—या निरनिराळ्या अवस्थांतून साम्राज्यवादी देश आणि त्यांच्या वसाहती असे द्वंद्व जागतिक क्षेत्रात दिसू लागले. वसाहतिक पिळवणूक आणि येथील प्रगतीला विरोध हे येथील अर्थव्यवस्थेचे स्थायी रूप झाले.

समाजातील व्यक्ति आणि गट यांच्यातील संबंध सामाजिक दर्जावरून न ठरता त्याला कायद्याचे स्वरूप आले. उत्पादनपद्धती बदलली, नवीन उद्योगधंदे येऊ लागले आणि त्यावर आधारलेल्या नवीन वर्गाचा उदय झाला. शेतीमध्ये भांडवलशाही उत्पादनाच्या दृष्टीने आवश्यक अशी भूमिका तयार झाली. ' भारतातील शेती व उद्योगधंदे यांची फारकत या ब्रिटिश तंत्रविज्ञानाने केलीय ' असा अभिप्राय व्यक्त करून मार्क्सने इंग्लंड हे ' नकळत इतिहासाचे हत्यार ' (Unconscious tool of History) झाले असल्याचे म्हटले आहे.

ब्रिटिश प्रशासनाचे दोन विशेष दिसून येतील. एक म्हणजे निष्ठा आणि दुसरी म्हणजे सर्व नागरिकांना कायद्यापुढे समानता यांचा आग्रह यांचीही बदललेल्या सामाजिक परिस्थितीत भर पडलेली दिसेल. सर्वसमर्थ व निःपक्षपाती अशी नोकरशाही, समता आणि एकाच तऱ्हेची प्रशासनाची पद्धती स्थापन करून सर्व घटकांचे एकत्रीकरण करण्याच्या मार्गाला फार मोठा हातभार लावीत होती. भारताच्या इतिहासांत भारत प्रथमच प्रशासनाच्या दृष्टीने एकसंघ झाला होता. शांतता आणि सुव्यवस्था यांचे रक्षण, कायद्याच्या अविभाज्य स्वातंत्र्यावर विश्वास, देशाचे आधुनिकीकरण, राज्याचा आर्थिक पाया मजबूत करणे, दुष्काळ आणि रोगराई यांच्याविरुद्ध उपाययोजना, शेतीच्या उत्पन्नात वाढ आणि स्थिर राजकीय परिस्थिती यांमुळे भारताचे संपूर्ण चित्रच पालटून गेले. सर्वांना समान असे भारतीय राष्ट्रीयत्व प्राप्त झाले. सर्वांना समान कायदा आणि सर्वांना समान अशी शासन-संहिता यांमुळे एकतेच्या प्रक्रियेत भरच पडली. एकाच राज्याच्या छत्राखाली होणारे सर्वांचे राजकीय साहचर्य भारतीय जनतेला अधिक एकसंघ करू लागले. इंग्रजी शिक्षण, दळणवळणाची आधुनिक साधने, नवीन वैचारिक बदल यांमुळे हे कार्य अधिकच वेगाने होऊ लागले.

भारतीय समाजातील लहान पण उच्च शिक्षितांचा गट परंपरागत विचारसरणी दूर सारणारा होता, आणि त्याने पाश्चिमात्यांच्या जीविताचा तत्त्वज्ञानविषयक दृष्टिकोन स्वीकारलेला होता. लॉर्ड मेकॉलेची शिक्षणविषयक प्रख्यात ' मिनिट्स ' अपेक्षित परिणाम करीत होती. रक्ताने वा वर्णाने भारतीय, पण आवडी-निवडी, मते, नीती-कल्पना आणि बुद्धी याबाबत इंग्लिश, अशा प्रकारचा वर्ग निर्माण करण्याचे त्याचे ध्येय होते. भारत सरकारचा हा निर्णय फार उपयोगी आणि क्रांतिकारक होता असे के. एम. पणिक्कर यांनी म्हटले होते. नागरी स्वातंत्र्यावर जोर, कायद्याचे श्रेष्ठत्त्व, चर्चा करून व मतपरिवर्तन करून शासन-संस्थेत बदल घडवून आणणे, सार्वजनिक मताधिकारावर आधारित निवडणुकी, सर्व देशभर राजकीय विचारांचा विस्तार, संसदीय लोकशाही, न्यायदानाची पद्धती, प्रगतीवर असलेला दुर्दम्य विश्वास, आणि भविष्यकाळाकडे आशेने पाहण्याचा दृष्टिकोन–या ब्रिटिश राजवटीने भारताला दिलेल्या परिणामकारक अशा नवीन देणग्या म्हणता येतील.

पूर्वीचे परंपराप्राप्त छोटे उद्योगधंदे नाहीसे होऊन त्या जागी आधुनिक उद्योगधंद्यांची प्रस्थापना झाल्यामुळे भारतीय जनतेची आर्थिक दृष्टीने एकात्मता दृढ होण्याची प्रक्रिया चालू झाली होती. या भांडवलशाहीच्या विस्ताराचा स्वाभाविक परिणाम म्हणजे नवीन वर्गाचा उदय. जमीनदार वर्ग व शेतमजुरांची वाढ होऊ लागली. रयतवारी पद्धतीत वाढलेल्या शेतकऱ्यांत राष्ट्रीय जाणिवेचा उदय झाला. या भांडवलदारी क्रांतीचे ' भारतीय इतिहासांतील खरी खुरी सामाजिक क्रांती ' असे कार्ल मार्क्सने केलेले वर्णन अन्वर्थकच होते.

ब्रिटिशपूर्व भारतातील सरंजामशाही अर्थव्यवस्थेचे भांडवलशाही अर्थव्यवस्थेत झालेले रूपांतर हे प्रगतिशील होते. हा क्रांतिकारक चमत्कार होता. त्यामुळे पूर्वीचे जमीनविषयक संबंध, आणि कारागीर वर्ग व हस्तव्यवसाय यांचा ऱ्हास होत होत विनाश पावले. उत्पादन-पद्धती बदलली. जमीनविषयक नवीन संबंध, आणि नवीन आधुनिक उद्योगधंदे यांच्यावर आधारलेल्या नवीन वर्गाचा उदय होऊ लागला. रयतवारी पद्धतीतील शेतकरी, तसेच लहान शेतकऱ्यांबरोबर मोठा शेतकरीही दिसू लागला. दोघांच्या बाबतीत एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे ते जमिनीचे मालक बनले. भारतीय समाजावर ब्रिटिश अमलाचा जो ठसा उमटला त्यामुळे भारतीय समाजाची आर्थिक प्रकृतीच पालटली असे नाही, तर सामाजिक तोंडवळाही पालटला.

खेडेगावातील आर्थिक जीवनाचा भांडवलदारी दृष्टिकोनातून कायापालट होऊ लागला. हस्तव्यवसायाचा विशेषत्त्वाने होणारा ऱ्हास, पैशाचा वाढता उपयोग, निरनिराळ्या जातींचे वाढत चाललेले परस्परावलंबित्व, आर्थिक व राजकीय संबंधात एकता पाहावयाची पददलितांची प्रवृत्ती, थोडक्यात सांगावयाचे म्हणजे, विचारांचे पश्चिमीकरण (पाश्चिमात्य विचारांचा स्वीकार) आणि वरिष्ठ वर्गाचे अनुकरण करण्याने होणारे सांस्कृतिक बदल यांमुळे पूर्वीच्या समाजपद्धतीची विघटना चालू झाली होती. साम्राज्यवादी पिळवणूक जरी चालू होती तरी ब्रिटिशांनी जातिविरहित संस्कृती आणि व्यक्तिस्वातंत्र्याचे विचार भारतात आणले ही निर्विवाद गोष्ट होय.

# २. भारतीय राष्ट्रवाद

आधुनिक भारतातील राष्ट्रवादी आणि स्वातंत्र्याच्या चळवळींचा विचार एकत्रितपणेच करावा लागतो. भांडवलशाही आणि बुद्धिजीवी वर्गाने आधुनिक भारतातील राजकारणात प्रामुख्याने भाग घेतला. हे वर्ग मुख्यतः पाश्चिमात्य राजकीय वाङ्‌मयावर पोसले गेले होते. सुरेंद्रनाथ बानर्जी, लाला लजपतराय, वि. दा. सावरकर हे जोसेफ मॅझिनीच्या विचाराने प्रभावित झाले होते आणि त्यांनी मॅझिनीची चरित्रेही लिहिली. भारतातील नेमस्त (उदारमतवादी) ग्लॅडस्टन, कॉबडेन, ब्राइट, मिल, स्पेन्सर आणि मोर्ले यांचे उद्‌गार सदैव उधृत करीत असत. गांधीजी हे टॉलस्टॉय, रस्किन, एडवर्ड कार्पेंटर आणि सॉक्रेटिस यांच्या विचारांनी प्रभावित झाले होते. बर्गसाँ, हेगेल आणि नीत्शे यांनी आपला ठसा अरविंद घोष आणि इकबाल यांच्यावर उमटविला होता. अमेरिकन, फ्रेंच आणि रशियन राज्यकर्त्यांनी भारतातील राजकीय विचारवंत आणि पुढारी यांच्या विचारांना आकार दिला होता. १९२० नंतर भारतातील देशभक्तांच्या विचारांवर मार्क्स आणि लेनिन यांनी प्रभाव पाडलेला दिसून येतो.[१]

सर्व सामाजिक घटनांप्रमाणे, राष्ट्रवाद हे एक ऐतिहासिक वास्तव आहे. समाजजीवनाच्या एका विशिष्ट अवस्थेत राष्ट्रवाद ही संकल्पना विकसित होत जाते. ई. एच्. कार यांनी म्हटल्याप्रमाणे मध्ययुगाच्या अखेरीपर्यंत आधुनिक राष्ट्र या अर्थाने राष्ट्रे उदयाला आली नव्हती. राष्ट्रवादाची वैशिष्ट्ये खालीलप्रमाणे सांगता येतील :–

(१) समान शासन, (२) सर्व व्यक्तींना एकत्रित करणारे समान विशिष्ट बंध, (३) विशिष्ट भूप्रदेश, (४) इतरांपासून अलग दाखवता येण्यासारखी भाषा, (५) समान हितसंबंध, (६) समान भावना : प्रत्येक देशात निरनिराळ्या स्वरूपात राष्ट्रवाद उदयास येत असतो.

भारतीय राष्ट्रवाद हा आधुनिक प्रकार होय. ब्रिटिश अमलात त्याचा उदय झाला. जागतिक शक्ती आणि ब्रिटिश सत्ता यांच्यामुळे भारतीय समाजात जी अवस्था निर्माण झाली, त्याच्या क्रिया आणि प्रतिक्रिया यांचा परिणाम म्हणजेच भारतीय राष्ट्रवाद. प्रगत अशा ब्रिटिश राष्ट्राने स्वतःच्या स्वार्थासाठी का होईना भारतीय समाजाच्या आर्थिक रचनेत मूलभूत क्रांतिकारक बदल घडवून आणले, केंद्रीभूत राज्याची प्रस्थापना केली, आधुनिक शिक्षणाचा पाया घातला, वाहतुकीची आधुनिक साधने आणली आणि इतर सामाजिक आणि राजकीय संस्था स्थापन करण्यास गती प्राप्त करून दिली. याचा परिणाम असा झाला की नवीन सामाजिक वर्ग उदयास आले आणि अभूतपूर्व अशा नवीन शक्ती उफाळून वर आल्या. त्यांच्या स्वभावाप्रमाणेच या सामाजिक शक्तींचा ब्रिटिश साम्राज्यशाहीशी संघर्ष

झाला, आणि भारतीय राष्ट्रवादाचा उदय आणि विकास यासाठी त्याना प्रेरणा दिली आणि त्याचा पाया घातला.

' ऐतिहासिक क्रमाने विकसित झालेला भाषाप्रदेश, आर्थिक जीवन आणि मानसिक धारणा यांची सांस्कृतिक एकता असलेला स्थिर समाज ' अशी स्टॅलिनने राष्ट्राची व्याख्या केली आहे. उदयोन्मुख भांडवलशाही युगाचे फलित म्हणजेच आधुनिक राष्ट्र होय.

आपल्या राष्ट्रराज्याचे इतर राज्याशी असलेले, तसेच इतर सार्वभौम नसलेल्या राज्यातील जनतेशी असलेले संबंध ठेवण्यात दिसून येणारे भांडवलशाहीचे धोरण म्हणजेच राष्ट्रवाद अशीही त्याची व्याख्या करण्यात आली आहे. भांडवलदारी राष्ट्रवाद हा कामगारवर्गीय आंतर-राष्ट्रीयवादाच्या अगदी विरोधी आहे. इतर राष्ट्रांवर साम्राज्यवाद गाजविणारा आणि पददलित राष्ट्रे तसेच कामगारवर्गात आणि चळवळीत भांडवलदारी शोषण करण्यासाठी भांडवलदारी राष्ट्रवाद हा शोषक वर्गाच्या हातातील एक हत्यार आहे. ' कोणत्याही पददलित राष्ट्राच्या भांडवलदारी राष्ट्रवादाचा आशय लोकशाहीचा असतो आणि तो जुलमाविरुद्ध सरळ सरळ उभा ठाकलेला असतो, हा जो राष्ट्रवादाचा आशय असतो.त्यालाच आम्ही बिनशर्त पाठिंबा देतो ' असे लेनिनने म्हटले आहे.[२]

## राष्ट्रवादाची वाटचाल

१८५७ ते १८८५ पर्यंतच्या कालखंडात भारतात ( विशेषतः महाराष्ट्रात) जे विचारवंत झाले, नवीन काळास अनुसरून त्यांनी जे धोरण स्वीकारले, भारतातील नवीन राजवट व साम्राज्यशाही पिळवणूक यांचा नाश करण्यासाठी त्यांनी जी प्रांगतिक, सनदशीर धोरणे स्वीकारली, त्याचा धावता आढावा येथे घेतला आहे. भारताचा राष्ट्रवाद हा जाती, धर्म, पंथनिरपेक्ष असा विकसित होत होता आणि त्याचा आर्थिक पाया औद्योगीकरण, कापड गिरण्यांची वाढ, पोलाद कारखान्यांचा विकास याद्वारे घालण्यात आला होता. स्वदेशी व बहिष्काराच्या चळवळींमुळे येथील औद्योगीकरणाचा पाया विस्तृत झाला, स्वदेशी कारखानदारीला प्रोत्साहन मिळाले.

भारतात वसाहतवादी अर्थव्यवस्था होती, त्यायोगे ब्रिटिशांचे हितसंबंध वाढीस लागले आणि भारतातील औद्योगीकरणाला त्यायोगे खीळ बसली. पाश्चात्य शिक्षणाचा प्रसार, लोकशाहीसारख्या आधुनिक राजकीय विचारांचा प्रभाव, आधुनिक शास्त्रीय विकास व तंत्र-विज्ञान, सुशिक्षित मध्यम वर्गाची वाढ यांमुळे देशात राजकीय क्रांतीचे वारे वाहू लागले. स्वातंत्र्य, समता व बंधुता आणि इंग्लिश जहालवाद्यांकडून शिकलेला '' प्रतिनिधित्व नाही तर कर नाही '' हा धडा यांमुळे वसाहतवादी अर्थव्यवस्था दृढमूल राहू शकली नाही. ब्रिटिश राजवटीचा भारतीय समाजजीवनावर जो परिणाम झाला त्यातूनच भारतीय राष्ट्रवादाचा जन्म झाला, आणि

जनतेचे वाढते दारिद्र्य व साम्राज्यशाहीची राक्षसी पिळवणूक यांमुळे असंतोष वाढला व हा राष्ट्रवाद अधिकच सतेज व झुंजार बनला.

भारताच्या राष्ट्रवादाच्या आर्थिक पायासंबंधी विवेचन करीत असता डॉ. ताराचंद यांनी खालील निष्कर्ष काढले आहेत. ' भारताचे दारिद्र्य ' हा परकीय राजवटीचा परिणाम होता. '' सरकारात बदल घडवून आणल्याशिवाय आर्थिक परिस्थितीत सुधारणा घडून येणे शक्य नव्हते. म्हणून सरकार बदलण्यासाठी चळवळ करणे अवश्य होते. त्यासाठी प्रातिनिधिक किंवा लोकशाही पद्धती स्वीकारली पाहिजे व भारतीयांच्या हातांत कारभार आणला पाहिजे. आर्थिक प्रश्न महत्त्वाचे, पण त्यांची उत्तरे भारताच्या स्वराज्यप्राप्तीवरच अवलंबून होती.''

भारतीय राष्ट्रवादाच्या उदयासंबंधीची चर्चा आतापर्यंत झाली आहे, त्याचाच सारांश पुढीलप्रमाणे सांगता येईल : (१) ब्रिटिश साम्राज्यशाही वर्चस्व साऱ्या देशावर निर्माण झाले, साम्राज्यशाही पिळणूक झाली आणि एकत्वाची भावनाही निर्माण झाली. (२) भारतीयांचा ब्रिटिशांशी संबंध प्रस्थापित झाला आणि त्याचा भारतावर परिणाम झाला. राष्ट्रवाद व उदारमतवाद यांचे धडे भारतीयांनी युरोपीयनांकडून घेतले. जबाबदार राज्यपद्धती वैचारिक दृष्ट्या स्वीकारण्यात आली. (३) दळणवळणाची साधने विकसित झाली व देशात मुक्त संचार चालू झाला. (४) कवी, विद्वान, धर्मसुधारक यांनी आपले विचार सर्वत्र फैलावले व आपल्या समाजाशी जुळवून घेण्याचा प्रयत्न केला. (५) राममोहन रॉय, देवेंद्रनाथ टागोर, ईश्वरचंद्र विद्यासागर, स्वामी दयानंद, रामकृष्ण परमहंस, विवेकानंद, अशा धार्मिक सुधारकांनी भारताच्या भूतकाळाचे स्फूर्ति-चित्र उभे केले व भावी काळांसाठी लढ्याला प्रोत्साहन दिले. राष्ट्रवाद उभा केला. (६) इंग्लिश व मराठी वर्तमानपत्रांनी लोकांची गाऱ्हाणी पुढे मांडली, राष्ट्रीय जाणीव निर्माण केली. क्रांतिकारक मते तयार होण्यावर झुंजार राष्ट्रवाद अवलंबून होता. (७) देशातील वाढता असंतोष, पिळवणूक, बेकारी, इंग्रजांचे लठ्ठ पगार, भारतीयांना अपमानास्पद वागणूक यांचाही परिणाम झाला. (८) इंग्रजांचे खुल्या व्यापाराचे धोरण या देशाच्या विकासाच्या आडच आले. १८५८ ते १८७६ या काळात भारताचे सार्वजनिक कर्ज दुप्पट झाले. देशात भयानक दुष्काळ पडले. (९) १८५७ पूर्वी युरोपियन भारतीयांशी चांगले वागत, पण बंडानंतर त्यानी जणू सूडच घेतला. त्याचाही परिणाम झाला. (१०) राष्ट्रीयत्वाच्या विकासात इंग्रजी भाषेचाही मोठा वाटा होता. भारतीयांत सर्वांना समान अशी भाषा म्हणून इंग्रजीने काम केले. (११) कॉँझर्वेटिव्ह पक्षाच्या राजवटीत भारतात दडपशाही झाली व भारतीय राष्ट्रीयत्व वाढीस लागले. लॉर्ड लिटनच्या कारकीर्दीत याचा कळस झाला. दुसऱ्या अफगाण युद्धाचा खर्च भारतावरच बसला. इंग्रजी कापडावरील जकातही लिटनने दूर केली आणि भारतीयांवर अन्याय केला. (१२) लॉर्ड लिटननंतर रिपनने काही अन्याय दूर करण्याचा प्रयत्न केला; पण इल्बर्ट बिलाच्या वादाने पुनः वातावरण

गढूळ झाले. युरोपियनाचा खटला हिंदी मॅजिस्ट्रेटपुढे चालवण्याला इंग्रजांचा विरोध होता. या सर्वांचा परिणाम भारतीय राष्ट्रवाद झुंजार बनण्यात झाला.[३]

भारतात राष्ट्रवादाचा उदय होण्यास ज्या वैचारिक भूमिका कारणीभूत झाल्या त्यात राजा राममोहन रॉय, दादाभाई नौरोजी व महादेव गोविंद रानडे यांचे अर्थकारण, समाजसुधारकांचे पुरोगामी विचार, नव्या आलेल्या राजवटीने आणलेला नवीन दृष्टिकोन यांचा अंतर्भाव होता. भाषा, पंथ, चालीरीती यांचे वैविध्य असताना, आपण भारतीय ही भावना त्यांनी वाढीस लावली आणि काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत व कराचीपासून कलकत्त्यापर्यंत सर्व भारत आंदोलून निघाला.

भारतीय राष्ट्रवादाचा विकास जनतेच्या तीन मोठ्या चळवळींच्या लाटेतून दाखवता येईल. त्यातील प्रत्येक लाट पहिलीपेक्षा अधिक प्रभावी होती आणि तिचा चळवळीवर चिरस्थायी परिणाम झाला होता आणि प्रत्येक वेळी चळवळीची अवस्था उन्नत होत होती. चळवळीच्या पहिल्या अवस्थेत मोठा भांडवलदार वर्ग, जमीनमालकातील प्रगतिपर विभाग, नवीन उदयाला येणारा औद्योगिक भांडवलदार आणि समाजातील सुखवस्तु लोकांचा वर्ग भाग घेत असे. १९१४ पूर्वीच्या कालखंडात असंतोषाच्या पहिल्या लाटेत शहरी मध्यमवर्ग भाग घेऊ लागला; पण ती चळवळ श्रमजीवी वर्गापर्यंत पोचलीही नव्हती. पहिल्या काळात अत्यंत संकुचित सामाजिक पाया होता. हिंदी जनतेच्या एका विभागातील वाढत्या राष्ट्रीय लोकशाही जाणिवा त्या काळातील चळवळीत प्रकट होत होत्या.

भारतीय राष्ट्रीय चळवळीच्या दुसऱ्या कालखंडात काँग्रेसमधील उदारमतवादी नेतृत्व होते. दहशतवादी चळवळीच्या रूपाने जनतेतील असंतोष उफाळून वर आला. दहशतवादी तरुणांनी शस्त्रसज्ज होऊन साम्राज्यवादी अधिकाऱ्यांचे खून केले आणि असंतोषाला वाचा फोडली. राजकीय स्वातंत्र्यासाठी सैन्यात बंडाची प्रवृत्ती वाढविण्यासही त्याने कमी केले नाही. तिसरी अवस्था १९०५ ते १९१८ च्या काळात दिसून येते. या काळात उदारमतवादी नेतृत्व (मवाळ) पराभूत झाले आणि त्यांची जागा जहाल पुढाऱ्यांनी घेतली. चळवळीला आव्हानात्मक लढाऊ स्वरूप आले, आणि कनिष्ठ मध्यम वर्ग चळवळीत आल्याने तिचा सामाजिक पाया विस्तृत झाला. युद्धकाळात होमरूलची चळवळ वाढीस लागली, जनतेच्या राजकीय जाणिवा विकसित झाल्या. अनेक कारणांमुळे त्यातील एक विभाग जातीय बनला आणि त्याने जातीय पायावर आपल्या संघटना बांधल्या.

१९३०-३४ काळातील सविनय कायदेभंगाचा लढा चौथी अवस्था दाखवितो. वरिष्ठ व मध्यम वर्गापुरती असलेली चळवळ जनतेपर्यंत पोहोचली. या काळात गांधीजी चळवळीचे पुढारी होते. धर्म व राजकारणाची या काळात गल्लत झाली, राष्ट्रीय चळवळ संभ्रमावस्थेत सापडली; काँग्रेस संघटनेवर भांडवलदारांची पकड बसली आणि त्यांच्या वर्गीय हितसंबंधांशी

राष्ट्रीय चळवळ निगडीत होण्याचा धोका निर्माण झाला. जातीय भावनाही वाढीस लागली. रजनी पाम दत्त यांनी भांडवलदारांचे डावपेच वर्णन करताना म्हटले आहे की, साम्राज्यशाहीशी सहकार्याचा पवित्रा घेण्याऐवजी जनतेशी सहकार्य करून त्यांच्या मागण्यांना पाठिंबा देऊनच भांडवलदारांना साम्राज्यशाहीशी सौदा करता येईल.

थोडक्यात सांगायचे म्हणजे, भारतीय राष्ट्रवाद नुसता ब्रिटिशविरोधी नव्हता; तर तो विकास पावत असताना साम्राज्यवादविरोध, वसाहतवादविरोध, भांडवलशाहीला विरोध अशी वळणे त्याने घेतली. भारताने राष्ट्रीय प्रश्नांबरोबरच आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन ठेवून, जागतिक साम्राज्यवादविरोधी लढ्याचा भाग म्हणूनच भारताचा राष्ट्रवाद उभा राहिला आहे, राहणार आहे या जाणिवेमुळे भारतीय स्वराज्याचा लढा हा निव्वळ राजकीय न राहता त्याला सर्वंकष स्वरूप आले. १९३४ नंतरच्या भारताची वैचारिक घडण पूर्वीच्या पायावर झाली; पण त्यात फॅसिझमविरोध हा नवा विचार आला. सोव्हिएट युनियनशी सहकार्य व नियोजित अर्थव्यवस्था हा विचार भारताने स्वीकारला. या सर्वांच्या विचारमंथनातून भारतीय राष्ट्रवाद साकार झाला.

भारतातील समाजसुधारणेची चळवळ ही नवनवीन पंथांच्या उदयाने सुरू झालेली असल्याचे दिसून येईल. या नवीन पंथांचे प्रवर्तक व्यक्तिस्वातंत्र्याच्या विचाराने प्रभावित झाले होते. तसेच संसदीय पद्धतीवर दृढ विश्वास आणि कायदा व परमेश्वर यांच्यापुढे सर्वांना समान अधिकार आहेत असे त्यांचे निश्चित मत होते.

**(१) राजा राममोहन रॉय (१७७४-१८३३) :** भारतात कायद्यांचे अधिराज्य यावे यासाठी रॉय सिंहासारखे लढले. सामाजिक सुधारणेच्या क्षेत्रात पाहिले तर उपयुक्ततावाद्यांच्या विचारांनी ते प्रभावित झाले होते. केवळ जगातील राष्ट्रे स्वतंत्र होण्याने भारतीय राष्ट्रवाद वाढीला लागणार नाही यावर तसेच लोकशाहीवर त्यांचा दृढ विश्वास होता. पहिल्या सुधारणा कायद्याला त्यांनी जो पाठिंबा दिला त्यावरून हे उघड होते. वृत्तपत्रस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य यांसारख्या लोकशाही हक्कांसाठी ते लढायला उभे राहिले आणि देशाच्या प्रशासनात जनतेचा सहभाग पाहिजे, जनतेचा आवाज ऐकू आला पाहिजे अशा मागण्या त्यांनी पुढे मांडल्या. ' मुक्त व्यापार ' या कल्पनेला त्यांनी विरोध केला. ते जमीनदारी पद्धतीचे पाठीराखे असले तरी बलिष्ठ जमीनदाराविरुद्ध निराधार शेतकऱ्यांचे-कुळांचे संरक्षण करणे हे सरकारचे कर्तव्य आहे अशी त्यांची धारणा होती. रयतेवरील खंड वाढवण्याचा जमीनदाराचा हक्क नेस्तनाबूद केला पाहिजे असे त्यांनी सुचविले होते. राष्ट्रीय ऐक्याचा त्यानी सतत ध्यास घेतला होता, कलकत्त्यात संस्कृत कॉलेज काढण्याला त्यांनी विरोध केला व संस्कृतपेक्षा पाश्चात्त्य शिक्षणाचा आग्रह धरला, तरी त्यांचा संस्कृतचा व्यासंग गाढा होता. वेदान्त सूत्रावरील शांकरभाष्याचे त्यांनी बंगालीत भाषांतर केले. उपनिषदांच्या इंग्रजी भाषांतराला

प्रस्तावना लिहिल्या. त्यांनी मूर्तिपूजेवर टीका केली होती, भूतदया आणि परस्परांशी परोपकार-बुद्धीने वागणे हा ईश्वरवंदनाचा मार्ग आहे असे त्यांना वाटत होते. मिशनऱ्यांकडून होणाऱ्या टीकेला सरकारने प्रतिबंध करावा अशी त्यांची मागणी होती. त्यांनी एकेश्वरी वादाचा स्वीकार केला होता. सती, बालहत्या यांना त्यांनी विरोध केला होता. ते विचारस्वातंत्र्याचे पुरस्कर्ते होते.

फ्रेंच राज्यक्रांतीबद्दल त्यांना फार प्रेम होते, पण ब्रिटिश सत्तेचा विनाश व्हावा असे त्यांचे मत नव्हते. इंग्रजांच्या कृपाछत्राखाली स्थानिक स्वराज्यसंस्थांत भारतीयांना वाढत्या प्रमाणात प्रतिनिधित्व मिळावे अशा मागण्या त्यांनी केल्या. ब्रिटिश भांडवलाच्या मुक्त आयातीचा पुरस्कार त्यांनी केला.

रॉय यांनी मध्ययुगीनतेविरुद्ध संघर्ष केला. नव्या घडामोडींचा फायदा घेऊन जो मध्यम व्यापाऱ्यांचा व सुशिक्षित अधिकाऱ्यांचा वर्ग पुढे येत होता त्यातून राजकीय लोकसत्तेचा लढा देणारा वर्ग तयार होईल आणि इंग्लंडमध्ये ज्याप्रमाणे लोकनियंत्रित राजसत्ता स्थापन झाली तशी ती येथेही होईल असा रॉय यांचा विश्वास होता. ते लंडनला गेले ते मोगल बादशहाची वकिली करण्यासाठी. राजा राममोहन यांना ' नवीन संस्कृतीचा आघाडीचा सैनिक ' असे म्हटले जाते. त्यांनी लंडनमध्ये भारताची जमीनदारी महसूल पद्धती, न्यायपद्धती, भारताची स्थिती तसेच प्रेस कायदा याबाबतही निवेदने सादर केली. त्यांची विचारसरणी जातिधर्मनिरपेक्ष होती. युरोपीयन बुद्धिवाद आणि उदारमतवादावर त्यांच्या धार्मिक निष्ठा आधारित होत्या. विश्वधर्म या संकल्पनेचे ते एक मूळ प्रवर्तक होते. ते मानवतावादी व आंतरराष्ट्रीवादी होते. ' मानवजातीच्या सेवेसाठी आत्यंतिक प्रेमाने आणि उत्कटतेने प्रशंसनीय सहयोग केलेला,[४] असे वर्णन करून बेंथॅमने त्यांना अभिवादन केले आहे.

**(२) विवेकानंद (१८६३-१९०२) :** राजा राममोहन रॉय यांनी ब्राह्मो समाजाची स्थापना करण्यात पुढाकार घेतला. त्यांच्या मृत्यूनंतर देवेंद्रनाथ ठाकूर अणि केशवचंद्र सेन यांनी ब्राह्मो समाजाचे काम पुढे चालू ठेवले. केशवचंद्रानी ब्राह्मो समाजास खिस्ती वळणावर नेण्यास सुरुवात केली, पण १८७५ नंतर ते रामकृष्ण परमहंस यांच्याकडे आकर्षिले गेले. रामकृष्णांनी ब्राह्मो समाजाकडून सुशिक्षितांचे लक्ष वेदान्ताकडे खेचण्यात मोठेच यश प्राप्त केले. १८८६ मध्ये रामकृष्णांचे निर्वाण झाले. नंतर त्यांच्या विवेकानंदादि शिष्यांनी ' रामकृष्ण मिशन ' ही संस्था स्थापन केली आणि सनातन हिंदू धर्माच्या आधारावर व्यापक विश्वधर्माचा संदेश देणे, अद्वैतवेदान्त हा भौतिक प्रगतीने खोटा ठरू शकत नाही अशी लोकांची खात्री करून देणे, वेदान्ताला कर्मप्रवण व प्रगतिपर बनवणे, खिस्ती मिशनप्रमाणे धर्माचरणांत लोकसेवेला प्राधान्य देणे आणि धर्माच्या प्रेरणेवर राष्ट्रभक्तीची व स्वाभिमानाची

ज्योत पेटवून पारतंत्र्याविरुद्ध क्रांतिकारक वृत्ति फैलावणे असे बहुविध कार्य रामकृष्ण मिशनने केले.

बंगालमधील राष्ट्रवादाचा तात्त्विक आणि व्यावहारिक पाया नैतिक दृष्टीने उंचावण्याच्या आणि दृढ करण्याच्या बाबतीत स्वामी विवेकानंदांचे विचार मार्गदर्शक झाले होते. प्रबल आणि चिरस्थायी राष्ट्रवाद धार्मिक पायावर प्रस्थापित करता येईल अशी त्यांची धारणा होती; पण त्यांच्यावर जातीयवादाचा वा पंथवृत्तीचा आरोप करता येणार नाही. नैतिक आणि आध्यात्मिक विकासाची शाश्वत तत्त्वे म्हणजेच धर्म असे ते मानीत. विवेकानंदांनी विश्वबंधुत्वाचा पुरस्कार केला. ' आय ॲम ए सोशॅलिस्ट ' यांत ते म्हणतात, ' कामगारांनी जर काम बंद केले तर तुमचा अन्न, वस्त्र यांचा पुरवठा थांबलाच म्हणून समजा. . . आतापर्यंत यासारखे त्यांच्याकडून काम करून घेतले असून चाणाक्ष, सुशिक्षित वर्गाने त्यांच्या श्रमाचे, त्यांच्या घामाचे, त्यांच्या रक्ताचे फळ लुबाडले आहे. . . . काही गुण त्यात नाहीत असे कुणाला वाटले तरीसुद्धा युगाच्या नाविन्यासाठी समाजवादी पद्धती पसंत केलीच पाहिजे. '[५] आपली समाजपद्धती शोषक आहे असे त्यांनी कंठरवाने सांगितले आहे. '' गांधीजींची दरिद्रीनारायणाची कल्पना घ्या, माणसाला आधी भाकरी मग धर्म ही धर्माची पुरोगामी कल्पना घ्या; सर्वधर्मसमत्व अथवा धर्मनिरपेक्ष राज्याची कल्पना घ्या, देशाला प्राणवत अशा हिंदू-मुस्लिम ऐक्याची कल्पना घ्या, किंवा आधी जगत्, आधी मानवता मग राष्ट्र, मग देश ही विश्वशांतीच्या पायाभरणीची कल्पना घ्या, भारतीय परंपरेला धरून असलेल्या या सर्व कल्पना प्रथम विवेकानंदानीच भारताला दिलेल्या आहेत.'' रशियन अराज्यवादी क्रोयोटकिन यांना ते भेटले होते. एका व्याख्यानात ते म्हणाले ' समाजवाद, राज्यवाद, वा उच्छेदवाद (निहीलिझम) आणि असे पंथ हे जी सामाजिक क्रांति होणार आहे त्याचे अग्रदूतच आहेत. '[६]

**(३) महर्षि दयानंद सरस्वती (१८२४-१८८३) :** बंगालमध्ये ज्या प्रकारची विचारक्रांती चालू होती, तशाच प्रकारची एक विचारक्रांती या सुमारास किंवा थोडी आधी पंजाबात चालू होती. स्वामी दयानंद सरस्वती हे त्या विचारांचे प्रवर्तक. मोर्वी संस्थानातील टंकारा या गावी काठेवाडात एका ब्राह्मण कुलात त्यांचा जन्म झाला. त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव मूळशंकर. एका शिवरात्री महादेवाच्या देवळात देवापुढे ठेवलेला प्रसाद एका उंदराने खाल्ला हे पाहून देवाच्या मूर्तीत काही सामर्थ्य नसते व मूर्तिपूजा करणे शहाणपणाचे नाही असा विचार त्यांच्या मनात उद्‌भवला. त्यांचा विवाह करण्याचा माता-पित्यांनी प्रयत्न केला तेव्हा ते घराचा त्याग करून पळून गेले आणि त्यांनी संन्यासदीक्षा घेतली. ते प्रथमतः ब्राह्म समाजाच्या व त्याच्या शाखांच्या सहकार्यानेच धर्मप्रचाराचे व धर्मसुधारणेचे कार्य करीत असत, पण १८७५ साली त्यांनी मुंबईस ' आर्यसमाज ' हा स्वतंत्र संप्रदाय स्थापन केला व त्याचीच शाखा १८७७ साली पंजाबात काढली. लाला हंसराज, स्वामी श्रद्धानंद, लाला लजपतराय या तीन श्रेष्ठांनी पंजाबात या संप्रदायाचे काम फार वाढविले.

परमेश्वराच्या शुद्ध स्वरूपाचे ज्ञान वेदांत असून वेदांचे अध्ययन करणे हे प्रत्येक हिंदुमात्राचे कर्तव्य आहे, वेदाध्ययनाचा हक्क सर्व मनुष्यमात्रांना आहे, वेदप्रामाण्य सर्वांनी मानले पाहिजे, चातुर्वर्ण्य हे जन्मसिद्ध नसून गुणकर्मावर अवलंबून असावे आणि ज्याच्या अंगी ज्या वर्णाचे गुण असतील त्याला त्या वर्णाचा अधिकार प्राप्त व्हावा, धर्माचे दरवाजे सर्वांना खुले असावेत व शुद्धीकरणाने वैदिक धर्मात कोणासही प्रवेश मिळावा ' कृण्वन्तो विश्वमार्यम् '– हे घोषवाक्य असावे असे त्यांचे विचार होते. आर्यसमाजाने खिस्ती व मुसलमान धर्मप्रचारकांचा कडवेपणा आणि आक्रमक वृत्ती हिंदू लोकांत बाणविण्याचा प्रयत्न केला. मूर्तिपूजा, बालविवाह, स्त्रीदास्य, जन्मसिद्ध अस्पृश्यता वगैरे हिंदू समाजातील दोषांविरुद्ध त्यांनी हल्ले चढवले.

**(४) दादाभाई नौरोजी (१८२५-१९१७) :** १८५२ च्या बॉम्बे असोसिअेशनपासून दादाभाईंच्या राजकीय जीवनाला खरा प्रारंभ झाला. उद्योग-विचारांशी ओळख व इंग्लंडमध्ये वास्तव्य झाल्यामुळे आधुनिक विचारांशी त्यांचा परिचय झाला होता. त्यामुळे त्यांच्या पिढीतील व नंतरच्या मेहता, वाच्छा, गोखले यांच्यापेक्षाही ते जहाल होते. स्वदेशी, स्वराज्य, बहिष्कार हा मंत्र त्यांनी राष्ट्राला दिला. फ्रेंच राज्यक्रांतीच्या स्वातंत्र्य, समता, बंधुता यांनी भारलेले दादाभाई १९०४, १४ ते २० ऑगस्टच्या ॲमस्टरडॅमच्या आंतरराष्ट्रीय समाजवादी परिषदेला हजर होते.

१८५३ ते १९०६ पर्यंतच्या हिंदी राजकारणाचा पाया ब्रिटिश न्यायदेवतेवरील विश्वास हा होता, आणि ब्रिटिश साम्राज्यात राहून ब्रिटिश प्रजाजनांच्या बरोबरीचे नागरिकांचे हक्क अथवा साम्राज्यांतर्गत स्वराज्य प्राप्त करून घेणे हे त्यांचे अंतिम साध्य होते. हेच ध्येय त्यांनी १९०६ साली अगदी उघडपणे राष्ट्रसभेपुढे मांडले. या दृष्टीने देशाच्या राजकीय व आर्थिक स्थितीचा अभ्यास करून त्यास प्रगतीच्या वाटेवर नेण्यासाठी राजकीय जागृतीचा सामुदायिक मार्ग स्वीकारणारे पहिले नेते म्हणजे दादाभाई.

हिंदी स्वराज्य हा केवळ वरिष्ठ वर्गाच्या स्वाभिमानाचा किंवा संस्कृतिरक्षणाचा अथवा वैभवाचा प्रश्न नसून तो सामान्य जनतेतील कोट्यवधी जीवांच्या पोटाचा प्राणधारणेचा आणि क्लेशरहित व रोगरहित जीवनाचा प्रश्न आहे याची जाणीव हिंदी लोकांच्या मनावर जर प्रथम कोणी ठसवली असेल तर ती दादाभाईंनीच होय. आर्थिक साम्राज्यशाही म्हणजे काय आणि एका राष्ट्राने दुसरे राष्ट्र जिंकले असता जिंकलेल्या राष्ट्राचे किती प्रकारे रक्तशोषण होते, याची बरोबर कल्पना दादाभाईंनी आणून दिली. १८५१ ते १८७१ या कालखंडात हिंदुस्थानच्या द्रव्याचे शोषण कोणत्या प्रकारे चालू होते आणि त्यामुळे हिंदी जनता किती दरिद्री झाली, याचा त्यांनी बरोबर अंदाज केला, आणि हे शोषण थांबल्याखेरीज

जनतेचा उद्धार होणार नाही असा सिद्धान्त मांडला. हिंदुस्थानात भांडवल साठत नाही याचे मूळ कारण हा परदेशात जाणारा द्रव्याचा ओघच होय असे दादाभाई म्हणत असत. त्यामुळे देशात युरोपियन भांडवलवाले व व्यापारी येतात तेही आपल्या देशाची अधिक लूटच करतात असे त्यांना वाटे. देशातून सर्व पैसा लुबाडून इंग्लंडात नेण्यात येतो, त्यातील काही भाग भांडवलाच्या रूपाने परत येतो व लोकांची अधिक लूट करून अनेक पटींनी परत विलायतेस जातो असे हे रक्तशोषणाचे कालचक्र एकसारखे चालू असते. '' हिंदुस्थानला ब्रिटिश भांडवलाची अत्यंत जरुरी आहे, पण त्याला ब्रिटिशांचे केवळ भांडवलच हवे आहे, ब्रिटिशांनी आपल्या भांडवलासहित या देशावर स्वारी करावी आणि भांडवलाबरोबर त्याच्या साह्याने निपजणारे धनही त्यांनीच खाऊन टाकावे हे त्याला नको आहे '' असे त्यांनी भारतीय दुष्काळ कमिशनला दिलेल्या निवेदनात म्हटले होते. इंग्रजांचे साम्राज्य हिंदी लोकांच्या पैशावर व रक्तावर उभे असल्याचे त्यांनी म्हटले असून हिंदुस्थानातील लक्षावधी जनतेचे जीवन म्हणजे अर्धपोटी जगणे, उपासमारीने मरणे अथवा दुष्काळाने किंवा रोगाच्या साथीने मरणे असेच असल्याचा अभिप्राय त्यांनी व्यक्त केला होता. आर्थिक रक्त शोषणाऱ्या व राजकीय स्वराज्याच्या मानाने त्यांना सामाजिक व औद्योगिक चळवळी गौण वाटत असत. सर्वात महत्त्वाचा प्रश्न जनतेच्या दारिद्र्याचा व उपासमारीचा असून त्यावर एकच उपाय म्हणजे स्वराज्य असा विचार त्यांनी आग्रहाने मांडला.

दारिद्र्याचा तपशीलवर विचार करून दरडोई उत्पन्न निश्चित करण्याचा पहिला प्रयत्न दादाभाईंनी केला. या त्यांच्या विवेचनाने हिंदी राष्ट्रीय चळवळीला आर्थिक बैठक दिली. हिंदी राष्ट्रवादाचे ते जनक होते. ते नेमस्त व जहाल यांना सारखेच मान्य होते. त्यांनी भारतीय राष्ट्रवादाची गंगा आणली.

भरमसाट जमीनमहसूल हा या देशाच्या दारिद्र्याला कारणीभूत होतो असे रमेशचंद्र दत्त म्हणत. दत्त हे जमीनमहसुलावर भर देतात, लुटीचा विचार करीत नाहीत अशी टीका दादाभाई करीत. तेव्हा दोन्हीही दरिद्री करतात असा खुलासा रमेशचंद्रांनी केला होता.

दादाभाईंचा राष्ट्रसभेशी तिच्या स्थापनेपासून संबंध होता. १८८६, १८९३ व १९०६ या वर्षी ते राष्ट्रसभेचे अध्यक्ष होते. ते ब्रिटिश पार्लमेंटवरही निवडून आले होते. पार्लमेंटवर भारतातून प्रत्यक्ष प्रतिनिधी निवडून जावेत असा विचार त्यांनी मांडला होता. अखेरपर्यंत त्यांचा ब्रिटिशांच्या न्याय्य बुद्धीवर विश्वास होता. १९०६ च्या त्यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनात स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य यांविषयी प्रस्ताव संमत झाले होते. '' पॉव्हर्टी अँड अनब्रिटिश रूल इन इंडिया '' हा भारताच्या दारिद्र्याची मूलभूत मीमांसा करणारा त्यांचा ग्रंथ त्यांच्या अभ्यासाची साक्ष देतो. दादाभाई व कार्ल

मार्क्स एकाच वेळी ब्रिटिश म्युझियममध्ये अभ्यास करीत होते. त्या वेळी त्यांची भेट झाली असती तर अधिक चांगले झाले असते, असे वाटल्याविना राहात नाही.

**(५) म. गो. रानडे (१८४२-१९०१) :** भारतातील धार्मिक चळवळी बाजूला ठेवल्या तरी महाराष्ट्रात सामाजिक, राजकीय सुधारणेची चळवळ १९व्या शतकाच्या उत्तरार्धात सुरू झालेली दिसून येईल. महादेव गोविंद रानडे, दादोबा पांडुरंग, लोकहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी, ज्योतिबा फुले ही नावे समाजसुधारकांत अग्रभागी झळकत होती. रानडे यांचा सामाजिक दृष्टिकोन खालील शब्दांत सांगता येईल. '' नियंत्रणाकडून स्वातंत्र्याकडे, भोळेपणाकडून निष्ठेकडे, सामाजिक दर्जाकडून कराराकडे, अधिकाराकडून बुद्धिवादाकडे, असंघटित जीवनाकडून संघटित जीवनाकडे, फाजील अभिमान किंवा हटवादाकडून सहनशीलतेकडे आणि आंधळया दैववादाकडून मानवी प्रतिष्ठेच्या जाणिवेकडे–आपला हा नवीन बदल झाला पाहिजे. मला जी सामाजिक क्रांती अभिप्रेत आहे ती हीच. ही क्रांति आपल्या समाजांत आणि व्यक्तीतहि घडून आली पाहिजे.''[७] व्यक्तिस्वातंत्र्याचा उद्‌घोष, बुद्धिवाद, दुरभिमानाचा निरास, मानवी प्रतिष्ठा यांचे मंजुळ घोष त्यांना पाहिजे होते आणि त्याचबरोबर आंधळा दैववाद आणि भोळेपणा हे दोष त्यांना पैलतीरी पाठवायचे होते.

१८५८ चा राणीचा जाहीरनामा, विद्यापीठांची स्थापना, ईस्ट इंडिया कंपनीकडून ब्रिटिश मंत्रिमंडळाकडे हिंदी राज्यसूत्रांचे संक्रमण आणि १८६१ च्या कायदेमंडळाच्या सुधारणा-कायद्याने काही बिनसरकारी सभासदांची कायदेमंडळात नेमणूक यांमुळे सुशिक्षित पिढीच्या अंत:करणात राजनिष्ठेचे पुनरुज्जीवन होत होते, अशा कालखंडात रानडे उदयाला आले. टिळकांच्या भाषेत सांगायचे म्हणजे ' थंड गोळ्याला ऊब आणण्याचे कार्य ' त्यांनी केले. गणेश वासुदेव जोशी ऊर्फ सार्वजनिक काका यांच्या सहाय्यानें त्यांनी सार्वजनिक कामात चैतन्य ओतले. त्यांनी १८७२ व १८७३ साली स्वदेशी उद्योगधंद्यांच्या ऱ्हासावर आणि त्यांच्या उन्नतीच्या उपायासंबंधी दोन व्याख्याने दिली. यांत त्यांनी दादाभाईंच्या सिद्धांताचाच पाठपुरावा केला आणि सामाजिक भांडवलाच्या मंडळया स्थापून कारखान्यांची वाढ करण्यावर भर दिला. सार्वजनिक काका हातसुताची व हातविणीची खादी स्वतः तयार करून वापरीत. त्यांनी स्वदेशीची दुकाने काढली व संरक्षक जकातीचें तत्त्व अवलंबण्यास सरकारला सुचवून स्वदेशी उद्योगधंद्यांना संरक्षण देण्याचा पुरस्कार केला. त्याना दादाभाईंचा ' ड्रेन ' सिद्धांत मान्य नव्हता. शेतीवरील भार कमी करण्याकरता शेतीच्या दाट लोकवस्तीच्या प्रदेशातून विरळ लोकवस्तीच्या प्रदेशात माणसे हलवावीत अशी त्यांनी सूचना केली होती.

रानडे प्रकृतीने प्रागतिक, उदारमतवादी होते पण त्यांनी अनिर्बंध अर्थव्यवस्थेचा पुरस्कार केला नव्हता. '' संपत्तीची निपज झाल्यावर मूठभर प्रबळ लोक व बहुसंख्य गरजवंत यांच्यामध्ये तिची विभागणी करतानाही याच तत्त्वाचा म्हणजे न्यायाचा व समबुद्धीचा अवलंब

केला पाहिजे आणि समाजजीवनांतील सर्व व्यवहारासंबंधीचे जुन्या अर्थशास्त्राचे सिद्धांत निर्दोष न समजता त्यांचा फेरविचार करणे भाग आहे '' असे त्यांचे विचार होते.

ऐतिहासिक घडामोडींकडे परमेश्वरी हेतूंच्या चष्म्यांतून पाहण्याची त्यांची स्वाभाविक मनोवृत्ति असून प्रत्येक वाईट गोष्टीतूनही काहीतरी चांगले निर्माण होत असते, अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. ब्रिटिश राज्यकर्त्यांनी हिंदी लोकांना समानतेने वागवावे आणि हिंदी लोकांनी ब्रिटिश साम्राज्याशी एकनिष्ठ राहावे असे त्यांचे राजकीय तत्त्वज्ञान होते. रानडे प्रागतिक होते तसे नेमस्तही होते. प्रागतिकत्व म्हणजे वंशभेद किंवा धर्मभेद न मानता मनुष्यामनुष्यांत समानता व न्याय प्रस्थापित करणे असा अर्थ ते करीत. नेमस्त या शब्दाने फार दूरच्या ध्येयाकडे लक्ष न देता पावलापुरते पाहून काम करीत राहणे आणि हे काम करीत असता तडजोडीची व उभयपक्षी देवाणघेवाणीची समंजस वृत्ति धारण करणे असा याचा अर्थ ते लावीत होते.

इंग्लंडातील लिबरल पक्ष रानडे यांच्यापुढे आदर्श म्हणून होता. हिंदी प्रगतीला विरोध करणाऱ्या मोठ्या धनिकांचा वर्ग हाच हिंदी राजकारणातील कॉंझर्वेटिव्ह पक्ष असून अल्पसंख्य सुशिक्षित हिंदी वर्ग, त्याची वृत्तपत्रे व त्याच्या संस्था आणि नेणतेपणी त्यांना पाठिंबा देणारी हिंदी जनता यांच्या संघटनेतूनच हिंदुस्थानात खरा प्रागतिक म्हणजे लिबरल पक्ष निर्माण होईल, असे रानडे यांचे मत होते. जहाल राजकारणाचा उदय होऊ लागण्याची चिन्हे दिसू लागताच रानडे यांनी आपल्या नेमस्त प्रागतिक पक्षाची तत्त्वे आखून घेतली व त्याला सार्वजनिक सभेहून भिन्न असे डेक्कन सभेचे अधिष्ठान निर्माण केले. (कारण पुण्याची सार्वजनिक सभा जहालानी काबीज केली होती). ब्रिटिश पार्लमेंटात हिंदी प्रतिनिधी असावेत अशी मागणी करणारा एक अर्ज पार्लमेंटच्या सभासदांकडे पाठवण्यात आला. १८७६-७७ साली महाराष्ट्रात दुष्काळ पडला तेव्हा दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांना साह्य करण्याचे आणि शेतकऱ्यांची गाऱ्हाणी सरकारपुढे ठेवून त्यांची दाद लावण्यातही त्यांनी पुढाकार घेतला. शेतकऱ्यांची दाद लावण्याची चळवळ भारतात प्रथमच सार्वजनिक सभेने केली व त्याला रानडे यांची प्रेरणा होती. १८७७ ला दिल्लीला मोठा दरबार भरणार होता, त्यात एक प्रतिनिधी पाठवून भारतीय सम्राज्ञीला (व्हिक्टोरिया राणीला) एक मानपत्र समर्पण केले आणि या मानपत्रात हिंदी जनतेचे हक्क आणि हिंदी राष्ट्राच्या अंतःकरणातील राजकीय आकांक्षा व राजनिष्ठा पण स्पष्ट भाषेत राज्यकर्त्यांना सार्वजनिक सभेने सादर केल्या, भारतीय ऐक्याची व हिंदी पार्लमेंटची कल्पना मांडली आणि निरनिराळया प्रांतातून आलेल्या राजकीय कार्यकर्त्यांना राष्ट्रीय सभेची कल्पना सुचविली. हे काम करण्यासाठी खादी वेशधारी सार्वजनिक काकांना पाठविण्यात आले होते. '' हिंदी लोकांना ब्रिटिश राष्ट्राच्या बरोबरीचा राजकीय व सामाजिक दर्जा प्राप्त करून द्या आणि जबाबदारीचे हक्क उपभोगून हिंदी लोकांना स्वावलंबी व पुरुषार्थी बनविण्याचे शिक्षण द्या '' अशी मागणी त्यांना करण्यात

आली होती. काकांनी राजेरजवाड्यांना उद्देशून भाषण केले. सुरेंद्रनाथ बानर्जी हेही त्या वेळी तेथे आले होते व राष्ट्रीय सभेची कल्पना आपणास तेथे प्रथम सुचली असे त्यांनीही म्हटले आहे. १८५८ च्या राणीच्या जाहीरनाम्याला '' मॅग्नाचार्टा '' असे संबोधण्यात आले होते. ब्रिटिश '' मॅग्नाचार्टा '' विजयशाली सरदारांनी पराभूत राजाकडून लिहून घेतलेला करार होता, तो मोडल्यास राजाचे पारिपत्य करण्याची स्पष्ट योजना त्यात ग्रथित झाली होती व ही उपाययोजना अमलात आणण्याची शक्ति ब्रिटिश सरदारांपाशी भरपूर होती. राणीचा जाहीरनामा म्हणजे बंडखोर सैनिकांचे कंबरडे मोडून विजयशाली झालेल्या राणीने आपल्या राजनिष्ठ प्रजेला व दुर्बल संस्थानिकांना दिलेले कोरडे आश्वासन होते.

राजा राममोहन रॉय व रानडे यांचा पिंड धार्मिक होता. धर्मात सुधारणा करून मूर्तिपूजेपासून लोकांना परावृत्त करून निर्गुण, निराकार अशा परमेश्वराच्या चिंतनाचा व भक्तीचा पंथ शोधावा असा दोघानाही ध्यास होता. रानडे यांनी अनेक कमिट्यांकडे निवेदने पाठवली, त्यांनी फार उपयोग होत नाही अशी टीका करणाऱ्यांना त्यांनी ' अर्ज सरकारला अनुलक्षून असले तरी ते लोकशिक्षणासाठी असतात ' असे उत्तर दिले होते. राजकीय स्वातंत्र्य हे सामाजिक स्वातंत्र्याखेरीज पुरे होणार नाही व अखेरीस या दोन्हींचे अधिष्ठान मानवाची सर्वांगीण सुधारणा हे आहे अशी त्यांची धारणा होती. ते धर्मनिष्ठ असले तरी स्वदेश व संस्कृतीचा तीव्र अभिमान ही त्यांच्या पंथाची प्रेरणा नव्हती.

रानडे यांचे विचार जमीनदारवर्गास पोषक होते. जमीनदार व खोत यांच्या राजकीय हक्कांवर निर्बंध आणणे त्यांना मान्य नव्हते. त्यांना कायमधारा पद्धती मान्य होती; पण जमीनदारी मान्य नव्हती. ते औद्योगिक संस्कृतीचे प्रवक्ते होते, त्यांनी भांडवलशाहीच्या दोषाकडे लक्ष दिले नाही. ' नियोजनाचे पहिले भारतीय पुरस्कर्ते ' असे रानडे यांचे चरित्रकार प्रा. डी. जी. कर्वे यांनी त्यांचे वर्णन केले आहे. प्रागतिक पुढारी दिनशा वाच्छा यांनी ' सॉक्रेटिसासारखे विद्वान व त्यांच्यासारखे साधे ' अशा शब्दात त्यांचा गौरव केला होता. डॉ. आंबेडकर यांनी ' रानडे, गांधी व जीना ' या ग्रंथात रानडे यांच्या विद्वत्तेचे, दूरदृष्टीचे मुक्त कंठाने वर्णन केले आहे.

१८८० नंतर रानडे यांची प्रागतिक विचारसरणी व दादाभाईंचा साम्राज्यशाहीच्या लुटीचा शोषण सिद्धान्त घेऊन पुढे जाणारी विचारसरणी यांत संघर्ष आला. महाराष्ट्रातील राजकारणात पुढे आलेली जहाल व मवाळ ह्या संघर्षाची बीजे येथे पडलेली दिसतील.

जर्मन आदर्शवादी फ्रेडरिक लिस्ट यांच्या विचारांशी त्यांचे विचार मिळतेजुळते होते. औद्योगिकीकरणात शासनाचा पुढाकार, आर्थिक जीवनाची योजनाबद्ध आखणी, समाज-सुधारणेसाठी कायदा आणि संरक्षण यांचा त्यांनी हिरीरीने पुरस्कार केला. भारतीय इतिहासात आणि राजकारणात रानडे यांना देशभक्तीचे प्रेषित समजण्यात येते. तसेच

स्वातंत्र्य, सामाजिक प्रगती, वैयक्तिक चारित्र्याची पुनर्स्थापना या विचारांचे ते उद्‌गाते तसेच उन्नत भारतीय राष्ट्रवादाचे ते मार्गदर्शक समजले जातात.

पुण्याला सार्वजनिक सभा २ एप्रिल १८७० ला स्थापन झाली. रा. ब. नूलकर व सीताराम हरी चिपळूणकर हे तिचे संस्थापक होते. रानडे, गोखले व टिळक यांनी त्या संस्थेचे नेतृत्व केले.

सभेतर्फे पहिला सार्वजनिक अर्ज त्या वेळी महाराष्ट्रात पडलेल्या दुष्काळासंबंधी होता. जहाल-मवाळ वादात तिचे पुढारीपण १८९५ साली टिळकांकडे आले, म्हणून रानडे यांनी ४ नोव्हेंबर १८९६ रोजी डेक्कन सभा स्थापन केली व गो. कृ. गोखले तिचे चिटणीस झाले. याच डेक्कन सभेतर्फे गोखले यांची वेल्बी कमिशनपुढे साक्ष झाली.

ईस्ट इंडिया कंपनीची सत्ता पार्लमेंटच्या हातात जाण्यापूर्वी व गेल्यानंतर अल्पावधीतच सुशिक्षित वर्गाने लोकमत संघटित करण्यास प्रारंभ केला आणि प्रशासनाचे दोष व उणिवा दाखवण्यास त्यानी सुरुवात केली. चळवळीचे पाश्चात्य मार्ग आत्मसात् केले आणि भारत सरकार व पार्लमेंट या दोहोंचे लक्ष वेधावयास पाहिजे हे त्यांनी ओळखले. १९ व्या शतकाच्या द्वितीयार्धात काँग्रेसच्या स्थापनेपर्यंत (१८८५) एक कालखंड व नंतरचा दुसरा. पहिल्या कालखंडात असंघटित, प्रेरणाहीन अशी चळवळ होती. यात मध्यम वर्ग दुबळा होता. त्यात एकता नव्हती आणि कार्यक्रमात योजना नव्हती. दुसऱ्या कालखंडात चळवळ संघटित झाली आणि स्वराज्यप्राप्ती हे ध्येय बनले. अशी ही सार्वजनिक सभा रानडे यांनी जोपासली.

वर वर्णन केलेल्या निरनिराळ्या संस्थांनी राजकीय जागृति करून जनमत संघटित करण्याचा प्रयत्न केला. याच कालखंडात धार्मिक, सामाजिक अशा पुनरुज्जीवनवादी चळवळी निर्माण झाल्या. त्यातील ब्रह्मोसमाज, आर्यसमाज, प्रार्थनासमाज, सत्यशोधक समाज असे धार्मिक, सामाजिक पुनरुत्थानाचे अनेक पंथ निर्माण झाले. या सर्व पंथानी हिंदू समाजातील दोष दाखवून त्याची पुनर्रचना नवीन तत्त्वावर करण्याचा प्रयत्न केला.

प्रार्थनासमाजाची कल्पना बंगालमधील ब्रह्मो समाजाच्या कल्पनेवरून सुचली होती. हिंदू धर्मातून फुटून निघण्याच्या ब्रह्मो समाजाच्या धोरणास प्रार्थनासमाज प्रथमपासूनच विरुद्ध होता. मूर्तिपूजा व अवतार-कल्पना यांच्या विरुद्ध त्यांचा रोख असला, तरी आपला पंथ हा हिंदू धर्मातील सुधारक पंथ आहे ही वृत्ती त्यांनी सदैव जागृत ठेवली व वारंवार त्याचा उपदेश केला. डॉ. भांडारकर व न्या. रानडे यांना '' ईश्वरः सर्वभूतानाम हृद्देशेऽर्जुन तिष्ठति '' हे तत्त्व हिंदू धर्मात असल्याबद्दल अभिमान होता. असे असले तरी जीवात्मा व परमात्मा यांचे अद्वैत व '' अहं ब्रह्मास्मि '' हे तत्त्व त्यांना मान्य नव्हते. तसेच ते अव्यक्तं परमात्म्याची उपासना करीत असले व मूर्तिपूजेच्या विरुद्ध असले तरी ते परमेश्वराला

सगुण मानीत होते. शंकराचार्यांचे निर्गुण परब्रह्म त्यांना मान्य नव्हते. त्याचप्रमाणे शंकराचार्यांचा मायावादही त्यांना मान्य नव्हता. त्यांना प्रार्थनेचे महत्त्व वाटत होते, पण प्रार्थनेने, भौतिक फलाची प्राप्ती होणे शक्य नसते, याविषयी त्यांची खात्री होती. आत्मिक उन्नतीसाठी प्रार्थना आवश्यक असल्याचे त्यांचे मत होते. अनन्यभावे देवास शरण जाऊन प्रार्थना केली असता माणसांत निश्चयी सामर्थ्य प्राप्त होते आणि अंतःकरण उत्तम व शुद्ध करण्याचा मार्ग सुलभ होतो, असे प्रार्थनासमाजाचे तत्त्व होते. महाराष्ट्रीय सुशिक्षितांचे मन त्या काळात भक्ती युगातच होते, आणि प्रार्थनासमाजाचा विवेकवादाइतकाच अद्वैत वेदान्तालाही विरोध होता.

ब्राह्मो समाज किंवा प्रार्थनासमाज हे ग्रंथप्रामाण्यवादी नाहीत, तर ते अनुभवप्रामाण्यवादी आहेत. डॉ. भांडारकर म्हणतात, '' आर्यसमाज वेद हे ईश्वरप्रणीत असे मानतो, तसे प्रार्थना अगर ब्राह्मसमाज मानीत नाही. प्रार्थनासमाजाचा धर्म खुद्द देवाने उपदिष्ट व ईश्वरप्रणीत असाच आहे. सर्वांच्या अंतःकरणात हे बीज आहे आणि हे बीज ईश्वराकडून प्राप्त झालेले आहे. सर्व धर्मात सत्य आहे व असत्यही आहे. म्हणून असत्यास दूर सारून सत्यास स्वीकारण्याची तर आपली नेहमी सिद्धता असलीच पाहिजे. आपल्याच एका धर्मात सर्व तत्त्वे शुद्ध आणि सत्य आहेत आणि ती सर्व एका काळीच प्राप्त झाली आहेत असे नाही. प्रार्थना व ब्राह्मो समाजास जी तत्त्वे मान्य आहेत ती सर्व वेदात नाहीत, त्यात बीज आहे, ते पुढे उपनिषदे व गीतेत उत्तम रीतीने विकसित झालेले आहे.''

ब्राह्मोसमाज व प्रार्थनासमाज हे सर्वस्वी आंग्लविद्याभूषित अशा पहिल्या व दुसऱ्या पिढींत वाढीस लागले. हिंदू धर्म व संस्कृतीचा पाश्चात्य संस्कृतीच्या संदर्भात आणि ख्रिस्ती धर्माच्या प्रकाशांत जो विचार सुरू झाला, त्यालाच ती फळे आली होती. आर्यसमाज त्या दोन समाजापेक्षा निराळ्या वातावरणात उदयास आला. वेदप्रामाण्य, चातुर्वर्ण्य यांचा पुरस्कार करून लोकांच्या परंपरेच्या अभिमानाला त्याने आव्हान केले होते.

**(६) महात्मा फुले (१८२७-१८९०) :** महाराष्ट्रात सामाजिक समता आणण्यासाठी बहुजनसमाजांत जागृति करून मोठे कार्य केले असेल ते जोतिराव फुले यांनी. शब्दप्रमाण्य, जुने आचार-विचार, जुन्या रूढी, कर्मकांड, जपजाप्य, पूर्वसंचित, पूर्वजन्म, ईश्वरी संकेत, स्वर्ग-नरक इत्यादी कल्पना प्रसृत करणाऱ्या आणि मानवी कर्तृत्व दास्यशृंखलात बद्ध करून टाकणाऱ्या भोळ्या समजुतीवर जोतिरावांनी सतत आघात केले.

जोतिराव गोविंद फुले (१८२७ ते २८ नोव्हेंबर १८९०) यांनी पुणे येथे मुलांसाठी पहिल्यांदा १८४८ त व मुलींसाठी १८५१ त शाळा सुरू केली. त्यांच्या कार्यात त्यांच्या पत्नी सौ. सावित्रीबाई या मदत करीत.

त्यांनी अस्पृश्यांसाठी घरचा हौद १८६८ साली खुला केला. ते पुणे नगरपालिकेचे सभासद होते (१८७६ ते १८८२). शिक्षणविषयक प्रश्नासाठी नेमलेल्या ' हंटर ' आयोगापुढे त्यांनी साक्ष दिली. सप्टेंबर १८८२ रोजी पंडिता रमाबाईंचीही साक्ष झाली. टिळक व आगरकर कोल्हापूर प्रकरणांत शिक्षा भोगून आल्यानंतर त्यांनी त्यांचा सत्कार केला. सरकारनेही त्यांच्या कार्याचा गौरव केला आणि जनतेने सत्कार करून त्यांना ' महात्मा ' ही पदवी अर्पण केली. फुले यांच्या चरित्राच्या या रूपरेषेपेक्षा त्यांनी निरनिराळ्या पुस्तकांतून जे विचार मांडले, त्यांचे समीक्षण आवश्यक आहे.

'' सार्वजनिक सत्यधर्म '' या पुस्तकात मानवविषयक त्यांची कल्पना दिसून येते. हा ग्रंथ '' मानवी स्वातंत्र्याचा जाहीरनामाच '' व '' विश्वकुटुंबवादाची गाथा '' आहे असे त्याचे वर्णन करण्यात आले आहे. '' जो आपल्या धर्मबांधवांना व देशबांधवांना समान मानीत नाही तो देशभक्त कसला? '' असा त्यात त्यांनी सवाल केला आहे. या पुस्तकात मिशनऱ्यांवर टीका करण्यात आली आहे. पुण्याची सार्वजनिक सभा ही जमीनदार, सावकारांचे हित पाहते असे त्यांनी सांगितले होते. त्यांचे ' गुलामगिरी ' हे पुस्तकही गाजले. '' युनायटेड स्टेटस्मधील सदाचारी लोकांनी गुलामास दास्यापासून मुक्त करण्याच्या कामात औदार्य, निरपेक्षता व परोपकारबुद्धी दाखवली यास्तव त्यांच्या सन्मानार्थ '' हे पुस्तक अर्पण करण्यात आले होते. ' सुधारल्या इंग्रजी राज्यात ब्राह्मणी धर्माच्या आडपडद्यात ' गुलामगिरी कशी नांदत आहे याचे संवादरूपाने विवेचन या पुस्तकात आहे. दशावताराची व पुराणातील अनेक कथांची फोड त्यांनी केली. ' कलमकसाई ' ' भट कामगार ' असे शब्दप्रयोग त्यात असून '' सरकार भटाच्या नादीं लागते ' याबद्दल राग व्यक्त करण्यात आला आहे. मारवाडी व भट यांच्या कसबाविषयी त्यांत भरपूर टीका आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेत '' शूद्रांची मने आणि अंतःकरणे सुखी आणि समाधानी ठेवली, तर भविष्यकाळात त्यांच्या निष्ठेबद्दल सरकारला भीती बाळगण्याचे कारण नाहीं '' असे विचार व्यक्त केले आहेत. '' बामणी कावा समजुनी ध्यावा '' '' विद्याहीन शूद्र लज्जाहीन झाला, जोडा सांभाळीला ब्राह्मणाचा '' अशा काव्यपंक्ती त्यात आढळतात.

सत्यशोधक समाजाची स्थापना '' भिक्षुकांच्या बौद्धिक गुलामगिरीतून अडाणी भाबड्या बहुजनसमाजाला मुक्त करण्यासाठी '' २४ सप्टेंबर १८७३ रोजी झाली. जन्माचा किंवा जातीचा विचार न करता गुणावर व्यक्तीची प्रतिष्ठा निर्माण करावी हा त्यांचा हेतू होता. शूद्र आणि अतिशूद्र यांची ब्राह्मण पुरोहितांकडून होणारी पिळवणूक बंद करणे, त्यांना त्यांच्या मानवी हक्कांची व अधिकाराची शिकवणूक देणे, आणि ब्राह्मणी शास्त्रज्ञांच्या मानसिक आणि धार्मिक गुलामगिरीतून मुक्त करणे हे सत्यशोधकाचे ध्येय-धोरण होते. या समाजाची तीन मोठी तत्त्वे आहेत : (१) देव एक आहे, (२) सर्वांचा मायबाप ईश्वरच

आहे, सर्व माणसे त्याच्या दृष्टीनी समान आहेत. केवळ जन्मावर मोठेपणा व कमीपणा घ्यावयाचा तर व्यसनी, मूर्ख, दरिद्री, नादान अशी माणसे वरिष्ठ म्हणविणाऱ्या वर्गात जन्मास कां यावीत? असा त्यांचा सवाल होता. (३) सर्वज्ञ परमेश्वराची भक्ती करण्यास मध्यस्थाची (दलालाची) जरूर नसते. म्हणून भिक्षुकशाही ही समाजाला लागलेली कीड आहे असे त्यांचे मत होते. या तत्त्वावर पहिली सत्यशोधक परिषद १७ नोव्हेंबर १९११ रोजी झाली. '' आपले धार्मिक विधी आपले आपण करावेत '', '' सत्य शोधा आणि भट सोडा '' अशा घोषणा दिल्या गेल्या. उपाध्यायवर्ग हा परोपजीवी (पिळणारा) आहे, असे ते म्हणत.

जन्माचा किंवा जातीचा विचार न करता गुणावर व्यक्तीची प्रतिष्ठा निर्माण करावी हा सत्यशोधक चळवळीचा हेतू होता. हिंदू समाजातील घटकांना साधे माणुसकीचे हक्कही या जातिव्यवस्थेमुळे मिळत नाहीत म्हणून या जातिव्यवस्थेविरुद्ध बंड केले पाहिजे हे फुले अत्यंत पोटतिडिकीने मांडीत. ब्राह्मणांचे वर्चस्व नाहीसे करण्यासाठी अब्राह्मणांनी केलेली चळवळ असे त्यांच्या कार्याचे रूप नव्हते; तर सर्व विषमतेच्या मुळाशी असलेली जन्माधिष्ठित जातच नाहीशी करायला पाहिजे हाच त्यांच्या कार्याचा स्थायीभाव होता. ' स्वातंत्र्याच्या विचारांची बीजे आपल्या मनात ब्राह्मण विद्यार्थी-मित्रांनी आणि ब्राह्मण शिक्षकांनी पेरली होती ' असे फुले यांनी '' गुलामगिरी '' ग्रंथात नमूद केले आहे. फुले यांनी काढलेल्या मुलींच्या शाळेला सखाराम यशवंत परांजपे, सदाशिव गोविंद हाटे व सदाशिवराव गोवंडे आर्थिक सहाय्य करीत असत. ते सहकारी, भूतदयावादी होते.

महादेव गोविंद रानडे या चळवळीकडे सहानुभूतीने पाहत असत. १८८५ साली फुले आणि त्यांच्या अनुयायांनी जनतेचा ध्वज मिरवणुकीने आणला, त्या प्रसंगी रानडे यांनी भाषण केले. फुले यांच्या मृत्यूनंतरही रानडे यांनी त्यांच्या क्रांतिकार्याचा गौरव केला होता.

१८५७ च्या क्रांतियुद्धाविषयी जोतिरावांना सहानुभूती नव्हती. इतकेच नव्हे तर इंग्रजांचे राज्य उलथून पाडण्यासाठी उत्तर हिंदुस्थानात जे युद्ध चालले होते त्याविषयी ते अत्यंत उदासीन होते. '' देवाजीने शूद्रावर दया करून इंग्रज बहाद्दराच्या हातून भट नानाचे बंड मोडविले म्हणोन बरे झाले,'' '' या लोकांचे राज्य या देशात आहे तोवरच आपण सर्व शूद्रांनी जलदी करून भटांच्या वडिलोपार्जित दास्यापासून मुक्त व्हावे यातच मोठा शहाणपणा आहे '' असे ते म्हणत. मिशनऱ्यांवर त्यांची टीका कडक नसे. पंडिता रमाबाईना हिंदू धर्मात ठेवण्यात ब्राह्मणांना अपयश आले म्हणून त्यांनी ब्राह्मणांना दोष दिला. कॉंग्रेसवर त्यांचा विश्वास नव्हता. कॉंग्रेसजनांना गरीबांची कळकळ नाही असे त्यांना वाटे. हिंदू धर्माच्या नावाने सार्वजनिक सभा आणि कॉंग्रेस ह्या संस्थाकरवी ब्राह्मण लोक अधिक हक्क मिळवण्याची चळवळ करतात असे त्यांना वाटे. ता. १० जुलै १८८७ मध्ये त्यांनी केलेल्या मृत्युपत्रात '' शूद्रादी अतिशूद्रास दासानुदास मानणाऱ्या आर्य भट्ट ब्राह्मण जातीसह त्यांच्या

अनुयायांची सुद्धा माझे शवावर व तत्संबंधी करीत असलेल्या विधीवर सावलीसुद्धा पडू देऊ नये " असे लिहिले होते.

सन १८८२ साली शिक्षणविषयक प्रश्नासंबंधी विचार करण्यासाठी नेमलेल्या हंटर आयोगापुढे फुले यांनी निवेदन सादर केले. प्राथमिक शिक्षण सक्तीचे केले जावे ही मागणी महाराष्ट्रात (कदाचित् भारतात) प्रथमच करण्यात येत होती. प्रशिक्षित शिक्षकांच्या वेतनात वाढ करावी, कनिष्ठ वर्गीयांतील शिक्षक तयार करावेत, खेड्यांतील मुलांना शेतीचे व तांत्रिक शिक्षण द्यावे, अशा काही मागण्या त्यांत होत्या. मातृभाषा (मराठी), हिंदी व इंग्रजी असे त्रिभाषा-सूत्र त्यांत होते. स्त्रियांमध्ये प्राथमिक शिक्षणाचा प्रसार आणखी मोठ्या प्रमाणावर होईल अशा प्रकारच्या उपाय-योजनांना संमती द्यावी, अशी त्यांत मागणी होती. या मागण्यांबरोबर " या उच्च शिक्षणपद्धतीची ढळढळीत दिसून येणारी प्रवृत्ती म्हणजे तिच्यामुळे वरिष्ठ अधिकारपदे ही ब्राह्मणवर्गाची सर्वस्वी मिरासदारी होऊन बसलेली आहे." " ब्राह्मण वर्गाच्या मिरासदारीला आळा घालणे हे सरकारचे आद्य कर्तव्य ठरावे " याप्रमाणे टीका असून खेड्यांत शूद्रासाठी शाळा काढाव्यात, त्या शिक्षणखात्याच्या देखरेखीखाली चालवाव्यात, पण त्यावर ब्राह्मण शिक्षकाचा नुसता संपर्कही नको असे त्यांचे मत होते.

शासनसंस्था, आर्थिक व्यवहाराची साधने, सामाजिक आणि धार्मिक सत्ता ही सर्व ब्राह्मणांच्या हाती असल्याने फुले चळवळीचे स्वरूप वरवर पाहता ब्राह्मणेतरी दिसे; पण बहुजनसमाजाची ब्राह्मणाविरुद्ध चळवळ असे त्यांचे स्वरूप होते. महाराष्ट्रातील खेडोपाडी पोचलेली ती पहिली चळवळ होती. बहुजनसमाजात आत्मविश्वास निर्माण करण्याची कामगिरी या चळवळीने केली. ता. २ मार्च १८८८ ला ड्यूक ऑफ कॅनॉट पुण्यात आले असता फुले शेतकऱ्यांच्या वेशात बसले होते. ' सत्यमेव जयते ' हे ध्येयवाक्य पहिल्यांदा वापरणारे, बहिष्काराचे शस्त्र वापरणारे, शेतकऱ्यांना गाऱ्हाणी दूर करून घेण्यास उपदेशिणारे, कामगारांच्या गाऱ्हाण्यांना वाचा फोडावयास शिकवणारे (सत्यशोधक समाजाची एक शाखा लोखंडे यांच्या नेतृत्वाखाली मुंबईला कामगारात काम करीत होती) अशा विविध नात्यांनी फुले जनतेसमोर आले.

महाराष्ट्रातील अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीचा, स्त्री शिक्षणाचा पहिला मान त्यांनाच द्यावा लागेल. आंग्लशिक्षित पहिली पिढी तयार होण्यापूर्वीच ते शिक्षणाच्या कार्यात पडले होते. लोकहितवादींचे ते समकालीन होते. सामाजिक चळवळीला सामाजिक वर्गविग्रहाचे स्वरूप प्राप्त होण्यास त्यांच्या सत्यशोधक समाजाची विचारसरणी कारण झाली. सत्यशोधक समाजाच्या बुडाशी असलेला अंतिम ध्येयवाद डोळ्याआड केल्यामुळे त्या चळवळीला १९१९ च्या सुमारास स्वराज्यविरोधी स्वरूप आलें.

**ब्राह्मणेतर चळवळ**

कृष्णाजीराव पांडुरंग भालेकर, मारुतराव नवले, डॉ. विश्राम रामजी घोले, रामचंद्र हरी शिंदे, रामशेट उधवणे, नारायण मेघाजी लोखंडे, डॉ. संतूजी लाड, भाऊ कोंडाजी, सदाशिव बल्लाळ, गोवंडे इत्यादी मित्रांच्या सहकार्याने सत्यशोधक समाजाची चळवळ मुंबईत व महाराष्ट्रात पसरली व स्थिरावली. भालेकर यांनी ' दीनबंधू ' हे साप्ताहिक १८७० च्या जानेवारीमध्ये स्थापन केले. जोतीराव व लोखंडे यांचेही लेख या साप्ताहिकांत वारंवार येऊ लागले. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या निबंधमालेस तोडीस तोड म्हणून लोखंडे यांनी सत्यशोधक निबंधमाला प्रसिद्ध करण्यास प्रारंभ केला. भालेकरांचा मामेभाऊ गणपत सखाराम पाटील यांनी " दीनमित्र " साप्ताहिक एप्रिल १८८८ मध्ये सुरू केले. ते सुमारे १९४० पर्यंत अव्याहत चालू होते. गणपतरावांचे चिरंजीव " कुलकर्णी लीलामृत " कार मुकुंदराव पाटील यांनी आपल्या वडिलांची परंपरा चालू ठेवली. या पत्रात ब्राह्मण पुरोहितांच्या जागी अब्राह्मण पुरोहितांची स्थापना करून त्यांचे प्रस्थ माजवू नका, असा इशाराही अनेक वेळा दिला होता." दीनबंधू " व " दीनमित्रा " बरोबरच ख्रिश्चन धर्मीयांचे " ज्ञानोदय " पत्रही फुल्यांच्या सत्यशोधक चळवळीला पाठिंबा देत होते. " दीनबंधू " हे साप्ताहिक १८८० साली लोखंडे यांनी चालवावयास घेतले. दीनबंधूमधून शेतकऱ्यांच्या प्रश्नाबरोबरच मुंबईतील गिरणी कामगारांच्या अडचणींचा व मागण्यांचा पुरस्कार होऊ लागला. भालेकर शेतकऱ्यांचे प्रश्न हाती घेऊन लढत होते. कामगार चळवळीचा पाया प्रथम सत्यशोधक समाजाने घातला, असे भारतातल्या कामगार चळवळीच्या इतिहासात नमूद करावे लागेल.

जोतीराव फुले १८९० साली निवर्तल्यावर ब्राह्मणेतर चळवळही हळूहळू कमजोर बनत गेली. दहा वर्षांनंतर सन १९०० मध्ये छत्रपती शाहूमहाराज (कोल्हापूर) यांच्या वेदोक्त प्रकरणाच्या निमित्ताने या चळवळीला हळूहळू बळ येऊ लागले. या चळवळीत जोतीराव फुल्यांसारखा मौलिक तत्त्ववेत्ता कोणी निघाला नाही, तरी भास्करराव जाधव, दिवाणबहादूर लट्ठे यांच्यासारखी अनेक विद्वान मंडळी या चळवळीला मार्गदर्शक म्हणून मिळाली. छत्रपती शाहूमहाराज हे प्रथम इंग्रजी सत्तेच्या विरुद्ध होते. जोतीराव इंग्रजी राज्याची एका बाजूने महती सांगत असले तरी राजकीय बंडखोर आणि राजकीय असंतोषाचे जनक वासुदेव बळवंत फडके, टिळक, आगरकर इत्यादी मंडळींबद्दल त्यांनी सक्रिय सहानुभूती महत्त्वाच्या प्रसंगी प्रकट केली. शाहूमहाराजांमध्ये असलेल्या इंग्लिश राजकर्त्याविरुद्धच्या प्रवृत्तीला हळुहळू ब्राह्मणी अहंभावामुळे मर्यादा पडत गेली. शाहूमहाराज २ एप्रिल १८९४ रोजी कोल्हापूरच्या राजासनावर आले तेव्हा लोकमान्य टिळकांनी शाहूमहाराजांबद्दल " करवीरक्षेत्री राजकीय कपिलाषष्ठीचा योग " असा अग्रलेख लिहून शाहूमहाराजांचे मोठ्या आनंदाने अभिनंदन केले.

जातिनिष्ठ ब्राह्मणांच्या मतपरिवर्तनाची शक्यता नाही म्हणून शाहूमहाराजांनी १९१० नंतर सत्यशोधक समाजाबद्दलची तटस्थ वृत्ती सोडली. कोल्हापूरला सत्यशोधक समाजाची ११ जानेवारी १९११ रोजी श्री. परशुराम घोसळवाडकर यांच्या अध्यक्षतेखाली स्थापना करण्यात आली. भास्करराव जाधव हे अध्यक्ष, अण्णासाहेब लट्ठे उपाध्यक्ष, श्री. म. ग. डोंगरे हे सर्वाधिकारी आणि हरी लक्ष्मण चव्हाण कार्यवाह झाले. १९१३ साली भास्करराव जाधव यांच्या देखरेखीखाली " घरचा पुरोहित " हे पुस्तक तयार करण्यात आले. संध्या, श्रावणी, पूजा, लग्नपद्धती, श्राद्ध, अंत्यसंस्कार इत्यादी विधी, संस्कृत मंत्र व त्याचा मराठी अर्थ लिहून त्या पुस्तकात ग्रथित केले. रामय्या वेंकय्या अय्यावारू व डॉ. संतूजी रामजी लाड हे जुने सत्यशोधक पुन्हा कार्यास उत्साहाने लागले. **पुणे येथे १७ एप्रिल १९११ रोजी सत्यशोधक समाजाची पहिली मोठी परिषद भरली.** दुसरी नाशिक येथे. तिसरी ठाणे येथे भरली. ब्राह्मणेतर पुरोहितांकडून धार्मिक विधी करण्याची लाट उसळली. सहभोजनाचा कार्यक्रमही मोठ्या प्रमाणात सुरू झाला. निपाणीत १९१६ साली सत्यशोधकांची परिषद होऊन त्याचे मुख्य उपदेशक म्हणून श्री. वालचंद रामचंद कोठारी यांची नेमणूक झाली.गावोगाव महाराष्ट्रभर प्रचारकांचे जथे फिरु लागले. खेडोपाडी इतर बलुतेदारांकडून ब्राह्मणांवर बहिष्कार घालण्याचे सत्र सुरू झाले. त्यांच्या जमिनी करावयाच्या नाहीत, त्यांची हजामत करावयाची नाही, त्यांची गुरे राखावयाची नाहीत, त्यांना पौरोहित्यास बोलवायाचे नाही, त्यांचे जोशीपणाचे इनाम व हक्क मान्य करावयाचे नाहीत इत्यादी प्रकारचा हा कार्यक्रम होता. खड्या आवाजात तमाशा चालविणाऱ्यांचे बंड रंगू लागले. ब्राह्मणांची वैयक्तिक उणीदुणी श्लील वा अश्लील अशा चटकदार शैलीने रंगवण्यात तमासगीर व त्यांच्या बरोबरीचे प्रचारक रंगू लागले. या चळवळीचे तमाशा हे एक महत्त्वाचे अंग होते.

मध्ययुगीन समाजसंस्थेला, विचारपद्धतीला व धर्मभोळ्या समजुतींना प्रचंड हादरे ही चळवळ देऊ लागली. कामगार चळवळ वाढीस लागली होती. या चळवळीचे पुढारीपण लोखंडे यांच्यानंतर रावबहादूर सीताराम केशव बोले यांच्याकडे आले. १९१८ साली " पीपल्स युनियन " किंवा " लोकसंघ " या नावाची संस्था बोले यांनी स्थापली. शाहूमहाराज या संस्थेचे आश्रयदाते होते. याच सुमारास मद्रासकडे " जस्टिस पार्टी " नावाचा ब्राह्मणेतर पक्ष वाढू लागला. शाहूमहाराजांना जस्टिस पार्टीच्या व महाराष्ट्रातील सत्यशोधक समाजाच्या ब्राह्मणद्वेषाच्या अतिरेकाबद्दल एक प्रकारचा उद्वेग वाटू लागला. सत्यशोधक समाजाशी व जस्टिस पार्टीशी आपला संबंध नाही असे त्यांनी जाहीरही केले. परंतु भास्करराव जाधवांसारख्या विद्वान विचारवंतांबद्दल त्यांना आदर वाटत असल्यामुळे त्यांचा संबंध तोडला नाही. शाहूमहाराजांनी असेही सांगितले की, महाराष्ट्रातील मराठ्यांनी म्हणजे क्षत्रिय वर्णाने पुढाकार घेऊन जाति नि पंथ मोडण्याचे कार्य चालू ठेवावे. आम्हाला स्वराज्य

पाहिजेच परंतु ते स्वराज्य मूठभर लोकांच्या हाती जाणे ठीक नाही, आम्ही उच्चवर्णीय पुढाकार घेऊ तरच लोकांच्या हाती खरोखरीची सत्ता येईल. शाहूमहाराजांना आर्यसमाजाची विचारसरणी प्रथमपासून मान्य होती. आर्यसमाज महाराष्ट्रात स्थिरावू शकत नाही हे पाहून त्यांनी सत्यशोधक समाजाला उचलून धरले. महाराजांना मूर्तिपूजा मात्र सोडवेना, परंतु आर्यसमाजाची वेदांवरील निष्ठा आणि गुणकर्म मूळ चातुर्वर्ण्य निर्माण करण्याचा ध्येयवाद त्यांना मान्य होता. म्हणून आर्यसमाजाच्या अनेक परिषदांचे त्यांनी अध्यक्षपद स्वीकारले. " महाराजांनी सत्यशोधक आणि आर्यसमाज या दोन्ही चळवळींचा फायदा घेऊन सामाजिक समतेची प्रस्थापना, अस्पृश्यतेचे निर्दालन आणि कनिष्ठ जातींची उन्नती साधण्यासाठी महान प्रयत्न केले. महाराजांच्या काळी धनगर, जैन, मराठे, महार, मांग, शिंपी, सोनार असे विविध वर्गीय नेते त्या चळवळीत होते. अस्पृश्यता-निवारणावरील भर महाराजानंतर कमी झाला हे खरे, परंतु त्याला छत्रपतींना जबाबदार धरता येत नाही."

१९१६ नंतर सत्यशोधक चळवळीचे रूपांतर ब्राह्मणेतर चळवळीत खऱ्या-खुऱ्या अर्थाने झाले. त्यातील सामाजिक क्रांतीचा व समतेचा आशय नष्ट झाला. मॉन्टेग्यु-चेम्सफोर्ड यांची राजकीय सुधारणाविषयक घोषणा ऐकल्यानंतर ब्राह्मणेतर नेत्यांनी स्वतंत्र मतदार- संघाची मागणी केली. काहींनी स्वराज्य सध्या नको असे म्हणण्यासही सुरुवात केली. ब्राह्मणेतर पुढाऱ्यांमध्येच आपसात वितंडवाद सुरू झाला. ६ मे १९२२ रोजी छत्रपतींचे मुंबई येथे अकाली आणि आकस्मिक निधन झाले. ब्राह्मणेतर चळवळीत जमीनदार व सावकारही मोठ्या प्रमाणात शिरू लागले. ब्राह्मणेतर चळवळीचे येथपासून तिसरे पर्व सुरू झाले.

या तिसऱ्या पर्वात ब्राह्मणेतर चळवळीला ब्राह्मणविरोधाची प्रखर धार चढलेली होती. परंतु त्यातील मूळचा ध्येयवाद नीट रीतीने मंदस्वरात का होईना जपून ठेवण्याचा प्रयत्न नव्या तरुण पिढीतील माधवराव बागलांसारखे लेखक करीत होते. माधवराव बागल यांनी जोतीराव फुले यांचा ध्येयवाद आपल्या खड्या बोलीत " स्वराज्याचा शत्रू " या पुस्तकात उत्कृष्ट रीतीने मांडला आहे. परंतु त्याबरोबरच दिनकरराव जवळकर यांनी केशवराव जेधे यांचा आशीर्वाद घेऊन " देशाचे दुष्मन " (१९२५) या पुस्तिकेत अतिरेकीपणाने लो. टिळकांना देशाचे दुष्मन ठरविले. प्रबोधनकार ठाकरे यांनी " भिक्षुकशाहीचे बंड " (१९२१) या पुस्तकात आपल्या समर्थ लेखणीने ब्राह्मणजातीवर विषाचा वर्षाव केला. हे पुस्तक ओजस्वी शैली व एकांगी वकिली युक्तिवाद यांचे उत्कृष्ट मिश्रण आहे. आधुनिक जातिवादाच्या संदर्भात अत्यंत वाचनीय असे हे पुस्तक होय असे म्हणता येईल. १९२२ ते १९३० या कालखंडात ही चळवळ संस्थापकाच्या मुख्य ध्येयवादापासून पूर्ण घसरली, त्यामुळे १९३०च्या काँग्रेसच्या सविनय कायदेभंगाच्या आंदोलनाच्या वातावरणात ती पूर्ण

निस्तेज झाली. या चळवळीतील एक महत्त्वाची व्यक्ती म्हणजे कर्मवीर भाऊराव पाटील होते, त्यांनी त्या चळवळीतील अत्यंत मौलिक अशी शैक्षणिक चळवळीची परंपरा जागृत ठेवली, वाढविली व तिला महान यशाच्या मार्गावर नेले. या काळातील बहुजनसमाजातील विद्वान, विचारवंत व ध्येयनिष्ठ असे दोन मोठे सत्पुरुष म्हणजे विठ्ठल रामजी शिंदे आणि बाबूराव गणपतराव जगताप. त्यांनी सत्यशोधक चळवळीशी सहानुभूती कायम ठेवली, परंतु त्यात सामील न होता आपली उच्चतम धर्मसाधना चालू ठेवली. शिंदे यांनी अस्पृश्य जमातीची सेवा करीत त्या सेवायज्ञात आपले आत्मसमर्पण केले व बाबूराव जगताप यांनी निष्ठेने शिक्षणकार्यास वाहून घेतले. केशवराव जेधे व शंकरराव मोरे या दोघांनी १९३० सालापासून राजकीय स्वातंत्र्याच्या चळवळीत शेवटपर्यंत भाग घेतला व समाजवादी क्रांतिकारक विचारांची ज्योत खेड्यापाड्यापर्यंत नेली. [' भारतीय प्रबोधन ', पृ. २२५-२३०]

**(७) बाळशास्त्री जांभेकर (१८१२-१८४६):** महाराष्ट्रात आचार्य बाळशास्त्री जांभेकर (१८१२ ते १८४६) यांनी पहिले इंग्रजी-मराठी वर्तमानपत्र ' दर्पण ' १८३२ मध्ये चालू केले. ते मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजात गणित व भाषाशास्त्राचे प्राध्यापक होते. पाश्चात्य विद्या आत्मसात् करून तिच्यातून प्राप्त झालेले ज्ञान महाराष्ट्रातील वाचकवर्गात फैलावण्याचे कार्य करावे, बंगाल प्रांतात राजा राममोहन रॉय प्रभृति सुधारकांनी जशी लोकजागृती केली तशी महाराष्ट्रात करावी असा उद्देश त्यामागे होता. बंगालमधील धर्मसुधारकांचे अंधानुकरण करावे अशी बाळशास्त्रींची वृत्ती नव्हती. तरीही पाश्चात्य विद्येच्या प्रसाराने पुढे गेलेल्या बंगालबरोबर यावे हीच त्यांची तळमळ होती. सामाजिक व धार्मिक सुधारणांच्या बाबत ते प्रागतिक होते. बालविधवांचा पुनर्विवाह, स्त्रीशिक्षण, हिंदुधर्मातून परधर्मात गेलेल्यांना शुद्ध करून घेणे याबाबतही त्यांनी प्रचार केला. हिंदू समाजास धक्का देऊन जागृत व पुरोगामी बनवण्याच्या कामांत जांभेकर यांनी महाराष्ट्रात अग्रेसरत्त्व संपादन केले.

**(८) दादोबा पांडुरंग (९-५-१८२४ ते २५-१०-१८८२) :** प्रभृतींनी मुंबईस एक परमहंस मंडळी या नावाची गुप्त संस्था जातिभेद मोडण्याच्या उद्देशाने काढली होती. या सभेच्या सभासदांत खिस्ती व मुसलमान लोकही होते आणि तिच्या शाखा मुंबईच्या बाहेरही काही ठिकाणी होत्या. सभेचे काम १८६० पर्यंत चालले. नंतर सभासदांची नावे फुटली, तेव्हा सर्वच सभासद अंग झाडून दूर झाले व सामाजिक बहिष्काराच्या भीतीने घरोघरी स्वस्थ बसले. या संस्थेच्या राखेतूनच पुढे '' प्रार्थना समाज '' उभा राहिला, असे रानडे-चरित्रकार न. र. फाटक लिहितात. ब्राह्मो समाजाला बंगालमध्ये जे स्थान प्राप्त झाले तसे महाराष्ट्रात या समाजाला स्थान मिळाले नाही.

दादोबा पांडुरंग नंतर वैचारिक दृष्ट्या महत्त्वाचे कार्य करणारे सरदार गोपाळराव हरी देशमुख ऊर्फ '' लोकहितवादी '' हे होत. बाळशास्त्री जांभेकर यांच्या सहाय्याने भाऊ

महाजन यांनी १८४१ मध्ये मुंबईत सुरू केलेल्या ' प्रभाकर ' नावाच्या पत्रात त्यांचे लेख प्रथमत: येऊ लागले. ' इंग्रज व नेटीव लोक यामध्ये सांप्रत मोठा भेद आहे. तो मोडून एकसारखे होण्याकरिता हिंदुस्तान देशात पार्लमेंट ठेवावे ' असा विचार त्यांनी सुरुवातीलाच मांडला होता. ' भट, गृहस्थ, शास्त्री, परभू, कुळंबी, मुसलमान, इंग्रज इत्यादी जे शहाणे दिसतील ते नेमावे व त्यांनी राज्य चालवावे '. ' जे फार विद्वान व चांगले लोक आहेत तेच नेमले पाहिजेत. परंतु ब्राह्मणास गर्विष्ठपणा फार आहे याजकरिता ती जात फार थोडी असली पाहिजे ' असा त्यांनी इशारा दिला होता. इंग्रजी विद्येची महती गाताना, ' पाठशाळांचा विध्वंस झाला पाहिजे ' असे त्यांनी सांगितले होते. '' आपल्या देशाचे हित करावे हा मुख्य धर्म असे युरोपांत समजतात आणि जर काही अपाय अगर वाईट वर्तणूक राजाकडून अगर त्याचे प्रधानाकडून होईल तर त्यास हे लोक बडतर्फ करतात. इकडील लोकांस राजा म्हणजे विष्णूचा अवतार व प्रधान म्हणजे ब्रह्मदेव वाटतो.' अशासारखे त्यांचे विचार होते. त्यांत पुढील गोष्टी मुख्य आहेत : (१) युरोपातील लोक आपल्या देशाचे हित हा मुख्य धर्म मानतात, (२) लोकांवर जुलूम झाला असता देशातील सूज्ञ लोक राज्यक्रांती करून रयतेचे राज्य स्थापन करतात. ही बंडाळी नव्हे, स्वैर राज्यापेक्षा लोकसत्ताक राज्य चांगले, (३) शिवाजी हा एक प्रकारे राज्यक्रांतिकारकच होता, पण पुढे तसा सद्बुद्धीचा पुरुष न झाल्याने आपले राज्य इंग्रजांनी घेतले.

भारताला ' पार्लमेंट ' पाहिजे म्हणजे लोक स्वराज्य भोगतील असे त्यांना वाटत होते. तसेच इंग्रज गडबड करू लागतील किंवा काही नवीन कानू करावयाचा आग्रह धरतील त्या वेळी अमेरिकेप्रमाणे क्रांती होईल असे त्यांना वाटत होते. त्यांचे त्यावेळचे हे विचार बंगाली सुधारकांच्या विचारांशी तुलना करता अधिक प्रगत दिसतात. स्वदेशी व बहिष्काराचाही त्यांनी पुरस्कार केला होता. तत्कालीन निष्क्रिय प्रारब्धवादावर व अवतारवादावर त्यांनी टीका केली होती. मूर्तिपूजेचा निषेधही त्यांनी गीतेच्या आधारावर केला होता. ईश्वरपूजा करण्याचा प्रशस्त मार्ग म्हणजे ध्यान किंवा मनन हा असून आपणांस द्रव्यरूपाने ज्या गोष्टी द्यावयाच्या असतील, त्या मनुष्यमात्रास द्याव्या आणि मनुष्यसेवा हेच ईशपूजेचे प्रशस्त बाह्य स्वरूप मानावे. ' जे सुख भोगतात ते लोकांचे मूर्खपणामुळे भोगतात ' असे लिहून त्यांनी आर्थिक समतेचा उपदेश केला होता, पण प्रतिकाराची भावना जागृत केली नाही.

लोकहितवादींचे समकालीन विष्णुबुवा गोखले ब्रह्मचारी यांनी ' सुखदायक राज्यप्रकरणी ' या निबंधात (१८६७) समाजवादाची तरफदारी केलेली आढळते. कार्ल मार्क्स न वाचलेल्या या संन्याशाला हा समाजवाद कसा सुचला याचा लोकांना अचंबा वाटतो. विश्वबंधुत्वाचे, विश्वकुटुंबाचे ध्येय असल्याने व वर्गस्वार्थाचा पगडा मनावर नसल्याने त्यांनी तसे विचार

व्यक्त केले यात आश्चर्य नाही. " सर्व प्रजा एक कुटुंब व सर्व जमीन एक बाग व त्यातून जे जे निघेल ते ते सर्वांचे एक, याप्रमाणे राज्यव्यवस्था असली म्हणजे सर्वांना सर्व उपभोग मिळतात व सर्वांना उत्तम खावयास मिळते व सर्वांना विपुल वस्त्रे व अलंकार भूषणे मिळतात म्हणून सर्वलोक पूर्णकाम होतात.' असे गोखले म्हणतात.

लोकहितवादींनी राजकीय विचारांना आर्थिक तत्त्वाची जोड दिली आहे. दारिद्र्याची मीमांसा करताना त्यांनी आर्थिक शोषणाचे कारण सांगितले आहे. इंग्रज अधिकाऱ्यांचा पगार, इंग्लंडच्या यंत्रोत्पादित मालाचा वाढता खप वगैरे कारणांमुळे संपत्तीचा ओघ त्यांच्या देशाकडे वळला आहे. त्यामुळे बेकारी आणि आमच्या कारागिरांची उपासमार होऊ लागली. भरमसाट शेतसारा, शेतकऱ्यांचाच कर्जबाजारीपणा आणि सावकारांचे रक्षण करणारे कायदे, न्यायदानाची खर्चिक पद्धत या सर्वांमुळे शेतकऱ्यांचे दारिद्र्य वाढले आहे. दारिद्र्यासाठी त्यानी समाजपद्धतीला जबाबदार धरले आहे. दारिद्र्यनाशाकरिता लोकहितवादींनी स्वदेशी व औद्योगीकरण हे उपाय सांगितले आहेत आणि त्याच्या अनुषंगाने बहिष्काराचा मार्गही सुचविला आहे.

**(९) अरविंद घोष (१८७२-१९५०) :** १८७२च्या १५ ऑगस्टला जन्मलेल्या, सात वर्षांच्या छोट्या अरविंदला इंग्लडमध्ये शिक्षणासाठी पाठविण्यात आले. लॅटिन, फ्रेंच या भाषा आत्मसात् करून आय्.सी.एस्. च्या सर्व विषयांत उत्तीर्ण झालेल्या या लोकोत्तर मुलाने घोड्यावर बसण्याची परीक्षा दिली नाही. ' कमळ व खंजीर ' या गुप्त संघटनेचे सदस्यत्व पत्करले. ही संस्था भारताच्या स्वातंत्र्यासाठी काम करणारी गुप्त मंडळी होती.

भारताला परतल्यावर मुंबईच्या ' इंदू-प्रकाश ' या पत्रात भारताच्या परिस्थितीवर अनेक लेख त्यांनी लिहिले.

१९०१ मध्ये भूपालचंद्र बोस यांच्या मृणालिनी या कन्येशी त्यांचा विवाह झाला. १९०२ ते १९०५ या काळात बंगालमध्ये वरचेवर जाऊन त्यांनी गुप्त संघटना बांधल्या.

बडोद्यातील शिक्षणाधिकाऱ्याची नोकरी सोडून बंगालमधील निःशस्त्र क्रांतीच्या कार्यास वाहून घेण्याचा अरविंदबाबूंनी निश्चय केला. लगेचच त्यांनी कलकत्त्यास राष्ट्रीय शिक्षणाचे कार्य अंगावर घेतले. बिपिन चंद्र पाल यांच्यामुळे " वंदे मातरम् " या बंगालमधील पत्राशी त्यांचा संचालक म्हणून संबंध आला. बडोद्याची नोकरी सोडल्यावर त्यांना कलकत्त्याच्या नॅशनल कॉलेजचे प्राचार्य करण्यात आले. बाबूजी प्रथमपासूनच अध्यात्मप्रवण होते. त्यांचे बंधू वीरेंद्रकुमार यांनी विवेकानंदांचे बंधू भूपेंद्रनाथ दत्त यांच्या सहकार्याने सशस्त्र क्रांतिकार्यात उडी घेतली व नंतर त्यांना काळ्या पाण्याची शिक्षा झाली.

सुरत काँग्रेस (१९०७) मध्ये फूट पडली. जहाल-मवाळ असे भेद उघड झाले. जहालांच्या गटाचे अध्यक्षपद अरविंद बाबूना देण्यात आले.

टिळकांना १९०८ मध्ये सहा वर्षांची काळे पाण्याची शिक्षा झाली. मद्रासमधील चिदंबरम् पिल्ले यांनाही सहा वर्षांची शिक्षा ठोठावण्यात आली. अरविंद घोष यांच्यावर बंड करण्याच्या आरोपावरून खटला भरण्यात आला. चित्तरंजन दास त्यांचे वकील होते. अखेरीस एक वर्षानंतर ते दोषमुक्त होऊन सुटले. तुम्ही आम्हास नागरिकत्वाचे मूलभूत हक्क देत नाही व स्वराज्याची मुहूर्तमेढ रोवत नाही, तोपर्यंत तुम्हास नेमस्तांप्रमाणे लोकांचे पुढारी सहकार्य देऊ शकणार नाहीत असे अरविंद बोलत व लिहीत होते. कलकत्त्यातील एका भाषणात ते म्हणाले, ". . .अत्याचाराचा अवलंब न करता आणि कायद्याच्या राज्यास धक्का न लावता आपल्या न्याय्य आकांक्षा तृप्त करण्याचा एकच मार्ग–निःशस्त्र प्रतिकाराच्या स्वरूपात आम्ही लोकांस दाखवून देत आहोत."

१९०९ च्या जुलै महिन्यात अरविंदबाबूंनी पांडिचेरीला जाण्यापूर्वी देशबांधवांना उद्देशून पत्र लिहिले. बहिष्कार-योगावर त्यांनी भर दिला होता. अरविंद घोष, बिपिनचंद्र पाल, लोकमान्य टिळक वगैरे पुढाऱ्यांनी १९०५ साली सुरू केलेल्या बहिष्कारयोगाचे पुनरुज्जीवन गांधींनी असहकारयोगाच्या रूपाने केले. त्यामुळे बंगालमध्ये रुजलेला सशस्त्र क्रांतिवाद सर्वत्र फैलावला नाही. टिळक, अरविंद आणि गांधी यांच्या प्रयत्नांनी भारतीय संस्कृतीचे उज्ज्वल रूप लोकांपुढे आले आहे. त्यांच्या पत्नी मृणालिनी देवी १९१८ मध्ये कलकत्ता येथे निधन पावल्या.

राष्ट्रवाद हा देशभक्तीचा विचार किंवा बौद्धिक कसरत नसून ती धार्मिक साधना आहे असे अरविंद म्हणत, असे डॉ. करणसिंग यांनी म्हटले आहे. त्यांनी त्यांच्या पुस्तकाला " प्रोफेट ऑफ इंडियन नॅशनॅलिझम " " भारतीय राष्ट्रवादाचा प्रेषित " असेच नाव दिले आहे. मागासवर्गाला जागृत केले पाहिजे आणि राजकीय जीवनाच्या मुख्य प्रवाहात सामील करून घेतले पाहिजे अशी त्यांची राष्ट्रवादाची कल्पना होती. आशियातील लोकांना जागृत करावे, उच्च व उदात्त तत्त्वावर जगावे, ऐक्य साधावे, भारताने जगाला दिलेली अध्यात्म्याची देणगी विकसित करावी, जगापुढील जटिल प्रश्न सोडविण्यात भारताने पुढाकार साधावा–असा संदेश त्यांनी १५ ऑगस्ट १९४७ च्या स्वातंत्र्यदिनाला दिला आहे.

आध्यात्मिक राष्ट्रवादाच्या या पुरस्कर्त्याने २८ ग्रंथ लिहिले असून त्याची मूळ बैठक आध्यात्मिक-धार्मिक आहे. " डिव्हाइन लाइफ " या त्यांच्या प्रख्यात ग्रंथाचा सेनापती बापट यांनी " दिव्य जीवन " म्हणून केलेला अनुवाद प्रसिद्ध आहे.

रामकृष्ण परमहंस आणि विवेकानंद यांच्या वेदान्तविषयक तत्त्वज्ञानाने ते प्रभावित झाले होते. " लोकांना काळाप्रमाणे लागू पडणारा राष्ट्रीयत्व हा धर्म आहे" अशा स्वरूपात त्यांनी

राष्ट्रीयत्वाची मांडणी केली आहे. धर्मनिरपेक्ष राष्ट्रवादाचे ते प्रवक्ते होते. दादाभाईंचा शोषण सिद्धान्त त्यांना मान्य होता. ते भांडवलशाहीचे टीकाकार होते आणि समाजवादी राष्ट्राचे ध्येय त्यांनी स्वीकारले होते. " कामगारवर्गाचा दर्जा उंचावणे आणि त्याला ज्ञानी करणे हे आपले पवित्र कर्तव्य असले पाहिजे "[१] असे त्यांनी म्हटले आहे. जहाल राष्ट्रवादाचे नेते आणि आधुनिक भारताचे शिल्पकार असे त्यांचे राष्ट्रीय लढ्यातील स्थान होते.

**(१०) लाला लजपतराय (१८६५-१९२८) :** लालाजी हे " पंजाब केसरी " या नावाने प्रख्यात होते. लुधियाना जिल्ह्यात जानेवारी २८, १८६५ साली जन्मलेल्या लालाजींच्या आई गुलाबदेवी शीख कुटुंबातील होत्या.

लालाजींचे वडील सर सय्यद अहमद यांचे चाहते होते, पण सर सय्यद अहंमदांनी काँग्रसविरोधी भूमिका धेतल्याने त्यांनी त्यांच्यावर टीका केली. लालाजींना त्यांच्या वडिलानीच राजकारणाची दीक्षा दिली.

लालाजी वयाच्या चौदाव्या वर्षीच स्वामी दयानंद सरस्वतींच्या सान्निध्यात आले. विद्यार्थी दशेतच त्यांच्या मनावर आर्यसमाजाचा प्रभाव पडला. सामाजिक आणि शैक्षणिक सुधारणांकडे त्यांचा प्रथमपासूनच ओढा,पण कर्झनशाहीमुळे ते राजकारणात खेचले गेले. त्यांनी पंजाबात सभांचा धडाका लावला. भारताच्या दारिद्र्याची कारणे लोकांपुढे मांडली. त्यांच्या लेखनात आणि भाषणात त्यांनी ब्रिटिश साम्राज्यशाही भारताचे कसे शोषण करीत आहे हे स्पष्टपणे मांडले.

लालाजी आणि गोपाळ कृष्ण गोखले काँग्रेसचे प्रतिनिधी म्हणून इंग्लंडला गेले आणि भारताची परिस्थिती तेथील जनतेपुढे मांडली. कामगार, लोकशाही आणि समाजवादी पक्षांचा त्यांना पाठिंबा मिळाला. १९०५ च्या बनारस काँग्रेसमध्ये ब्रिटिश मालावरील बहिष्काराच्या ठरावाला त्यांनी जोरदार पाठिंबा दिला. त्यांनी १९०७ मध्ये पंजाबात शेतकऱ्यांची प्रभावी संघटना बांधली, त्यामुळे १८१८ च्या तिसऱ्या रेग्युलेशनखाली सरकारने त्यांना ब्रह्मदेशात हद्दपार केले. त्या काळात त्यांनी भारताचा सर्वांगीण अभ्यास केला. त्याचा त्यांना भाषणे करताना व लिहिताना उपयोग झाला.

याच सुमारास काँग्रेसच्या अध्यक्षपदासाठी टिळकांचे नाव पुढे आले होते. लालाजींनी आपले नाव माघारी घेतले व काँग्रेसमधील फूट टाळली.

१९०८ मध्ये लालाजींनी इंग्लंडला प्रयाण केले आणि विद्यार्थ्यांपुढे अनेक व्याख्याने दिली. १९१३ मध्ये जपान, इंग्लंड व अमेरिका यांना भेटी दिल्या. त्यांनी त्या काळात गदर पार्टीच्या कार्यक्रमाला पाठिंबा दिला असे समजण्यात येते. इंडियन होमरूलची शाखा ऑक्टोबर १५, १९१६ ला त्यांनी अमेरिकेत स्थापन केली. १९२० च्या नागपूर व कलकत्ता येथील काँग्रेस अधिवेशनाला ते उपस्थित राहिले आणि १९२० मध्ये नागपूरला भरलेल्या अखिल भारतीय विद्यार्थी परिषदेचे

अध्यक्षस्थान त्यांनी भूषविले. पंजाब प्रांतिक राजकीय परिषद त्यांच्या अध्यक्षतेखाली भरणार होती, पण त्यांना अटक झाली.

भारताबाहेर अनेक वर्षे राहावे लागल्याने त्यांचा दृष्टिकोन विशाल झाला. त्यांनी '' यंग इंडिया '' '' पोलिटिकल फ्युचर ऑफ इंडिया ''आणि '' अनहॅपी इंडिया '' हे प्रख्यात ग्रंथ लिहिले. ते आणि हिंदुस्थानी सेवादलाचे डॉ. हर्डीकर ब्रिटिश मजूर पक्षाशी व आयरिश संघटनांशी निगडित राहिले. भारतीय परिस्थितीत बोल्शेविझमची आवश्यकता यावर ते ग्रंथ लिहिण्याच्या विचारात होते.

जालियनवाला बागेतील हत्याकांडामुळे ते अस्वस्थ झाले. १९२० च्या खास कलकत्ता अधिवेशनाचे ते अध्यक्ष झाले. गांधीजींचे राजकारण त्यांना स्वप्नाळू वाटे, तरीपण अनत्याचारी असहकाराचे धोरण त्यांनी स्वीकारले. असहकारितेच्या पराभवानंतर दास-नेहरूंच्या '' स्वराज्य '' पक्षात ते सामील झाले.

१९२८ मध्ये सायमन कमिशनविरोधी निदर्शने झाली. लाहोरला अशा मोठ्या निदर्शनात त्यांच्या डोक्यावर व छातीवर लाठ्यांचे तडाखे बसले. त्या जखमांनीच हा थोर स्वातंत्र्यवीर धारातीर्थी पडला. भगतसिंग, प्रभृतींनी त्याचाच सूड म्हणून सॉंडर्सचा खून केला.

पश्चिम आशियातील व दक्षिण आशियातील राष्ट्रांनी स्वतंत्र झाले पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. ते कट्टर साम्राज्यविरोधी होते.

ते पत्रकार होते. '' वंदे मातरम् '' हे उर्दू व '' दि पीपल '' (इंग्रजी) ही पत्रे ते चालवीत. ते बहुप्रसव असे प्रभावी लेखक होते. '' सर्व्हंट्स ऑफ दि पीपल '' ही सामाजिक व राजकीय कार्य करणारी संस्था त्यांनी स्थापन केली. समाजवाद, बोल्शेव्हिझम, भांडवलशाही आणि कामगार संघटना या विषयांवर प्रत्यक्ष लिहिणारे ते थोर राष्ट्रीय पुढारी होते. अखिल भारतीय ट्रेड युनियन कॉंग्रेसचे ते पहिले अध्यक्ष होते (१९२०). विचाराने ते समाजवादी होते पण सैद्धान्तिक समाजवादी नव्हते. आंतरराष्ट्रीय बंधुत्व कामगार संघटनामार्फत साधले जाईल असे त्यांनी मुंबईतील भाषणात म्हटले होते. वर्गीय जाणिवा, कामगारांचा आंतरराष्ट्रीय बंधुभाव आणि वर्गीय दृष्टिकोनातून राष्ट्रवाद या तीन गोष्टी लालाजींनी आपल्या भाषणात संगितल्या.

बंगालमध्ये ज्या प्रकारची विचारक्रांति चालू होती तशाच प्रकारची एक विचारक्रांति या सुमारास किंवा थोडी आधी पंजाबात चालू होती. तिचे श्रेय स्वामी दयानंद यांनी स्थापन केलेल्या आर्यसमाजाला आहे. स्वामी दयानंद यांचा जन्म मोर्वी संस्थानातील टंकारा या गावी काठेवाडात एका ब्राह्मण कुलात १८२४ मध्ये झाला. त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव मूळशंकर असे होते.

पुढे त्यांनी सरस्वती संप्रदायाकडून संन्यासदीक्षा घेतली व '' दयानंद सरस्वती '' असे नाव धारण केले. ते प्रथमतः ब्राह्मो समाजाच्या व त्यांच्या शाखांच्या सहकार्यानेच धर्मप्रचाराचे किंवा

धर्मसुधारणेचे कार्य करीत असत. १८७५ साली त्यांनी मुंबईत " आर्यसमाज " नावाचा आपला स्वतंत्र संप्रदाय स्थापन केला आणि त्याचीच एक शाखा १८७७ साली पंजाबात काढली. लाला हंसराज, लाला मुन्शीराम ऊर्फ श्रद्धानंद आणि लाला लजपतराय या तीन विभूतींमुळे पंजाबातील या आर्यसमाजाच्या शाखेला पुष्कळ महत्त्व प्राप्त झाले. लाला हंसराज यांचे " दयानंद अँग्लो वैदिक कॉलेज " व स्वामी श्रद्धानंद यांचे " गुरुकुल " या शिक्षणसंस्था प्रसिद्ध असून लाला लजपतराय राष्ट्रीय पक्षाच्या त्रिमूर्तीतील जहाल राजकीय पुढारी म्हणून हिंदुस्थानात व युरोप-अमेरिकेत प्रसिद्धीस आले. त्यांनी लोकमान्यांच्या राजकारणाच्या स्मरणार्थ " टिळक स्कूल ऑफ पॉलिटिक्स " ही ना. गोखल्यांच्या भारत सेवक समाजाच्या धर्तीवर राष्ट्रीय राजकारणाची संस्था स्थापली असून हिंदुस्थानात समाजवादी विचारांचा प्रथम पुरस्कार करण्याचे श्रेयही त्यानाच द्यावे लागेल. त्यांची धार्मिक मते पुढे पुढे नास्तिकवादी बनली होती. त्यांच्या मृत्यूनंतर " पीपल " पत्रात प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या पत्रावरून त्यांनी शुद्ध बुद्धिवादाचा स्वीकार केल्याचे आढळते. तथापि त्यांच्या देशभक्तीचा प्रारंभ आर्यसमाजी धर्मसुधारणेच्या वृत्तीतूनच झाला, हे सर्वश्रुत आहे.

स्वामी दयानंद यांनी स्थापन केलेल्या आर्यसमाजाची धार्मिक व सामाजिक मते थोडक्यात पुढीलप्रमाणे सांगता येतील : परमेश्वराच्या शुद्ध स्वरूपाचे ज्ञान वेदांत असून वेदांचे अध्ययन करणे हे प्रत्येक हिंदुमात्राचे कर्तव्य आहे. वेदाध्ययनाचा अधिकार सर्व मनुष्यमात्रांना आहे. वेद हा आर्यांचा पवित्र धर्मग्रंथ असून त्याचे प्रामाण्य सर्व आर्यांनी मानले पाहिजे. वैदिककाली मानव संस्कृती पूर्णावस्थेत पोहोचलेली असून समाजरचनेची सर्व श्रेष्ठ तत्त्वे वर्णाश्रमधर्मात आहेत. चातुर्वर्ण्य हे जन्मसिद्ध नसून गुणकर्मांवर अवलंबून असावे आणि ज्यांच्या अंगी ज्या वर्णाचे गुण असतील, त्याला त्या वर्णाचा अधिकार प्राप्त व्हावा. आर्यांच्या वैदिक धर्माचे दरवाजे सर्व धर्मियांना खुले असावे व शुद्धीकरणाने कोणासही या धर्मात प्रवेश मिळावा. आर्यधर्माची दीक्षा सर्व जगाला देणे हाच जगोद्धाराचा मार्ग असून आर्यावर्त हा आर्यांचाच देश आहे.

आर्यसमाजाने हिंदू समाजाला आक्रमक स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. खिस्ती व मुसलमान धर्मप्रचारकांचा कडवेपणा आणि आक्रमक वृत्ती त्याने हिंदू लोकांत बाणविण्याचा प्रयत्न केला. त्याचप्रमाणे मूर्तिपूजा, बालविवाह, स्त्रीदास्य, जन्मसिद्ध अस्पृश्यता वगैरे हिंदू समाजातील दोषांविरुद्धही त्याने हल्ला चढविला. या चढाईच्या धोरणामुळे काही काळ सनातनी हिंदू व आर्यसमाजी सुधारक यांच्यात एक तुंबळ वाद-रण माजून राहिले आणि सुधारकांच्या गोटात त्यागी, संन्यासी वृत्ती, लोकसेवेचे व्रत आणि धर्मनिष्ठेचे तेज निर्माण झाले. खिस्ती धर्मप्रचारकांना हिंदू समाजात निर्माण झालेल्या या लढाऊ संप्रदायाचा हेवा वाटू लागला आणि हिंदू समाजात जागृत होणाऱ्या या नव्या अस्मितेमुळे आपल्या राजकीय प्रभुत्वाला धक्का देणारी क्रांतिकारक वृत्ती हिंदू समाजात बाणणार, अशी भीती ब्रिटिश राज्यकर्त्यांनाही वाटू लागली. यामुळे खिस्ती मिशनरी

आणि ब्रिटिश अधिकारी यांना आर्यसमाजाचे क्रांतिकारकत्व जाणवू लागले; पण हा एक धर्मसंप्रदाय आहे अशी सरकारची लवकरच खात्री झाली व पुढे पुढे त्याने निर्माण केलेली लढाऊ वृत्ती आपणांवर होणाऱ्या मुसलमान समाजाच्या हल्ल्यांना तोंड देण्यास उपयोगी आहे असे वाटल्याने हिंदूसभेचे व आर्यसमाजाचे बरेच सख्य होऊ लागले. पण आर्यसमाजाची सुधारणावृत्ती मात्र हिंदूसभेत शिरली नाही. एके काळी आर्यसमाजाने राष्ट्रीयत्वाला आणि जहाल राजकारणाला व हिंदू समाजातील राजकीय क्रांतिवृत्तीला चालना दिली यात शंका नाही.

**(११) चिपळूणकर (१८५०-१८८२), टिळक (१८५६-१९२०), आगरकर (१८५६-१८९५) :** '' वाघिणीचे दूध '' अशा शब्दात चिपळूणकरांनी पाश्चात्य शिक्षणाचे स्वागत केले. १८७४ मध्ये त्यांची ' निबंधमाला ' चालू झाली. महाराष्ट्रात नव्या राष्ट्रवादाचा जो उद्‌भव झाला त्यामागे विष्णुशास्त्री चिपळूणकर यांची ओजस्वी आणि ज्वलंत लेखणी होती यात काहीच शंका नाही. त्यांच्या लिखाणाने भाषाभिमान, देशाभिमान यांच्या नौबती झडू लागल्या. रानडे आणि दादाभाई यांच्या विचारसरणीचा ओघ राष्ट्रवादी असला तरी त्यात ब्रिटिशांच्या मोठेपणाविषयी आदर होता. चिपळूणकरांना ते मान्य नव्हते, चिपळूणकरांच्या लेखणीची धार आणि प्रखरता महाराष्ट्रातील तरुण पिढीला आकर्षू लागली; पण दादाभाई आणि रानडे यांच्या विचारसरणीत पाश्चात्य शिक्षण आणि संस्कृती यांच्या बरोबरच्या परिचयामुळे जी प्रगल्भता, व्यापकता आणि दूरदर्शीपणा आला होता तो चिपळूणकरांच्या विचारसरणीत कधीच येऊ शकला नाही. त्यांची भूमिका नव्याजुन्याचा संगम साधण्याची नव्हती. जुन्या आणि बुरसटलेल्या विचारांची शृंखला तोडून टाकून नव्या समाजरचनेचा पाया घालण्याची तयारी करण्याची हाक त्यांनी कधी दिली नाही. त्यांना सर्वंकष सुधारणावादाचे वावडे होते.

लोकहितवादी आणि जोतिबा फुले यांच्याविरोधी त्यांनी अतिशय प्रखर भूमिका घेतली ती यामुळेच. लोकहितवादी आणि सत्यशोधक समाजाच्या प्रणेत्याचा रोख मुख्यत्वेकरून ब्राह्मणवर्गाच्या मिरासदारीवर होता. आपल्या लेखणीने तरुण पिढीच्या मनात देशप्रीतीची लाट उभी करणारे चिपळूणकर यांनी लोकहितवादींवर कडाडून हल्ला चढविला. सत्यशोधक समाजाच्या धुरीणांनी ब्राह्मणवर्गाच्या मिरासदारीवर जो हल्ला चढविला त्या हल्ल्यापासून प्रस्थापितांच्या बचावासाठी उभे राहिले ते चिपळूणकर! चिपळूणकरांची भूमिका पुनरुज्जीवनवादी होती.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस भारतात आणि विशेषतः महाराष्ट्रात जे विचारमंथन झाले, जो सुधारणावाद पुढे आला तो विभिन्न विचारप्रणालींनी भारलेला होता. काहींना आमूलाग्र सुधारणा पाहिजे होती, काहींना प्रचलित समाजाची घडी तशीच कायम ठेवावयाची होती, तर काहींना जुन्या-नव्याचा समन्वय साधावयाचा होता. एका सुधारणावादात सनातन

हिंदूधर्मतत्त्वांचा त्याग करून नव्या विचारप्रणालीने बद्ध व्हावयाचा अभिनिवेश होता, तर दुसऱ्यामध्ये हिंदू समाजाची चौकट कायम ठेवून त्या चौकटीत व्यक्तिगत जीवन आणि दृष्टिकोन अधिकाधिक बदलायची भूमिका होती.

रानडे यांच्यासारख्यांनी राजकारणात ज्या उदारमतवादी आणि व्यक्तिस्वातंत्र्य अभिप्रेत असलेल्या ध्येयवादाची अपेक्षा धरली तोच ध्येयवाद समाजकारणातही आला पाहिजे असा आग्रह धरला. १८८७ मध्ये सामाजिक परिषदेची स्थापना झाली. त्यात रानडे, तेलंग, बेहिरामजी मलबारी, भांडारकर, आगरकर, टिळक, जिनसीवाले आदि व्यक्तींनी भाग घेतला. यात मूलभूत प्रश्न असा होता की नवी समाजरचना आणि राजकीय वाटचाल करावयाची ती जुन्या विचारसरणीला धरून की तिला सोडून. या प्रश्नावर रानडे आणि आगरकर असे दोन तट दिसून येतात. जुन्याचे खंडन करताना जुन्याचा दाखला दिल्याने फारसे काही बिघडत नव्हते, परंतु नव्याचा पाठपुरावा करताना जुन्याचा दाखला देणे हे प्रागतिक विचारसरणीच्या अगदी विरुद्ध होते. रानड्यांची भूमिकाही थोडीफार अशाच प्रकारची होती. परिणामी ज्या वर्गाचा समाजसुधारणेला विरोध होता त्या वर्गाचीच बूज राखल्यासारखे झाले. समाजातील या कट्टर सनातनी वर्गाने समाजसुधारणा आणि तितक्याच कट्टरपणे राजकारण याला कडाडून विरोध केला, कारण समाजसुधारणा ही प्रागतिक राजकारणाची पार्श्वभूमी होती आणि ज्या तऱ्हेने राजकारणाची वाटचाल होत होती ती पाहिल्यावर या राजकारणातूनच समाजसुधारणेला चालना मिळावयाची होती. " असल्या वेडेपणाच्या समजुतीचा मोक्ष करण्यास पूर्वेतिहास हे पुन्हा पुन्हा पुढे आणून त्याचे फिरून अवलंबन करा असे सांगत न बसता अलीकडील न्यायाच्या भात्यातून तीव्र बाण काढून त्यांचा त्यावर संपात केला पाहिजे. कोणतेही आचार चालण्यास पूर्वीच्या ऋषीस जितका आधार होता तितका आम्हासही आहे. . . . सबब त्यांनी घालून दिलेल्या नियमांपैकी जेवढे हितकारक असतील तेवढ्याचेच आम्ही वाहन करणार व जे अपायकारक असतील ते टाकून देऊन त्यांचे जागी आम्हास निर्दोष वाटतील असे नवीन घालणार . . . .एक ऋषी विरुद्ध दुसरा ऋषी हुडकीत बसण्यात व साऱ्यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न करण्यात काही अर्थ नाही." सारांश, जुन्याबद्दल वृथा अभिमान न बाळगता परंतु योग्य तो आदर दाखवून आगरकरांनी विशिष्ट वैचारिक भूमिका मांडली व कालौघाबरोबर जुने, मग ते कितीही ग्राह्य पण नवीन समाजरचनेत न बसणारे असेल तर त्याचा त्याग केलाच पाहिजे, त्यासाठी आत्मघातकी स्वाभिमान सोडून देणे इष्ट आहे असे प्रतिपादन केले.

आगरकरांच्या या भूमिकेचे खंडन करण्यासाठी टिळक आणि जिनसीवाले यांना कंबर कसावी लागली हा महाराष्ट्रातील सामाजिक आणि राजकीय चळवळीला एक प्रकारे शापच ठरला. अर्थात् त्या काळात प्रथम सुधारक आणि सनातनी यामधील आणि नंतर ' सुधारक '

आणि ' केसरी ' यांमध्ये अतिशय कटू असा वाद झाला. तरी टिळक ' केसरी 'त म्हणाले, '' आजकाल कोणतीही सुधारणा करणे असल्यास ती सयुक्तिक, आवश्यक आणि सुकर आहे की नाही एवढाच खरोखर विचाराचा भाग असतो. असा विचार करण्यास आमचेकडून कोणतीही हरकत नाही.''

समाजसुधारणेच्या बाबतीत टिळक आणि आगरकर यांच्या भूमिका जरी परस्परविरोधी नाही तरी विरोधाभासात्मक होत्या. टिळकांचे समाजसुधारणेशी वावडे नव्हते. हिंदुस्थानापुढे असलेली सर्वांत मोठी समस्या ही त्यांच्या दृष्टीने राजकीय होती आणि ही समस्या सोडविण्यासाठी त्यांच्या दृष्टीने राष्ट्राला स्वाभिमानी बनविणे जरूर होते. समाजसुधारणा ही जरी महत्त्वाची असली तरी सद्यःपरिस्थितीत राजकारणापुढे तिचे महत्त्व गौण होते असे टिळकांना वाटे.

टिळक इंग्लंडमध्ये असताना ते लष्करी परिस्थितीबाबत सतत फार रस घेत होते असे अहवाल आले होते. इंग्लंडमध्ये बोल्शेव्हिक तत्त्वांचा प्रसार कसा आहे याबद्दल त्यांचे मित्र त्यांना माहिती देत होते. या सरकारचे पतन लवकरच होईल व कामगार आणि समाजवादी गोटात त्यांच्या कार्याचा उठाव होईल अशी त्यांना आशा वाटत होती.[१०]

टिळक भारतात परत आले ते नवीन कार्यक्रम घेऊन. सोशल डेमोक्रॅटिक पक्ष स्थापन करण्यासाठी मुंबईत इंग्रजी वा मराठी दैनिक सुरू करून, मुंबई हेच कार्यक्षेत्र करण्याचे त्यांचे विचार होते. त्यांनी बॅ. व्ही. एम्. पवार यांची नवीन कंपनीचे सेक्रेटरी व त्यांचे प्रतिनिधी म्हणून निवड केली.[११]

' कामगारांच्या श्रमातून देशातील संपत्ती निर्माण होत असल्याने तीमधील योग्य तो वाटा मिळविण्याचा त्यांना हक्क आहे. भांडवलदारांना त्यांच्या भांडवलावर फक्त योग्य ते व्याज मिळावे, बाकीचे सर्व कामगारांना मिळाले पाहिजे. हे जर कामगारांना मिळत नसेल तर ते मिळविण्यासाठी त्यांनी प्रयत्न केले पाहिजेत ' हे टिळकांचे बोल आहेत १९१९च्या अखेरचे. ब्रिटनमधील तेरा महिन्यांच्या वास्तव्यानंतर ते २६ नोव्हेंबर १९१९ला परत आले. ब्रिटिश मजूर पक्षाशी त्यांचे दृढ संबंध प्रस्थापित झाले. इंग्लंडमधील मजूर चळवळीचा आणि रशियात झालेल्या बोल्शेव्हिक क्रांतीचा त्यांच्या मनावर प्रभाव पडला होता. चळवळ टिकाऊ व्हावयाची असेल तर मध्यमवर्गापेक्षा खालच्या वर्गावर अधिक भर देऊन धार्मिक, औद्योगिक आणि सामाजिक प्रश्नांच्या पायांवर चळवळी उभ्या करून त्या देशाच्या कानाकोपऱ्यात पसरल्या पाहिजेत आणि चळवळ अधिक समाजव्यापी केली पाहिजे या मतापर्यंत ते आले होते....कामगारांनी आपल्या मजबूत संघटना निर्माण करून आपली चळवळ प्रभावी करावी असे त्यांनी आग्रहाने प्रतिपादन केले आहे. मद्रासच्या भाषणात ते म्हणाले, '' मी तुमच्यासारखाच एक मजूर आहे. तुम्ही हातांनी काम करता, मी माझे

हात आणि डोके यांनी काम करतो...आपण सगळेच मजूर आहोत.... जाती, धर्म इत्यादी भेद बाजूला सारून तुम्ही एकी केली पाहिजे आणि सरकारला काम द्यावयाला भाग पाडण्याइतक्या तुमच्या युनियन तुम्ही जोरदार बनविल्या पाहिजेत. इंग्लंडमधील मजूर संघटना तुमच्या पाठीशी उभ्या राहतील याची खात्री बाळगा. खरे म्हणजे हा संदेश तुम्हाला देण्याची कामगिरी त्यांनी माझ्यावर सोपवली आहे....या कामी तुम्हाला काँग्रेसचा पाठिंबा मिळेल...जे स्वातंत्र्य आम्हाला मिळावयाचे आहे ते वरिष्ठ वर्गाकरिता नव्हे....संपत्ती ही कामगार निर्माण करीत असतात, म्हणून ती संपत्ती सर्वांआधी जे हात ती निर्माण करतात त्यांच्या मालकीची असते. ... मुंबईच्या कामगारांना मी सांगितले की, मुंबईचे मालक कामगार हेच आहेत, भांडवलदार नव्हेत ....आमची प्राचीन, सामाजिक आणि आर्थिक रचना धनिकांची बाजू घेणारी नव्हती....हिंदी कामगारवर्गात शेतमजुरांचाही समावेश केला पाहिजे आणि त्यांच्याही कामगार युनियन्स स्थापन केल्या पाहिजेत.... युरोप तुमच्या पाठीशी उभा आहे....आम्हाला तुमचा भक्कम पाठिंबा हवा आहे. असा पाठिंबा द्यायला तुम्ही तयार आहात काय? (आवाज-होय होय).(२३ डिसेंबर १९१९ ' हिंदु ' व ' बाँबे क्रॉनिकल ') (म. टा. १९ जुलै १९९०).

महाराष्ट्रात साखर कारखाने काढण्याची कल्पना टिळकांनी १९०६ साली सूचित केली होती. महाराष्ट्रात साखरेचे ८० कारखाने निघतील हे त्यांनी आकडेवारीने दाखविले (' केसरी '१७ जुलै १९०६).

बंगालमध्ये वंगभंगाच्या प्रतिकाराच्या निमित्ताने जी ही प्रचंड शक्ती निर्माण होत होती, तिला निःशस्त्र क्रांतीचे रूप देऊन ती राष्ट्रसभेच्या राजकारणामागे उभी करावी हे लोकमान्यांचे १९०५ पासून १९०८ पर्यन्तचे राजकारण होते, आणि या नव्या शक्तीच्या प्रकाशात दिसू लागलेल्या मार्गाने राष्ट्रसभा जाऊ लागल्यास ती एखाद्या खोल दरीत जाऊन पडेल या भीतीने तिला नव्या मार्गाने जाऊ न देता पूर्वीच्याच परावलंबनाच्या मार्गावर हट्टाने व आग्रहाने खेचून ठेवण्याचा तुटेपर्यन्त प्रयत्न करणे, हे सर फेरोजशहाप्रभृति जुन्या पुढाऱ्यांचे राजकारण होते. ना. गोखले व बाबू सुरेंद्रनाथ हे जुन्या पक्षाचेच असले तरी सर फेरोजशहांचा हा तमोगुणी हट्ट म्हणजे दुराग्रह आहे असे त्यांना वाटत होते. तरीही या नव्या शक्तीचे उघड स्वागत करण्याचे मनोधैर्य त्यांच्यापाशी नसल्याने आणि त्यांची श्रद्धा जुन्या भूमिकेवर दृढ असल्याने त्यांना अखेरीस सर फेरोजशहांच्या निशाणाखालीच जाणे भाग पडले. या रस्सीखेचीचे अखेर पर्यवसान ती रस्सी तुटण्यात म्हणजे राष्ट्रसभा दुभंगण्यात झाले व त्याचा फायदा राज्यकर्त्यांना मिळून भारतीय राष्ट्रशक्ती काही काल मूर्छित होऊन पडली.

लोकमान्यांनी १९०५ च्या राष्ट्रसभेच्या आवारातच नव्या पक्षाला बहिष्कार योगाची दीक्षा देऊन लाला लजपतराय व बाबू बिपिनचंद्र पाल यांच्या सहाय्याने नव्या निःशस्त्र

क्रांतिकारक राष्ट्रीय पक्षाची स्थापना केली. भारतसेवक समाजाची स्थापना करून जुन्या राजकारणाला चिरंतन करणारे ना. गोखले हे या वर्षी राष्ट्रसभेच्या अध्यक्षपदावर आरूढ झाले असले आणि त्यांनी आपल्या भाषणात वसाहतीचे स्वराज्य हेच आमचे अंतिम साध्य आहे असे जाहीर केले असले तरी त्यांनी बंगालमधील विलायती मालाच्या बहिष्काराच्या चळवळीचे समर्थन व अभिनंदन केले आणि स्वदेशी चळवळीला पूर्ण पाठिंबा दिला. तथापि, त्यांच्या विचारांची मूळ भूमिका कायम होती आणि राजनिष्ठा व राष्ट्रनिष्ठा यांचा पूर्ण समन्वय करून त्यांनी आपल्या भाषणात युवराजांच्या आगमनाचे मनःपूर्वक स्वागत केले. बंगालमधील तरुणांची अंतःकरणे वंगभंगाने खवळून गेलेली असून युवराजांच्या स्वागताचा ठराव करण्यास त्यांचा तीव्र विरोध होता.

१९०६ हे वर्ष हिंदी राष्ट्रीय चळवळीत दोन-तीन गोष्टींसाठी सुप्रसिद्ध आहे. १९०५ सालच्या अखेरीस लो. टिळकांनी ज्या बहिष्कारयोगाचे बीजारोपण राष्ट्रसभेच्या आवारात केले, त्याला बंगालमध्ये शांततेच्या कायदेभंगाचा अंकूर फुटून ज्या मुद्यांवर हा कायदेभंग किंवा हुकूमभंग झाला.त्या मुद्यांवर बंगाली पुढाऱ्यांना तात्कालिक यश मिळाले. या यशानंतर थोड्याच दिवसात श्री. दादासाहेब खापर्डे यांनी राष्ट्रीय सभेच्या धोरणाला नवी दिशा लावण्याचे कार्य येत्या राष्ट्रसभेत झाले पाहिजे, अशा अर्थाचे एक पत्रक राष्ट्रसभेच्या कार्यकर्त्यांस पाठविले. हे पत्रक अर्थात् लोकमान्य टिळकांच्या प्रेरणेनेच निघाले होते. त्यास पाठिंबा देताना लो. टिळकांनी निःशस्त्र कायदेभंग आणि बहिष्कार यांचा अवलंब करून तेथील राज्ययंत्राला खीळ घातल्याखेरीज मोर्लेसाहेब झाले तरी आपणास काही देणार नाहीत असे स्पष्ट लिहिले.

स्वराज्य हे लोकमान्यांचे साध्य होते आणि " साधनानाम् अनेकता " हे त्यांच्या कार्यपद्धतीचे सूत्र होते. " साधनानाम् अनेकता " याचा टिळकांना नेमका कोणता अर्थ अभिप्रेत होता, ते पाहणे आवश्यक आहे. टिळकांच्या समकालीनांपैकी नामदार गोखले, फिरोजशहा मेथा आदी नेमस्त पुढाऱ्यांना देशाच्या राजकीय प्रगतीसाठी सनदशीर मार्गानेच गेले पाहिजे असे वाटत होते. सरकारकडून नेमल्या जाणाऱ्या समित्यांसमोर अभ्यासपूर्ण निवेदने द्यावयाची, सरकारकडे गाऱ्हाणी मांडून ती दूर व्हावी यासाठी विनंती करावयाची, कायदे कौन्सिलात जनतेच्या आकांक्षा समर्थपणे मांडावयाच्या, हिंदुस्थानात व इंग्लंडमध्येही आपणांस लोकमत अनुकूल होण्यासाठी इंग्रजीतून भाषणे करावयाची व लेख लिहावयाचे या विविध मार्गांनी गोखलेप्रभृतींचे कार्य चालत असे. ब्रिटिशांच्या न्यायबुद्धीवरील विश्वास हा या कार्यपद्धतीचा आधार होता. तत्कालीन परिस्थितीत या कामाचे महत्त्व फार होते हे टिळकही जाणीत होते. नामदार गोखले यांच्या इंग्लंडमधील कामगिरीचा त्यांनी ज्या रीतीने गौरव केला, त्यावरून हे स्पष्ट होते. परंतु या कार्यपद्धतीला फार मोठी मर्यादा

आहे, असे टिळकांचे मत होते. ती मर्यादा ही की, या रीतीने कार्य करणे केवळ मूठभर देशभक्तांसच शक्य होते. जे नेते बुद्धिमान होते, ज्यांना फर्डे इंग्रजी बोलता व लिहिता येत असते, ज्यांच्याजवळ वाक्पटुता होती किंवा कोणत्याही प्रश्नांचा अभ्यास करण्याचे सामर्थ्य होते, अशा असामान्य कर्तृत्वाच्या व्यक्तींना–दादाभाई नौरोजी, न्यायमूर्ती रानडे, नामदार गोखले, फिरोजशहा मेथा आदी नेत्यांना या मार्गाने देशसेवा करणे शक्य होते. सर्वसामान्य माणसांना या थोर नेत्यांबद्दल आदर वाटला तरी त्यांच्या कार्यात सहभागी होणे शक्य नव्हते. म्हणजे हा मार्ग मूठभर व्यक्तींच्यापुरताच मर्यादित होता. टिळकांचा नेमस्तांशी आणखीही एक मतभेद असा होता की, ब्रिटिशांच्या न्यायबुद्धीवर त्यांचा विश्वास नव्हता. मोर्लेसारखा विद्वान भारतमंत्री झाल्यावर साम्राज्यवादी म्हणून वागतो हे टिळकांनी दाखवून दिले होते. त्या काळातील क्रांतिकारक हे नेमस्तांच्या दुसऱ्या टोकाला होते. ब्रिटिशांना केवळ शस्त्राचीच भाषा समजते, असे क्रांतिकारकांना वाटत होते म्हणून सशस्त्र क्रांति हाच स्वराज्य संपादनाचा मार्ग होऊ शकेल, या तरुण देशभक्तांच्या मनात परकीय सत्तेबद्दल तीव्र संताप होता. संतापाचा हा आगडोंब देशभर पसरावा यासाठी स्वतःच्या रक्ताचे सिंचन करण्यास ते ध्येयवेडे तरुण तयार होते. चाफेकर बंधू, अरविंद घोष आणि त्यांचे सहकारी, स्वातंत्र्यवीर सावरकर आणि अभिनव भारत संघटनेतील त्यांचे सहकारी, सेनापती बापट आदी क्रांतिकारकांची बलिदानाची तयारी होती. त्यांच्यातील काहीजण हसत फासावर गेले आणि काहींनी अंदमानातील अंधारकोठडीत दारूण हालअपेष्टा सोसून देशप्रेमाची ज्योत प्रज्वलित केली. या थोर देशभक्तांच्याबद्दल टिळकांच्या मनात नितांत आदर होता. तरीही या क्रांतिकारकांच्या कार्यपद्धतीची मर्यादा त्यांना पुरेपूर माहिती होती. सशस्त्र क्रांतीचा मार्ग, सर्वस्वाचा होम करण्यास तयार असणाऱ्या मूठभर ज्वलंत देशभक्तांनाच चोखाळता येईल अशी ती मर्यादा होती. सर्वसामान्य माणसाला या क्रांतिकारकांबद्दल असीम प्रेम असले तरी त्यांचे अनुकरण करणे, सहाय्य करणे शक्य नव्हते. त्या काळात या देशभक्तांबद्दलचे प्रेम व्यक्त करणेही सोपे नव्हते. यावरून हे दिसून येईल की, सनदशीर मार्गाने जाणारे नेमस्त पुढारी आणि सशस्त्र क्रांतीचे पुरस्कर्ते हे एका अर्थाने दोन ध्रुवावर असले तरी दोघांच्या कार्यपद्धतीत सामान्यांना स्थान नव्हते.

लोकमान्य टिळकांची कार्यपद्धती या दोन्ही मार्गांपेक्षा भिन्न होती. सर्वसामान्य माणसाला चळवळीत सहभागी करून घेता येईल असे कार्यक्रम आखून स्वराज्याच्या चळवळीला व्यापक अधिष्ठान दिले पाहिजे, हे लोकमान्यांच्या कार्यपद्धतीचे सूत्र होते. बंगालच्या फाळणीविरोधी चळवळीत स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य या चतु:सूत्रींचा उद्घोष लोकमान्यांनी केला आणि या कार्यक्रमांतून असंख्य कार्यकर्त्यांच्या कर्तृत्वाला स्वराज्यसाधनेत वाव मिळवून दिला. टिळक बंडखोर होते, कायद्याच्या चौकटीत राहून बंडखोरीचा कार्यक्रम

दिला तरच जनसामान्यांना त्यात सहभागी होता येईल अशी त्यांची वास्तववादी दृष्टी होती. महाराष्ट्रातील दुष्काळाच्या वेळी टिळकांनी कायद्याच्या चौकटीत राहून शेतकऱ्यांची व्यापक चळवळ उभारली. वंगभंगाच्या वेळी जनशक्तीचा आविष्कार घडवून आणला. हेच त्यांचे मोठेपण होते. म्हणून त्यांना कायदेशीर बंडाचे प्रवक्ते असे अभिधान द्यावे लागते.

लोकमान्य टिळकांनी आपल्या अनेक चळवळी कायद्याच्या चौकटीत राहून केल्या, कारण त्या काळाच्या परिस्थितीच्या मर्यादा सांभाळून जनआंदोलन उभे करण्याचा तो एकच मार्ग होता. व्यक्ती म्हणून ते क्रांतिकारकांइतकेच निर्भय होते. लोकमान्यांनी हिंसा निषिद्ध मानली नव्हती, परंतु हिंसा या साधनाचा उपयोग विवेकाने केला पाहिजे, साहसी अविवेक आत्मघातकी ठरेल असा इशारा तरुण क्रांतिकारकांना त्यांनी सतत दिला. १९१४ च्या त्यांच्या हिंसाविषयक भूमिकेत पूर्वीपेक्षा बदल झालेला दिसून येतो. गीतारहस्य लिहिल्यावर लोकमान्यांना असे वाटत होते की, ज्याची बुद्धी निर्वैर झाली असेल त्यालाच हिंसेचा वापर केव्हा करायचा हे ठरविण्याचा अधिकार आहे. एखाद्या ब्रिटिश अधिकाऱ्याच्यां जुलुमाने संतप्त झालेल्या तरुण क्रांतिकारकाचे मन निर्वैर असणे शक्य नव्हते. परंतु वैयक्तिक रागालोभाच्या पलीकडे जाऊन साम्राज्यशाहीशी सतत झगडा देणाऱ्या दीर्घकालीन कारावासातही मन कडवट न होता गीतारहस्यासारखा तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ लिहिणाऱ्या लोकमान्यांचे मन खासच निर्वैर झालेले होते. म्हणून सशस्त्र क्रांतीचा मार्ग केव्हा स्वीकारावयाचा हे ठरविण्याचा अधिकार केवळ त्यांचा होता.

१९०६ सालात लॉर्ड मोर्ले अधिकारारूढ झाल्यानंतर थोड्याच दिवसात राष्ट्रसभेतील टिळक व गोखले यांच्या पक्षातील अंतर वाढू लागले आणि सशस्त्र क्रांतिकारक पक्षाची स्थापना झाली. पण या दोन घडामोडीपेक्षाही १९०६ साल आधुनिक भारताच्या इतिहासातील जर कोणत्या एका गोष्टीबद्दल विशेष प्रसिद्ध असेल, तर ती म्हणजे दादाभाई नौरोजी यांनी राष्ट्रसभेला स्वराज्याचा मंत्र देऊन नव्या-जुन्या पक्षांच्या सलोख्याने व सहकार्याने स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण, बहिष्कार आणि स्वराज्य या विषयांवरील ठराव मंजूर करवून घेतले व नव्या-जुन्या पिढीला '' चिकाटी धरा, एकी राखा आणि स्वराज्य मिळवा '' असा दिव्य संदेश दिला, हीच होय.

## (१२) आगरकर

'' केसरी ''चे पहिले संपादक होते आगरकर. १८८१ ते १८८८ या काळात आधी राजकीय सुधारणा की सामाजिक सुधारणा हा वाद रंगला. या विचारप्रणालींचे प्रवक्ते अनुक्रमे टिळक आणि आगरकर होते. सुरुवातीच्या काळात टिळक हे '' मराठा '' कार होते. सुरवातीच्या ७/८ वर्षांच्या काळात '' केसरी '' आगरकरांचा होता. या कालखंडात आगरकर जी मते प्रतिपादन करीत होते ती फक्त त्यांचीच होती, इतरांना मान्य नव्हती असे समजण्याचे

कारणच नाही. सुरवातीपासूनच त्यांच्यामध्ये सामाजिक बाबतीत विसंबद्ध सूर निघत असे, यालाच पुढे गंभीर स्वरूप प्राप्त झाले. आगरकरांनी '' केसरी '' सोडला (२९-१०-८७) आणि स्वतः चे '' सुधारक '' पत्र काढले (१५-१०-८८). त्या सुधारणाही कोणत्या मार्गांनी घडवून आणाव्यात याबद्दल त्यांच्यात आरंभापासूनच मतभेद होते. त्यामुळे आगरकरांची स्वाभाविकपणे कुचंबणा झाली.

'' सुधारक '' पत्रातून आगरकरांनी लिहिलेल्या लेखांची शीर्षके त्यांच्या धर्ममतांची कल्पना येण्यास पुरेशी आहेत. '' सोवळ्याची मीमांसा '', '' आमचे प्रेत-संस्कार '' '' शनिदेव व साडेसातीचा देव '', '' अंडी खाण्यास काय हरकत आहे ? '' अशा स्वरूपाच्या लेखांनी आगरकर हे रूढीकडे कोणत्या दृष्टीने पाहात होते याची कल्पना येते. धर्माधिष्ठित कर्मकांडावर त्यांनी कठोर टीका केली आहे. तर्ककठोर विचारसरणी, विवेकनिष्ठा, बुद्धिप्रामाण्य या धारदार शस्त्रांनी त्यांनी लेखणी झिजविली, पूर्वजन्म–पुनर्जन्म या कल्पना त्यांना मान्य नव्हत्या.

सार्वजनिक कामासाठी प्रयत्न करून स्वार्थत्याग करणाऱ्यांच्या तुरुंगवासाचा पायंडा टिळक-आगरकरांनीच पाडला. कोल्हापूर प्रकरणात त्यांना ही शिक्षा झाली आणि त्यांनी ती '' डोंगरी ''च्या तुरुंगात १०१ दिवस भोगली (त्यांच्या आधीचे मुख्य उदाहरण म्हणजे वासुदेव बळवंत फडके यांचे दिसेल). तुरुंगातून बाहेर येताच दोन हजारावर लोकांनी त्यांचे स्वागत केले.

राष्ट्राची सामाजिक प्रगती राजकीय प्रगतीच्या व स्वाभिमानाच्या अनुषंगाने झाली पाहिजे. राजकीय परवशता फारतर मुळमुळीत विरोधाने स्वीकारून जिवंत सुधारणा होणेच शक्य नाही असे राष्ट्रीय पक्षाचे तत्त्व होते. राजकीय लढा सर्व भारतीयांचा आणि सर्व भारतीयांसाठी आहे. समाजसुधारणेच्या प्रयत्नामुळे इंग्रजविरोधी राजकीय एकजुटीवर दुष्परिणाम होत नाही ना, हे पाहण्याची आपली जबाबदारी आहे असे टिळक सांगत.

हिंदुस्थानातील जन्मसिद्ध अर्थव्यवस्था व जातिभेद या कितीही जुन्या संस्था असल्या तरी त्या आता टिकणे शक्य आणि इष्ट नाही याची जशी आगरकरांना खात्री होती त्याचप्रमाणे येथे जे व्यवसाय-स्वातंत्र्य निर्माण होत आहे त्यातून केवळ द्रव्यावर अधिष्ठित होणारा एक वर्गभेद अस्तित्वात येत असून त्यामुळे आमच्या राजकीय दृढीकरणास सहाय्य होत आहे, इकडेही त्यांचे लक्ष गेल्याशिवाय राहिले नव्हते.

आपल्या देशात ज्या मानाने कारखानदारी वाढणार, त्यामुळे या मोठमोठ्या कारखान्यांतील लोकांना आपल्या हक्कासाठी आपल्या मालकांशी भांडावे लागणार व त्यातून एक स्वामी-सेवकांचा वर्गकलह निर्माण होणार हे त्यांना दिसत होते. '' रेल्वे कंपन्या आणि रेल्वे नोकर '' या १८९१ मधील लेखात रेल्वे कामगारांची संघटना बांधण्याची सूचना त्यांनी

केली होती. व्यक्तिवादी समाजवादी रचनेबरोबर येथील औद्योगिक क्षेत्रात वर्गकलह निर्माण होत आहे, म्हणून कामगारांनी संघटित होणे जरूर आहे असे त्यांनी स्पष्टपणे लिहिले आहे.

समाजात सत्ता आणि संपत्ती यांची समान विभागणी करणे हेच समाजसुधारणेचे खरे ध्येय आहे. निदान होईल तितके सारखे सुख मिळण्याची व्यवस्था होत जाणे म्हणजे सुधारणा होत जाणे असे म्हणण्यास हरकत नाही. जातिभेद मोडणे, धर्मसुधारणा करणे, सार्वजनिक शिक्षण, वयात आलेल्या व्यक्तीला उदरनिर्वाहाचा धंदा असणे, सहजगत्या उदरभरणाची सोय असणे यांवर त्यांनी भर दिला. आमची संस्कृति जगाच्या मागे पडली आहे हे त्यांनी आग्रहाने सांगितले आहे.

या संदर्भात आचार्य जावडेकर लिहितात, '' लोकमान्यांनी सांस्कृतिक पुनरुज्जीवनाच्या आधारावर जे राष्ट्रीयत्व निर्माण केले त्यामुळे त्यांच्या हयातीत महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर जनतेत फारशी जागृती झाली नव्हती ''.

आगरकर हे आपल्याप्रमाणेच पक्के स्वराज्यवादी होते असे स्वत: टिळकांनीच जाहीरपणे सांगितले होते. राजकीय मते टिळकांइतकीच जहाल असूनही सामाजिक सुधारणा घडवून आणण्यावर आगरकरांचा अधिक भर होता. '' मिशनऱ्यांच्या नादी लागून स्वराज्याच्या प्रयत्नात विघ्न आणणारा ब्राह्मणद्वेष्टा माणूस यापलीकडे ' केसरी ' ने एवढेच नव्हे तर आगरकरांसारख्या समाजसुधारक समकालीनांनीही जोतीरावांचे मूल्यमापन केलेले दिसत नाही ''. ' जातीजातीमधील, स्त्रीपुरुषांमधील विषमता जोपर्यंत कायम आहे तोपर्यंत आगरकरांचा विचार ते पक्के स्वराज्यवादी असूनही इतिहासजमा झाला आहे असे म्हणता येणार नाही.'

आगरकर अकाली कालवश झाले (१८९५). पुढील २५ वर्षांत टिळकांच्या राजकीय जीवनाचा विकास झाला आणि ते अखिल भारतीय पुढारी झाले. रॅण्डचा खून, वंगभंगाची चळवळ, सुरत कॉंग्रेस, होमरूल इत्यादी चळवळीतील महत्त्वाच्या घटना टिळकांच्या हयातीत झाल्या. या काळात सामाजिक का राजकीय सुधारणा हा विषय मागे पडला आणि राजकीय जहाल व मवाळ असे भेद पडले. राजकीय जहालांनी राजकीय मवाळांचा पराभव केला व त्या काळात आगरकरांचा विचार मागे पडला.

महात्मा गांधींनी काळे-गोरे या वर्णभेदाविरुद्ध दक्षिण आफ्रिकेत सत्याग्रह केला. हजारोंनी त्यात भाग घेतला. काही वर्षे तेथे काढून ते १९१५ला भारतात आले. १९१६ मध्ये त्यांच्याच नेतृत्वाखाली बिहारमध्ये निळीच्या युरोपियन मळेवाल्यांविरुद्ध सत्याग्रह मोहीम उभारली. त्यामुळे भारतात गांधीजींच्या भोवती कार्यकर्त्यांचा संच उभा राहिला. रौलट ॲक्ट विरोधी (१९१९) लढाही संघटित झाला, आणि त्यानंतर असहकाराचे आंदोलन झाले. या सर्व

काळात गांधींनी जो कार्यक्रम लोकांपुढे ठेवला तो सर्वंकष होता. खादी, अस्पृश्यतानिवारण, दारूबंदी असे अनेक कार्यक्रम पुढे आले. आधी राजकीय का सामाजिक हा वाद राहिला नाही. त्या सर्वंकष कार्यक्रमामुळे बहुजनसमाज त्यांच्याकडे येऊ लागला. १९२० ते १९३० या काळात ही क्रिया चालू होती. '' देशाचे दुष्मन '' सारखी प्रकरणे झाली; पण लाहोर काँग्रेस, दांडी मार्च, मिठाचा सत्याग्रह यात तो जातिवाद विरून गेला.

त्याहीपूर्वी समाजवादी विचारांचा उदय झाला होता. त्यामुळे समाजसुधारणा सर्वांगीण, आमूलाग्र पाहिजे हा विचार दृढ झाला. त्यामुळे १९ व्या शतकातील वाद लयाला गेले.

१८७१ साली सार्वजनिक सभा स्थापन झाली. १८७४ साली निबंधमाला सुरू झाली. १८८०-८१ साली न्यू इंग्लिश स्कूल, केसरी व मराठा यांचा अवतार झाला. १८८५ साली राष्ट्रसभा स्थापन झाली. १८८८ साली '' सुधारक '' पत्राचा जन्म झाला. १८९५ साली लो. टिळकांनी सार्वजनिक सभा हस्तगत केली.

इ. स. १८८० नंतर नवा राष्ट्रीय पक्ष निर्माण झाला. त्याला आधारभूत अशी राजकारणाची व अर्थकारणाची तत्त्वे किंवा सिद्धान्त दादाभाईंनी इ. स. १८७१ च्या सुमारास ईस्ट इंडिया फिनॅन्स कमिटीपुढे किंवा १८८०च्या फॅमिन कमिशनच्या रिपोर्टात त्यांची जी मतपत्रिका प्रसिद्ध झाली तीत आढळतात. फरक इतकाच की, दादाभाईंचा ब्रिटिश न्यायदेवतेवर जितका विश्वास होता, तितकाही यापुढील पिढीचा उरला नाही. ब्रिटिशांवरचा विश्वास उडणे आणि आपल्या लोकांच्या जहाल राष्ट्रीय राजकारणाची इमारत उठण्यास फार कालावधीची गरज नव्हती.

राजकीय उन्नतीपेक्षा औद्योगिक उन्नती वरकरणी सोपी दिसली, तरी वस्तुतः ती तशी नव्हती आणि राजकीय कारणांकडे दुर्लक्ष करून व स्वकीय-परकीय भांडवलवाल्यांतील भेद विसरून औद्योगिक उन्नतीचा पुरस्कर करणे हे युक्त नाही, असे या नव्या देशभक्तांचे मत होते. टिळक-नामजोशी यांच्याप्रमाणे आगरकर हेही या बाबतीत दादाभाईंच्या मताचेच असून आपली औद्योगिक उन्नती होणे हे एकाअर्थी स्वराज्य मिळविण्यापेक्षाही कठीण आहे, असे त्यांनी स्पष्टपणे लिहिले आहे.

ब्रिटिश लोकांचे हितसंबंध व आपले हितसंबंध भिन्न व विरोधी आहेत इकडे दुर्लक्ष करून राजकारण करता येत नाही, तसेच आपले अर्थकारणही. हा विरोध किंवा हे द्वैत लक्षात घेतल्यावाचून चालणार नाही, याची जाणीव टिळक-आगरकर यांच्या पिढीला झालेली होती. त्यांना न्यायमूर्तींचे राजकारण व अर्थकारण ही दोन्हीही नेमस्त किंवा मिथ्या आशावादी वाटू लागली होती.

एका लेखात आगरकर म्हणतात '' आमच्या व्यापारास व शेतकीस अर्थशास्त्राचे उल्लंघन न करता कोणत्या रीतीने मदत करता येईल याची चिकित्सा मि. जस्टीस तेलंग,

रा. ब. रानडे, दादाभाई नौरोजी वगैरे अनेक अनुभविक शास्त्रज्ञ व विचारी गृहस्थांनी केली आहे. पण तिचा उपयोग काय? निजलेल्यास जागे करणे शक्य आहे, पण जाग्यास जागे कोण करू शकेल? इंग्लिश लोकांच्या मनोधर्मात एकाएकी प्रचंड क्रांती झाल्याशिवाय त्यांच्या अंतःकरणात जपान किंवा युनायटेड स्टेट्स येथील सरकारप्रमाणे आमच्या व्यापारवृद्धीविषयी कळकळ उत्पन्न होईल अशी आशा करणे व्यर्थ आहे.''

१८७५ पासून १८८५ पर्यंतच्या काळात हे जे नवचैतन्य राष्ट्रात निर्माण होत होते, त्याला एक सांस्कृतिक अंगही होते. हे सांस्कृतिक अंग म्हणजे भारतीय संस्कृतीच्या श्रेष्ठतेचा अभिमान हेच होय. महाराष्ट्र, बंगाल, पंजाब व मद्रास या चार प्रांतांत आपल्या भारतीय संस्कृतीच्या श्रेष्ठतेचा अभिमान वाढविणाऱ्या चळवळी या काळात झालेल्या आहेत. महाराष्ट्रात या चळवळीचे स्वरूप थोडक्यात '' महाराष्ट्र धर्माचे पुनरुज्जीवन '' या नावाने सांगता येईल. बंगालमध्ये रामकृष्ण परमहंसांचे शिष्य स्वामी विवेकानंद यांनी याच वेळी भारतीय वेदान्ताची पताका जगभर पसरविण्यासाठी संन्यासदीक्षा घेतली व पुढे रामकृष्ण मिशनची स्थापना केली. पंजाबात स्वामी दयानंद यांनी स्थापन केलेल्या आर्यसमाजाची शाखा १८७७ साली लाहोर येथे रुजली व तिनेच पंजाबात नवजीवन निर्माण केले. मद्रासमध्ये याच सुमारास थिऑसॉफीचा विशेष प्रचार झाला आणि त्या प्रांतात राष्ट्रीय स्वाभिमान जागृत करण्याचे कार्य थिऑसॉफीने केले. अशा प्रकारे महाराष्ट्रधर्म, रामकृष्ण मिशन, आर्यसमाज आणि थिऑसॉफी यांच्या आधारे महाराष्ट्र, बंगाल, पंजाब आणि मद्रास या चार प्रांतांत राष्ट्रीय अभिमानाचे एक नवे युग या वेळी प्रवर्तित होत होते.

केवळ चिपळूणकर यांनाच लोकांचे दारिद्र्य व राजकीय दास्य यांच्या हननास अग्रस्थान द्यावे असे वाटत होते असे नाही, तर आमच्या सामाजिक व धार्मिक विचारातही क्रांती झाली पाहिजे असे प्रतिपादन करणारे आगरकर यांनाही राजकीय सुधारणेला व तज्जन्य दारिद्र्यविनाशाला अग्रस्थान दिले पाहिजे ही गोष्ट मान्य होती. इतकेच नव्हे तर ब्रिटिश राज्यकर्ते आम्हास केवळ धार्मिक व सामाजिक सुधारणा करण्यातच गुंतून राहा असा उपदेश करतात, यात त्यांचा एक राजकीय किंवा आर्थिक स्वार्थ आहे हेही त्यांनी स्पष्टपणे लोकांपुढे मांडिले आहे.

१८८० सालापासून देशातील सर्व विचारी तरुण मंडळींच्या विचारात दारिद्र्य आणि दास्य यांच्या हननाच्या प्रश्नास आद्यस्थान मिळू लागले. या बाबतीत चिपळूणकर, आगरकर व टिळक यांच्यात मतभेद मुळीच नव्हता. लो. टिळक लिहितात : '' १८८८ सालापर्यंत ' केसरी ' त जे राजकीय विषयांवर लेख आले ते बहुतेक आगरकरांचे आहेत, आणि त्यानंतर ' सुधारका 'तही अशा प्रकारचे बरेच निबंध आले आहेत. या सर्वांचे सूक्ष्म निरीक्षण केले असता असे दिसून येईल की, आगरकर हे पक्के स्वराज्यवादी होते आणि

कै. विष्णुशास्त्री चिपळुणकरांप्रमाणे देशातील दारिद्र्य, परावलंबिता, चांगल्या पुरुषांचा तेजोभंग, गोऱ्या अधिकाऱ्यांची चरणी व वरणी, व्यापारनाश वगैरे राजकीय व औद्योगिक अवनती पाहून त्यांचे चित्त केशवपनादी चालींच्या निरीक्षणापेक्षाही अधिक संतप्त व दुःखित होत असे व याला मिल व स्पेन्सर यांनी प्रतिपादन केलेल्या स्वराज्याच्या तत्त्वाखेरीज दुसरा उपाय नाही, अशी त्यांची नक्की खात्री झालेली होती.मिलने ज्याप्रमाणे आपली लेखणी केवळ स्त्रीस्वातंत्र्यावरच चालविली नाही. तद्वतच आगरकरांची गोष्ट आहे. जो तार्किकपणा समाजसुधारणेसंबंधाने त्यांच्या अंगी वसत होता, तोच तार्किकपणा त्यांनी राजकीय बाबींवरील आपल्या लेखातही पूर्णपणे उपयोगात आणला आहे. टिळक आणि आगरकर यांचा जो मतभेद झाला, तो राजकीय बाबतीत किंवा शिक्षणाच्या बाबतीतही नाही. मतभेद धार्मिक व सामाजिक बाबतीत उत्पन्न झालेला होता. धर्मदृष्ट्या आगरकर केवळ बौद्धिकवादी होते आणि तोच पंथ सामाजिक बाबतीतही निदानपक्षी आपल्या लेखात त्यांनी स्वीकारला होता.''

मुंबईस भरलेल्या पहिल्या राष्ट्रसभेस एकंदर ७२ प्रतिनिधी उपस्थित होते. त्यापैकी : मुंबईचे १८, पुण्याचे ८, कराचीचे २, विरमगावचे ११, सुरतचे ६ आणि अहमदाबादचे ३ असे मुंबई इलाख्यातील ३८ सभासद होते. मद्रासचे ८, कलकत्त्याचे ३, लखनौचे ३, तंजावरचे २ आणि लाहोर, अंबाला, बऱ्हाणपूर, मच्छलीपट्टण, विंगलपूर, मदुरा, तिरुनेवेल्ली, कोइमतूर, कुंभकोणम्, सालेम, कुडाप्पा, अनंतपूर, बल्लारी आणि सिमला येथून प्रत्येकी १ अशी विभागणी झालेली होती. मुंबईच्या पुढाऱ्यात दादाभाई हे वयोवृद्ध राष्ट्रपितामह आणि त्यांच्या नेतृत्वाखाली फ़ेरोजशहा, वाच्छा, आणि तेलंग हे उत्साही तरुण देशभक्त राष्ट्राची धुरा वाहण्यास पुढे आले होते. पुण्याहून न्या. रानडे, डॉ. भांडारकर, नूलकर, साठे, आगरकर, टिळक, आपटे वगैरे जुन्या-नव्या पिढ्यांचे पुढारी उपस्थित होते.

राष्ट्रसभेचे दुसरे अधिवेशन कलकत्त्यास दादाभाई नौरोजी यांच्या अध्यक्षतेखाली आणि तिसरे अधिवेशन मद्रासमध्ये बद्रुद्दीन तैयबजी यांच्या अध्यक्षतेखाली भरले. पहिले अध्यक्ष ख्रिस्ती, दुसरे पारशी आणि तिसरे मुसलमान, हे दृश्य पाहून नोकरशाहीला मनातून राष्ट्रसभेचा हेवा आणि धास्ती वाटू लागली.

राष्ट्रसभेचे कार्य कोणते व ते केव्हा संपेल यासंबंधी आगरकरांनी पुढील विवेचन केले आहे : '' आमच्या राष्ट्रात खरे राष्ट्रपण आणण्यासाठी राष्ट्रसभेची स्थापना झाली आहे असे आम्ही समजतो. तेव्हा ते राष्ट्रपण येईपर्यन्त आमच्या राष्ट्रसभेचे काम झाले असे कोणासही वाजवी रीतीने म्हणता यावयाचे नाही. अलीकडील राजकीय विचारपद्धतीप्रमाणे कोणत्याही राष्ट्राला राष्ट्रपण येणे म्हणजे त्यावर अंमल करणाऱ्या सरकारचे नियंत्रण किंवा नियमन त्यातील लोकांचे हाती येणे होय... ज्याप्रमाणे हिंदुस्थानचे राज्य इंग्लंडातून होत

राहील, त्याप्रमाणे इंग्लंडच्या धर्तीवर येथे स्थापिलेल्या राजकीय संस्थात अधिकाराचा उणेपणा राहिलाच पाहिजे. पण जर यासंबंधाने इंग्लंडाचे अनुकरण करणे इष्ट असेल तर तेथील हाऊस ऑफ कॉमन्ससारखी राज्यसभा येथे स्थापण्यात येईतोपर्यन्त राष्ट्रसभेचा कार्यभाग उरकला असे म्हणणे अप्रयोजक होणार आहे."

सुधारणेच्या कामी रानडे पक्ष व आगरकर पक्ष हे तत्त्वतः अगदी भिन्न आहेत. हिंदू संस्कृतीत गौतमबुद्ध आणि शंकराचार्य या दोन फार मोठ्या विभूती प्राचीन काळी होऊन गेल्या. त्याच प्रकारच्या आगरकर आणि टिळक या दोन विभूती महाराष्ट्रात आधुनिक काळात झाल्या. बुद्ध आणि शंकराचार्य हे दोघेही प्रखर बुद्धिवादी होते. पण पहिल्याने वैदिक परंपरेवर आणि चातुर्वण्यावर उघड हल्ला चढविला आणि बुद्धिवादाच्या आश्रयाने अज्ञेयवादाचे शिखर गाठले, आणि दुसऱ्याने अद्वैतवेदान्ताचा आश्रय करून ईश्वराचे अस्तित्व मान्य करून व वैदिक परंपरा आणि चातुर्वर्ण्य यांना धक्का न लावताच हिंदु संस्कृतीचा उद्धार केला. आगरकरांचा पंथ गौतमबुद्धाच्या प्रयत्नासारखा होता आणि टिळकांचा प्रयत्न शंकराचार्यांच्या प्रयत्नासारखा होता. टिळक आपल्या तत्त्वविचारांची पूर्ण परिणती करीपर्यन्त जगले, पण आगरकर अल्पायुषी झाले, हे महाराष्ट्राचे व कदाचित् भारतवर्षाचेही दुर्दैव गणिले जाईल.

आगरकरांच्या सर्व सुधारणांचा आधार व्यक्तिस्वातंत्र्य हा होता. " समाजाचे कुशल राहून त्यास अधिकाधिक उन्नतावस्था येण्यास जेवढी बंधने अपरिहार्य आहेत तेवढी कायम ठेवून बाकी सर्व गोष्टीत व्यक्तिमात्रास (पुरुषास व स्त्रीस) जितक्या स्वातंत्र्याचा उपभोग घेता येईल तितका द्यावयाचा, हे अर्वाचीन पाश्चिमात्य सुधारणेचे मुख्य तत्त्व आहे व हे ज्यांच्या अंतःकरणात बिंबले असेल त्यांना आमच्या समाजव्यवस्थेत अनेक दोषस्थळे दिसणार आहेत, हे उघड आहे. ही दोषस्थळे वारंवार लोकांच्या नजरेस आणावी, ती दूर करण्याचे उपाय सुचवावे आणि युरोपीय सुधारणेत अनुकरण करण्यासारखे काय आहे ते पुनःपुनः दाखवावे यास्तव हे सुधारक पत्र काढले आहे " असे ते आपले धोरण सांगतात.

हिंदुस्थानातील जन्मसिद्ध वर्णव्यवस्था व जातिभेद या कितीही जुन्या संस्था असल्या तरी त्या आता टिकणे शक्य व इष्ट नाही याची जशी आगरकरांना खात्री होती, त्याचप्रमाणे येथे व्यवसायस्वातंत्र्य निर्माण होत आहे त्यातून केवळ द्रव्यावर अधिष्ठित होणारा दुसरा एक वर्गभेद अस्तित्वात येत आहे इकडे त्यांचे लक्ष गेल्याखेरीज राहिले नव्हते.

आपल्या देशात ज्या मानाने कारखानदारी माजणार, त्या मानाने या मोठमोठ्या कारखान्यातील लोकांना आपल्या हक्कासाठी आपल्या मालकांशी भांडावे लागणार व त्यातून एक स्वामी-सेवकांचा वर्गकलह निर्माण होणार, हे त्यांना दिसत होते. आपल्या देशातील रेल्वेच्या नोकरांनी आपल्या हक्कांचा हा लढा चालविण्यासाठी आपला संघ स्थापन करावा असा उपदेश आगरकरांनी १८९१ सालीच केला आहे.

तात्पर्य, व्यक्तिवादी समाजरचनेबरोबर येथील औद्योगिक क्षेत्रात स्वामी-सेवकांचा वर्गकलह निर्माण होत असून तो कलह चालविण्यासाठी कामगारवर्गाने आपल्या संस्था स्थापून संपाची तयारी केल्याखेरीज मालक त्यांच्या न्याय्य मागण्या मान्य करणार नाहीत व राजा-प्रजा यांच्यातील कलहाप्रमाणे हाही एक नित्य कलह येथून पुढे सुरू होणार, हे त्यांनी लोकांना सांगितले आहे. समाजात आर्थिक व शैक्षणिक विषमता वाढल्याने अखेरीस राज्यक्रांती होते, हेही त्यांनी स्पष्टपणे लोकांपुढे मांडले आहे.

थोर समाजसुधारक गोपाळ गणेश आगरकर यांनी आयुष्यभर सामाजिक सुधारणेचा आग्रह धरला. त्यामागे त्यांची समाजनिष्ठा होती. तशीच उत्कट ज्ञानोपासनाही होती. '' ज्ञानसुक्त प्रयत्नवाद '' हे त्यांच्या विचारांचे सूत्र सांगता येईल. सामाजिक परिवर्तनावर त्यांचा विश्वास होता. लोकशिक्षण हे त्यांनी आपल्या जीवनाचे श्रेष्ठ तत्त्व मानले होते. लोकशिक्षणाने आणि लोकांच्या संमतीनेच समाजात प्रगत परिवर्तन घडून आले पाहिजे अशी त्यांची ठाम भूमिका होती. विचार आणि आचार यात एकवाक्यता राहिली पाहिजे, हे जसे त्यांनी आयुष्यभर प्रत्यक्षात आणण्याचा प्रयत्न केला, तसेच सार्वजनिक शुद्ध वर्तन ठेवण्याचाही आग्रह धरला. त्यांना आपल्या बुद्धिवादी विचारांच्या बाबतीत तडजोड करणे कधीच पटले नाही. त्यांनी तशी तडजोड केलीही नाही. म्हणूनच त्यांच्या विचार-आविष्कारात संदिग्धता सापडणार नाही.

आगरकरांच्या सार्वजनिक जीवनातच त्यांचे सामाजिक विचार समाविष्ट झालेले आहेत. किंबहुना सार्वजनिक जीवन जगण्याचा हेतूच मुळी सामाजिक सुधारणेचे विचार प्रतिपादन करणे, हे त्यानी ध्येय मानले होते. हे ध्येय त्यांच्या विचारात आणि वर्तनात विद्यार्थीदशेपासूनच व्यक्त होत होते. त्यांनी म्हटले आहे, सामाजिक मन प्रगत झाल्याशिवाय राजकारण हाती येणे त्यांना फलदायी वाटत नव्हते. समाजाच्या उन्नतीचा आणि सामाजिक हितसंबंधांचा विचार करण्यासाठी समाजाला प्रवृत्त करणे शक्य झाले तरच समाजमन योग्य दिशेने विचार करू शकते, पण '' मनाची मशागत झाली नाही आणि राजकीय सत्ता हाती आली तर ती मस्तकात चढते. राजकीय सत्ता, सामाजिक जाणिवेशिवाय हाती आली म्हणजे धोक्याची असते, कारण अशा सत्तेला विधिनिषेध बाळगण्याची गरज वाटत नाही, मनावर समाजहिताचे संस्कार नसल्यामुळे स्वार्थ हाच सत्तेचा उद्देश मानला जातो. अशा व्यक्ती शासक होण्याचीच फक्त स्वप्ने पाहात असतात ''.

समाजातील ज्या अंधश्रद्धा, व्रतवैकल्ये, धार्मिक कर्मकांड, अनिष्ट रुढी आणि परंपरा यांच्यावर आगरकरांनी अतिशय तळमळीने टीका केली, समाजाचा रोष आणि क्रोध पत्करून त्यावर प्रहार केले. ते सर्व अपप्रकार अद्यापही चालू आहेत. त्याचेही कारण स्वातंत्र्यलढ्याच्या काळात सामाजिक समस्यांपेक्षा राजकारणाला अधिक महत्त्व मिळत गेले.

## विषमतेतून क्रांतीचा जन्म

'' समता याचा अर्थ सर्वांना समान संधी आणि समान हक्क देणे '' असे प्रतिपादन करून आगरकर म्हणतात, '' पण असे झाले नाही व विषमताच वाढत राहिली तर काय होईल ?'' याचेही आगरकर यांनी उत्तर देऊन ठेवले आहे. ते म्हणतात, '' विपत्ती दुःसह झाली असता अगदी क्षूद्र जंतूही जिवावर उदार होऊन आपल्या छलकावर तुटून पडतात. '' या एका वाक्यात आगरकरांनी क्रांतीचे सूत्र सांगितले आहे. ते पुढे म्हणतात '' ज्या देशात असमता वाढत जाऊ लागली असेल, त्या देशाच्या ऱ्हासास आरंभ झाला आहे असे समजावे, जेव्हा या असमतेची परमावधी होते तेंव्हा घनघोर राज्यक्रांती होऊन समाजाचे समाज लयास जातात, धुळीस मिळतात किंवा त्यात अपूर्व स्थित्यंतरे होतात. निरंतर कष्ट साहण्यास खालच्या प्रतीचे प्राणीसुद्धा तयार असत नाहीत तर मनुष्य कसा असेल ? ''

आगरकरांच्या विचारावर मिल व स्पेन्सर यांचा प्रभाव पडला होता. ते अर्थशास्त्राला संपतशास्त्र म्हणत. औद्योगीकरणावर त्यांचा भर होता. ' स्त्रियांना चरितार्थसंपादक शिक्षण देण्याची आवश्यकता ' त्यांनी प्रतिपादन केली. असे प्रतिपादन करणारे हिंदुस्थानात आगरकर हे पहिलेच पुरुष असावेत. ' व्यक्ती अथवा कुटुंबाचा संपत्तीवरील मालकी हक्क नाहीसा करून देशातील संपत्तीचे सारे लोक समाइक मालक मानावे ' असे त्यांनी ' गुलामांचे राष्ट्र ' या लेखात म्हटले आहे. यावरून आगरकर समाजवादी विचाराकडे झुकलेले दिसून येतात. विष्णुबुवा ब्रह्मचारीनंतर समाजवादी विचार मांडणारे आगरकर हे पहिले होऊन गेले. (' नवभारत ' मासिक, जुलै १९८५.)

**(१३) रवींद्रनाथ टागोर :** '' मानवाचे एक मोठे संघराज्य '' ही भव्य कल्पना त्यांच्या दृष्टीपुढे होती. त्यामुळे राष्ट्र-राज्याच्या आज्ञा पाळण्याला ते विरोध करीत. राष्ट्रवाद मानवा-मानवात विभिन्नपणा निर्माण करतो, आणि त्याच्या आक्रमकतेमुळे जगाच्या संस्कृतीला धोका निर्माण होतो, असे त्यांचे मत होते.[१२] राष्ट्राभिमान हा संकुचित कल्पनाशक्तीचा परिणाम असतो आणि त्यात आत्मिक तरलता नसते. साम्राज्यवाद आणि दुरभिमान त्यामुळे निर्माण होतो. वास्तविक जगाची पिळवणूक होत राहते. यावरून असे दिसेल की टागोर हे मानवतेचे प्रवक्ते होते, राष्ट्रवादाचे नव्हते. संघटित राष्ट्रवादामुळे प्रेम, नैतिक स्वातंत्र्य, आणि आध्यात्मिक सुसंवाद नाहीसा होतो. या त्यांच्या मतामुळे आधुनिक राष्ट्रवादाचा रानटीपणा त्यांनी चव्हाट्यावर मांडला. मानवतावादी दृष्टीने ते सर्व गोष्टींकडे पाहत होते.

**मुस्लिम जातीयवाद :** मुसलमानातील सय्यद अहमदखान (१८१७-१८९८) इंग्रज सरकारबरोबर सहकार्य आणि पाश्चिमात्य शिक्षणाचा अंगीकार हा त्यांच्या विचारांचा ध्रुवतारा होता. अँग्लोमहंमदन कॉलेजची अलिगढ येथे त्यांनी स्थापना केली. तिचेच पुढे अलिगढ

विश्वविद्यालयात रूपांतर झाले. हिंदु, मुसलमान आदि सर्व समुदायांच्या ऐक्याचे व एकराष्ट्रीयत्वाचे ते पुरस्कर्ते होते. नंतर ते काँग्रेसचे कट्टर विरोधक झाले. मुसलमानांना तिच्यापासून वेगळे ठेवण्याच्या प्रयत्नांचे ते जनक होते. मुसलमान समाजाचे आधुनिकीकरण व्हावे हा त्यांचा आग्रह होता.

**(१४) आगाखान (आगा सुलतान सर महंमदशहा) (१८७७-१९५७).**—इस्त्राइली (शिया) पंथाचे वंशपरंपरागत पुढारी. ब्रिटिशांच्या खास मर्जीतील, मुस्लिम लीगच्या प्रमुख संस्थापकांपैकी एक. व्हाइसरॉय मिंटोंना भेटावयास गेलेल्या प्रसिद्ध मुस्लिम शिष्टमंडळाचे नेते. मिंटो यांनी भारतीय मुस्लिम समाजाचे स्वतंत्र अस्तित्त्व मान्य केले. त्यांच्यासाठी स्वतंत्र व राखीव मतदारसंघ मिळविण्याच्या प्रयत्नात आगाखानांची कामगिरी महत्त्वाची होती. फाजली हुसेनच्या सहकार्याने सर्व मुस्लिम पक्षीय परिषद संघटित करून काँग्रेसच्या राष्ट्रीय भूमिकेला त्यांनी शह दिला.

**मुस्लिम लीग**—वंग-भंगाची चळवळ आणि लीगची स्थापना डिसेंबर १९०६ मध्ये झाली. त्यांत महंमद अलीनी पुढाकार घेतला. संकुचित जातीय संस्था, आणि मुख्यतः वरिष्ठवर्गीय मुसलमान जमीनदारांची प्रवक्ती. १९१६ साली लखनौ येथे काँग्रेस-मुस्लिम लीग ऐक्याचा करार झाला,विभक्त मतदारसंघाचा स्वीकार करण्यात आला, आणि दोन्ही संस्थानी वसाहतीचे स्वराज्य हे आपले ध्येय असल्याचे घोषित केले. हे करण्यात महंमदअली जिना अग्रणी होते.

खिलाफत कमिटी ही मुसलमानातील लढाऊ पुढाऱ्यांनी स्थापन केलेली संघटना, महंमद अली व शौकत अली हे बंधु त्यांचे पुढारी. महंमद अली (१८७८-१९३१) यांनी १९११ मध्ये 'कॉम्रेड' हे साप्ताहिक काढले होते. संघस्वराज्यात मुसलमान अल्पसंख्यांकांचे रक्षण होईल हा त्यांना विश्वास होता. महात्मा गांधीजींच्या पुढारीपणाखालील काँग्रेस आणि अली बंधूंच्या पुढारीपणाखालील खिलाफत कमिटी यांनी स्वराज्य हे आपले ध्येय गाठण्यासाठी सरकारविरोधी आघाडी उघडली. मुस्लिम पुढारी अलीबंधूंनी सैन्यात राजद्रोहाचा प्रचारही केला. स्वराज्य म्हणजे संपूर्ण स्वातंत्र्य अशी मांडणी खिलाफत पुढारी करीत होते. १९२१ मध्ये मौलाना हसरत मोहानी यांनी अहमदाबाद काँग्रेसमध्ये ही मागणी केली.त्या वेळी गांधीच म्हणाले, 'यामुळे मला दुःख झाले. जबाबदारीची जाणीव नाही हे यामुळे दिसून येते.'[१३]

जिना हे धार्मिक नव्हते, पण भारतीय राष्ट्रवादातील अनेक अंतर्विरोध त्यांच्या विचारात होते. 'फोडा व झोडा' हे साम्राज्यवाद्यांचे धोरण हा त्यांच्या विचारांचा आधार होता. साम्राज्यवादाविरुद्ध लढा ही घोषणा भावनात्मक होती—भारतीय जीवनातील ताण-तणाव त्या वेळी दिसले नाहीत. लोकशाही संस्कृती येणार म्हणजे त्यात हिंदूंचे मताधिक्य होणार

या कल्पनेने मुसलमानातील नवशिक्षित बुद्धिजीवी लोक घाबरले.अलीगडमध्ये शिकून तयार झालेल्या लोकांचा शैक्षणिक क्षेत्रावर झालेला परिणाम, आणि जागतिक मुस्लिम साम्राज्याच्या (पॅन-इस्लामिक) चळवळीशी धागे असलेले अलीबंधु यांचा पाठिंबा यामुळे जिनांच्या धार्मिक आणि जातीय मागण्या अधिकच फोफावल्या.

**(१५) मुहम्मद इकबाल (१८७३-१९३८)**.––यांचा राष्ट्रवादाला विरोध होता. त्याला कारणे दोन :–(१) अखिल भारतीय राष्ट्रवाद जर प्रत्यक्षात साकार झाला तर हिंदूंचे वर्चस्व वाढेल, आणि दुसरे म्हणजे निरनिराळया मुसलमान राष्ट्रात अलगपणाची भावना राष्ट्रवादामुळे निर्माण होईल आणि त्यांच्यातील इस्लामी बंधुभाव कमी होत जाईल. १९३०च्या मुस्लिम लीगच्या अलाहाबाद अधिवेशनात पश्चिमोत्तर हिंदुस्थानात मुस्लिम स्वतंत्र राज्य स्थापावे या मताचा पुरस्कार त्यांनी केला व विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकात इकबाल आणि केंब्रिजच्या काही मुसलमान विद्यार्थ्यांनी मुस्लिम राज्याची कल्पना मांडली, पण गोलमेज परिषदेतील घटना कमिटीपुढे पुरावा देत असताना मुसलमान पुढाऱ्यानी ही कल्पना ' अव्यवहार्य ' आणि ' विद्यार्थ्यांचे स्वप्न ' म्हणून बाजूला सारली.[१४] पुढे ते उघड पाकिस्तानवादी झाले.

' सारे जहाँसे अच्छा हिंदोस्तां हमारा ' हे त्यांचे गीत मात्र चांगले आहे. मिर्झा गालीब नंतर प्रख्यात उर्दू कवि असा त्यांचा लौकिक झाला.

**(१६) हसरत मोहानी (१८७८-१९५१)**.––यांनी १९२१ मध्येच संपूर्ण स्वतंत्र्याचा ठराव मांडला. १९२५च्या कानपूरच्या पहिल्या कम्युनिस्ट परिषदेचे ते स्वागताध्यक्ष होते.

मुसलमान समाजातील महत्त्वाच्या व्यक्ती कशा प्रकारे विचार करीत होत्या याचे विवेचन थोडक्यात वर केले आहे. प्रथमपासून हिंदूसमाजापासून अलगपणा त्यांनी जोपासला. मुख्य राष्ट्रीय प्रवाहापासून ते लांब गेले–अलग झाले.

## हिंदू पुनरुज्जीवनवाद

भारतातील प्रबोधनाला एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात व विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात आर्यसमाजाने फार मोठा हातभार लावला आहे. आर्यसमाजाचे कार्य समाजसंघटनेचे व समाजशिक्षणाचे असे दुहेरी होते. आर्यसमाजाच्या कार्यकर्त्यात '' दयानंद अँग्लो–वैदिक कॉलेज ''च्या स्थापनेनंतर (१८८५) शिक्षणाच्या स्वरूपाविषयी लवकरच मतभेद निर्माण झाले. त्या मतभेदाचे स्वरूप '' पुनरुज्जीवन की सुधारणा '' असेच होते. अभ्यासक्रमात इंग्रजी आणि विज्ञान यांना प्राधान्य असावे असे म्हणणारा एक पुरोगामी गट होता; तर वेदांच्या व तदनुषंगिक शास्त्रांच्या अध्ययनाला प्राधान्य असावे असे म्हणणारा पुनरुज्जीवनवादी दुसरा गट होता. लाला मुन्शीराम (स्वामी श्रद्धानंद १८५६-१९२६) या विचाराचे पुरस्कर्ते होते. या मतभेदाचे पर्यवसान आर्यसमाजाचे कार्याच्या दृष्टीने दोन

स्वतंत्र प्रवृत्ती निर्माण होण्यात झाले. लाला मुन्शीराम यांनी हरिद्वारजवळ गुरुकुल (कांगडी) ही संस्था निर्माण केली. " ब्रह्मचर्याच्या प्राचीन संस्थेचे पुनरुज्जीवन करावे, भारतीय तत्त्वज्ञान आणि साहित्य यांचा पुनरुद्धार करून त्यांना नवजीवन द्यावे, प्राचीन विद्यांचे संशोधन करावे, पाश्चात्य विचारात जे उत्कृष्ट आणि आत्मसात् करण्याजोगे असेल ते घेऊन हिंदी साहित्याची उभारणी करावी, वैदिक धर्माचे प्रचारक निर्माण करावेत या उद्देशाने " गुरुकुल " ही संस्था उभारण्यात येत आहे " असे संस्थेच्या ध्येय व उद्दिष्ट यासंबंधीच्या पत्रकात नमूद करण्यात आले आहे.

आर्यसमाजातील आधुनिक विचारांचे नेतृत्व लाला लजपतराय यांनी केले. भारतीय समाजाच्या आजच्या गरजा कोणत्या व त्याची भविष्यकाळातील उद्दिष्टे कोणती यांचा त्यानी समतोल विचार केला होता. इंग्लंड, अमेरिका व जर्मनी हे प्रगत देश आणि भारत. चीन, रशिया हे (त्या वेळचे) मागासलेले देश . यातील सर्वच घडामोडींवर त्यांचे लक्ष होते व त्यात शिक्षणाला प्राधान्य होते. जॉन ड्यूई व बर्ट्रांड रसेल यांचे शिक्षणविषयक विचार समजून घेणारे राष्ट्रीय चळवळीतील ते एकमेव नेते असावेत. सन १९१८ मध्ये लिहिलेल्या " दि प्रॉब्लेम ऑफ नॅशनल एज्युकेशन इन इंडिया " या ग्रंथात त्यांनी मांडलेले विचार अत्यंत पुरोगामी आहेत. भारतात झालेल्या राष्ट्रीय शिक्षणाच्या प्रयत्नांचा त्यांनी आढावा घेतला आहे. राष्ट्रीयत्वाची कल्पना भूतकाळातील आदर्श व जीवनपद्धती यांच्याशी व भूतकाळातील साहित्याशी निगडित करणे आत्मघातकीपणाचे ठरेल असा स्पष्ट इशारा त्यांनी दिला आहे.त्यांचा मुख्य रोख डॉ. ॲनी बेझंट यांच्या विचारसरणीवर होता. सन १८८०-१९२० पर्यंतच्या काळात झालेल्या " राष्ट्रीय शिक्षणा "च्या प्रयत्नांचे परखड मूल्यमापन लाला लजपतराय यांनीच फक्त केलेले दिसते. या टीकेतून द.अँ.वै. कॉलेज, अलिगड मुस्लिम कॉलेज, फर्ग्युसन कॉलेज, बनारस हिंदू विद्यापीठ यापैकी कोणतीही संस्था सुटलेली नाही. या बाबतीतील त्यांच्या विचारांचे सार असे : शिक्षणाला आधारभूत म्हणून व्यक्तिस्वातंत्र्य, मानसशास्त्राचा अभ्यास, प्रायोगिक पद्धती, वैज्ञानिक दृष्टिकोन इत्यादी नवमूल्यांचा स्वीकार लाला लजपतराय यांनी केला होता. अमेरिकेतील प्रगमनशील शिक्षण-चळवळींचा त्यांच्या विचारावर प्रभाव असल्याचे स्पष्ट दिसते. लोकशाहीवरील निष्ठा, लोकशाही पद्धतीसाठी स्वतंत्र विचाराचे सुबुद्ध नागरिक निर्माण करण्याची आवश्यकता, शासनसत्तेची शिक्षणावरील जबाबदारी, प्रादेशिक भाषेचे माध्यम, हिंदुस्थानी ही राष्ट्रभाषा, शारीरिक व व्यावसायिक शिक्षण, शिक्षणसंस्था व उत्पादन-केंद्रे यांच्यातील सहकार्य यांना त्यांच्या शैक्षणिक विचारात महत्त्वाचे स्थान आहे.

मुस्लिम लीगची स्थापना झाल्यावर त्याची प्रतिक्रिया हिन्दू समाजावर झाली व हिन्दू महासभेची स्थापना झाली. प्रथम कालखंडात कॉंग्रेसशी मुसलमान प्रश्नाच्या बाबतीतच

मतभेद होते. काँग्रेस ही मुख्य राष्ट्रीय संस्था होती. सन १९२० च्या काँग्रेस अधिवेशनाचे लालाजी अध्यक्ष निवडले गेले. त्यात असहकाराच्या कार्यक्रमाला मान्यता मिळाली. लालाजी हे आर्यसमाजी होते, आणि ते हिंदू महासभेचे १९२६ मध्ये अध्यक्षही झाले. पंडित मदनमोहन मालवीय (१८६१-१९४६) हेही काँग्रेसचे १९०९ व १९१८ च्या अनुक्रमे लाहोर व दिल्ली येथील अधिवेशनाचे अध्यक्ष होते. पण मुस्लिम प्रश्नावर त्यांचेही मतभेद होते. स्वामी श्रद्धानंद हे रौलॅट बिलविरोधी व खिलाफत-असहकार चळवळीचे एक पुढारी. त्यांचा खून एका मुसलमानाने केला (१९२६). त्याची मोठीच प्रतिक्रिया झाली.

(१७) **स्वातंत्र्यवीर सावरकर (१८८६-१९६६)** : हे कडवे राष्ट्रवादी व क्रांतिकारक पण अंदमानात असताना व नंतर रत्नागिरीत असताना ते हिंदुमहासभावादी झाले. डॉ. के. ब. हेडगेवार यांनी १९२५च्या विजयादशमीला नागपूरला राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची स्थापना केली. ' हिंदू धर्म, हिंदू संस्कृती आणि हिंदू समाज यांचे रक्षण करून हिंदू राष्ट्राला स्वतंत्र करणे ' ही त्यांची पहिली प्रतिज्ञा होती. डॉ. हेडगेवार जरी हे काम करीत होते, तरी १९३०च्या कायदेभंगाच्या चळवळीत त्यांनी भाग घेऊन कारावास भोगला होता.

नंतर ही भूमिका बदलली गेली. भूतकाळातील उज्ज्वल परंपरेचा दुरभिमान; हिंदू धर्माच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे राजकीय व आर्थिक धोरणे आखणे, निदान तसा भास निर्माण करणे; काँग्रेस, समाजवाद व साम्यवाद यांना विरोध ही मुख्यतः हिंदू पुनरुज्जीवनवादाची वैशिष्ट्ये झाली. अखेर त्याचीच परिणती ' हिंदुस्थान हिंदुओंका ' या विचारात आणि आचारात झाली. पाश्चिमात्य संस्कृतीपेक्षा भारतीय आर्यसंस्कृती श्रेष्ठ आहे हा सतत घोष सुरू झाला.

भारतीय राष्ट्रवाद ज्या तत्त्वावर विकसित झाला त्याला छेद देणे हेच ह्या विचारसरणीचे प्रधान अंग बनले.

पहिले महायुद्ध संपल्यानंतर '' डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्ट '' आपोआप रद्द होणार होता. तेंव्हा देशातील गुप्त कटाच्या क्रांतिकारक चळवळींचा निःपात करता यावा म्हणून हे कायदे सरकारने केलेले होते. या कायद्यामुळे कोणत्याही आरोपीस त्याच्यावरील आरोपाची शाबिती सामान्य न्यायासनापुढे उघड चौकशीअंती झाल्याखेरीज शिक्षा होऊ नये, या मूलभूत नागरिक हक्कावर गदा येऊन हिंदी नागरिकांचे जीवित व वित्त यांच्या सुरक्षिततेस धोका येणार होता. या काळ्या कायद्यांचा निषेध कायदेमंडळातील लोकप्रतिनिधींनी अत्यंत कडक आणि निःसंदिग्ध अशा भाषेत केला होता. इतकेच नाही, तर लोकमताला लाथाडून असे कायदे राष्ट्रावर लादले तर त्याचे दुष्परिणामही सरकारला भोगावे लागतील अशी धमकीही त्यांनी आपल्या भाषणातून दिली होती. या धमक्या पोकळ असतात हे जाणून सरकारने ते कायदे प्रसृत केले आणि आपल्या हाती सुलतानी सत्ता घेतली. सर्व प्रकारचा सनदशीर विरोध विफल झाला होता आणि लोकांवरील जुलूम असह्य आणि निर्विवाद स्वरूपाचा

होता. यावेळी म. गांधींनी अखिल भारतीय स्वरूपाची सत्याग्रहाची पहिली मोहीम २८ फेब्रुवारी (१९१९) ला जाहीर केली.

या मोहिमेची सुरुवात प्रथमतः ३० मार्च रोजी हरताळ पाळून व उपवास करून व्हावयाची होती. पण पुढे हा दिवस बदलून ता. ६ एप्रिल हा दिवस मुक्रर करण्यात आला; तथापि काही चुकीच्या समजुतीमुळे दिल्लीस ता. २० मार्च रोजीच हा दिवस पाळण्यात आला. याच दिवशी लोकांची मिरवणूक चालू असता दिल्लीत पहिला गोळीबार झाला. याच दिवशी स्वामी श्रद्धानंद यांनी गुरख्यांच्या रोखलेल्या संगिनीपुढे आपली छाती करून तीत आपल्या संगिनी भोसकण्याचे आव्हान दिले आणि स्वामीजींचा हा अंतिम स्वरूपाचा सत्याग्रह यशस्वी होऊन गुरख्यांच्या अंतःकरणातील राष्ट्रप्रेम जागृत झाले.

**(१८) महात्मा गांधीजी (१८६९-१९४८).**—गांधीजी हे भारतीय राष्ट्रवादाचे प्रवक्ते खरे, पण खरे म्हणजे ते आंतरराष्ट्रवादीच. आंतरराष्ट्रवाद प्रत्यक्षात आणण्यासाठी वसाहतवादी वर्चस्वाखाली असलेले लोक मुक्त झाले पाहिजेत, आणि त्यांना स्वातंत्र्य मिळाले पाहिजे; राष्ट्रवाद ही आंतरराष्ट्रवादाकडे जाण्यासाठी एक पायरीच आहे असे त्यांचे मत होते.

गांधीजी हे भांडवलशाहीचे टीकाकार, कारण भांडवलशाहीत पिळवणूक असल्याने हिंसा असते. लोकशाही म्हणजे सत्तेचे विकेंद्रीकरण असे त्यांना वाटे. राज्य म्हणजे हिंसा आणि सत्ता यांची संघटना. सर्व अन्याय, जुलूम, पिळवणूक यांच्या विरोधी शुद्ध आत्मबल उभे करणे म्हणजे सत्याग्रह. राजकारणाचा पाया धार्मिक, आध्यात्मिक असावा यावर ते भर देत; पण रुढ अर्थाने नव्हे. त्यांना धार्मिक कर्मकांड मान्य नव्हते. 'राजकारणाचे अध्यात्मीकरण झाले पाहिजे' या गोपाळ कृष्ण गोखले (१८६६-१९१५) यांच्या विचाराने ते भारावून गेले होते.

गोऱ्या राज्यकर्त्या वर्गाविरुद्ध गांधीजींनी दक्षिण आफ्रिकेत लढा दिला. ते मानवतावादी होते. भारतीय राष्ट्रवादाला वर्णवर्चस्वाविरुद्ध लढण्याची प्रेरणा त्यांनीच दिली. १९१६ मध्ये बिहारमधील निळीच्या युरोपियन मळेवाल्यांविरुद्ध लढा देऊन त्यांनी भारतीय राष्ट्रवाद्यांची मने खेचून घेतली. संकुचित घटनात्मक मार्ग आक्रमीत भांडवलदारी राष्ट्रवाद साम्राज्यशाहीला सुधारणावादाने विरोध करण्याच्या पवित्र्यात असतानाच गांधीजी भारताच्या राजकीय क्षितिजावर आले. राष्ट्रीय चळवळीला त्यांनी व्यापक अधिष्ठान दिले, आणि काँग्रेसचा पाया विस्तृत केला. १९२०च्या त्यांच्या असहकार आंदोलनापासून जनता मोठ्या प्रमाणावर राष्ट्रीय आंदोलनात काँग्रेसमध्ये आली.

आझाद यांनी भारतीय मुसलमानांना एकराष्ट्रवादाचा उपदेश केला हे खरे; परंतु ते कुराणाचा नवीन अर्थ लावून, त्याचा दैवी अधिकार नाकारून नव्हे; याउलट अस्पृश्यतेच्या प्रश्नाची तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्याशी चर्चा करताना गांधी म्हणाले की, " असे

दिसते की, हिंदू धर्मग्रंथ अस्पृश्यता पाळण्याची आशा करतात, तिच्या निवारणाची कोणतीही स्पष्ट आज्ञा देत नाहीत. मला त्यांच्याशिवाय पुढे जावे लागेल. '' दुसऱ्या एका वेळी त्यांनी स्पष्ट सांगितले की, '' विवेकबुद्धीला न पटणारा आणि नीतीमूल्यांच्या विरुद्ध असलेला कोणताही धर्मसिद्धान्त मला बुद्धीला न पटणारा परंतु अनैतिक असलेली धर्मभावना मी चालवून घेतो. ''

बुद्ध, येशू ख्रिस्त, मुहम्मद यांच्याप्रमाणे गांधींनीही ईश्वराने काय सांगितले आहे यापेक्षा, आपल्या समाजाचे प्रबोधन घडवून आणण्यासाठी त्याने काय सांगावयास पाहिजे किंवा धर्माचे '' खरे '' स्वरूप काय असावयास पाहिजे या प्रश्नाचे परिस्थितीनुरूप उत्तर दिले. परंतु आधीचे धर्मसंस्थापक आणि गांधी यांच्या परिस्थितीत एक मूलभूत फरक होता. येशू किंवा मुहम्मद यांच्या काळात समाजप्रबोधन घडवून आणण्याचा, नवीन धर्म सुरू करणे हा एकच मार्ग होता; कारण, त्या युगातील समाजधुरीण राज्यकर्ते, तत्त्वज्ञ, विचारवंत, धर्मगुरू व सर्वसामान्य नागरिक या सर्वांचे विचारविश्व संपूर्णतः धर्मव्याप्त होते.

ध्येयपूर्तीसाठी नवीन धर्म सुरू करण्याची त्यांना गरज भासली नाही हे समजण्यासारखे आहे; परंतु, अस्पृश्यतानिवारणाच्या, त्यांना अतिशय जिव्हाळा वाटणाऱ्या, कार्यासाठीही फसव्या शास्त्राधाराचा त्यांनी स्वतःस मोह पडू दिला नाही. असा शास्त्राधार प्रा. आनंदशंकर ध्रुव आणि डी. भगवानदास यांनी देऊ केला होता; परंतु तो स्वीकारून सत्याशी प्रतारणा करण्याऐवजी गांधींनी वर उल्लेख केल्याप्रमाणे धर्मशास्त्राशिवाय पुढे जाण्याचे ठरविले, नवीन धर्म सुरू करण्याच्या किंवा अप्रामाणिक पंडिती काथ्याकुटाच्या खटाटोपात न पडता गांधींनी धर्माच्या कल्पनेतच नवीन आशय भरून धार्मिक मनोवृत्तीला नवे वळण देण्याचा प्रयत्न केला.

गांधींचे नेतृत्व प्रस्थापित होण्यापूर्वी या देशात असे मानले जात होते की, राजकीय नेत्याने समाजसुधारकांची भूमिका स्वीकारली तर ती त्याच्या राजकीय कार्याच्या दृष्टीने घातक ठरेल. दुसरा एक असाही समज होता की, धर्माच्या नावाने सर्वसामान्य नागरिकास सुधारणेस अनुकूल बनवून घेणे अशक्यच होय. गांधींनी प्रत्यक्ष कृतीने हे दोन्ही समज चूक ठरवून दाखवले आणि तेही कोणत्याही सैद्धान्तिक चर्चेच्या फंदात न पडता.

गांधींचे खरे वैशिष्ट्य प्रबोधनाच्या कल्पनेत भर घालण्यापेक्षा तिची सामाजिक व्याप्ती वाढवण्यात आणि स्त्रिया, अस्पृश्य इत्यादी पददलित वर्गाच्या प्रगतीच्या दृष्टीने ती अल्पावधीत प्रत्यक्षात कशी उतरवता येईल या प्रश्नांचे उत्तर देण्यात आहे.

टिळकांच्या नंतर समाजप्रबोधनाचे कार्य राजकारणाचेच एक अंग बनले. त्यामुळे वर सांगितल्याप्रमाणे त्याला गती व सामाजिक व्यापकता लाभली हे खरे; परंतु या दोन प्रक्रियांच्या संगमामुळे प्रबोधनाच्या दृष्टीने एक अनिष्ट परिणाम घडून आला, तो असा

की गांधींची इच्छा नसतानाही कालक्रमाने प्रबोधनाचे स्वतंत्र व मूलभूत महत्त्व नाहीसे झाले.

त्यांच्या आधीच्या सुधारकांच्या प्रयत्नामुळे धर्मनिरपेक्ष दृष्टिकोन बाळगणारा असा एक उदारमतवादी सुशिक्षित मध्यमवर्ग हिंदू समाजात निर्माण झाला होता आणि गांधींशी महत्त्वाच्या बाबतीत मतभेद असूनही १९३० पर्यंत तो राजकारणात गांधींच्या मागे मोठ्या प्रमाणात येऊ लागला होता. सुधारकांना सामाजिक मान्यता मिळाली होती, आणि आधुनिक ज्ञान आणि त्यामुळे धर्माकडे चिकित्सक, ऐतिहासिक दृष्टिकोनातून पाहण्याची वृत्ती यात बरीच वाढ झाली होती. म्हणून धर्माकडे पाहण्याचा गांधींचा दृष्टिकोन गोखले किंवा नेहरू यांच्यासारखा असता तर राजकारणाच्या दृष्टीने तो अडचणीचा न होता उलट फायद्याचा झाला असता.

गांधींची या प्रश्नाकडे पाहण्याची दृष्टी मुळातच चूक होती. स्वातंत्र्यासाठी इंग्रजांशी प्रभावी लढा देण्याच्या दृष्टीने हिंदू-मुस्लिम ऐक्य महत्त्वाचे होते. अशा ऐक्याची सांस्कृतिक आणि ऐतिहासिक पार्श्वभूमी इंग्रज येथे येण्यापूर्वी तयार झाली होती, परंतु इंग्रजाने धर्माधिष्ठित भेदनीती अवलंबून ती नाहीशी केली, म्हणून आपल्या उदात्त धर्मकल्पनेच्या भाषेत मुसलमानांच्या सदसद्विवेकबुद्धीस आवाहन केले तर त्याला आज नाही तर उद्या प्रतिसाद हमखास मिळेल, असे गांधींचे गृहीततत्त्व होते. डाव्याच्या दृष्टिकोनात एवढाच फरक होता की, हे आवाहन धर्माच्या ऐवजी आर्थिक हितसंबंधांच्या भाषेत केले पाहिजे; परंतु, गांधी आणि त्यांचे डावे टीकाकार या सर्वांचे धोरण इस्लामच्या सांस्कृतिक परंपरेच्या अज्ञानावर आधारलेले होते.

" आधी राजकीय की आधी सामाजिक " हा वाद महाराष्ट्रात त्याआधी जवळ जवळ चाळीस वर्षे चालला होता. त्यामुळे महाराष्ट्रातला सुशिक्षित समाज दुभंगल्यासारखा झाला होता. तो वाद १९२० नंतर मागे पडला, कारण गांधींनी आपल्या चळवळीत राजकीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक, शैक्षणिक, स्त्रीविषयक अशा सर्वच प्रश्नांचा अंतर्भाव करून घेतला. सार्वजनिक, किंबहुना वैयक्तिकही, जीवनातला कोणताही महत्त्वाचा प्रश्न त्यांच्या विचारातून सुटला नाही. त्यांच्या नेतृत्वाने राजकीय विचारांना आणि आंदोलनाला एक प्रकारची सर्वंकषता दिली. एक सर्वसमावेशक दृष्टिकोन दिला. ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळीमुळे महाराष्ट्रातल्या समाजजीवनाला एक प्रकारची विफलता व विकीर्णता आली होती. गांधींच्या चळवळीत ब्राह्मणांचे वैचारिक नेतृत्व हिरावले न जाता ब्राह्मणेतरांना आपले संख्याबल व कर्तृत्व वापरण्याची संधी मिळाली. त्यामुळे ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाचे जुने स्वरूप बदलले.

गांधींनी जेव्हा राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ हाती घेतली, आणि मार्क्सवाद्यांनी ह्या देशाच्या राजकीय क्षेत्रात प्रवेश केला तेव्हा बुद्धिजीवी वर्गात मोठी लाट उसळल्यासारखे झाले

होते. त्यातून शतकभर चालत असलेल्या प्रबोधनाला नवे वळण लागले. ते अधिक समृद्ध होईल असे वाटले होते. कारण दोन्ही विचारसरणी अत्यंत व्यापक; सबंध जीवनाला गवसणी घालणाऱ्या आणि मूलगामी अशा आहेत. गांधीनी राजकीय आणि आर्थिक परिस्थितीचाच विचार केला होता असे नाही तर आहार, आरोग्य, औषधयोजना, विवाह, स्त्री-पुरुषसंबंध, स्त्रियांची परवशता, ब्रह्मचर्य, समाजव्यवस्था, अस्पृश्यता, शिक्षण, धर्म आणि ईश्वर-मनुष्यसंबंध ह्या सर्वांवर विचार केला होता आणि मते निश्चित केली होती. ती वाचनाने, व्यासंगाने बनवलेली ग्रंथाश्रित नव्हती, तर अवलोकन, चिंतन आणि त्यांनी स्वतः केलेले प्रयोग ह्यांवर आधारलेली स्वयंप्रेरित होती. त्यांच्या विचारसरणीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे ती पूर्णपणे भारतीय होती. खिस्त, थोरो, रस्किन आणि टॉलस्टॉय ह्यांच्या जीवनापासून किंवा लिखाणापासून त्यांनी काही गोष्टी घेतल्या असतील, पण त्या त्यांनी भारतीय परंपरेत बसवून टाकल्या. सामान्यातल्या सामान्य माणसाला समजेल अशा भाषेत आणि झेपेल इतक्याच पातळीवर त्यांनी आपले विचार मांडले. त्यांना पेलेल असा कार्यक्रम दिला आणि त्यांना कार्यप्रवृत्त केले.

गांधींच्या चळवळीने सगळा देश जागा केला. त्या चळवळीने देशाचे स्वातंत्र्य अनेक दशकांनी जवळ आणले.

मजूर, शेतकरी यांच्यावर होणाऱ्या अन्यायाची भारतात आल्याबरोबर गांधींनी मोठ्या आत्मीयतेने दखल घेतली, याचे कारण जिथे अन्याय होत असेल, जिथे शोषण चालू असेल, जिथे जात-पात, सत्तासंपत्ती आणि वर्ण किंवा वर्ग यांच्या आधाराने माणसांना अमानुषपणे वागवले जात असेल तिथे तिथे धावून जावे आणि सत्याग्रहाच्या मार्गाने तो प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करावा, हा त्यांचा स्वभावच बनून गेला होता. गांधीजी चरितार्थाचा व्यवसाय सांभाळून यथाशक्ती देशसेवा करणारे संसारी सद्‌गृहस्थ नव्हते. हिंसा, अन्याय, जुलूम, शोषण, विषमता, भेदभाव, अमानुषता इत्यादी मानवी जीवनातल्या अमंगल गोष्टींशी आमरण लढण्याचे कंकण बांधलेले वीर पुरुष होते ते. मानवी मन सुधारल्याशिवाय जग सुधारणार नाही, अशी त्यांची श्रद्धा होती. त्यामुळे राजकीय लढा आधी की सामाजिक चळवळ आधी, प्रथम ही सुधारणा करायची का ती करायची, असले प्रश्न त्यांच्या वाऱ्यालाही कधी उभे राहिले नाहीत.

गांधीजी केवळ राजकीय पुढारी नव्हते, नुसते समाजसुधारक नव्हते, आधुनिक अर्थशास्त्राच्या अनुरोधाने गरीबीचा विचार करणारे पंडित नव्हते, अनेक लहानमोठ्या नद्या सागराला मिळाव्यात, त्याप्रमाणे मागच्या चार पिढ्यातले भारतीय प्रबोधनाचे भिन्न भिन्न प्रवाह त्यांच्या ठिकाणी एकरूप झाले होते. इतकेच नव्हे तर त्या साऱ्यांना गांधीजींनी स्वतःचे असे निराळे वळण लावले होते.

हे वळण लावण्याचे सामर्थ्य गांधीजींच्या ठिकाणी आले ते त्यांच्या अनेकपदरी व्यक्तिमत्त्वामुळे. गांधी कुणाला संत भासले, तर कुणाला सेनापती वाटले. त्यांचा आश्रम, त्यातले यम-नियम इत्यादिकांमुळे त्यांचे संन्याश्याशी जवळचे नाते असल्याचा भास होई, पण त्यांचा अत्यंत साधा वेष, दीनदलितांविषयीचा कळवळा इत्यादी गोष्टी शेतकऱ्यांशी असलेले त्याचे नाते सूचित करीत असत. त्यांच्यापूर्वी स्वदेशीची चळवळ अनेकांनी केली होती; पण गांधीजींनी स्वदेशीचा आणि तिच्या अनुरोधाने खादीचा जो पुरस्कार केला, त्याचे यश अपूर्व होते. खादीमुळे परदेशी कापडावर यशस्वी बहिष्कार टाकता आला, आणि तिच्यामुळेच खेड्यातल्या स्त्री-पुरुषांना दररोज चार-दोन आणे मिळवून देणारा तात्पुरता रोजगार निर्माण झाला. आपल्या चळवळीचे राजकीय, सामाजिक व आर्थिक असे अगदी अलग कप्पे गांधींना मंजूर नव्हते. या सर्व चळवळीच्या आडव्या-उभ्या धाग्यांनी आपल्या स्वप्नातल्या सुखी भारताचे एक नवे सुंदर महावस्त्र विणण्याचा प्रयत्न त्यांनी सतत केला.

टिळकांच्या हयातीपर्यंत सत्यशोधक पक्षाचे व ब्राह्मणेतर नेते काँग्रेसपासून अलिप्त राहिले, टिळकांच्या निधनानंतर काँग्रेसचे नेतृत्व महात्मा गांधींच्याकडे गेले. महात्माजींनी राजकारणातला संकुचितपणा काढून टाकला.राजकारण अगोदर की समाजकारण अगोदर, ही विचारसरणी काँग्रेसमधून काढून टाकली. समाजकारण, धर्मकारण, अर्थकारण व राजकारण असे भाग पाडले नाहीत. सर्वच प्रश्न हाती घेतले. त्यामुळे बहुजनसमाज काँग्रेसकडे आकर्षित होऊ लागला व केशवराव जेधे, शंकरराव मोरे,दिनकरराव जवळकर इत्यादी कट्टर सत्यसमाजिस्ट हे सर्व काँग्रेसमध्ये शिरले. टिळकपंथी बहुतेक ब्राह्मण हे काँग्रेसपासून अलिप्तच नव्हे तर प्रतिकूल राहिले व हिंदू महासभेचे म्होरके बनले.

एकेश्वरवाद, विशिष्ट धर्मग्रंथ प्रमाण न मानणे, विवेचक बुद्धीचे प्रामाण्य, पुरोहित वर्गाचा अभाव, मूर्तिपूजाविरोध, अद्‌भूत चमत्कारावरील अविश्वास, परलोकाचा व स्वर्गलोकाचा अभाव, स्त्री-पुरुषांची समता व मानवी मूलभूत हक्क व जातिसंस्थांचे निर्मूलन ही तत्त्वे जोतीरावांनी प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला.

१८७५ पासून १९२० पर्यंतचा कालखंड या दृष्टीने मोठा अभ्यासण्याजोगा आहे. या वेळची स्त्रियांची वडीलधारी पिढी, जहालांनी स्त्री-सुधारणांना पहिल्यापासून विरोध केल्याने पूर्णपणे प्रागतिकांबरोबर, समाजसुधारकांबरोबर होती; पण त्याच वेळी वाढत असलेल्या नवबालिकांची पिढी मात्र समाजसुधारणेत आगरकरादी प्रागतिकांबरोबर व राजकीय लढ्यात जहालांबरोबर म्हणजे विष्णुशास्त्री, लोकमान्य टिळक यांच्याबरोबर होती. कुठच्याच आघाडीवर त्यांना अन्याय, पारतंत्र्य नको होते.

ही नस महात्माजींनी बरोबर हेरली. म्हणूनच १९२१ मध्ये महात्माजींनी त्यांचा असहकारितेचा, बहिष्काराचा लढा पुकारताच हजारो तरुण-तरुणी विद्यार्थीनी धावून आल्या. भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्यात महात्माजींचे आगमन झाल्यावर स्त्री-समाजसुधारणेच्या कार्यावरचे लोकांचे लक्ष उडाल्यासारखे झाले. महात्माजींनी स्त्रियांकरिता वेगळा असा लढा केव्हाच पुकारला नाही. प्रागतिकांप्रमाणे त्यांना वेगळे उचलूनही धरले नाही की, जहालाप्रमाणे त्यांच्या प्रगतीचा अधिक्षेपही केला नाही. त्यांचा लढा अन्यायाविरुद्ध असहकारितेचा, सत्याग्रहाचा होता, तोही आत्मिक बळावर लढायचा होता. आत्मिक बळात स्त्री पुरुषांपेक्षा कमी नसून काकणभर सरसच आहे. अशी त्यांची मनोधारणा होती. म्हणून त्यांनी भारतीय लढ्यात भाग घेण्यास स्त्रीला आवाहन केले ते बरोबरीचा सैनिक म्हणून. स्त्रियांनी ते स्वीकारले तेही त्याच नात्याने. पुरुषांबरोबर त्यांच्या खांद्याला खांदा लावून लढणारा एक सैनिक म्हणून.

**(१९) जवाहरलाल नेहरू (१८८९-१९६४).**—नेहरूंनी राष्ट्रवादाची रूक्ष चर्चा केली नाही, त्यासंबंधी नवीन सिद्धान्त मांडले नाहीत पण राष्ट्रीय चळवळीचे ते मोठे पुढारी होते. स्वामी दयानंद, विवेकानंद, पाल, अरविंद घोष यांनी प्रवर्तित केलेला धार्मिक राष्ट्रवादी दृष्टिकोन त्यांना मान्य नव्हता. "....भूतकाळात संपादन केलेले पराक्रम, विचारपरंपरा, अनुभव यांची सांघिक स्मृती म्हणजे राष्ट्रवाद. हा असा राष्ट्रवाद मात्र आजकाल प्रभावी आहे. ......ज्या वेळी एखादे अरिष्ट येते, त्यावेळी राष्ट्रवाद पुनः उफाळून वर येतो, जनमानसावर प्रभाव पाडतो, आणि भूतकालीन परंपरातून लोकांना प्रेरणा आणि समाधान मिळत असते."[१५] —साम्राज्यवादविरोधी आंतरराष्ट्रीय परिषदेच्या ब्रुसेल्स येथे भरलेल्या (१० फेब्रुवारी १९२७) अधिवेशनात भाषण करताना नेहरू म्हणाले, ". . . भारताचा प्रश्न हा केवळ भारताचा नाही.चिनी राष्ट्रवादाचे उदात्त उदाहरण पाहून आमच्या आशा पालवल्या आहेत, आणि शक्य तितक्या लवकर आम्ही त्यांच्या पावलावर पाऊल टाकीत आहोत." उदारमतवादी दृष्टिकोनातून शिक्षण, आणि त्या वातावरणातच वाढल्याने ते धर्मनिरपेक्ष (secular) रीतीने राजकारणाकडे पाहू शकत. हिंदुमहासभेच्या कार्यक्रमाचा ते वारंवार निषेध करीत; कारण त्यांची विचारसरणी त्यांना प्रतिगामी, वरिष्ठ वर्गीयांचे हितसंबंध जपणारी आहे असे वाटे. " ते धर्मनिरपेक्ष असल्याने भारतातील अल्पसंख्य जमातींना त्यांचा आधार वाटे. शास्त्रीय विचार करण्याची पद्धती आणि बुद्धिवादावर भर असल्याने भारतीय राजकीय विचारसरणीत त्यांनी धर्मनिरपेक्ष लोकशाहीवर भर दिला. त्यामुळे मध्ययुगीन विचारसरणी, धर्मवेडेपणा यांना आळा बसला."[१६]

नेहरू आंतरराष्ट्रवादी होते. वांशिक दुरभिमानाचे धोके त्यांना माहीत होते. संकुचित विस्तारवादी राष्ट्रवादाला त्यांचा विरोध होता, असा विशाल आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन ठेवून

त्यांनी काँग्रेसमध्ये प्रवेश केला. आर्थिक दृष्टिकोनातून त्यांनी आंतरराष्ट्रवादाचा पुरस्कार केला. पुनरुज्जीवनवादाचा त्यांना तिटकारा होता आणि जातिवादाचे तर ते कट्टर शत्रूच होते.

नेहरूंनी समाजवादाचा हिरीरीने पुरस्कार केला (पहा ' व्हिदर इंडिया ' १९३३) आणि भांडवलशाही आणि साम्राज्यशाही यांच्याविरोधी चाललेल्या जागतिक लढ्याशी तो संबंधित आहे; तसेच राष्ट्रवाद हा अपुरा असून सामाजिक क्रांतीचे तत्त्वज्ञान म्हणजेच समाजवादाचे तत्त्वज्ञान आणि त्यासाठी योग्य आर्थिक धोरण आवश्यक आहे, असे त्यांनी प्रतिपादन केले. सामाजिक विषमता दूर करणे व समाजाची पुनर्घटना करणे यासाठी भारतीय राष्ट्रवादाने लढले पाहिजे. पहिल्या महायुद्धानंतरच्या पहिल्या दशकात वसाहतवादविरोधी लढे उभे राहिले. भारतीय राष्ट्रवाद हा वसाहतवादविरोधी असला पाहिजे यावर त्यांनी भर दिला.

**(२०) सुभाषचंद्र बोस :** निव्वळ आर्थिक स्वातंत्र्यावर त्यांना समाधान वाटत नसे. जमीनदार आणि कुळे, भांडवलदार आणि कामगार, श्रीमंत आणि गरीब यांच्यातील अंतर्गत सामाजिक लढे कधी थांबता कामा नयेत. सामाजिक आणि राजकीय लढे हे एकाच वेळी चालले पाहिजेत.त्यांची डावी विचारसरणी ही त्यांच्या वरील आर्थिक विचारातूनच आलेली होती. ' इंडियन स्ट्रगल ' (१९३४) हे त्यांचे प्रसिद्ध पुस्तक भारतीय राजकारणावरील चांगले भाष्य आहे.

## जवाहरलाल व सुभाष यांचा साम्राज्यवादविरोध

भारताच्या स्वातंत्र्यलढ्याला साम्राज्यशाहीविरोधाचे सर्वांगीण व निग्रही वळण देण्याचे आणि धर्मातीत लोकशाही आणि समतावादी राष्ट्रीयत्वाच्या आशयाला त्यामध्ये केंद्रस्थान मिळवून देण्याचे महान ऐतिहासिक कार्य नेहरूंनी आपल्या वाणीने, लेखणीने व करणीने यशस्वी रीतीने पार पाडले आहे. आपल्या राष्ट्रीयत्वाला व स्वातंत्र्याला जागतिक राजकारणातील प्रवाहांची जाण ठेवून आंतरराष्ट्रीय संदर्भातच आपली राष्ट्रीय मांडामांड यशस्वीपणे करता येईल या तत्त्वाचाही त्यानी अखंड प्रसार केला, पुरस्कार केला व पाठपुरावा केला.

आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्यात राजकीय स्वातंत्र्याइतकाच आर्थिक व सामाजिक स्वातंत्र्याचा आशय असला पाहिजे आणि त्यासाठी आपण समाजवादाचा मार्ग चोखाळला पाहिजे या भूमिकेचा जोरदार प्रचार करण्यात काँग्रेसच्या प्रवाहात तेच नेहमी आघाडीवर राहिले. स्वातंत्र्य म्हणजेच समाजवाद असा समज लोकमानसात निर्माण करण्याइतका प्रभावी प्रचार स्वातंत्र्यपूर्व काळात त्यांनी केला.

'मार्क्स व लेनिन यांच्या अभ्यासाने माझ्या मनावर अपार परिणाम झाला आहे. इतिहासाकडे, आजकालच्या सर्व घडामोडींकडे पहाण्याची एक नवी दृष्टी लाभायला त्यांची मला मदत झाली आहे ' अशी स्वतःच्या विचारपद्धतीची ओळख त्यांनी करून दिली आहे. त्यामुळे भारताच्या आधुनिक राष्ट्रीयत्वाच्या आशयातही बदल झाला आहे. लोकजीवनाच्या दर्शनाने राष्ट्र म्हणजे लोक, आणि राष्ट्रीय जीवनातील आंतरिक ऐक्य ही आधुनिक राष्ट्रीयत्वाची भूमिका त्यानी स्वीकारली, आणि तिचा प्रभावी प्रचार केला, जागृती केली व प्रबोधनही केले.

' ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या जोखडाखालून मुक्त होऊन राजकीय आर्थिक व लष्करी दृष्ट्या संपूर्ण स्वातंत्र्य संपादन केलेला अखंड व एकसंघ भारत उभा करणे हेच आता आमचे ध्येय आहे, त्यापासून आता माघार नाही, की त्यामध्ये कसल्याही तडजोडीला जागा नाही,' अशी संपूर्ण स्वातंत्र्याची निःसंदिग्ध घोषणा त्यांनी १९२९च्या लाहोर काँग्रेसच्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून केली. काँग्रेसमधील वसाहतवादी नेतृत्वाची ब्रिटिश साम्राज्यवाद्यानी पूर्ण निराशा केली होती. बाहेरच्या डाव्या शक्तींचा जोर वाढत होता. काँग्रेसवर त्याचा परिणाम होत होता, काँग्रेसमध्ये नेहरू-सुभाष यांचा डावा गट अल्पमतात असतानाही गांधीजींच्या मुत्सद्देगिरीमुळे नेहरूंना काँग्रेसचे अध्यक्ष (१९२९) करण्यात आले. त्यांच्या नेतृत्वाने काँग्रेस सुरक्षित राहील असा अभिप्राय गांधींनी दिला होता.

धर्मातीत राष्ट्रीयत्वाच्या आधारावरच भारतीय लोकजीवनांतील ते ऐतिहासिक आंतरिक ऐक्य निर्माण करता येईल, असे नेहरू आग्रहाने प्रतिपादन करीत. भारतीय राष्ट्रवाद समाजवादाच्या स्वीकाराशिवाय अपुराच राहील, म्हणजे सरंजामशाही व भांडवलशाहीतील अर्थसंबंध नाहीसे करून, साम्राज्यशाहीविरोधी आघाडी उघडली तरच भारतीय लोकशाही स्थिर होईल अशी त्यांची धारणा होती. ' ते संघटित समाजवादी शक्तीपासून अलग राहिले, तरी कालबाह्य पुढारीपण आणि उगवत्या समाजवादी विचारांच्या मध्ये ते दुवा या स्वरूपात राहिले, असे रजनी पाम दत्त यांनी ' इंडिया टुडे ' या आपल्या ग्रंथात म्हटले आहे (पृ. ५१६).

जवाहरलाल व सुभाषबाबू हे काँग्रेसमधील डाव्यांचे पुढारी एकामागून एक असे अ. भा. ट्रेड युनियन काँग्रेसचे अध्यक्ष झाले, पण कम्युनिस्टांच्या पंथवादी व एकांगी धोरणामुळे त्यांचा कामगार चळवळीला फायदा झाला नाही. ' भांडवलदारी नेतृत्वाने चालविलेल्या सविनय कायदेभंगाच्या लढ्याशी कम्युनिस्टानी संबंध ठेवता कामा नयेत, आणि राष्ट्रवाद्यातील डाव्याना ते खोटे(नकली) क्रांतिकारक असल्याने त्यांचा बुरखा फाडला पाहिजे ' हा नारा देण्यात आला. ३१ डिसेंबर १९२९ला नेहरूनी तिरंगा फडकावला, इन्किलाब झिंदाबादच्या घोषणा झडल्या, तरी सुभाषबाबूंनी त्यांच्या मागे असलेल्या डाव्या विचारसरणीच्या अनुयायांना घेऊन ' काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्ष ' स्थापन केला. त्यात काँग्रेसचे माजी अध्यक्ष

श्रीनिवास अय्यंगारही सामील झाले. स्वराज्य पक्षाप्रमाणे काँग्रेसअंतर्गत पक्ष म्हणून त्याने काम करावे हा हेतू होता. अर्थात् हा पक्ष अल्पजीवी ठरला हे निराळे ! १९३०च्या स्वातंत्र्यदिनाची तयारी चालू असतानाच सुभाषबाबूंना अटक झाली व एक वर्ष ते गजाआड झाले. ४ मार्च १९३१ ला गांधी-आयर्विन करार झाला; आणि 'आमचे ते शूरांचे शब्द व त्यांची शूराची कृत्ये यांचा असा शेवट व्हावा ना ?' असे जवाहरलालजी म्हणाले, पण ते काँग्रेसश्रेष्ठांपुढे – गांधीजींच्यापुढे–नमले !

कराची काँग्रेस अधिवेशनात (१९३१) मूलभूत हक्कांचा ठराव झाला. मूलभूत उद्योग धंद्यांचे व वाहतुकीचे राष्ट्रीयीकरण, सुधारित कामगार कायदे व शेती सुधारणा ही निःसंशय पुढचीच पावले होती. अ. भा. ट्रेड युनियन काँग्रेसच्या (१९३१) अधिवेशनाचे सुभाषबाबू अध्यक्ष व सेक्रेटरी होते कॉ. एस्. व्ही. देशपांडे. अध्यक्ष म्हणून केलेल्या भाषणात त्यांनी 'समाजवादाच्या दिशेने उचललेले पाऊल ' असे कराची ठरावाचे स्वागत केले. तरी नेहरूंप्रमाणे इतिहासाची आधिभौतिक मीमांसा त्यानी कधी स्वीकारली नाही.

जानेवारी १९३२ ते मार्च १९३३या काळात सुभाषबाबूंची प्रकृती खालावली व हवापालट करण्यासाठी ते युरोपात गेले. मॉस्कोकडे न जाता इतर मोठ्या शहरांना त्यांनी भेटी दिल्या; मुसोलिनीला ते अनेक वेळा भेटले. तसेच डी. व्हॅलेरांनाही भेटले. जर्मनीत नाझी राजवट आली होती; पण हिटलरला ते भेटले की नाही हे निश्चित सांगता येत नाही. ते सतत आजारी विठ्ठलभाई पटेलांच्या शेजारी बसून असत. विठ्ठलभाईंचे २२ ऑक्टोबर १९३३ रोजी व्हिएन्नात निधन झाले.

कम्युनिस्टांच्या पाठिंब्याने सुभाषबाबू अ. भा. ट्रेड युनियन काँग्रेसचे अध्यक्ष झाले. कम्युनिस्ट व डावे राष्ट्रवादी यांची आघाडी तयार झाली; पण १९२८च्या कॉमिन्टर्नच्या ६व्या काँग्रेसच्या आदेशानुसार रणदिवे व देशपांडे यांच्या पुढारीपणाखाली असलेली अ. भा. ट्रे. यु. काँग्रेस दुभंगली व त्यानी लाल अ. भा. ट्रे. यु. काँग्रेस स्थापन केली !

लंडन येथे १० जून १९३३ ला भरलेल्या तिसऱ्या भारतीय राजकीय परिषदेचे अध्यक्ष सुभाषबाबू होते. भारतात ' समाजवादी पक्ष ' स्थापन करण्याची आवश्यकता त्यानी त्यांच्या भाषणात जोराने मांडली. भारतातील डावे राष्ट्रवादीही असे एकांगी धोरण मांडू लागले होते. त्यावर कम्युनिस्टानी अधिक एकांगी धोरण स्वीकारले व ' सुभाषबाबू व गांधी यांच्यात फरक इतकाच की सुभाषबाबू अधिक चांगल्या अटींवर राज्यकर्त्यांशीं तडजोड करू इच्छितात.' अशी प्रतिक्रिया व्यक्त केली.

१९३४ मध्ये सुभाषबाबूंचे ' दि इंडियन स्ट्रगल ' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. सुभाषबाबूंनी फॅसिझमची स्तुती केली होती. नेहरू हे सतत फॅसिझमविरोधी होते. ' फॅसिझम व कम्युनिझम यात मला कम्युनिस्टांचे ध्येय पसंत आहे ' असे ते म्हणत. ' फॅसिझम व कम्युनिझम यांतील

ऐक्य हीच जागतिक इतिहासाला मोठी देणगी ठरेल व ते भारतातच घडून येईल. नेहरूंचा दृष्टिकोन मुळातच चूक आहे' असे सुभाषबाबूंनी म्हटले आहे. (पृ. १६ वरील टीप).

नेहरू-सुभाषबाबू यांच्यात जरी असे तात्त्विक मतभेद होते, तरी या दोघा नेत्यांनी साम्राज्यविरोधी आघाडी सतत तेवत ठेवली आणि लढा तीव्र करण्याचा प्रयत्न केला.

**पटेल, राजेंद्र व आझाद.**— वल्लभभाई (जन्म : ३१ ऑक्टोबर १८७५) हे बॅरिस्टरच्या परीक्षेत पहिल्या वर्गात आले होते. एक फौजदारी वकील म्हणून ते गुजरातेत ख्यातनाम होते. १९१६ मध्ये गांधींजीशी त्यांची ओळख झाली. १९१६च्या लखनौ काँग्रेसला गुजरात सभेचे प्रतिनिधी म्हणून ते हजर राहिले होते. १९१७ मध्ये त्यानी वेठबिगार पद्धतीविरुद्ध चळवळ केली. दुष्काळग्रस्त खेडा जिल्ह्यातील शेतकऱ्यांकडून शेतसारा सरकारने घेऊ नये यासाठी करबंदीचा यशस्वी लढा त्यांनी दिला (१९१८). १९१९ मध्ये रौलटविरोधी लढा उभारला. राष्ट्रीय सप्ताहाच्या सुरुवातीच्या दि. ७ एप्रिलपासून सत्याग्रही पत्रिका चालू केली. (राष्ट्रीय सप्ताह–६ एप्रिल ते १३ एप्रिल. रौलटॲक्ट विरोधी हा सप्ताह सर्व देशभर पाळण्यात आला होता.) अहमदाबाद महानगरपालिकेत काँग्रेसचे सर्व सदस्य निवडून आणले. १९२० पासून खादी वापरू लागले. टिळक स्मारक फंडासाठी १० लाख रुपये जमा केले. काँग्रेसचे तीन लाख सदस्य नोंदवले. गांधीजींच्या सूचनेप्रमाणे गुजरात विद्यापीठाची स्थापना केली. १९२१ मध्ये गुजरात प्रा. काँ. कमिटीचे अध्यक्ष व अहमदाबाद काँग्रेस अधिवेशंनाचे स्वागताध्यक्ष निवडले गेले. १९२३ त झालेल्या नागपूर झेंडा सत्याग्रहाचे ते नेते होते. १९३३ मध्ये बोरसदला सरकारने बसविलेल्या कराविरुद्ध लढा देऊन सरकारला कर रद्द करायला लावण्यात यश मिळविले. १९२८ मध्ये बारडोली भागात साराबंदीचा यशस्वी लढा दिला. 'सरदार' या पदवीने त्यांना मान्यता मिळाली. १९२९ मध्ये महाराष्ट्र राजकीय परिषदेचे ते प्रमुख अतिथी होते. १९३० मिठाच्या सत्याग्रहात तुरुंगवास भोगला. ते १९३१च्या कराची काँग्रसचे अध्यक्ष होते. या अधिवेशनातील मूलभूत हक्कासंबंधीचा ठराव हे राष्ट्रीय चळवळीचे पुढचे पाऊल मानण्यात येते.

**(२१) राजेंद्र प्रसाद.**— यांचा जन्म ३ डिसेंबर १८८४ला उत्तर बिहारमधील एका खेड्यात झाला. कलकत्ता विद्यापीठात येण्यापूर्वी त्यांचे बंधू महेंद्र यांच्यामुळे ते 'स्वदेशी' कडे आकर्षित झाले. बिहारी विद्यार्थी परिषदेच्या स्थापनेनंतर त्यात सहभागी झाले. बिहारमधील राष्ट्रीय चळवळीचे पुढारी यातूनच तयार झाले. १९११ मध्ये त्यांनी पाटणा हायकोर्टात वकिली चालू केली. त्याच सुमारास त्यानी काँग्रसचे सदस्यत्व स्वीकारले व ते अ. भा. काँ. कमिटीवर निवडून आले. कलकत्ता विद्यापीठाचे कुलगुरू आशुतोष मुकर्जींनी विद्यापीठात व्याख्याता म्हणून नेमणूक देऊ केली. तसेच गोपाळ कृष्ण गोखले यांनी सर्व्हंट्स ऑफ इंडियाचे सदस्यत्व स्वीकारण्याची विनंती केली होती. चंपारण्य सत्याग्रहामुळे

गांधीजींशी परिचय झाला. रौलट ॲक्टविरोधी सत्याग्रहात नंतर १९२० मध्ये असहकार चळवळीत उडी घेतली. नागपूर झेंडा सत्याग्रहाच्या वेळी (१९२३) वल्लभभाई पटेल यांच्याशी परिचय झाला. कायदेभंगाच्या चळवळीत कारावास भोगला. १५ जानेवारी १९३४ ला झालेल्या बिहार भूकंपाच्या वेळी ते तुरुंगात होते. भूकंपानंतर दोनच दिवसानी सरकारने त्याना मुक्त केले. भूकंपातील पीडितांसाठी त्यांनी अहर्निश काम केले व लक्षावधी रुपयांचा फंड जमविला, १९३४ च्या मुंबई काँग्रेस अधिवेशनाचे ते अध्यक्ष निवडले गेले.

(२२) **मौलाना आझाद**.—त्यांचा जन्म १८८८ मध्ये झाला. मूळचे नाव मोहियुद्दिन. अबुल कलम आझाद हे नाव लेखनासाठी त्यांनी धारण केले होते. ते कोणत्याही महाविद्यालयात गेले नव्हते. परंपरेने त्यांचे शिक्षण झाले. सर सय्यद अहमदखान यांच्या विचारांशी त्यांचा परिचय झाला. वडिलांना–मौलाना खैरुद्दिन यांना–कळू न देता, त्यांनी इंग्रजी शिकण्यास प्रारंभ केला. ते शिक्षण घेणे हे 'नास्तिकपणाचे '. व .' पाप ' समजत असत. काँग्रेसचे मंदगती राजकारण त्यांना मान्य नव्हते, आणि मुस्लिम लीगचे ध्येय त्यांना असंभवनीय वाटत होते. म्हणून त्यांनी बंगाली क्रांतिकारकाशी संबंध ठेवायला प्रारंभ केला. १३ जुलै १९१२ ला त्यांनी ' अलहिलाल ' ( चंद्रकोर ) हे ऊर्दू साप्ताहिक चालू केले. मुसलमान पुढाऱ्यांच्या सरकारधार्जिण्या वृत्तीवर, तसेच मुसलमानांच्या विषयी ब्रिटिशांच्या अनुदार धोरणावर त्यांनी कडक टीका करण्यास सुरुवात केली. पहिले महायुद्ध चालू झाले व सरकारने त्या पत्रावर बंदी आणली. १२ नोव्हेंबर १९१५ ला त्यानी ' अल-बलाग ' साप्ताहिक चालू केले, पण सरकारने ते बंद करून त्याना कलकत्त्यातून हद्दपार केले. पंजाब, दिल्ली, संयुक्त प्रांत व मुंबई प्रांतात त्या पत्रावर आधीच बंदी होती. बिहारात बंदी नव्हती, म्हणून ते रांचीला गेले, तेथेच ते १ जानेवारी १९२० पर्यंत स्थानबद्ध होते. तुरुंगातून सुटल्यावर अ. भा. खिलाफत कमिटीच्या (कलकत्ता अधिवेशनात, १९२०) अध्यक्षपदी त्यांची नियुक्ती झाली. १९२३ मध्ये दिल्लीच्या काँग्रेस अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते. दिल्लीच्या ऐक्य परिषदेचे त्यांना अध्यक्ष करण्यात आले (१९२४). १९२८ मध्ये राष्ट्रीय मुस्लिम परिषदेचे त्यांना अध्यक्ष करण्यात आले. कायदेभंगाच्या चळवळीत त्यांना अनेकदा तुरुंगवास घडला.

मौलाना आझाद हे मुस्लिम समाजाच्या, मौलवीच्या श्रेष्ठ घराण्यातील होते. त्यांचे वडील खैरुद्दिन त्या काळातील बंगालमधील प्रसिद्ध इमाम होते. १८५७ नंतर ते मक्केस गेले. मौलाना लहान वयातच ख्यातनाम पंडित म्हणूनच अरबस्तानात ज्ञात होते. मुल्ला-मौलवींनी मक्केच्या धर्मक्षेत्रात त्यांचा सत्कार करून मौलाना ( विद्यावाचस्पती ) ही पदवी त्यांना दिली. मूळचे नाव जाऊनच मौलाना अबुल कलम आझाद या नावाने ओळखले जाऊ लागले. मुस्लिम धर्मपंडितांच्या मनात ब्रिटिश राजसत्तेविरुद्ध तीव्र द्वेष होता. खिश्चन धर्माचे

मूर्त स्वरूप अशा स्वरूपात ते या राजवटीकडे पाहात. १८८५ साली कॉंग्रेस स्थापन झाली तेव्हा मुस्लिम जातीयवादाचे केंद्र म्हणून ' देवबंद ' चळवळ काम करीत होती. या चळवळीशी मौलानांचा वंशपरंपरेने संबंध होता. या ' देवबंद ' ने कॉंग्रेसला पाठिंबा जाहीर केला. मौलानांच्या ' अल-हिलाल ' या पत्राच्या वाचनाने सरहद्द गांधी राजकारणात खेचले गेले होते.

गांधी दक्षिण आफ्रिकेतून भारतात आल्यावर गुजरातेत वल्लभभाई, बिहारात राजेंद्र बाबू, मद्रास प्रांतात राजाजी असे खंदे नेते गांधीजींच्या मागे ठामपणे उभे राहिले. जवाहरलालजीनी गांधींना पाठिंबा दिला, पण ते समाजवादी कार्यक्रम चोखाळू लागले. मोतीलाल नेहरू व चित्तरंजन दास यांनी असहकारिता कार्यक्रमाला पाठिंबा दिला; पण नंतर कॉंग्रेसअंतर्गत, स्वराज्य पक्ष स्थापन केला. १९२५ साली दास निधन पावले, १९३१ साली मोतीलालजी कालवश झाले. नंतरच्या पुढारीपणात वल्लभभाई, राजेंद्रप्रसाद व राजाजी हे गांधीजींचे आधारस्तंभ होते.

स्वराज्य पक्षाच्या विलीनीकरणानंतर कॉंग्रसने सायमन कमिशनविरोधी चळवळ केली. १९२८ चा नेहरू अहवाल, १९२९ ची लाहोर कॉंग्रेस, नंतरचा कायदेभंगाचा लढा या काळात वल्लभभाई, राजेंद्र प्रसाद व राजाजी गांधीजींमागे ठामपणे उभे राहिले.

गांधी-नेहरूंचे पुढारीपण जरी सामान्यपणे स्वीकारले जात होते, तरी वरील त्रयी गांधींना सतत पाठिंबा देत राहिली व कॉंग्रेसला तिने बलिष्ठ केले. प्रांतिक स्वायत्ततेच्या काळात जे संसदीय मंडळ स्थापन झाले, त्यात वल्लभभाई (अध्यक्ष), राजेंद्र प्रसाद व मौलाना आझाद ही त्रयी खंबीर स्वरूपात उभी राहिली. हे त्यांचे ऐतिहासिक कार्य दृष्टीआड होता कामा नये. उजव्या गटाचे असे जरी त्यांचे वर्णन होत होते, तरी साम्राज्यवादविरोधी लढ्यातील त्यांचे कार्य मोलाचे आहे.

संक्षेपाने लिहायचे म्हणजे भारतीय राष्ट्रवाद चार टप्प्यांनी विकसित झालेला दिसेल. प्रत्येक टप्प्यात तो अधिक वरच्या स्तरावर जाऊन त्यावर आपला प्रभाव पाडून नवीन प्रगतीकडे जात असे. भारतीय राष्ट्रवादी विचारसरणी ही पहिल्या टप्प्यात भांडवलदारी दृष्टिकोनातून विकास पावलेली दिसेल. जमीनदार वर्गातील प्रागतिक तसेच औद्योगिक भांडवलशाहीने आणलेली उदारमतवादी भूमिका आणि मध्यमवर्गातील सुखवस्तू बुद्धिमंत यांची त्या विचारांना साथ दिसेल. पहिल्या महायुद्धापूर्वी शहरी वरिष्ठ मध्यमवर्गीयांतील उसळलेल्या असंतोषाने त्याला धार आली. त्या पहिल्या टप्प्यात त्याचा सामाजिक पाया अतिशय संकुचित होता. एका विशिष्ट वर्गातील राष्ट्रीय लोकशाहीच्या जाणिवांचा तो आविष्कार होता.

काँग्रेसचे पुढारीपण उदारमतवादी होते. अशा काळात राष्ट्रीयत्वाचा आविष्कार क्रांतिकारक तरुणांच्या चळवळीने झाला. (दहशतवादी अशा) तरुणांची संघटना करणे, त्यांना शस्त्रसज्ज करणे, परकी सरकारचे प्रतिनिधी अशा काहींचे खून करणे, आणि राष्ट्रीय स्वातंत्र्याकरिता सैन्यात क्रांतिकारक विचार प्रसृत करणे असे मार्गही त्यांनी चोखाळले ( क्रांतिकारक व गदर बंडाच्या वर्णनावरून हे दिसेल ).

तिसरा टप्पा १९०५ ते १९१८ असा सांगता येईल. या काळात काँग्रेसमधील मवाळ गट मागे पडू लागला आणि त्याची जागा जहालानी घेतली. गोखले, मेथा यांचे पुढारीपण संपले, आणि लाल-बाल-पाल यांचे पुढारीपण स्थिर झाले. या काळात राष्ट्रवादाने लढाऊ रूप घेतले, तो आक्रमक आव्हानात्मक भूमिका घेऊ लागला. त्याचा सामाजिक पाया विस्तृत झाला, कारण गरीब-मध्यम वर्ग त्या लढ्यात भाग घेऊ लागला. १९१४-१८ या काळातील ' होम-रूल ' च्या चळवळीने लोकांच्या राजकीय जाणिवा अधिकच दृढ झाल्या. वरिष्ठवर्गातील सुशिक्षित लोक अनेक कारणांमुळे जातीय भूमिका घेऊ लागले आणि जातीय पायावर संस्था-संघटनांही उभ्या राहिल्या.

१९३०-३४ च्या कायदेभंगाच्या चळवळीपर्यंत चौथा टप्पा म्हणता येईल. या काळात सामान्य जनता, बहुजनसमाज राष्ट्रीय चळवळीत खेचला गेला. गांधीजींच्या पुढारीपणाखालील चळवळीत ही प्रक्रिया वेगाने घडू लागली.

राजा राममोहन रॉयपासून जवाहरलाल नेहरू व सुभाष बोस यांच्यापर्यंत – म्हणजे या शतकाच्या काळात —प्रत्येक पुढाऱ्याने भारतीय स्वातंत्र्य म्हणजे इंग्रजांच्या गुलामगिरीतून मुक्तता असे नसून सामाजिक पाया विस्तृत करणे, आणि दारिद्र्याचा नाश करणे यावर जोर दिला. स्वराज्य फक्त वरिष्ठ वर्गीयाकरिता नसून त्यात बहुजनसमाजाची पिळवणूक थांबली पाहिजे. यावर नेहरूंनी फार जोर दिलेला दिसतो. भारतीय राष्ट्रवाद याच काळात सर्वसमावेशक, विश्वबंधुत्ववादी, धर्मनिरपेक्षवादी आणि मानवतावादी झाला.

या सर्व चर्चेवरून भारतीय राष्ट्रवाद, (१) साम्राज्यशाहीविरोधी, (२) वंशवादविरोधी, (३) आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन धारण करणारा, (४) लोकशाहीचा पुरस्कार करणारा असा आहे; (५) रूसो-जपानी युद्धाच्या काळात त्याने आशियावादी अशी भूमिका घेतली, (६) धर्मनिरपेक्षता (secularism) स्वीकारल्यामुळे भारत अधिक व्यापक दृष्टीचा झाला. मानवतावादी दृष्टिकोन स्वीकारल्यामुळे भारतीय राष्ट्रवादी चळवळ विश्वबंधुत्वाकडे खेचली गेली. याच काळात समाजवादी विचार भारतीय राजकारणात आले. कम्युनिस्टांच्या चळवळी चालू झाल्या. नेहरूंनी समाजवादाचा पुरस्कार केला. " वासाहतिक देशातील स्वातंत्र्याचा लढा हा अखेरीस भांडवलशाहीविरोधी आणि साम्राज्यशाहीविरोधी या स्वरूपात लढला जातो "[१७] असे कॉ. लेनिनने म्हटले आहे ते सार्थ आहे.

## संदर्भ

(१) A. R. Desai, 'Social Background of Indian Nationalism', p. 6;
(२) Ed. G. Adhikari, 'Lenin and India', p. 62.
(३) R. P. Dutt, 'India To-day', p. 253.
(४) V. P. Varma, 'Modern Indian Political Thought', p. 161.
(५) B. K. Roy, 'Vivekananda', p. 60.
(६) *Ibid.*
(७) V. P. Varma, *op cit,* p. 275.
(८) *Ibid,* p. 93.
(९) S. A. Dange, *op cit,*
(१०) Source Material for the History of the Freedom Movement, Vol. II, p. 313.
(११) S. A. Dange, A. I. T. U. C. Fifty Years, p. XVIII.
(१२) V. P. Varma, *op cit,* p. 250.
(१३) R. P. Dutt, *op cit,* p. 379.
(१४) *Ibid* , p. 387.
(१५) Varma, *op cit,* p. 414.
(१६) India 1910 — G.O.I. Publication.
(१७) A. R. Desai, *op cit,* pp. 309–408.

# ३. आर्थिक पार्श्वभूमी

या विभागात जागतिक अरिष्ट, ते निवारण करण्यासाठी सरकारने योजलेले उपाय; शेतकऱ्यांची झालेली हलाखी, त्यांचे लढे; मुळशी सत्याग्रह; बारडोलीच्या शेतकऱ्यांचा लढा; तुकडेबंदी बिलविरोधी आंदोलन; या जागतिक अरिष्टातील शेतकरीवर्ग; कामगारांच्या चळवळी या प्रश्नांचा ऊहापोह करण्यात आला आहे. भारतीय पातळीवरील प्रश्नांचे स्वरूप आणि महाराष्ट्रातील परिस्थितीवर त्याचे झालेले परिणाम यावर भर देण्यात आला आहे.

**प्रारंभिक**

भारतातील पहिल्या पिढीतील पुढारी सामान्यतः साम्राज्यविरोधी होते. याचा अर्थ इतकाच की त्यांना भारत आणि ब्रिटन यांच्यातील आर्थिक संबंध बदलायचे होते. भारताची अर्थव्यवस्था ब्रिटनशी म्हणजे ब्रिटिश साम्राज्यशाहीशी निगडित आहे, म्हणजे तिला स्वातंत्र्य नाही, स्वतःचे असे काही ठरविता येत नाही. दादाभाई नौरोजी यांनी प्रवर्तित केलेल्या ' शोषणा ' च्या सिद्धान्तास त्यांनी परकीय आर्थिक शोषणाचे प्रतीक म्हणून सर्वसाधारणपणे मान्यता दिली. आर्थिक विकास म्हणजे औद्योगीकरण असे त्यांचे मत होते. भांडवलसंचयावर ' शोषण ' सिद्धान्ताचा विपरीत परिणाम होतो म्हणून त्यांचा विरोध होता. त्यांनी उद्योगधंद्यांना महत्त्व दिले, व्यापाराला दिले नाही. जमीनमहसूल, आणि मिठावरील कर कमी करावा याकरिता त्यांनी चळवळ केली, पण कामगार वा शेतकरी यांच्या वर्गीय मागण्या त्यांनी हाती घेतल्या नाहीत. जमीनदाराविरुद्ध कुळांना संरक्षण मिळावे असा त्यांचा प्रयत्न होता.

कापसावरील आयात जकात उठवावी याला भारतीय पुढाऱ्यांचा विरोध होता. मध्यमवर्ग हा खरा परकीय कापडाचा ग्राहक होता. त्यांनी उद्योगधंद्यांना संरक्षणाची मागणी केली. परकीय माल स्वस्त होता तरी त्यांनी स्वदेशीचा पुरस्कार केला.उद्योगधंद्यांच्या विकासाकरिता आणि समाजकल्याणासाठी अधिक कर बसवावा असे त्यांचे मत होते; तरी पण शहरी कनिष्ठ, मध्यम आणि वरिष्ठवर्गीयांच्या मागण्या प्राप्त करून घेण्यासाठी त्यांनी प्रयत्न केले. भारतीय समाजाच्या सर्व विभागांच्या भोवती उभे राहिलेल्या आंदोलनाचाच तो भाग होता.

त्वरित औद्योगीकरणाभोवती असलेले राष्ट्रीय हितसंबंध आणि औद्योगिक कामगारवर्गाचे हितसंबंध हे एकत्र जुळले. सुरुवातीच्या काळात औद्योगिक आणि व्यापारी वर्गाने या राष्ट्रीय मागणीला उचलून धरले नाही. पहिल्या महायुद्धानंतर मात्र भारतीय भांडवलदार राष्ट्रीय चळवळीला, राष्ट्रीय पुढाऱ्यांना आणि पक्षांना मोठ्या प्रमाणावर मदत करू लागला.[१]

भारतात व्यापार करून मिळविलेले नफे, ब्रिटिश अधिकाऱ्यांचे पगार, वासाहतिक युद्धाकरिता ब्रिटनने काढलेली कर्जे, ' होम चार्जेस ' भारतातून निर्यात होणाऱ्या मालावरील

आणि पक्का माल करून येथे विकून मिळविलेले नफे अशा रूपात ब्रिटन भारताची लूट करीत होते. याला प्रतिबंध करण्याकरिता, सुरुवातीच्या काळात स्वदेशी आणि बहिष्काराची चळवळ राष्ट्रीय पुढाऱ्यानी हाती घेतली.

बहिष्काराची चळवळ ही जरी सर्व प्रकारच्या परदेशी मालाविरुद्ध होती, तरी ब्रिटिश मालाच्या विरोधीच ती केंद्रित झाली. राष्ट्रव्यापी वसाहतवादविरोधी लढ्याची ती नांदी होती. परकीय आर्थिक वर्चस्वाविरुद्ध ती राजकीय प्रतिकाराची चळवळ होती. बहिष्काराच्या या चळवळीमुळे ब्रिटिश मालाची आयात घटली.

१९०५ साली व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांनी बंगालची फाळणी करण्याच्या केलेल्या निर्णयाविरुद्ध झालेल्या लढ्यातून स्वदेशीची चळवळ उफाळून वर आली. बहिष्काराची चळवळ भारतातील भांडवलदारवर्गाने उचलून धरली आणि त्यामुळे कापड उद्योग स्थिरावला. उद्योगक्षेत्रात श्रेष्ठत्व मिळविण्यासाठी त्या वर्गाला स्वदेशीचा उपयोग झाला. सर्व जनतेच्या मागण्यांशी भारतीय भांडवलदारवर्गाच्या मागण्या एकरूप झाल्या. प्रारंभीच्या काळात स्वदेशी चळवळीने वसाहतवादविरोधी लढ्याला मोठी गती दिली. ब्रिटिश मालावरील बहिष्काराच्या चळवळीमुळे जर्मन, अमेरिकन, जपान इ. देशांना भारताची बाजारपेठ खुली झाली.[२]

## जागतिक अरिष्ट

भारतीय स्वातंत्र्यलढ्याचा अधिक मागोवा घेण्यापूर्वी पहिल्या महायुद्धानंतर आलेले आर्थिक अरिष्ट, वसाहतवादी सरकारने ते निवारण करण्यासाठी अवलंबिलेले धोरण व उपाय, शेतकऱ्यांचे वाढते दारिद्र्य आणि कामगारवर्गाचे शोषण व त्यांचे संघटित लढे यांचा विचार केला पाहिजे.

दोन महायुद्धांच्या काळातील एक महत्त्वाची घटना म्हणजे भारतात ब्रिटिश भांडवल कमी प्रमाणात येऊ लागले. त्याला कारणे अनेक होती. मुख्य म्हणजे ब्रिटिश साम्राज्यशाहीचे वर्चस्व कमी झाले, ब्रिटिश भांडवलाचा ओघ इतर मागास देशांकडे वळला, भारतातील ब्रिटिशांच्या उद्योगधंद्यांना मंदी आली. ते ऱ्हास पावू लागले.

जागतिक आर्थिक शक्तींची असमान प्रगती हेच या जागतिक आर्थिक अरिष्टाचे मूळ आहे. फ्रान्सने रशियातील रेल्वेमध्ये भांडवल गुंतवले, आणि रशियन सरकारला कर्जे दिली, पण १९१७ च्या रशियन क्रांतीने फ्रान्सच्या भांडवलाला खूपच तडाखा बसला. अमेरिकन भांडवलाचा ओघ मागास देशाकडे वळला. या प्रक्रियेत अमेरिकेने ब्रिटनला मागे टाकले. ब्रिटनच्या जर्मनीतील गुंतवणुकीने पौंडाची स्थिरता कमी झाली. (कारण युद्धोत्तर काळात जर्मनीची अर्थव्यवस्था कोलमडली होती). जर्मनीत गुंतविलेले भांडवल पुनः हाती येण्याची शक्यता नव्हती. राष्ट्रीय उत्पन्नात घट, त्यामुळे व्यापारातही घट, यामुळे लंडनच्या

बँकेतील ठेवीदारानी आपल्या रकमा काढून घेण्यास सुरुवात केली. ह्या अरिष्टाला तोंड देण्यासाठी इंग्लंडने न्यूयॉर्क आणि पॅरिसमध्ये कर्जे उभारली, पण परिस्थितीत फरक पडला नाही. बँक ऑफ इंग्लंडमधील सोन्याचा साठा कमी झाला, पुरेसा राहिला नाही, त्यामुळे सुवर्ण परिमाण रद्द करण्याचा बँकेने ब्रिटिश सरकारला सल्ला दिला. त्याचा परिणाम म्हणजे ब्रिटनमधील पौंड हे कागदी चलन झाले.

कोणत्याही इतर देशांपेक्षा भारताला या अरिष्टाचा तडाखा सहन करावा लागला; कारण भारत संपूर्णपणे प्रारंभिक उत्पादनावर अवलंबून होता, त्याची उत्पादनपद्धती विकसित झाली नव्हती. १९२८-२९ ते १९३२-३३ या चार आर्थिक वर्षांत भारताचा निर्यात व्यापार ३३९ कोटी रुपयांवरून १३५ कोटी रुपयांइतका खाली गेला, आणि आयात व्यापार २६० कोटी रुपयांवरून १३५ कोटी रुपयांवर आला.... १९३१ ते ३५ या चार वर्षांत २०३ दशलक्ष पौंडांचे ३२ दशलक्ष औंस सोने भारतातून परदेशी गेले. थोडक्यात म्हणजे अरिष्ट येण्यापूर्वीच्या ब्रिटिशांच्या सुवर्णसाठ्यापेक्षा हे सोने अधिक होते.[३]

ह्या अरिष्टाने सर्व भांडवलशाही जगताला व्यापून टाकले, त्यामुळे जागतिक आर्थिक संबंध मुळापासून हादरले गेले. साम्राज्यवाद्यांनी या अरिष्टामुळे आलेला आर्थिक बोजा परतंत्र आणि वासाहतिक देशावर टाकण्यास प्रारंभ केला. परिणामी त्या देशांतील जनतेचे शोषण झाले.

जुलै १९३० पासून या जागतिक अरिष्टाचे गांभीर्य वाढू लागले. मुंबईचा शेअर बाजार १२ जुलैला बंदच झाला. कापड गिरण्या बंद पडल्याने बेकारी वाढली. कापसाच्या किमतीतील घट, तयार उत्पादित मालांचे साठे, आणि सर्वसाधारण व्यापारातील मंदी यांमुळे मुख्यतः हे अरिष्ट आले. इंडियन मर्चंटस चेंबरचे अध्यक्ष डी. पी. खैतान म्हणाले, '' कच्चा जूट (ताग) आणि तागाचे तयार कापड यांच्या किमती लढाईपूर्वीच्या पेक्षाही पडल्या, आणि उत्पादकांना तोटा सहन करावा लागला.''[४]

१९२९ पासून शेतीमालाच्या किमती वेगाने पडल्या, आणि जमीनमालकाचा खंड आणि जमीनमहसूल देण्यातच त्यांचे सर्व उत्पन्न खर्ची पडले. काही ग्रामीण भागांत कर न देणाऱ्या शेतकऱ्यांना जुलूम सहन करावा लागला. प्रिय असे सोन्याचे दागिने त्याला विकावे लागले. लहान उद्योजकांना धंदे बंद करण्याची पाळी आली, आणि टाटा-बिर्लासारखे मक्तेदार भांडवलदार वाढू लागले. दरिद्री आणि भुकेकंगाल शेतकरी बेकारांची संख्या वाढवू लागले. ब्रिटिश मक्तेदार, भांडवलदार वसाहतींची, विशेषतः भारताची, अधिक पिळवणूक करून आर्थिक अरिष्ट कमी करण्याचा प्रयत्न करू लागले, यातूनच ब्रिटिश मक्तेदार आणि भारतीय राष्ट्रीय भांडवलदार यांच्यातील चुरस वाढू लागली. ब्रिटिश मॅनेजिंग एजन्सी फर्मशिवाय भारतात अनेक धंदे निर्माण होण्याची प्रक्रिया चालू झाली.[५]

या अरिष्टातून सुटण्यासाठी वसाहतवादी सरकारने दोन उपाय योजले : (१) उद्योगधंद्यांना संरक्षण, आणि (२) रुपयाचे अवमूलन.

भारताचे आयात-निर्यातीच्या जकातीबाबतचे धोरण ठरविण्यासाठी सर इब्राहिम रहिमतुल्ला यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या समितीचे (कमिशन) जी. डी. बिर्ला हे एक सदस्य होते. ११ सदस्य असलेल्या या समितीने खालील शिफारशी केल्या :–(१) उद्योगधंद्यांच्या विकासासाठी देशी उद्योगधंद्यांना संरक्षण, आणि (२) जकातीबाबतचे कायमचे बोर्ड स्थापन करणे. याला जोडलेल्या भिन्नमतपत्रिकेत बिर्ला, अय्यर व स्वतः अध्यक्षांनी (१) सखोल किंवा संपूर्ण औद्योगीकरण, (२) कापसाच्या कापडावरील जकात रद्द करणे, (३) आणि भारतात जबाबदार राज्यपद्धती निर्माण होऊन लोकनियुक्त विधिमंडळाने संपूर्णपणे नियंत्रित असे अर्थविषयक धोरण ठरेपर्यंत ' साम्राज्यवादी धोरणास पसंती ' (इंपीरीयल प्रेफरन्स) या तत्त्वाला विरोध–यांचा पुरस्कार केला. ' साम्राज्यवादी धोरणाला पसंती ' यांचा हेतू साम्राज्य स्वयंपूर्ण करण्याचे धोरण. भारताचे सहकार्य, आयात मालावर, विशेषतः चीन व जपानच्या मालावर जादा आयात-जकात बसवणे हाच ब्रिटिशांची प्रतिष्ठा जगात वाढीस लागण्यास उपाय असल्याचे मत व्हाईसरॉय लॉर्ड आयर्विन यानी व्यक्त केले होते.

मध्यवर्ती विधिमंडळात पंडित मालवीय आणि राष्ट्रीय पुढाऱ्यांनी कापूस उद्योगधंदा (संरक्षण) विधेयकाला कडाडून विरोध केला. त्यात ब्रिटिश आयात कापडावर ५ टक्के व इतर देशातील मालावर २० टक्के जकात सुचविण्यात आली होती. याचा अर्थ साम्राज्यवाद्यांना प्राधान्य या तत्त्वाचाच हा आविष्कार होता. मालवीयांनी एका उपसूचनेत सर्वांना सारखा दर सुचवला. मालवीयांची उपसूचना नामंजूर झाली व सर षणमुखम चेट्टींची सूचना मंजूर झाली ! (चेट्टी हे ' साम्राज्यशाहीला प्राधान्य ' या तत्त्वाचे प्रवक्ते ! १९३२ च्या ओटावा करारातही त्यांनी हीच भूमिका कायम ठेवली––लेखक). या जकात पद्धतीने ब्रिटनमधील औद्योगिक वाढीला गती मिळाली, परकीय हितसंबंधांचे रक्षण करून भारतीय उद्योगधंद्यांना प्रेरणा मिळाली. (त्यातही ब्रिटिश हितसंबंध अधिक होते) असे रजनी पाम दत्त यांनी म्हटले आहे.

दोन महायुद्धांच्या काळात परकीय व्यापाऱ्याला भांडवलाचा पुरवठा करणाऱ्या ब्रिटिश भांडवलदारांनी आपली परिस्थिती सुधारली. असोसिएटेड चेंबर ऑफ कॉमर्सने सायमन कमिशनपुढे सादर केलेल्या निवेदनात ब्रिटिश आणि भारतीय भांडवलदारांच्या संयुक्त उद्योगधंद्यांवर भर दिला होता.[६]

चलनपद्धतीत सुधारणा करण्याच्या नावावर हिल्टन यंग कमिशन नेमण्यात आले. वास्तविक चलनाच्या दरात फरक करून आपला घसरलेला व्यापारशेष सुधारावा हा खरा हेतू. त्या कमिशनने रुपयाचा दर १८ पेन्स असावा असे सुचविले. सर पुरुषोत्तमदास

ठाकुरदास यांनी त्याला विरोध करून १६ पेन्स भाव असावा असे सुचविले. हा भारतीय भांडवलदारांचा आवाज होता. रुपयाला अधिक पेन्स मिळतील या प्रचाराने व आचाराने ब्रिटिश व्यापार सुधारण्याचा उद्देश होता, त्याने भारताचे अधिकच शोषण झाले असते. त्याने भारताचा व्यापार कमी झाला. सोन्याच्या निर्यातीला उत्तेजन मिळाले. थोडक्यात म्हणजे रुपयाचे अवमूलन आणि मोठ्या प्रमाणावरील जकाती यामुळे या अरिष्टातून मार्ग निघू शकला नाही. अखेर साम्राज्यवाद्यांना प्राधान्य (इंपीरियल प्रेफरन्स) हे भारतावर लादण्यात आले (ओटावा कराराच्या संदर्भात याविषयी नंतर अधिक चर्चा केली आहे—लेखक).

**शेतकऱ्यांचे प्रश्न**

दक्षिणी विभागात वाढलेला जमीनमहसूल आणि सावकारी यांच्या विरोधी झालेली शेतकऱ्यांची बंडे, भूहीन मजुरात झालेली वाढ, मुळशीचा सत्याग्रह, तुकडेबंदी व तुकडेजोड याविरोधी झालेली चळवळ, जागतिक अरिष्टाने शेतकरी जीवनावर झालेले दुष्परिणाम, बारडोली येथे झालेला शेतकऱ्यांचा लढा व त्याचे शेतकरी चळवळीवरील प्रभुत्व, या शेतकरी जीवनाशी निगडीत अशा महत्त्वाच्या घटना. कायदेभंगाची चळवळ सुरू होण्याच्या सुमारास वरील घटनांचा मागोवा घेणे जरूर आहे.

**(अ) शेतकऱ्यांची बंडे**

१८७५च्या सुमारास महाराष्ट्रातील नगर, पुणे या जिल्ह्यांत सावकारविरोधी शेतकऱ्यांच्या लढ्यात शेतकऱ्यांबरोबरच बलुतेदारानीही भाग घेतला. सावकारांच्या घरातील नोकरही त्यात सामील झाले होते, हजारो लोक बाजारपेठेत जमत आणि सावकारांचे देणे नाकारीत. तसेच सावकाराजवळील कर्जरोखे हस्तगत करण्याचा प्रयत्न करीत. शेतकऱ्यांचे हे रौद्ररूप पाहून काही सावकार गावे सोडून गेले. ज्या सावकारांनी प्रतिकार केला, त्यांच्या गंजी जाळण्यात आल्या, काही सावकारांची नाकेही कापण्यात आली, आणि हस्तगत केलेले रोखे फाडण्यात आले. याला रोखेफाडीची चळवळ असे म्हणतात. सरकारचे सैन्य जेव्हा बंदोबस्तासाठी आले तेव्हाच हा उपक्रम थांबला.

या शेतकरी उठावाची चौकशी करण्याकरिता नेमलेल्या 'दख्खन बंड आयोगाने' (डेक्कन रायट्स कमिशन) म्हटले आहे, "या बंडातील भाग घेणाऱ्या शेतकऱ्यांचा मुख्य हेतू सावकाराजवळ असलेले रोखे हस्तगत करून ते नाहीसे करण्याचा होता. यासाठीच हिंसा झालेली दिसून येते."[७] एका पंधरवड्यात पुणे जिल्ह्यातील ५५९ आणि अहमदनगर जिल्ह्यातील ३९२ शेतकऱ्यांना अटक झाली; आणि त्या भागावर सामुदायिक दंड बसविण्यात आला. १८७९ मध्ये 'दक्षिणी शेतकऱ्यांच्या मुक्ततेचा कायदा' (Deccan Agriculturists'

Relief Act) करण्यात आला. त्यामुळे शेतकऱ्याला थोडा दिलासा मिळाला.त्यांच्या लढ्यामुळेच हे शक्य झाले. याच संदर्भात वासुदेव बळवंत फडके यांचे बंड झाले होते.[८]

पहिल्या महायुद्धाच्या आधी व नंतरच्या काळात म्हणजे हा कायदा झाल्यानंतरच्या चाळीस वर्षांत शेतकऱ्यांचे जीवन अधिकच हलाखीचे झाले. मुंबई इलाख्यात मुख्यतः रयतवारी पद्धतीच होती, स्वतः जमीन न कसणारे असे शेतकरी ३० टक्क्यांपेक्षा अधिक होते. १९०१ ते १९३१ या तीस वर्षांत शेतीवर काम न करणारे पण खंड घेणारे यांच्यात अडीच पटीने वाढ झालेली दिसून येते. भूहीन शेतकऱ्यांत ही वाढ झाली. म्हणजे त्यांची संख्या $^{१}/_{३}$ होती ती $^{१}/_{२}$ झाल्याचे आढळून आले.

### (ब) मुळशी सत्याग्रह

मुळशी भाग पुण्यापासून सुमारे २८ मैल दूर. त्यात मुख्यतः भातशेती, दुर्गम डोंगर, २५० इंच पाऊस असलेला. मुळा, निळा या भागांतील मोठ्या नद्या. या भागाची पाहणी टाटा कंपनीने केली आणि त्या भागात एक धरण बांधून वीज प्रकल्प उभारण्याची योजना तयार केली. या धरणाच्या पाणलोट क्षेत्रात ५४ गावे व ४० हजार एकर भातशेती जाणार होती. १५ हजार लोक.बेघर होणार होते.

धरण बांधायचे तर जमीन ताब्यात घेणे जरूरीचे होते. टाटा कंपनीने मूळ मालकापासून जमिनी खाजगी रीतीने न घेता त्या ताब्यात घेण्याबाबतच्या सरकारी कायद्याची (लॅण्ड ॲक्विझिशन लॉ) मदत घेण्याचे ठरविले. सरकारनेही ही मदत दिली. १९१९ च्या जूनपासून जमिनींच्या मूळ मालकांना सरकारने नोटिसा दिल्या. याला विरोध करण्याकरिता १६ व १७ डिसेंबरला आवळस व मुळशी येथे सभा झाल्या. आवळसचे शाळामास्तर गोखले, दत्तू साठे व शंकर रानडे यांनी आधी त्या भागात फेरफटका मारला होताच.

केसरीने लिहिले; " मुळशी पट्ट्यातील ताम्हीण खोऱ्यात टाटा कंपनीने बोगद्याचे काम सुरू केले आहे. हे काम चालू असताना कंपनीच्या अधिकाऱ्यांनी तेथील शेतकऱ्यांच्या जमिनीवर हवा तसा धुडगुस घातला ! आपल्या जमिनीची होत असलेली नासधूस पाहून एका शेतकऱ्याने कंपनीचा एक अधिकारी मि. व्हाईट याला आपल्या जमिनीत येऊ दिले नाही. एका सामान्य शेतकऱ्याने अडविले? केवढा मोठा गुन्हा ! साहेबाने खिशातील पिस्तुल काढून रोखले. शेतकरी डगमगला नाही ! " केसरीने भविष्य वर्तविले की, अशा प्रकारचे अत्याचार चालू राहतील तर शेतकरी सत्याग्रह केल्याशिवाय राहाणार नाहीत.

१९२०च्या नोव्हेंबरमध्ये महात्माजी पुण्यात आले असता मुळशीच्या लोकांनी त्यांना भेटून त्यांचा सल्ला मागितला. ते म्हणाले, " सरकारच्या नादाला लागू नका, एकतर खचलेल्या चरात बसून मातृभूमीकरिता मरून जा, नाही तर देशोधडीला लागून परकियांचे गुलाम व्हा." ' महात्माजींनी अशी निर्वाणीच्या त्यागाची अपेक्षा का केली व त्यांच्या पुनर्वसनाच्या प्रश्नाला

अग्रस्थान का दिले नाही, हे माझ्या लक्षात येत नाही असे शंकरराव देव यांनी नंतर म्हटले आहे.

धरणासाठी जमिनी घ्यायच्या असतील तर मोबदला देताना पुढील गोष्टींचा विचार करावा असे केसरीने लिहिले: (१) जमिनी काढून घेताना सरकारला जो नफा होईल तो रयतास द्यावा; (२) हल्लीच्या जमिनीच्या तोडीची किंवा त्याहून चांगली जमीन दुसरीकडे द्यावी; (३) निकृष्ट जमीन असेल तर मशागतीचा खर्च द्यावा; (४) नवा धंदा शोधताना होणारे नुकसान द्यावे; (५) कॉंपेन्सेशन कंपनीच्या शेअर्सच्या रूपाने द्यावे; (६) कॉंपेन्सेशनचा ठराव वैयक्तिक न करता संस्थेशी करावा.

त्यावर चीफ सेक्रेटरीचे उत्तर आले ते असे :–' जमिनी मिळवून देण्याचे काम तुमच्या विचाराने करण्यात येईल. पाण्याचा उपयोग उद्योगधंद्याकरिता आहे. ज्यांच्या वतीने तुम्ही बोलत आहात त्यांचे हित साधावयाचे म्हणजे ज्यांची वस्ती उठवणार त्या रयतांना दुसरीकडे जमीन पाहिजे असल्यास त्यांना ती मिळवून देण्यात तुम्ही शक्य तितकी मदत केली पाहिजे.'

नागपूर कॉंग्रेसमध्ये (१९२०) केळकरांनी खालील ठराव मांडला :—

' मुंबई, मद्रास, बिहार वगैरे अनेक ठिकाणी सरकार परदेशी भांडवलवाल्यांच्या हिताकरिता हजारो एकर जमीन ॲक्विझिशन कायद्याच्या नावाखाली सक्तीने घेऊन हिंदी लोकांच्या घरादारांचे, शेतीचे वाटोळे करीत आहे. त्याचा प्रतिकार करणे हे आपले कर्तव्य असून सरकारशी असहकारिता करण्याला हेही एक जादा कारण आहे. श्रीमंत सरकार व त्या सरकारचे श्रीमंत कैवारी यांची गट्टी जमून ते आमच्यातून दूर गेले आहेत. पण त्यांची वृत्ती गरिबांच्या हितांच्या विरुद्ध झाल्यास त्यांची शेंडी धरून त्यास असहकारितेच्या समुद्रात बुडवावे लागेल; कारण ते गोरगरिबांची घरे बुडवायला बसले आहेत. टाटा कंपनीकडून मुंबईला विजेचा पुरवठा करून तेथला धूर कमी करण्याकरिता १५ हजार इसमांची घरे बुडण्यासाठी चालली आहेत. हाच प्रकार इतर प्रांतातही चालला आहे. हे सर्व केवळ भांडवलवाल्यांच्या हिताकरिता होत आहे.'

मुळशीच्या अन्यायाच्या प्रतिकारासाठी ' सत्याग्रह सहायक मंडळ ' स्थापन करण्यात आले. शि. म. परांजपे अध्यक्ष व गव्हर्नरांना याबाबत तारा करण्यात आल्या. पुण्यातील व्यापाऱ्यांनी मदत करण्याचे मान्य केले. केसरीने ' सत्याग्रहाला जबाबदार सरकार ' या अग्रलेखात लिहिले, ' टाटाचे डायरेक्टर पुरुषोत्तमदास यांनी कौन्सिलात सरकारास हा दोष दिला. टाटा कंपनीतर्फे कौन्सिलात सांगण्यात आले की मुळशीमुळे अनेक व्यापाऱ्यांचा मिळून एक कोटी साठ लक्ष रुपये फायदा होणार आहे. जमिनी पाहिजेत तर त्यांनी खर्चण्यास तयार झाले पाहिजे. लॅंड ॲक्विझिशन कायदा लागू करणे म्हणजे कायद्याची तलवार हाती

घेऊन दिवसा ढवळ्या लुबाडणे अशी सर्वांची समजूत होऊन बसली आहे. सरकारने जमीन मोबदल्याचा प्रश्न निकालात काढला नाही. जमीन वसाहतीची तयारी प्रथम सरकारने करावी, अशी इंडस्ट्रियल कमिशनरची शिफारस आहे.'

'बोल्शेव्हिझमचे भय' या लेखात 'केसरी' म्हणतो, खरे म्हणजे सरकारला बोल्शेव्हिझमचे भय वाटत होते आणि मुळशीचे चंपारण्य होण्याची भीती वाटत होती. २९ मार्च २१ रोजी पुण्यात झालेल्या सभेचे अध्यक्ष प्रा. परांजपे होते. भोपटकर म्हणाले, " हा कायदा न्यायाच्या व नीतीच्या विरुद्ध आहे, शिवाय असले भांडवलवाल्यांच्या वशिल्याचे उंटाचे पिल्लू एकदा घरात शिरल्यास ते सगळे घर घेतल्याशिवाय राहाणार नाही. सरकार १,१०० रु. जमीन १,६०० रु. ला विकते. असला हा भांडवलवाल्यांचा कावा करणे म्हणजे बोल्शेव्हिझमचे बी पेरणे होय. भांडवलवाल्यांच्या हितासाठी जर ' लँड ॲक्विझिशन कायदा ' करून शेतकऱ्यांच्या जमिनी घ्यावयाच्या तर शेतकऱ्याच्या कल्याणाकरिता ' कॅपिटल ॲक्विझिशन ॲक्ट ' का करू नये ? पण सरकारचा सगळा ओढा भांडवलवाल्यांकडेच दिसतो.....टाटा कंपनीच्या दिखाऊ नावामागे युरोपियन भांडवलवाले असावेत. थोड्याच कालावधीत त्या भांडवलवाल्यांनी महाराष्ट्रातील जमीन व्यापल्यास येथेही चंपारण्य होण्याची भीती आहे." (५-४-२१)

ता. ७ जून १९२१ रोजी आवळसला सभा झाली. ' आपली महार लोकांची जमीन हाय, आम्हा महारांना दुसरीकडे कोण विचारणार ? सरकारने कसलाही कायदा लावला तरी आम्ही आमच्या जमिनी सोडणार नाही ' असे कुशाबा महार म्हणाला.

या संदर्भात पुण्याच्या कलेक्टरांचे डॉ. फाटक यांना पत्र आले.—

(१) जमिनी मिळवून देऊ अशी लोकांची खात्री करा. असे आपले म्हणणे टाटानी कळवले आहे.

(२) १-२-१९२१ ला लोकांपुढे मी विचारले तेव्हा दुसरीकडे जमिनी नकोत असे लोक म्हणाले.

(३) वसाहत करण्यास लोक तयार आहेत असे कळले तरच त्या कामावर स्वतंत्र अधिकारी नेमेन.

(४) २० मार्चला सरकारने धोरण जाहीर केले आहे. पुढाऱ्यांनी लोकांना समजावून सांगण्याचा प्रयत्न केला नाही. सरकार जमिनी मिळवून देण्याचा आटोकाट प्रयत्न करील.

आता–(१) दुसरीकडे जमीन घ्यायची. (२) रोख पैसे घ्यायचे, का (३) आंध्र व्हॅलीतील लोकांप्रमाणे ७ वर्षे धरणावर मजूर म्हणून काम करायचे याविषयी निश्चय करावा.

डॉ. फाटक यांचे उत्तर खालीलप्रमाणे होते :—

'' जमीन सोडण्याची मावळ्यांची इच्छा त्यांनी एकमताने व्यक्त केली. मोबदला किंवा नुकसानभरपाई घेण्यास लोक नाखूष आहेत (केसरी २६-४-१९२१). ' मुळशी सत्याग्रहाचे प्रवर्तक बापट, विनायकराव भुस्कुटे होते. त्यांनी मुळशी तालुक्यातील शेतकऱ्यांच्या परिस्थितीची पाहणी करण्याकरिता त्या भागात दौरा काढला. अनेक सभा घेतल्या. ' तुम्ही सत्याग्रहाची तयारी करा. मला मध्यरात्री बोलवा. मी येतो ' असे आश्वासन न. चिं. केळकर यांनी मावळ्यांच्या सभेत अध्यक्षीय भाषणात दिले. हे ऐकताच समाज हर्षाने उचंबळून गेला. टिळक व शिवाजी महाराजांच्या जयजयकाराने तो भाग दणाणून गेला. कवडेशास्त्र्यांनी चळवळीला वसिष्ठांच्या कामधेनूची उपमा दिली. टाटा कंपनीच्या अधिकाऱ्यांनी पोलिसांची मदत मागितली. जिल्हाधिकाऱ्यांनी कंपनीचा पाठपुरावा केला. लोकांच्या सम्मतीशिवाय त्यांच्या जमिनीत खड्डे खणण्यात आले. लोकांवर जुलूम होऊ लागला. सरकार नेहमीच श्रीमंतांचा पाठराखीपणा करते. सरकार कंपनीच्या बाजूला आहे यांची जाणीव मावळातील शेतकऱ्यांना होऊ लागली. कोल्हटकरांनीही या सभेत भाषण केले. त्यांच्या सभेत मावळ्यांनी आमची गावे बुडवू नका, आम्हाला देशोधडीला लावू नका अशी तक्रार मांडली. कंपनीला सरकारचा पाठिंबा असल्याने ही चळवळ करायची तर सरकारविरुद्ध चळवळ करावी लागेल. अशी जागृती लोकांत होऊ लागली.

३० नोव्हेंबर १९२० रोजी सत्याग्रहाचे भविष्य केसरीने वर्तविले आणि १४ डिसेंबरला ' मुळशीवरील संकट ' हा वि. म. भुस्कुटे यांचा वृत्तांत केसरी व लोकसंग्रहमध्ये आला. लॅंड ॲक्विझिशन कायद्याच्या आधारे जमिनी घेण्याचा उपक्रम कलेक्टरने चालू केलाच. ' जमिनी घेऊ तर भरपाई देऊ ' असे ३ फेब्रुवारी १९२१ ला आश्वासन दिले.

## जान की जमीन

कलेक्टरने एवढे लांबलचक भाषण केले, पण त्यात या सर्व जमिनी कायद्याच्या जोरावर आपण कंपनीला मिळवून देणार आहोत किंवा कंपनी या सर्व जमिनीचे पैसे त्या त्या मालकाला देणार आहे. याचा उल्लेख आपल्या भाषणात केला नाही. तसेच ' कंपनीने धरण बांधल्यामुळे आपल्या हजारो एकर जमिनी पाण्यात बुडून जाणार तेव्हा ही नुकसानभरपाई कोण भरून देणार ' असा प्रश्न जमलेल्या गावकऱ्यांपैकी कोणीही किंवा पांढरेपेशांपैकी कोणीही व सावकारांपैकी कोणीही कलेक्टरला विचारला नाही. ज्या जमिनी सरकार कंपनीला मिळवून देणार होते त्या जमिनींपैकी शेकडा ६० जमिनी सावकारांच्या व वतनदार इनामदारांच्या होत्या. तरी सर्व मावळे आपली जमीन विकण्यास तयार होईपर्यंत सावकार लोक अशा प्रकारची भाषा तोंडातून काढणे शक्य नव्हते. विशेषतः महार वतनदार

आपल्या पिढीजात आलेल्या अरिष्टाच्या जाणिवेने घाबरून गेले होते. आवळसच्या विठु महाराने आवळसच्या केळकरांच्या सभेत भाषण करून ' उद्या चळवळ चालू झाली तर त्यात भाग घ्यायला मावळेही तयार आहेत ' असे सांगितले. नव्हे, घोषित केले.

दक्षिण आफ्रिकेत, चंपारण्यात आणि रौलेट कायद्याविरुद्ध महात्माजींनी सत्याग्रहाचा अवलंब केला होता. सत्याग्रह कधीच अयशस्वी ठरत नाही, त्याचा सर्वत्र विजयच होतो अशी भावना सत्याग्रहाभोवती महात्माजी निर्माण करीत होते. केसरीने मुळशीच्या सत्याग्रहाचा उल्लेख केला तो देशात त्या वेळी पसरलेल्या वरील विचारसरणीला धरून होता. सत्याग्रहाची कल्पना मावळयांच्या मनाचा कब्जा घेऊ लागली. ' मावळे या अन्यायाचा प्रतिकार केल्याशिवाय राहणार नाहीत व सबंध महाराष्ट्र त्यांच्यामागे उभा राहील ' अशा केसरीच्या अग्रलेखाने मावळयांच्या सत्याग्रहाच्या निश्चयाला बळकटी आली.

' सत्याग्रह करून टाटा कंपनीचा काटा काढल्यावर सावकारांचा काटा काढायला किती वेळ लागणार !' असा विचार कार्यकर्ते करीत होते. प्रतिज्ञापत्रकावर एक हजार मावळ्यांनी आपल्या सह्या व आपले अंगठे दिले. ' ५०० खंडी भात मावळ्यांनी सत्याग्रहाची वर्गणी म्हणून जमा केले तर मुळशीचे मावळे सत्याग्रहाला तयार आहेत असे मी समजेन ' ही केळकरांची अट मावळ्यांनी मान्य केली. सत्याग्रहाचे स्वरूप काय असावे ह्याबाबत अनेक बाजूनी चर्चा झाली. त्यात ' लोकसंग्रहाचे ' संपादक श्री. अण्णासाहेब भोपटकर यांनी ' जान किंवा जमीन, ' ही घोषणा केली. अशा पार्श्वभूमीवर मावळ्यांनी प्रतिज्ञापत्रकावर सह्या केल्या.

यापुढे सत्याग्रह होणार हे पाहून सावकारांचे धाबे दणाणले होते. मावळ्यांनी सत्याग्रह केला, सरकारने जोराची दडपशाही करून तो चिरडून टाकला व काही तरी नावापुरती भरपाई देऊन सर्व जमिनी ताब्यात घेतल्या तर आपले नुकसान होणार असे त्यांना वाटू लागले; उलटपक्षी सत्याग्रहाला यश आले, कंपनीचे काम बंद पडले, मावळ्यांनी जमिनी वाचविल्या तर ते आतापेक्षाही जास्त शिरजोर होतील व आपल्याला या भागात राहणे मुष्कील होईल असे त्यांना वाटू लागले. सावकारांची ही भीती अगदीच निराधार नव्हती; कारण गेली तीन चार वर्षे काही गावांतून सावकारांच्या मालकीची शेते मावळ्यांनी पिकवायचे बंद करून ती पाडून ठेवली होती. त्यामुळे या चळवळीकडे पाहताना दोन दृष्टिकोन दिसून येत होते. सत्याग्रहाची धमकी देऊन जास्तीत जास्त मागणी करणारा एक पक्ष व जान किंवा जमीन या ध्येयाने लढत राहणारा दुसरा पक्ष.

सावकार व वतनदार लोकांतही काही दुसऱ्या पक्षांचे लोक होते. ' केसरी व लोकसंग्रह ' या राष्ट्रीय पत्रांनी मावळ्यांच्या जमिनी वाचविण्याचे काम उचलून धरले होते. ' पण केळकरांचे मत आत्ताच सत्याग्रह करण्याचे कारण नाही ' असे मला समजले त्यावेळी

चळवळीच्या यशस्वितेच्या दृष्टीने हे चिन्ह शुभ नाही असे वाटून माझे मन चिंताग्रस्त झाले. प्रतिज्ञापत्रकावर भरपूर सह्या झालेल्या पाहिल्याबरोबर सत्याग्रहासंबंधाने सावकार मंडळीत पूर्वीसारखा उत्साह राहिला नाही असे दिसू लागले. सत्याग्रह लांबणीवर टाकणे म्हणजे तडजोड करण्यास तयार असण्यासारखेच आहे असे भुस्कुटे यांनी केळकरांना सांगितले.

## बारामती परिषद

बारामती येथे मुळशीच्या सभासदांची परिषद घेण्याची योजना चालू असतानाच कंपनीविरुद्ध सत्याग्रह म्हणजे सरकारविरुद्ध सत्याग्रह होणार हा विचार स्पष्ट होत चालला. तडजोडवादी सावकारांविरुद्ध भूमिका मांडण्यात येऊ लागली. सत्याग्रह करून कंपनीचा काटा काढायचा त्याप्रमाणे सावकारांचाही काटा काढावयाचा असेल तर सावकारांनी काय म्हणून सत्याग्रह करायचा असे प्रश्न पुढे मांडण्यात आले. नगर जिल्ह्याप्रमाणे पुणे जिल्ह्यात सावकार लोकांकडे वसाहती, गुजर व काही ब्राह्मण यांच्या हाती होत्या. थोडी सावकारी, थोडी शेती करणारीही ब्राह्मण मंडळी होती.

पावसाळ्यानंतर सत्याग्रह करावा असे केळकरांचे मत त्याला उद्देशून होते. अशा वातावरणात बारामतीला परिषद झाली. अध्यक्ष श्रीनीवासराव कौजलगी यांनी विषयनियामक समितीत 'तरुण मंडळींच्या उत्साहावर तुम्ही थंड पाणी ओतत आहा' असे केळकरांना उद्देशून म्हटले. केळकर आपले म्हणणे मागे घेण्यास तयार नव्हते. 'तथापि सत्याग्रह तहकूब ठेवावा, दरम्यान तडजोडीचा प्रयत्न करावा.' ही केळकरांची ठरावाला जोडलेली पुस्ती मान्य झाली. ठरावावर भुस्कुटे व शंकरराव देव यांनी विरोधी मते नोंदविली. केळकरांच्या भूमिकेचे सावकारांनी स्वागत केले. शिवरामपंत परांजपे व वासुकाका जोशी यांनी भुस्कुटे यांना परिषदेनंतर पाठिंबा दिला. या पाठिंब्याने देवांना बरे वाटले.

मावळात सत्याग्रहाबाबत उत्साह होता. डॉ. फाटक या सत्याग्रहाला पाठिंबा द्यायला पुढे आले. देवांनी मुळशी भागात प्रचाराला सुरुवात केली. सत्याग्रहाचा दिवस न ठरवण्याचे कारण सावकार आहेत असे लोक उघड बोलू लागले.

## बंडाचे निशाण

२००/२५० मावळे पुण्याला सत्याग्रह ठरविण्यासाठी आले. केळकरांनी काय, तुम्हाला कोण पाहिजेत? नरसोपंत का विनायकराव ? असे विचारले आम्हाला विनायकराव पाहिजेत असे लोक म्हणाले. अखेर मावळ्यांनी रामनवमीचा दिवस ठरविला. नंतर केळकरांनीच सत्याग्रहाचा मजकूर तयार करून दिला.

सत्याग्रहाच्या आधी दोन दिवस ज. स. करंदीकर व पां. म. बापट मुळशीला स्वयंसेवकासह दाखल झाले. करंदीकरांना सत्याग्रह मंडळाचे अध्यक्ष निवडण्यात आले.

बापट हे पूर्वाश्रमीचे क्रांतिकारक. भारतात बाँबची विद्या आणणारे पहिले पण त्यांनीही सत्याग्रह मंडळाच्या शिस्तीने वागेन असे घोषित केले.

१६ एप्रिल १९२१ रोजी मावळ्यांनी आपल्या जमिनी वाचविण्याकरता बंडाचे निशाण उभारले. हे निःशस्त्र बंड होते. विठोबा बाठीवलेकराने झेंडा हातात घेऊन कूच केले. आपल्या नायकाच्या नेतृत्वाखाली सत्याग्रहाच्या तुकड्यांनी धरणाच्या पायाच्या मध्यभागापर्यंत व तेथून आपल्या तुकड्या घेऊन ठरलेल्या जागी धरणाच्या पाण्यात उतरायचे असे ठरवण्यात आले होते. पायाकरता खणलेल्या चरात सत्याग्रही मावळयांच्या तुकड्या आपापल्या नायकासह खाली उतरल्या. सत्याग्रही मावळे चरात उतरल्याबरोबर माती भरण्याचे व वाहण्याचे काम बंद झाले. काही स्वयंसेवक आडवे पडले. १५० फूट रुंद व ६ फर्लांग लांबीचा चर सत्याग्रही मावळयांनी फुलून गेला होता. हजारांवर मावळे चरात उतरले होते. तेथील काम बंद पडले. मजूर सत्याग्रह्यांशी गप्पागोष्टी करू लागले. बापटांच्या तुकडीतील लोक मजुरांचे पाय धरत होते. बापटांनी भाषणही केले. सत्याग्रह्यांवर गरम पाण्याचा मारा झाला त्यालाही त्यांनी यशस्वी तोंड दिले. दुसऱ्या दिवशीही तसेच झाले. केळकर सत्याग्रहाच्या ठिकाणी आले त्यांनी उत्तेजनपर भाषण केले. सत्याग्रहाचा हा हप्ता पंधरा दिवस चालला.

या सत्याग्रहाची मीमांसा करताना 'केसरीने' म्हटले, "मावळे लोकांना व्यवहार कळत नाही असे नाही. मनुष्याला कारणपरत्वे वस्तुत्याग करावा लागतो हे ते जाणतात. कोणत्या कारणाकरिता स्थानत्याग करावा हे ते जाणतात. तळ्याच्या पाण्याचा उपयोग इंदापूर-दौंड शेतकऱ्यांना झाला असता तर मुळशीतील मावळ्यांनी जमिनी न सोडण्याचा हट्ट खचितच धरला नसता व महाराष्ट्रातील लोकांनीही सत्याग्रहाला मदत केली नसती. या विचाराला सोलापूर परिषदेचाही पाठिंबा मिळाला. मुळशी चळवळीचा जोर भावनाप्राधान्यावरून काढून निव्वळ सारासारविचार किंवा देवघेवीचा व्यवहार यावर सरकारास आणून ठेवायचे होते तर ती वेळ पूर्वी होती. मुंबईतील व्यापाऱ्यांनी टाटा कंपनीच्या बँकेवर व गिरण्यांवर बहिष्कार घालण्याचे ठरविले. काँपेन्सेशन ठरवण्यासाठी अधिकारी हिंडत आहेत म्हणून काम बंद केले असे कंपनीने जाहीर केले. 'जमीन संरक्षण मंडळी' स्थापन करण्यात आली. नुकसानभरपाई घेऊन जमीनभरपाई द्यावयाची नाही असे ठराव मावळ्यांच्या सभेत झाले. मुळशी पट्ट्यातील चार तलाठ्यांनी तलाठी जागेचा राजीनामाही या प्रकरणात दिला." (२२-११-१९२१).

अकोले येथे महाराष्ट्र परिषद १-१२-१९२१ ला सुरू झाली. अध्यक्षस्थानी केळकर होते. ते म्हणाले, मुळशीबाबतचा ठराव अणे यांनी मांडला, धार्मिक व ऐतिहासिक स्थळे जातात; परदेशी भांडवल कौशल्य, नोकरचाकर वगैरे गुंतविणाऱ्या अगर गुंतवू पहाणाऱ्या कंपन्यांचा

एकजात मालकी हक्क उत्पन्न करणाऱ्या औद्योगिक उन्नतीच्या नावाखाली करण्यात येणाऱ्या योजना होऊ द्याव्यात की नाही हा मुळशी पेटा प्रकरणाच्या बुडाशी मोठा महत्त्वाचा मुद्दा आहे. ही स्थानिक बाब नाही. या संदर्भात केसरीने म्हटले आहे की, ऐतिहासिक दृष्ट्या औद्योगिक उन्नतीच्या नावावर भांडवलवाल्यांची लूट चालू द्यावी काय ? वगैरे मुद्देही यात निघतात. (६-१२-१९२१) सत्याग्रह मंडळावरील सभेत कलेक्टरच्या पत्राचा विचार झाला. आपल्या जमिनी न सोडण्याची इच्छा मावळ्यांनी प्रकट केली. त्याप्रमाणे मोबदला जमीन किंवा बुडणाऱ्या जमिनीबद्दल कॉंपेन्सेशन घेण्याविषयी त्यांनी नाखुषी दर्शवली.

३० एप्रिलला शेरे येथे सत्याग्रहाला सुरुवात झाली. शेरेकर, देशमुख, भुस्कुटे, रानडे, बापट व पौडकर इ. मंडळींनी रेल्वे रुळाच्या बांधणीला हरकत घेतली. याच वेळी ' धरण बांधणे ' अपरिहार्य आहे ' असे गव्हर्नरने भाषणात उद्‌गार काढले. शेरे सत्याग्रहात भाग घेतल्याबद्दल रानडे, बापट यांना ६ महिने व इतरांना ३ महिने शिक्षा झाल्या. सरकारने ५ मैल घातलेले रूळ काढले.

मुंबईतील व महाराष्ट्राच्या इतर भागातील इंग्रजी व मराठी वर्तमानपत्रांचे बातमीदार हा सत्याग्रह पाहायला आले होते. सत्याग्रहाची वर्णने सर्वत्र येत. असा सत्याग्रह भारतातील पहिलाच होता. ' पाया खोदण्याची व त्यासंबंधी मुळशीच्या हद्दीत चालू असलेली सर्व कामे ६ महिने बंद राहातील. त्यापुढेही, या प्रश्नाचा निकाल लागेपर्यंत पुनः काम सुरू करण्यात येणार नाही ' अशी पुण्याचे कलेक्टर कॅमेरॉन यांनी सुचविलेली तडजोड उभयपक्षी मान्य करण्यात आली.

### महाराष्ट्र प्रांतिक परिषद

वसई येथे महाराष्ट्र प्रांतिक परिषद १९२१ च्या मे महिन्यात झाली. डॉ. मुंजे अध्यक्षस्थानी होते. या परिषदेत मुळशीच्या जमिनी टाटाच्या ताब्यात देताना लँड ॲक्विझिशन कायदा सरकारने वापरला याबद्दल सरकारचा निषेध करण्यात आला. तसेच सत्याग्रह्यांचे अभिनंदन करण्यात आले. या सत्याग्रहाला सर्वांनी मदत करावी अशी विनंती करणारा ठराव संमत झाला. या परिषदेतील भाषणात सरोजिनी नायडू म्हणाल्या, '' आजचा हिंदुस्थान दरिद्री झाला तरी त्या जमिनींचा त्याग तो कसा करील ? महाराष्ट्र ही वीरभूमी आहे....जी स्वराज्याची तलवार तुमच्या हाती दिली आहे, ती हाती घेऊन स्वराज्ययुध्द करा.'' या परिषदेत पहिल्या महाराष्ट्र प्रांतिक कमिटीची निवडणूक करण्यात आली. केळकरांना एकमताने अध्यक्ष करण्यात आले. केळकरांनी कार्यवाह पदासाठी ना. सी. फडके यांचे नाव सुचविले, भुस्कुटे यांनी शंकरराव देवांचे नाव सुचविले व ते निवडून आले.

बापट-दास्ताने यांनी महाराष्ट्रभर दौरे काढले. तालुक्याच्या व जिल्ह्याच्या ठिकाणी संघटना करून विरोध करण्याचे व सरकारच्या कामास अडथळे आणण्याचे आवाहन करण्यात आले होते. या दौऱ्यामुळे शेकडो स्वयंसेवक मुळशीला लोटले होते.

पैसे देण्यासाठी महालकरी मावळात फिरले, पण मावळ्यांनी त्यांच्यावर बहिष्कार टाकला. गावात पाणीही मिळू दिले नाही. एकराला ५०० रु. मिळतील असे जाहीर केले; पण कोणीही पैसे घेतले नाहीत. कंपनीशी सरकारचा झालेला करार जाहीर झाल्याबरोबर 'केसरी' ने निराळा सूर काढण्यास सुरुवात केली. नुकसानभरपाई द्यावी असा प्रचार केला. कितीही पैसे दिले तरी जमीन विकायची नाही हा मावळ्यांचा विचार तर मावळ्यांच्या एकजुटीचा व निश्चयाचा फायदा घेऊन कंपनीकडून नुकसानभरपाईचे पैसे जास्तीत जास्त घेण्याचा सरकारचा विचार. मुळशी सत्याग्रहात प्रथम प्रथम सुप्त असलेला हा वर्गकलह अशा रीतीने डोके वर काढू लागला व तीव्र होत चालला. केळकरांनी आपले धोरण बदलले व त्याचा फायदा सावकारांना झाला.

मुळशी सत्याग्रहाला पाठिंबा देण्यात आला पण फारसा फ़ायदा झाला नाही. मुळशीच्या शेतकऱ्यांवरील होणाऱ्या अन्यायाचा प्रचार करण्यास मदत झाली.

' फेर नाफेर वाद ' उफाळून आला व सरकारविरुद्ध कृती करावी असे म्हणणाऱ्यांनी यात भाग घेतला. फेर वाद्यांच्या हाती म. प्रां. कॉं. कमिटी होती.

बापटांचे पहिले पत्रक ऑगस्ट १९२१ चे. टाटा कंपनीला पाठीशी घालणाऱ्या ब्रिटिश सरकारशीही लढावे लागणार यावर त्यांनी भर दिला. मावळ्यांच्या खांद्याला खांदा लावून काम हा उत्तम मार्ग. ज्याला येणे शक्य होणार नाही त्यांनी आपापल्या तालुक्याच्या किंवा जिल्ह्याच्या गावी आपली संघटना करून त्या त्या ठिकाणी कचेऱ्यावर विरोध न करता सरकारच्या कामात अडथळा करावा. ही अभिनव कल्पना त्यांनी मांडली. ठिकठिकाणचे स्वयंसेवक एकाच दिशेने आणि एकाच हेतूने जमण्याचा योग ब्रिटिश आमदानीत मुळशीच्या निमित्ताने महाराष्ट्रात प्रथमच आला. टाटा कंपनीचा सरकारशी करार झाला. त्यामध्ये मावळ्यांच्या जमिनी सक्तीने घेण्याचा कायदा सर्व मुळशी पेट्याला लागू केल्याचे जाहीर झाले.

दर एकरामागे ५०० रु. भरपाई देण्याचे ठरले. सत्याग्रहामुळे हे झाले. भरपाईवाल्यांचे पारडे जरा जड झाले.

ब्राह्मणांनी आंबेमोहोर तांदळाकरिता ही चळवळ चालू केली आहे अशी घाणेरडी टीका ब्राह्मणेतर पक्षाची पत्रे करू लागली. मावळ्यांनी मिळतील ते पैसे घेऊन जमिनी कंपनीला देणे हिताचे आहे, असे आपले मत एका प्रसिद्ध पुढाऱ्याने जाहीर केले ब्राह्मणेतर पक्षाला शेतकऱ्यांचा विचार करता आला नाही. पुढारी ब्राह्मण म्हणून त्याने सत्याग्रहाला विरोध केला व तो सावकारांचे हस्तक बनला. मावळ्यात फूट पाडण्यास हा पक्ष कारणीभूत झाला. त्यामुळे चळवळीचे नैतिक सामर्थ्य लंगडे पडले. एकीकडे किरकोळ कामे करायची व दुसरीकडे आपल्या हस्तकाकडून मावळ्यांत भेद पाडायचा व त्यांना नुकसानभरपाई

घ्यायला लावायची, असा क्रम कंपनीच्या अधिकाऱ्यांनी चालू ठेवला. त्यामुळे मावळ्यात चलबिचल झाली.

शेरे येथे झालेल्या सत्याग्रहात झालेली शिक्षा भोगून बापट सुटले. सत्याग्रह मंडळाने त्यांना अध्यक्ष निवडले. नंतर भुस्कुटे, रानडे यांना सहा महिने सक्तमजुरीची शिक्षा झाली. काही दंडावर सुटले. यापुढील काळात बापट बाहेर तर भुस्कुटे तुरुंगात व भुस्कुटे बाहेर तर बापट तुरुंगात असा क्रम चालू झाला. वसई परिषदेनंतर देव चिटणीस झाले होते पण त्यांनी राजीनामा दिला. फेर नाफेर वादाचा तो परिणाम होता.

## सत्याग्रहाची दुसरी मोहीम

सत्याग्रहाची दुसरी मोहीम १ मे १९२२ रोजी चालू झाली. मोजके लोक सत्याग्रहाला पाठवण्यात आले. त्यात शि. म. परांजपे यांच्या नेतृत्वाखाली पुणे, मुंबई, नागपूर येथील लोक तसेच धुळेकर, महंमद हसन कहेर हेही होते. त्या दिवशी कंपनीच्या लोकांनी अत्याचाराची परिसीमा गाठली. सत्याग्रहापुढे नग्न होऊन नाचले. सत्याग्रह्यांवर बुटाच्या लाथा व काठ्यांचे घाव घालण्यात आले. या दिवशीच्या सत्याग्रहात फक्त पुढाऱ्यांनाच पकडण्यात आले.

ब्राह्मणेतर कृतीच्या लोकांनी थोडे महार, मावळे जमा केले. त्यांना ' शाहू छत्रपती की जय ' असा जयजयकार करीत सत्याग्रहाचा धिक्कार करायला लावले. सत्याग्रही मावळे शिवाजी महाराजांचा जयजयकार करीत होते. या धरणात महारांच्या वतनी जमिनी जाणार असल्याने त्यांचेच अधिक नुकसान होणार होते. विठु महार, भवानी महारासारखे कार्यकर्ते लोकांना घेऊन सत्याग्रहात सामील झाले होते. गुजर व ब्राह्मण सावकार पैसे घेण्यास पुढे सरसावले. आपल्याबरोबर त्यांनी मावळ्यांनाही फोडण्यास सुरुवात केली. पेट्याबाहेरच्या सावकारांनी व भांडवलदारी साथीदारांनी त्यांना या कामी उत्तेजन देऊन मदत केली. तीच गोष्ट ब्राह्मणेतर पक्षाच्या सर्व लोकांनी केली व वर सांगितल्याप्रमाणे उपद्व्याप करून आपल्या भांडवलदारी वृत्तीचे हिडीस प्रदर्शन केले.

पडुस्त्याची जाई भोयीण हिच्या पुढाकाराने स्त्रियांची तुकडी सत्याग्रहात उतरली. कंपनीच्या मजुरांनी स्त्रियांशी धक्काबुक्की करायला सुरुवात केली. हे पाहताच चरातील मावळे तिकडे धावले; पण बाहेरच्या स्वयंसेवकांनी त्यांना आवरले. जाईबाईंना शिक्षा झाली, पण स्त्रियांचा उत्साह कमी झाला नाही. स्त्रियांना न पकडण्याचे धोरण यापुढे कंपनी व सरकारने अवलंबिले.

या सत्याग्रहाला महाराष्ट्रव्यापी स्वरूप देण्याचा प्रयत्न बापट करीत होते. शेरे सत्याग्रहापासून त्यांनी ६० वर पत्रके काढली. याबाबत परांजपे व वासुकाकांनी महात्माजींची मुलाखत घेतली. अहिंसेची शिस्त पाळून सत्याग्रहाचा लढा महाराष्ट्रीयांकडून लढविला

जाणार नाही, असे त्यांना वाटे, वस्तुस्थिती अशी होती की, गांधीजींचे अनुयायीच सत्याग्रह चालवत होते. महात्माजींनी त्याकडे लक्ष दिले नाही तेव्हा त्यांच्या भोवतालच्या इतर मंडळींनीही या प्रश्नाला व्यापक स्वरूप देण्याच्या कामी लक्ष दिले नाही. इंग्रजी पत्रांच्या संपादकांनी बापटांची कल्पना हास्यास्पद ठरविली. नंतर पुढारी त्यांना भेटले व बापटांचे लेख बॉंबे क्रॉनिकलमध्ये प्रसिद्ध होऊ लागले. डॉ. भडकमकरांनी फंड जमवण्याकरिता पुढाकार घेतला. सत्याग्रहाला महाराष्ट्रव्यापी स्वरूप देण्याच्या दृष्टीने एक परिषद घ्यावी व केळकरांनी तिचे पुढारीपण करावे असे बापटांना वाटे. पण केळकरांनी ही जबाबदारी अंगावर घेण्याचे नाकारले. डॉ. भडकमकर, महादेव विठोबा गांधी व आगरकर यांनी सेक्रेटरी म्हणून परिषद यशस्वी करण्याच्या कामी मदत केली.

खानदेशातील यावल या गावी खानदेश जिल्हा परिषद भरली. अध्यक्ष सरोजिनीदेवी नायडू होत्या. बापटांनी आपली कल्पना या परिषदेपुढे मांडली आणि मुंबईला महाराष्ट्र मुळशी परिषद घेण्याचे ठरले. डॉ. मुंजे यांना अध्यक्ष व चिंतामणराव वैद्य यांना स्वागताध्यक्ष म्हणून निवडण्यात आले. ११ जून १९२२ रोजी ही परिषद झाली. ८०० प्रतिनिधी आले होते. सत्याग्रह तीन वर्षे चालवावा, इतके झाल्यावर पुढील मार्गाचा विचार करावा, असे ठरले, सौ. जाईबाईने मुळशीच्या अन्यायाकडे सर्वांचे लक्ष वेधले.

परिषदेच्या धोरणाप्रमाणे बापटांनी अखिल महाराष्ट्रात प्रचार केला. गणेशोत्सव मेळयातही ' मुळशी सत्याग्रह करणार का मातीला विकणार ' असा प्रचार चालू झाला. बापटांनी मुळशी सत्याग्रह मेळा काढला. मेळयाच्या कार्यक्रमासाठी त्यांनी झाडू घेऊन घाण काढण्याचे शिक्षण दिले. ठरल्याप्रमाणे बापटांनी सत्याग्रह केला. त्यांना व बरोबरच्या २० मावळ्यांना शिक्षा झाल्या.

त्यानंतर भुस्कुटे यांनी ४० सत्याग्रह्यांसह धरणाच्या पायापाशी सत्याग्रह केला. सर्वांना कडक शिक्षा सांगण्यात आल्या. याच सुमारास शंकरराव देव यांनी सत्याग्रह केला. येरवड्यात शिक्षा भोगत असताना आषाढी एकादशीला आहारात एकादशीचा फराळ आला नाही म्हणून त्यांनी काम बंद व अन्नत्याग केला. त्यांना सहानभूती म्हणून विष्णूपंत परांजपे, खानदेशचे बोचरे अशा ५ जणांत ३० फटक्यांची शिक्षा झाली. देवांना २० फटके खावे लागले. इतरांनाही फटके खावे लागले.

### प्रचार आघाडी

६ मे १९२२ रोजी पुण्याच्या शिवाजी मंदिरात झालेल्या सभेत शि. म. परांजपे म्हणाले, ' आज सर्व देशभर भांडवलवाले व मजूर यांचा झगडा चालू आहे, श्रीमंतांनी संपत्तीच्या जोरावर गरीबांना सतत चिरडणे यापुढे शक्य नाही. ते कायद्याच्या जोरावर या गोष्टी करीत असतील, पण ते कायदे अन्यायाचे आहेत हे विसरता उपयोगी नाही.'

मुंबईला डॉ. भडकमकर यांच्या जागेत मुळशी सहायक मंडळ स्थापन करण्यात आले. ११ जून १९२२ रोजी डॉ. मुंजे यांच्या अध्यक्षतेखाली मुळशी परिषद भरली. ३ वर्षे, ३ हजार स्वयंसेवक व ३ लाख निधी जमविण्याचे ठरले. याला साम सत्याग्रह असे नाव देण्यात आले. '' अधर्म उघड दिसत आहे. प्रतिकार झाला पाहिजे. स्वधर्माच्या स्थापनेसाठी उपयुक्त अशा सर्व धर्मसंमत साधनांचा उपयोग करणे हा अधर्म नव्हे. शूर मावळ्यांनी आत्तापर्यंत आपला धर्म सोडला नाही. ही माणसे जिवंत राहिली तरच हिंदुस्थान राहाणार आहे. खुद्द गांधींनीही जर्मन युद्धाच्यावेळी इंग्रजांसाठी सैनिक गोळा करण्याची खटपट केली होती.''

जमीन धरणात बुडणार मग भरपाई का घेऊ नये? अशा विचाराने सावकार व जमीनदार सत्याग्रहापासून झपाट्याने दूर चालले. अशा मावळ्यांना अहिंसेचे पुराण सांगून आवरणे कठीण आहे. मुळशीचा लढा जिंकला म्हणजे अखिल भारताचे स्वातंत्र्ययुद्ध जिंकणे सोपे होणार आहे अशी बापटांची धारणा होती.

महाराष्ट्र मेला तरी राष्ट्र मेले
मराठ्यांविना राष्ट्रगाडा न चाले
खरा वीर वैरी पराधीनतेचा
महाराष्ट्र आधार या भारताचा

अशी गीते बापटांनी केली. यात प्रांतिक दुरभिमान आहे अशी टीका झाली.

आता बोंब मारण्याचे दिवस संपले, बॉंब मारण्याचे दिवस आले आहेत असे बेळगावच्या सभेत बापट बोलले त्यामुळे या सत्याग्रहात गुंतागुंत निर्माण झाली.

१९ व २० एप्रिलला ' सत्याग्रहाला जबाबदार सरकार ' हा ' केसरीत ' अग्रलेख आला, ' पण पैसा असेल तर राजाची राणीही मिळू शकते, मनुष्य विकत घेता येतो, जमीन घेता येईल यात नवल काय? खरेदीने टाटा कंपनीला जमिनी मिळाल्या असत्या, शे.९० टक्के जमिनी खुष खरेदीवर मिळाल्यात. दहा वीस लोकांचा ताठा चालणार नाही ' अशा विधानामुळे पैशाने जमिनी विकत घेता येतील असे सुचविले.

१९ एप्रिलला डॉ. वि. दा. फाटक यांना कलेक्टरचे खालीलप्रमाणे पत्र आले— '' पेट्यातील लोकांपैकी ज्यांना दुसरीकडे जमीन घ्यायची असेल किंवा जमिनीच्या मोबदल्यात रोख पैसे घ्यायचे असतील त्यांनी तसे कळवावे. आंध्र व्हॅलीतील लोकांप्रमाणे ७ वर्षेपर्यंत टाटा कंपनीकडे मजूर म्हणून क़ाम करण्याचा हक्क पाहिजे असेल तर तसे कळवावे, लोकांना कोणत्याही प्रकारची नुकसानभरपाई मागून घेण्यास मुभा आहे. बदला पाहिजे असलेल्या जमिनीचे ठोकळ क्षेत्रफळ मला कळले तर बरे होईल.''

स्वातंत्र्यशाहीर हरिहर गुरुनाथ सलगरकर कुलकर्णी ऊर्फ कवि कुंजविहारी यांनी मुळशीचा पाळणा ही कविता लिहिली. तिचा महाराष्ट्रातच नव्हे तर अन्य प्रांतातही खूप बोलबाला झाला. कवि प्रसिद्धीच्या झोतात आले. मुळशी सत्याग्रह मंडळाला या कवितेने पुष्कळ पैसा मिळवून दिला व त्या मंडळाने हा पाळणा देशभर म्हटला. १९२२ च्या काँग्रेसमध्ये हा पाळणा म्हणण्यात आला. या कवितेचा आशय समजल्यावर देशबंधू चित्तरंजन दास गहिवरले. या गीतात एका शेतकऱ्याची धरणासाठी जमीन हिसकावून घेतल्यामुळे त्याच्या कुटुंबाची कशी वाताहात होते याचे वर्णन केले आहे. कवीचा धरणाला विरोध नसून त्यातून होणाऱ्या अन्यायावर होता. ही कविता ऐकून आबालवृद्ध विशेषतः स्त्रिया ढसाढसा रडत.

**शुद्ध सत्याग्रह**

१४ ऑक्टोबर १९२४ रोजी शिक्षा भोगून सुटल्यावर बापटांना मावळयांच्या जमिनी धरणाखाली गेल्याचे दिसले. ७ नोव्हेंबरपासून ज्योतीरूपेश्वराच्या क्षेत्रात राहावयाचे व तिथल्या मावळयांची वस्ती उठवायची व ज्योतीरूपेश्वराबरोबर जलसमाधी घ्यायची योजना बापटांनी केली.

अखेरीस सत्याग्रहाचा जोर कमी झाला. बापटांनी प्रचारात ' आतापर्यंत बोंब मारली, आता बॉम्बचे दिवस आलेत ' असे उद्‌गार बेळगावला काढले होते. त्यानंतर ते शुद्ध सत्याग्रहाच्या तयारीला लागले. त्यांनी ' मुळशीचा अर्धविराम ' हे पत्रक काढले. काही दिवसांनी ' मुळशीचा पूर्णविराम ' हे पत्रक काढले. ९ डिसेंबर १९२४ रोजी शुद्ध सत्याग्रहाचा अवलंब करणार असल्याचे जाहीर केले.

साम सत्याग्रह संपवून अहिंसा आग्रहरहित, सत्याची शुद्ध सेवा करणारा जो शुध्द सत्याग्रह त्याचे व्रत स्वीकारले. बापटांनी काढलेल्या पत्रकात ते म्हणतात, ' मुळशी परिषदेचा सत्याग्रह संपला आहे. व्यक्तिदृष्ट्या साम सत्याग्रह संपला नाही. परिषदेच्या साम सत्याग्रहाच्या संबंधाचे बंधन आता नाही. साम सत्याग्रहाचे अमलात आणलेले अनेक प्रकार व्यक्तींना व व्यक्तींच्या गटांना मोकळे आहेत. सत्याग्रहाचे अनेक प्रकार अद्याप शिल्लक आहेत. तेही व्यक्तीला व्यक्तींच्या गटांना मोकळे आहेत.'

जबरदस्ती करणाऱ्यांचा प्राण घ्यायचा व प्रतिकाराने आपला प्राण द्यायचा. त्यांनी म्हटले, ' श्रीहरीच्या इच्छेने सामसत्याग्रह यथाशक्ती संपवून अहिंसा आग्रहरहित, आत्महिंसा व परमहिंसा गौण मानून सत्याची सेवा करणारा शुद्ध सत्याग्रह त्याचे व्रत आज मी स्वीकारत आहे.'

३१/२ वर्षांचा सत्याग्रह फसला अशी कबुली त्यांनी दिली. श्री. भुस्कुटे बापटांना मिळाले नाहीत. ते म्हणतात, '' शुद्ध सत्याग्रहाच्या सेनापती बापटांच्या कल्पनेवर माझा विश्वास नव्हता.'' मुळशीचा प्रयोग फसल्यास धरणाच्या पाण्यात बुडून तेथेच आत्मत्याग करण्याचा आपला संकल्प १९२२ मध्ये बापटांनी तुरुंगातून भुस्कुटे यांना कळविला होता.

२४ एप्रिल १९२४ ला सत्याग्रह मंडळ बरखास्त करण्यात आले. बापटांनी ६-११-२४ ला ' मुळशीचा अर्धविराम ' हे पत्रक काढले. मुळशी पेटा टाटा पॉवर कंपनीने अनेक भल्याबुऱ्या उपायांनी आपल्या मालकीचा केला. माझे म्हणणे असे की, महाराष्ट्राच्या इच्छेस मान देऊन कंपनीने मालकीचा उपयोग पेटा बुडवण्यात न करता, त्यांचा उपयोग कर्जात न बुडू देण्याइतका करावा. मावळयांचा सावकार बदलायला हरकत नाही. या नव्या सावकारांनी मावळयांना पेट्यात ठेवून त्यांच्याकडून शेती करवावी व याप्रमाणे शेवट गोड करावा.'

आपण कंपनीची गाडी अडविणार आहोत व जरूर तर शस्त्राचाही उपयोग करणार आहोत, असे बापटांनी कंपनीला कळवले. मजुरांना घेऊन येणारी गाडी आल्यावर मजुरांवर सत्याग्रह्यांनी जखमा केल्या. बापटांनी ड्रायव्हरच्या पायावर गोळी झाडली. ' आजची घटना ही युद्धाचा भाग आहे ' असे बापटांनी पोलिसांना सांगितले. आपली शस्त्रे पोलिसांच्या स्वाधीन करून स्वतःही शत्रूच्या स्वाधीन होणे हा कोणता प्रकार या प्रश्नाला बापटांनी उत्तर दिले नाही.

सर्वांतर्फे भाषण करताना बापट म्हणाले, ' आम्ही दुखापत करण्याचे ठरवले होते. ठार मारण्याचा हेतू नव्हता. जेव्हा कंपनीचे मजूर सत्याग्रहाच्या वेळी स्त्रियांपुढे नागवे होऊन नाचू लागले तेव्हाच आम्ही त्यांचे मुडदे पाडू शकलो असतो.'

या खटल्याचा निकाल खालीलप्रमाणे लागला. (१) बापट ७ वर्षे, (२) देव ६ वर्षे, (३) गोरे ५ वर्षे, (४) मोडक व बाभळे यांना प्रत्येकी ४ वर्षे सक्तमजुरीच्या शिक्षा सुनावण्यात आल्या.

**समारोप**

सेनापती बापट आणि शुद्ध सत्याग्रहात भाग घेतलेले गोरे, देव, बाभळे व मोडक हे त्यांचे सहकारी दीर्घ मुदतीच्या शिक्षेसाठी निरनिराळ्या तुरुंगात रवाना झाले. धरणाचे बांधकाम पूर्ण होत आले होते. एक मोठा कालखंड (तोही लढ्याचा) समाप्त होत होता. ही घटना होऊन आता ७० वर्षे होत आली आहेत. तरी त्या सत्याग्रहाचे समर्थक, विरोधक यांच्यात सत्याग्रहाची इष्टानिष्टता याबद्दल चर्चा चालू आहे. त्यातील काहींचा परामर्श घेणे युक्त ठरेल.

या सत्याग्रहात ३ प्रवृत्तीचे लोक होते.– (१) बापट (२) शिवरामपंत परांजपे, वासुकाका जोशी (३) केळकर, भोपटकर वगैरे. पहिल्या वर्गाने शेवटपर्यंत लढत दिली. दुसरा वर्ग सत्याग्रह करून तुरुंगात गेला. हा वर्ग सर्वात मोठा होता. तिसरा वर्ग तडजोडवृत्तीचा. मावळयांना जास्तीत जास्त पैसे मिळवून दिले म्हणजे झाले अशी त्यांची भावना होती.

मुळशी सत्याग्रह मंडळाने शेवटच्या अहवालात पुढील सारांश दिला आहे--तुरुंग भरतीः--मावळे ९६, पुणे १०२, सोलापूर ६, सातारा १२, नगर १९, नाशिक ४, मुंबई १७, ठाणे ७, कुलाबा ११, परप्रांत १०, पूर्व खानदेश १०, पश्चिम खानदेश ९, मध्यप्रांत ४६, संस्थाने १६ एकूण ४००. मावळयांनी पहिल्या मोहिमेत लागलेले सर्व तांदूळ पुरविले.

श्री. भुस्कुटे यांनी आपल्या 'मुळशी सत्याग्रह' या पुस्तकात तुरुंगवास पत्करलेल्या सर्व सत्याग्रह्यांची यादी दिली आहे. तीवर नजर टाकली असता पुढे स्वातंत्र्यलढ्यात आघाडीवर आलेल्यांची हजेरी दिसेल.

तुरुंगातून सुटल्यावर बापट मुळशी पेट्याला भेट देऊन आले. धरणाचा विस्तार पाहून त्यांना आनंद झाला. तसेच पार्श्वभूमी पाहून दुःखही झाले. महात्मा गांधींजवळ दुःख व्यक्त केले तरी चालेल असे त्यांनी सुचविले पण ते झाले नाही.

बापटांना आधुनिक युगातील धरणाच्या आवश्यकतेची जाणीव होती. बिजली युगासाठी बांधण्यात येणाऱ्या धरणामुळे निर्वासित होणाऱ्या मावळयांना जागा द्यावी असा हट्ट होता. केळकरांनी तडजोडवादी समंजस भूमिका मांडली. आधुनिक युगाचे अर्थशास्त्र सुशिक्षितांना कळले नव्हते.

श्री. शंकरराव देव म्हणतात 'मुळशी सत्याग्रहाच्या वेळी आमची भूमिका बरोबर होती. आजची माझी बुद्धी त्यावेळी असती तर 'जान अथवा जमीन' या तत्त्वावर सत्याग्रहात मी सामील झालो नसतो. खरा प्रश्न ज्यांची जमीन जाते त्यांचा आहे. या लढ्याने असहकारितेच्या युगात महाराष्ट्रीय तरुणांच्या राष्ट्रीय वृत्तीला प्रकट होण्याला वाव दिला.' विनायकराव भुस्कुटे यांनी या लढ्यासंबंधी म्हटले आहे की, गांधींनी २०/२२ सालामध्ये ज्या सत्याग्रही चळवळीचा पुरस्कार केला तिचा पहिला प्रयोग महाराष्ट्रात झाला. ३ वर्षे अत्यंत शिस्तीने ही चळवळ चालविण्यात आली. बेळगावपासून नागपूरपर्यंत ४५० स्वयंसेवक आले होते. राष्ट्रीय पाठशाळा यात सामील होत्या. राष्ट्रीय लढ्यात महाराष्ट्र आघाडीवर राहिला याचे बीज महाराष्ट्रात रोवले गेले.

सेनापती बापट यांचे निष्ठावंत अनुयायी व या सत्याग्रहात भाग घेतल्याने चार वर्षांची शिक्षा झालेले आत्माराम वासुदेव मोडक हे आपल्या 'आत्मारामाची वाटचाल' या चरित्रपर पुस्तकात लिहितात की, मुळशीचा लढा अरेरावीविरुद्ध होता. हा लढा धरणाच्या पाण्यापासून निर्माण होणारी वीज व तिच्यावर चालणारे कारखाने याविरुद्ध नव्हता. टाटा कंपनी आणि परके सरकार यांनी संगनमत करून जमीनमालकांना न विचारता जमिनी ताब्यात घेतल्या. टाटा व सरकारने वर्तमानपत्रातून जाहीर करून जमीनमालकांना बोलावून त्यांना समजावून सांगण्यास हवे होते. त्यांना मोबदला देऊन हे काम करता आले असते.

हा सत्याग्रह महाराष्ट्र खूप शर्थीने लढला. त्याचा परिणाम चांगला झाला. त्यामुळे मावळ्यांचे आर्थिक नुकसान भरून निघाले.

बापटांना झालेल्या शिक्षेबद्दल केसरीने म्हटले की, बापटांसारखा देशभक्त तुरुंगात पडावा याबद्दल कोणालाही विषादच वाटेल.

मुळशी सत्याग्रह हा महाराष्ट्रातील पहिला सत्याग्रह, परंतु त्याला राजकारणाची झळ लागल्याने अनेकांनी अंग काढून घेतले. महाराष्ट्राकडून पाठिंबा मिळाला नाही. महाराष्ट्रातील शेकडो गावे बुडून भांडवलदारांची गुलाम बनू नयेत म्हणून हा सत्याग्रह चालला होता. बापटांसारख्या बुद्धिमान व धाडसी पुरुषाने हाती घेतलेल्या कार्याला महाराष्ट्राने मदत केली नाही. शिवाजीमहाराजांवरील प्रेम दाखविण्याची संधी मावळ्यांनी अप्रत्यक्षपणे गमावली, असे कोणीही म्हटल्यावाचून राहणार नाही.

केळकरांच्या मते धरण होणे हे महाराष्ट्राच्या औद्योगीक प्रसारासाठी आवश्यक होते तर शेतकऱ्यांना इतरत्र जमिनी दिल्या पाहिजेत. जमिनी मुळशी धरणासाठी घ्याव्या अशी केळकरांची भूमिका होती. ही भूमिका पुरोगामी होती. परंतु सर्व पुढाऱ्यांनी ही चळवळ केळकरांच्या पुढारीपणाला शह देण्यासाठी वापरली, आणि सत्याग्रह्यांपुढे भाषणे केली. त्या वेळेस केळकरांचा सल्ला न ऐकल्याने कोयना धरण ३० वर्षे पुढे गेले व महाराष्ट्राचे नुकसान झाले.

हा सर्व विचार झाला तरी स्वातंत्र्यलढ्यात महाराष्ट्राने जो पुढे भाग घेतला, त्याची प्रयोगशाळा हे या लढ्याचे फलित मानावे लागेल.

**(क) बारडोली सत्याग्रह.**–बारडोली हा गुजराथेतील खेडा जिल्ह्यातील एक तालुका-तहसील. २० किंवा ३० वर्षांत जमीन महसुलाचा पुनर्विचार करायचा ही प्रथा, पण अशा पुनर्विचारात सामान्यतः २५ टक्के त्यात वाढ करणे हा हेतूच. महसूल वा कर वाढवू नयेत असे बारडोलीच्या शेतकऱ्यांचे म्हणणे नव्हते, पण शेतकऱ्यांची आजची परिस्थिती, वस्तूंच्या किमती, यासंबंधीचा विचार करूनच दृष्टिकोन स्वीकारावा. यासाठी एखादी निःपक्षपाती समिती नेमून चौकशी करावी असे शेतकऱ्यांचे म्हणणे, सरकारची पद्धती ही मनमानेल अशी, एकतर्फी विचार करणारी असते. या बाबतीत नेहमीचे उपाय योजण्यात आले, पण त्यांचा काहीच उपयोग झाला नाही. नंतर एक अंतिमोत्तर पाठविण्यात आले. करबंदीची मोहीम चालू झाली. हा स्वराज्याच्या लढ्याचा कार्यक्रम म्हणून नव्हे, तसेच कायदेभंगाच्या लढ्याचा भागही नव्हता; शेतकऱ्यांच्या आर्थिक मागणीसाठी हा लढा होता. सरकार ताठर होते, लोकही काही कमी नव्हते.

बारडोली तालुक्याची परिषद झाली, आणि करबंदी पुकारण्यात आली, वल्लभभाई पटेल त्यांचे नेते होते. शेतकऱ्यांची गुरेढोरे जप्त करण्याचा सपाटा सरकारने चालू

केला. सरकारच्या या धाकधपटशाहीला लोक दबेनात. मुंबई आणि इतर ठिकाणाहून पठाण आणण्यात आले. त्यांनी सरकारी जुलमाला साथ देण्यास सुरुवात केली. अशा वेळी कॉ. डांगे यांनी ' मुंबईचे दहा हजार गिरणी कामगार मदतीला घेऊन येतो, त्यांच्या मदतीने पठाणी जुलूम नाहीसा करू,' अशी तार वल्लभभाईंना पाठवली;[१] पण वल्लभभाईंनी या उत्स्फूर्त मदतीचा स्वीकार केला नाही.

अशा वेळी मुंबई विधिमंडळाच्या काही सदस्यांनी आपल्या जागांचे राजीनामे पाठवून सरकारविरोधी निषेध नोंदवला. मध्यवर्ती असेंब्लीचे अध्यक्ष विठ्ठलभाई पटेल यानी व्हाइसरॉयना पत्र पाठवून बारडोलीचा प्रश्न नीट सोडवला नाही, तर राजीनामा देण्याचा हेतु कळवला. अखेरीस चर्चेतून एक योजना निघाली. सत्याग्रह्यांची मुक्तता, जप्त केलेली मालमत्ता परत करणे, आणि लढा थांबवणे असा त्याचा आशय होता. ब्लूमफील्ड या न्यायाधिशांना (यांनीच महात्माजींना १९२४ साली ६ वर्षांची शिक्षा दिली होती), व मॅक्सवेल या सरकारी अधिकाऱ्यांना नवीन निर्माण केलेल्या न्यायमंडळावर नेमण्यात आले. या न्यायमंडळाने सर्व प्रश्नांचा विचार केला आणि असा निर्णय दिला की जमीनमहसुलात ६$^{1}/_{4}$ टक्क्यांपेक्षा अधिक वाढ होता कामा नये. याला मान्यता देण्यात आली. लँड रेव्हेन्यू कोडमध्ये अशा तऱ्हेचे न्यायमंडळ नेमण्याची तरतूद नव्हती हे लक्षात घ्यावयास हवे.

या लढ्यात ८७,००० शेतकऱ्यांनी सक्रिय भाग घेतला. शेतकऱ्यांच्या हक्कासाठी काँग्रेस लढायला उभी राहिली. गांधीजींनी ह्या सत्याग्रहाला राजकारणापासून दूर ठेवले, तरी त्याचा आपल्या स्वातंत्र्यलढ्यावर परिणाम झालाच. काँग्रेस व सरकार या दोघांनीही हा सत्याग्रह ही कसोटी मानली. बारडोलीचा लढा जर यशस्वी झाला तर राष्ट्रीय स्तरावर असे लढे निर्माण होण्याची शक्यता होती. १९३० ला सुरू होणाऱ्या कायदेभंगाच्या लढ्याच्या आधीच हा लढा झाल्याने त्याला मोठे महत्त्व होते. गांधीजींचे निष्ठावंत सहकारी वल्लभभाई. त्यांच्यामार्फत गांधीजींनी या सत्याग्रह हत्याराची चाचपणी केली. या लढ्याचे पुढारीपण समर्थपणे केल्यामुळे गांधीजींनी वल्लभभाईना ' सरदार ' या पदवीने भूषविले. ' सरदार ' या पदवीनेच ते इतिहासात राहिले.

महाराष्ट्र प्रांतिक परिषदेचे ७ वे अधिवेशन वांद्रे येथे ४ मे १९२९ ला संपन्न झाले. अध्यक्ष होते सरदार वल्लभभाई. अध्यक्षीय भाषणात ते म्हणाले, '' बारडोली सत्याग्रहाच्या लढ्यात बोल्शेव्हिक पिशाच्च म्हणून उभे करण्यात आले, आणि मला भारताचे लेनिन म्हणून संबोधण्यात आले ! ' त्याच परिषदेत ३२ कम्युनिस्ट व कामगार पुढाऱ्यांवर भरलेल्या खटल्यात मीरत येथील कोर्टात त्यांच्या बचावासाठी निधी गोळा करण्यात आला. मुंबईच्या ' टाइम्स ऑफ इंडिया ' या पत्राने बारडोलीत वल्लभभाईंचे राज्य होते, तसेच त्यानी तेथे ' सोव्हिएट्स ' स्थापन केली होती, असे म्हटले आहे. [ १९२८ चे सार्वत्रिक संप, मीरत

कटाच्या खटल्यानिमित्त झालेली धरपकड, पकडलेल्या कार्यकर्त्यांच्या बचावासाठी काँग्रेसने जमविलेला निधि, आणि नेहरू, काटजू इत्यादी काँग्रेस पुढाऱ्यांनी केलेली बचावाची व्यवस्था. यामुळे प्रत्येक कृतीत सरकारला व टाइम्सला बोल्शेव्हिझम दिसू लागला !]. ता. ४ जुलै १९२८ च्या अंकात ' टाइम्स 'ने खालील बातमी प्रसिद्ध केली. " बारडोलीत बोल्शेव्हिकांचे राज्य आहे, आणि वल्लभभाई पटेल लेनिनची भूमिका वठवीत आहेत. या चळवळीमागील प्रेरकशक्ती म्हणजे गांधी. (१) शोषित/पीडीत असा शेतकरी शूरपणे पण अहिंसात्मक मार्गाने अन्यायी सरकारशी लढत आहे; (२) त्यांच्यात असाधारण धैर्य व शिस्त दिसून येते; (३) तालुक्यात सर्वत्र प्रतिसाद मिळाल्याने नवनवीन लोक सत्याग्रहाला साथ देत आहेत; आणि (४) त्यामुळे सरकार भयभीत झाले आहे."

वल्लभभाईंच्या परवानगीशिवाय कलेक्टरला प्यायला पाणीही मिळू शकले नाही. या लढ्याने महाराष्ट्रातील शेतकऱ्यांना लढ्याची प्रेरणा मिळाली.

या बारडोली सत्याग्रहासंबंधी डॉ. धनागरे म्हणतात, ' हा सत्याग्रह म्हणजे सरकारविरोधी करबंदीची चळवळच होती. त्याचा फायदा श्रीमंत व मध्यम शेतकरीवर्गाला मिळाला. ते एक तर पाटीदार होते, किंवा बिगरशेतकरी सावकार होते.' जमिनीवरील नियंत्रण आणि प्रत्यक्ष जमिनीचा उपयोग, तसेच जमिनीची वाटणी या प्रकारचे मूलभूत प्रश्न गांधीवादी पुढारीपणाने निर्माण केले नाहीत. भारतीय राष्ट्रीय स्वातंत्र्यलढ्याच्या चौकटीत शेतकऱ्यांना एकत्रित आणण्याचा तो प्रयत्न होता.

चंपारण्य आणि खेडा जिल्ह्यातील बारडोली सत्याग्रहात साम्य दिसते. पाटीदार व शोषित शेतकरी यांची ती आघाडी दिसते.

" बारडोली लढा हा जमीनदारशाहीच्या पिळणुकीविरुद्ध नव्हता, पण ती साम्राज्यविरोधी अशी मिश्रवर्गीय स्वरूपाची चळवळ होती. ही अनेक गटांनी प्रवर्तित केली होती, पण कामगार-शेतकरी या वर्गाबाबत त्यांना काहीही सहानुभूती नव्हती."[१०]

## (ड) जागतिक अरिष्टात सापडलेला शेतकरी

जागतिक अरिष्टात शेतकरीवर्गाला खूपच तडाखा बसला. त्यांचे संघटित मोर्चे काँग्रेसच्या नेतृत्वाने होत. या निदर्शनांवरून आतील असंतोष किती खदखदत होता याची कल्पना येते. मागे उल्लेखिलेली महाराष्ट्र काँग्रेस परिषद भरली ती जमीनमहसुलाच्या भरमसाट वाढीविरुद्धच (४ मे १९२९); अध्यक्ष होते सरदार वल्लभभाई.

सर फिरोज सेठना यांच्या जमीनमहसुलाबाबतच्या ठरावाची २० मार्च १९२९ रोजी कॉन्सिल ऑफ स्टेट्समध्ये चर्चा झाली. २५ मे १९२९ला अ. भा. काँ. कमिटीला याबाबत धोरणात्मक निवेदन करावे लागले. त्यात म्हटले आहे, " .... चालू आर्थिक आणि सामाजिक

रचनेत (मूलभूत) क्रांतिकारक बदल करून समाजातील प्रचंड विषमता दूर केली पाहिजे. त्यासाठी कामगाराला जीवनवेतन, शेतकऱ्याला पुरेशी जमीन, अनार्जित उत्पन्नावर जबर कर आणि दलाल किंवा अडत्यांचा हस्तक्षेप बंद करणे. असे उपाय योजले पाहिजेत.'' भारतीय शेतकऱ्यांच्या कर्जबाजारीपणाचे स्वरूप मूलतः आर्थिक असून, जमीन महसूल आणि खंड यांच्यामुळे त्यांची जी पिळणूक होते त्याच्याशी तो निगडित आहे.

१९३१ मध्ये मध्यवर्ती बँक चौकशी मंडळाने खालील मत व्यक्त केले.– '' शेतकऱ्यांच्या कर्जबाजारीपणामुळे जमिनीची मालकी शेतकरीवर्गाकडून शेती न करणाऱ्या सावकाराकडे जाते, आणि अखेरीस तो शेतकरी भूहीन कामगार बनून त्याचा आर्थिक दर्जा खालावतो. त्याचा परिणाम म्हणजे शेतीची कार्यक्षमता कमी होते.'' १९३१च्या खानेसुमारीच्या अहवालात म्हटले आहे, '' जमीन न कसणाऱ्या जमीन मालकांच्या हातात जमिनींच्या मालकीचे केंद्रीकरण होत आहे. '' शेतकऱ्यांच्या कर्जाचा अंदाज ९०० कोटी रु. किंवा ६७५ दशलक्ष पौंड असा व्यक्त करण्यात आला.

या जागतिक अरिष्टाच्या शेतकरीवर्गावर झालेल्या परिणामांचा विचार करताना खालील मूलभूत प्रश्न निर्माण होतात.–(१) शेतीवर अवलंबून असणाऱ्यात वाढ, कारण शेतकऱ्यांना इतर उत्पादनाच्या क्षेत्रात प्रवेश मिळत नसतो, (२) शेती हाच एकमेव व्यवसाय झाल्याने त्याचा शेतकऱ्यांवर बोजा पडतो, (३) शेतीचे अविकसित तंत्र आणि तंत्राच्या विकासात अडथळे, (४) ब्रिटिश अमलात झालेला शेतीचा ऱ्हास, (५) शेतकऱ्यांचे वाढते दारिद्र्य, शेतीची विभागणी आणि एकाच मालकाचे अनेक ठिकाणी शेतीचे पट्टे असणे आणि भूहीन मजुरात झालेली लक्षणीय वाढ.[११]

या सर्वांचा विचार करता शेतकरी चळवळीबाबत आपण पुढीलप्रमाणे निष्कर्ष काढू शकतो:–(१) १८५७-१९२१ या काळात मधूनमधून शेतकरी उठाव झाले, असंतोष प्रकट झाला, पण त्याला योग्य ते पुढारीपण मिळाले नाही, (२) वर्गजागृत शेतकऱ्यांच्या संघटना २० व्या शतकाच्या तिसऱ्या आणि चौथ्या दशकात उदयाला आल्या.

**(ई) अल्पभूधारक विधेयक** (स्मॉल होल्डिंग्ज बिल).

मुंबई प्रांतात रयतवारी पद्धती मोठ्या प्रमाणावर आहे. जमिनीचे लहान लहान पट्टे आणि त्याची मालकी निरनिराळ्या लोकांची. त्यामुळे भांडवलशाही पद्धतीने शेतीत उत्पादन करणे अशक्य झाले होते. पिकाऊ जमिनीचे तुकडे होण्यास प्रतिबंध करणे आणि झालेल्या तुकड्यांचे एकत्रीकरण करणे. यासंबंधीचे एक विधेयक ८ ऑक्टोबर १९२७ रोजी सर चुनीलाल मेहता यानी मुंबई विधिमंडळात मांडले. विधेयक मांडण्याचा उद्देश चांगला होता; पण जमिनींच्या निरनिराळया मालकांच्या विखुरलेल्या तुकड्यांचे एकत्रीकरण (सलगपणे एकाच्याच मालकीखाली) करण्याने काही शेतकऱ्यांना अपल्या छोट्या जमिनींना व जमीन

करण्याच्या पिढीजात (जन्मजात) हक्काला मुकावे लागणार होते. सुमारे ३५ ते ४० टक्के शेतकऱ्यांना या आपल्या स्थावर मिळकतीस मुकावे लागणार होते. आधीच शेतकरी कर्जात बुडालेला आणि या जमिनी एकत्रीकरणासाठी गेल्याने जमीनही जाणार व मिळालेल्या पैशातून कर्जातून सुटकाही नाही अशी त्याची स्थिती होणार. १० ते १५ लाख कुटुंबे जमिनीला मुकणार. विठ्ठल रामजी शिंदे हे प्रांतिक शेतकरी परिषदेचे अध्यक्ष, या विधेयकावर बोलताना ते म्हणाले, " जमिनीचे विखुरलेले पट्टे एकत्र करणे हे अन्यायाचे आहे. जर अशा प्रकारे जमिनीचे पट्टे एकत्र करायचे असतील तर त्याना योग्य ती नुकसानभरपाई द्यावी लागेल. पण ती नुसत्या पैशाच्या रूपाने नव्हे, तर मोठ्या जमीनदाराची अतिरिक्त जमीन लहान शेतकऱ्याला दिली पाहिजे. असे हे दुधारी धोरण अवलंबिल्यास रोख नुकसानभरपाई देण्याची आवश्यकता राहणार नाही. ही पद्धत जरा अवघड वाटेल, पण त्यामुळे शेतकऱ्यांना न्याय मिळेल." सत्यशोधक पक्षाचे दिनकरराव जवळकर म्हणाले, " या अशा कायद्याने शेतकऱ्यांच्या जमिनी जातील आणि त्यांना कामगार व्हावे लागेल आणि ते भांडवलदारांच्या कचाट्यात सापडतील. मोठे शेतकरी अधिक मोठे जमीनदार होतील, कारण जमीन विकत घेण्याची त्यांची ताकद मोठी असणार." भांडवलशाही पद्धतीने उत्पादन सुरू झाल्यावर शेतीचा अधिक तांत्रिक विकास होईल आणि परिणामी अधिक शेतकऱ्यांना जमिनींना मुकावे लागेल.

नगरचे आमदार रावबहादूर नवले यांच्या अध्यक्षतेखाली सातारा जिल्हा परिषद झाली. पुण्याला प्रांतिक परिषद २५ जुलै १९२८ ला झाली. अपक्ष अशा या परिषदेला सुमारे ५ हजारांवर शेतकरी हजर होते. विठ्ठल रामजी शिंदे अध्यक्ष व बाबूराव जेधे उपाध्यक्ष होते.

मुंबई विधिमंडळाच्या काँग्रेस, उदारमतवादी, प्रतियोगी सहकार इत्यादी पक्षांचे महत्त्वाचे सदस्य, तसेच शेतकरी परिषदेचे कार्यकर्ते आणि ग्रामीण भागातून आलेले अन्य शेतकरी यांची ता. २३ जुलै १९२९ ला मुंबईला एक प्रातिनिधिक परिषद झाली. अध्यक्ष होते सरदार वल्लभभाई. जमीनमहसुलाच्या सरकारी धोरणाविरुद्ध लढा करून जमीनमहसुलाच्या संहितेत (लँड रेव्हेन्यू कोड) योग्य ते बदल घडवून आणण्यासाठी आंदोलन करण्याचा निर्णय करण्यात आला. त्यासाठी ' मुंबई प्रेसिडेन्सी लँड लीग ' ही संस्था स्थापन करण्यात आली. त्यांच्या मागण्या खालीलप्रमाणे होत्या.–(१) जमिनींची मालकी शेतकऱ्याकडेच असावी, (२) जमिनीच्या उत्पादनातील नफ्यावर जमीनमहसूल हा कर म्हणून बसवावा. शेतकऱ्यांच्या तक्रारी निवारण करण्यासाठी एक समितीही नेमण्यात आली. या प्रेसिडेन्सी लँड लीगच्या धोरणावर विठ्ठल रामजी शिंदे यांनी कडाडून हल्ला केला, आणि ही ' लँडलॉर्ड लीग ' आहे अशी त्याची संभावना केली. या नवीन लँडलीगच्या कार्यकारी मंडळात ब्राह्मणांचाच भरणा होता. ते स्वतः जमीन कसत नव्हते. त्यामुळे सत्यशोधक ब्राह्मणेतरांनी ' मुंबई प्रांतिक

शेतकरी लीग ' (शेतकरी संघ) अशी निराळी संस्था काढली; पण शेतकरी संघ आणि पाटील परिषद यांनी शेतकरी चळवळीत काही भाग घेतला नाही.

या अल्पभूधारक विधेयकाच्या चर्चेच्या निमित्ताने एक नवीन प्रवाह नाशिक जिल्ह्यातील बागलाण तालुक्यात दिसून आला. केशवराव जेधे आणि दिनकरराव जवळकर यांनी जमीन महसुलाचे धोरण बदलून घेण्यासाठी सरकारविरोधी लढा उभारला (१९२९). सत्यशोधक पुढारी भास्करराव जाधव यांनी कुळांना संरक्षण देऊन जमीन न कसणाऱ्याची जमीनदारी (absentee landlordism) नाहीशी करावी या संबंधीचे विधेयक आणण्याची आवश्यकता प्रतिपादन केली. जाधव हे लँड लीगचे विरोधक. लँड लीगचे समर्थक न. चिं. केळकर. जाधवांवर टीका करताना म्हणाले, '' ब्राह्मणेतर पक्षाने कोणतीही योजना तयार केली, तर हे स्वीकारतील! ''

या अल्पभू विधेयकामुळे समाजातील निरनिराळ्या घटकातील दृष्टिकोन पालटलेला दिसून आला. वि. रा. तथा अण्णासाहेब शिंदे त्या विधेयकाविरुद्ध चाललेल्या लढ्याचे पुढारी होतेच. ब्राह्मणेतर पक्षात या विधेयकामुळे फूट पडली, आणि त्यातील जेधे आणि जवळकर हे जहाल विचारसरणीकडे ओढले गेले. मुळशी सत्याग्रहाच्या रूपाने पहिला शेतकरी लढा महाराष्ट्रात उभा राहिला होता, पण या नवीन शेतकरी आंदोलनाने महाराष्ट्रात काँग्रेसचा पाया विस्तृत केला पाहिजे असे या नवीन पुढारीपणाला वाटू लागले. गांधीजी कायदेभंगाचा लढा चालू करण्याच्या थोडी आधीची ही घटना. त्या वेळचे डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चर डॉ. हॅरोल्ड एच. मॅन म्हणाले, ' याने शेतकऱ्यांचा विनाश होईल '. वैकुंठलाल मेहता म्हणाले, '' यामुळे ग्रामीण भाग नाहीसा होईल. '' हे विधेयक निवड समितीकडे पाठविण्यात आले, पण यावरील टीका लक्षात घेऊन सर चुनीलाल मेहतांनी ते विधेयकच परत घेतले.

### कामगारांच्या चळवळी

शोषणमुक्त होण्यासाठी कामगारवर्गाने आपली संघटना जाणीवपूर्वक निर्माण केली पाहिजे असे मार्क्सने म्हटले आहे. या ध्येयासाठी कामगारवर्गाने प्रत्येक सामाजिक आणि राजकीय चळवळींना मदत केली पाहिजे. कामगारवर्गाने त्यांच्या कक्षेबाहेर असलेल्या अन्य कामगारांनाही संघटनेत सामील करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. व्यापाऱ्याकडे काम करणाऱ्या अत्यंत कमी वेतन मिळविणाऱ्या कामगारांचे हितसंबंध त्याने रक्षण केले पाहिजेत. तसेच शेतीवर काम करणारे आणि विशिष्ट परिस्थितीत प्रतिकारशक्ती नसलेल्यांनाही त्यानी मदतीचा हात दिला पाहिजे. दलितांच्या मुक्ततेसाठीच आपला लढा आहे याची त्यांना सतत जाणीव असली पाहिजे.

ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या वर्चस्वाखाली उदयास येणाऱ्या भांडवलशाहीने पिळणुकीचे रानटी मार्ग चोखाळले, रक्षण केले. भारतातील वासाहतिक अर्थव्यवस्थेमुळेच कामगारांची दुर्दशा झाली. वसाहतीत आलेल्या परकी मक्तेदारांना येथील राज्यकर्त्यांचा पाठिंबा मिळाला आणि त्यांच्या स्पर्धेला टक्कर देणे येथील भांडवलदारांना कठीण झाले. त्यामुळे आपले आसन टिकविण्यासाठी पिळवणुकीचे दुष्ट आणि तत्त्वहीन मार्ग त्यानी चोखाळले. याविरुध्द झगडणे कामगारांना भाग होतेच, पण साम्राज्यशाहीविरोधी लढ्यालाही अग्रस्थान देणे भाग होते.

मुंबईसारख्या कापडगिरण्यांमध्ये कामावर आलेला कामगार हा ग्रामीण भागातील शेतकरी. त्याच्यावरच कारखानदारी उभी राहिली. या कापड कामगारांचे कामाचे तास कमी करणे, स्त्रिया व मुलांना जी अमानुष वागणूक दिली जाते ती नाहीशी करणे अशा स्वरूपाचेच लढे कामगारांना प्राथमिक अवस्थेत लढवावे लागले.

१८८४ मध्ये नारायण मेधाजी लोखंडे यांच्या अध्यक्षतेखाली बॉंबे मिलहॅंडस् असोसिएशन ही कामगारांची संघटना चालू झाली. महाराष्ट्रातील नव्हे पण हिंदुस्थानातील ही पहिलीच कामगार-संघटना असावी. ' दीनबंधु ' हे संघटनेचे मुखपत्र मराठीत निघू लागले. लोखंडे हे सत्यशोधक, फुले यांचे अनुयायी. ते भारताचे पहिले कामगार पुढारी. कामगार चळवळ करायची या जाणिवेने त्यानी हे काम चालू केले नाही. कामगाराविषयी सहानुभूती, आणि समाजसेवा या बुद्धीनेच ते या कामाला प्रवृत्त झाले. समाजकल्याणाच्या भावनेने त्यांनी या कामगार चळवळीला हात घातला. परदुःख हलके करणे अशी मानवतावादी विचारसरणी घेऊन ते या लढ्यात उतरले. मुंबई सरकारने नेमलेल्या एका कमिशनसमोर त्यानी ५५ हजार कामगारांच्या सह्यांचा अर्ज सादर केला. २५ सप्टेंबर १८९० ला नेमलेल्या फॅक्टरी कमिशनवर त्यांची नेमणूक झाली होती. त्यांच्याशिवाय आणखी तीन भारतीय सदस्य होते. सोराबजींचा त्यात समावेश होता. १८९१ मध्ये नवा फॅक्टरी कायदा तयार झाला. १८९८ मध्ये कामगारात काम मिळविण्यासाठी स्पर्धा असे. रस्त्यावर कामगारांचे लिलाव होत.

२४ एप्रिल १८९० ला मुंबईला सुमारे दहा हजारांचा असा अभूतपूर्व मेळावा झाला. त्याचे वैशिष्ट्य म्हणजे त्या मेळाव्यात प्रथमच दोन महिला कामगारांनी सभेत भाषण करून आठवड्याच्या सुट्टीची मागणी केली आणि कामगारांची ही संघटित मागणी गिरणीमालकांना मान्य करावी लागली. त्याच वेळी सुमारे १० हजार कामगारांनी आपले निवेदन मुंबई सरकारला सादर केले.

मुंबईमध्ये मराठीभाषी कामगार ५१, व गुजराथी कामगार २६ टक्के होते, कापड गिरणी कामगारात ९० टक्के मराठे होते आणि इतर खात्यातूनही त्यांचे प्रमाण ८० टक्के होते.

१९०५-०७ या काळात झारच्या रशियात झालेल्या भांडवलदारी लोकशाही क्रांतीचा प्रभाव मुंबई कामगारांवर होता. त्याचप्रमाणे १९०७ च्या सुरतला झालेल्या काँग्रेसच्या अधिवेशनाचाही प्रभाव त्यांच्या मनावर होता. झुंजार राष्ट्रवादाचे प्रणेते लोकमान्य टिळक हे नेहमी कामगारात जाऊन सभातून भाषणे करून त्यांच्यात जागृती करीत. लोकमान्यांना १९०८ साली सहा वर्षांची शिक्षा झाली, त्यावेळी मुंबईच्या कामगारांनी सहा दिवस अभूतपूर्व असा उत्स्फूर्त संप केला होता. गणपत गोविंद हा कामगार शहीद झाला. संपावरील कामगाराना बाहेरच्यापेक्षा कमी दराने व्यापाऱ्यांनी तांदूळ विकला. छोटे व्यापारी लढाऊ कामगारांना साथ देत होते. साम्राज्यशाहीबरोबर झालेल्या या पहिल्याच लढ्यात कामगारांचे नीतिधैर्य मोठे होते. संप चिरडण्यासाठी आणलेल्या सैन्यावर दगडविटांचा मारा करण्यात येत होता. अशा वेळी मध्यमवर्गही त्याला साथ देत होता, सुमारे २०० लोक सैन्याच्या गोळीबाराने मृत्युमुखी पडले, त्यापेक्षा अधिक जखमी झाले. लढाऊ कामगारांना राजकीय मार्गदर्शन नव्हते. कामगारांनी लोकमान्यांच्या रूपाने हा जो संप केला, त्याचे महत्त्व विशद करण्यासाठी 'केसरी'चे संपादक कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यानी 'केसरीत ' ' सर्वात पुढे मुंबईच कां? ' ही लेखमाला लिहिली. ' सर्वात मागासलेले लोक पुण्यातच राहतात' अशी वेदना व्यक्त करताना लोकमान्यांसारख्या राष्ट्रपुरुषाला साम्राज्यशाहीने अमानुष शिक्षा दिली याची प्रतिक्रिया पुण्यात उठली नाही अशी खंत त्यांनी व्यक्त केली. ते म्हणतात, ''उद्योगधंद्यांचे शहरात लोकांचे अंगात–गरीब, श्रीमंत सर्वांच्या अंगात–स्वतःचे हिमतीवर पोटाला मिळविण्यासाठी धमक असते. तेथील लोक मेलेले अन्न खात नाहीत, पुण्यातील मोठा समाज मेलेले अन्न खातो'' [१२] ' युरोपातील वर्गजागृत कामगारांना आता आशियात नवा सहकारी मिळाला आहे आणि त्याची संख्या आता भराभर वाढत जाईल ' अशी प्रतिक्रिया लेनिनने व्यक्त केली आणि ' जागतिक राजकारणात नवा ज्वालाग्राही पदार्थ आल्याची नोंद केली.

रावसाहेब एस. के. बोले यांनी १९०९ मध्ये कामगारहितवर्धक सभा स्थापन केली. १९२० पर्यंत ही सभा काम करीत होती. या संस्थेने बारा तासांचा दिवस असावा अशी मागणी केली. बॉंबे सोशल सर्व्हिस लीगनेही मानवतावादी भूमिकेतून कामगारात काम केले.

१९२० मध्ये अ. भा. ट्रेड युनियन काँग्रेसची (आयटकची) स्थापना मुंबईला झाली. स्वागतसमितीचे अध्यक्ष होते बॅ. बॅप्टिस्टा– लोकमान्यांचे कट्टर अनुयायी. फेबियन समाजवादाचा त्यांच्या विचारांवर मोठाच प्रभाव होता. यामागे टिळकांची प्रेरणा होती, पण गांधीजींनी या घटनेची दादही घेतली नाही, संदेशही पाठवला नाही.

लाला लजपतराय हे आयटकच्या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्ष झाले. (टिळक हे अध्यक्ष व्हावयाचे, पण त्यांचे दुर्दैवी निधन झाले). त्या वेळचे राष्ट्रीय पुढारीपण भांडवलदारी, पण त्या पुढाऱ्यांनी प्रागतिक अशा कामगार चळवळीच्या मार्गात अडथळा आणला नाही;

उलटपक्षी त्यांनी मध्यवर्ती कामगार संघटना स्थापन करण्यासाठी निर्णायक पावले उचलली. क्रांतिकारक कामगार तत्त्वज्ञान, तसेच मानवतावाद, सुधारणावाद आणि भांडवलशाहीचे तत्त्वज्ञान या पुढारीपणात जणू एकत्रित झाली होती. अशा तऱ्हेने आयटकच्या सुरुवातीलाच सुधारणावाद आणि भांडवलदारी तत्त्वज्ञानाची बीजे कामगार चळवळीत रोवली गेली होती.[१३]

पहिल्या महायुद्धानंतरच्या काळात भारताच्या कामगार जगतात सर्वत्र असंतोषाचा काळ दिसून येईल. या काळाची विभागणी तीन प्रकारे असल्याचे दिसून येईल.– (१) १९१८-२० वाढत्या किमतींचा काळ; (२) १९२२-२५ पगारकाटीचा काळ; (३) १९२७-२९ प्रमाणीकरणाचा काळ. या प्रत्येक कालखंडात सार्वत्रिक संप आणि वाढती लढाऊ कामगार चळवळ झालेली दिसेल. यावरून एक गोष्ट स्पष्ट होईल–वाढत्या लढाऊ कामगार चळवळीचा उदय भारतातील नव्हे महाराष्ट्रातील मोठा चमत्कार होता. या नव्या कालखंडाचे वैशिष्ट्य म्हणजे जनतेची साम्राज्यविरोधी चळवळ, आणि कामगारांचा कामगारवर्ग म्हणून झालेला उदय. युगप्रवर्तक रशियन राज्यक्रांती, आयटकची स्थापना, कानपूर कम्युनिस्ट कटाचा खटला या घटनांनी राजकारणाचा सर्व दृष्टिकोनच बदलून टाकला. त्या काळाच्या औद्योगिक क्षेत्रात संप ही एक अपरिहार्य अशी घटनाच मानली जात असे.

विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकात कामगारांची चळवळ सर्वत्र वाढलेली दिसेल. मुंबई, सोलापूर या शहरातही या चळवळी वाढल्या. कापड गिरणी कामगारात दलित/अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या वर्गातील लोक काम करीत असत; पण त्यांना विणकामाच्या खात्यात काम देत नसत. कामगार युनियनने ही मागणी पुढे मांडली होती, पण मालकांनी ते कामगार अस्पृश्य आहेत म्हणून ती मागणी फेटाळली ! १९२८ च्या या संपास डॉ. आंबेडकर यांनी पाठिंबा दिला होता.

१९२२ ते १९२६ या काळात कामगार चळवळीची बांधणी चालू होती. त्यामुळे कामगारांनी बचावात्मक पवित्रा घेतला होता. कामगारांचे पुढारीपणही राष्ट्रवादी आणि मानवतावादी होते. आपले राष्ट्रवादी पुढारी समाजाच्या सर्व थरातील होते; पण कामगारवर्गीय पुढारीपण अजून निर्माण झाले नव्हते, असे व्हॅन्गार्डने म्हटले होते.[१४]

१९२६ ते २९ या काळात कामगारांत लढाऊ वृत्ति निर्माण झाली. त्याला खालील कारणे देता येतील :– (१) १९२६ च्या भारताचा कामगारविषयक कायदा–ट्रेड युनियन कायदा, (२) कामगार तंटे निवारण कायदा, (३) पब्लिक सेफ्टी कायदा. या काळात कम्युनिस्ट विचाराने भारलेले नवे नेतृत्व कामगार चळवळीत उतरले होते. सरकारनेही दडपशाही

केली आणि अखेरीस ' मीरत कम्युनिस्ट कटाचा खटला ' उभा केला; कारण त्यांना ' कम्युनिस्टांच्या धोक्यापासून ' कामगारांची सुटका करायची होती !

मुंबई गिरणी कामगार युनियनची सभासदसंख्या ६५ हजारावर गेली, एका वर्षात ७० टक्के सदस्य वाढले, सायमन कमिशनविरोधी झालेल्या निदर्शनात कामगारांचा अग्रभाग, कामगार युनियनमध्ये डाव्या गटाचे वर्चस्व आणि वाढत्या कामगार चळवळीबाबतच्या लढाऊ जाणिवा यामुळे राजकीय क्षेत्रात नवीच शक्ति आली असून ती लढाऊपणा वाढवीत असल्याचे दिसून येऊ लागले.

मुंबई कॉर्पोरेशन ही भांडवलदाराच्या नियंत्रणाखालील संस्था राष्ट्रीय चळवळीला मदत करी, पण कामगारांच्या संपाला १ लक्ष रुपयांची मदत करावी असा ठराव तिने फेटाळला. मुंबई प्रदेश काँग्रेस कमिटीत कामगार-शेतकरी पक्षाचे कार्यकर्ते होते, म्हणून ५ हजार रुपयांची मदत कमिटीने केली. याबाबत कॉ. डांगे म्हणाले, मुंबईच्या कामगारांना फक्त आंतरराष्ट्रीय कामगारांनीच मदत पाठविली. अशा या प्रत्यक्ष आलेल्या अनुभवानेच कामगारांनी घोषणा दिली,– " जगातील कामगारांनो, एक व्हा."[१५] कामगारांच्या वाढत्या चळवळींना पायबंद घालण्यासाठी बॉंबे चेंबर ऑफ कॉमर्स आणि इंडियन मर्चंटस असोसिएशन या भांडवलदारांच्या संस्था तर " कामगारांच्या पुढाऱ्यांवर आणीबाणीचा वटहुकूम काढा, कारण चळवळ करणारे कम्युनिस्ट आहेत असा सरकारला आग्रह करू लागल्या.[१६]

कॉ. सिंगारवेलू व त्यांच्या सहकाऱ्यांनी मद्रासला १९२३ मध्ये मे दिन प्रथम साजरा केला. सिंगारवेलू हा डावा काँग्रेस कार्यकर्ता म्हणून काम करीत होता. १९२४ मध्ये कानपूर कम्युनिस्ट कटाच्या धरपकडीमुळे तो साजरा होऊ शकला नाही, पण १९२५-२६ मध्ये लाहोरला साजरा झाला, तो कॉ.स्प्रॅटच्या पुढाकाराने. कामगार शेतकरी पक्षाचे त्यावेळचे कार्यकर्ते कॉ. मिरजकर यांनी १९२७ मध्ये मुंबईला साजरा केला. ८ ते १० हजार लोक हजर होते. कॉ. जोगळेकर प्रमुख वक्ते होते. कामगार शेतकरी पक्षाचे मुखपत्र म्हणून ' क्रांति ' हे मराठीतून निघे. मे दिनाच्या एका पत्रकात ' आठ तासांचा दिवस ' ही मागणी मांडण्यात आली.

' क्रांति ' हे मुखपत्र १४ मे १९२७ ला चालू झाले. नोव्हेंबरपर्यंत त्याचे अंक नियमित निघाले. नंतर १९२८ च्या जूनमध्ये ते निघू लागले. त्यावेळी कामगारांत संपाची लाट आली होती. कॉ. डांगे यांच्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या ' क्रांति ' ने ' संयुक्त संप समिती ' च्या नेतृत्वाखाली कामगारांना एकत्र आणण्याचे मोठे काम केले. एम्. जी. देसाई यांच्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या ' स्पार्क ' या साप्ताहिकानेही कामगार चळवळीला मोलाचे मार्गदर्शन आणि साह्य केले.[१७]

## संदर्भ

(१) Bipan Chandra,' The Rise and Growth of Economic Nationalism in India, ' pp. 751-759.

(२) Jha, Manoranjan, *op cit.*

(३) R. P. Dutt, ' India Today ', p. 133.

(४) The Times of India, 18-7-1930.

(५) A Short History of the World, p. 218.

(६) Levkovsky, ' Capitalism in India ', p. 170.

(७) A. R. Desai, *op. cit,* p. 160.

(८) *Ibid.*

(९) Author's Interview with Dange, on 13-9-79.

(१०) D. N. Dhanagare, ' Peasant Movements in India ', 1920-50, pp. 89, 107, 133.

(११) R. P. Dutt, op cit, pp. 166-169.

(१२) D. V. Tahmankar, ' L. Tilak ', p. 171.

(१३) Gopal Ghosh, ' T. U. Movement in India ' p. 90.

(१४) S. Sen, *op. cit,* p. 229.

(१५) G. O. I. Publication, 1928, p. 111.

(१६) S. S. Josh, ' The Great Attack ', p. 78.

(१७) S. A. Dange, Selected Works, I, p. IX.

# ४. सामाजिक आणि धार्मिक तणाव

भारतीय जीवनाकडे पाहिले तर आधी राजकीय घडामोडी झाल्या, बदल झाले आणि त्यामागून सामाजिक व आर्थिक बदल झाले. सामान्यतः समाजातील बुद्धिमान वर्ग हा परंपरेला चिकटूनच राहिला. त्याने परंपरा सोडली नाही. अभिजनवर्गाची (elite) आधुनिकता आणून परंपरागत मूल्यांमध्ये मूलभूत-क्रांतिकारक बदल घडवून आणण्यासंबंधीची बांधिलकी ही कमजोर आणि एकाच वेळी समर्थन व नंतर विरोध अशा स्वरूपाची झाली. राजकीय कारणाकरिता ब्राह्मणी समाजपद्धतीच्या विभाजनवादी स्वरूपाचे रक्षण करण्याची साम्राज्यशाही सत्तेची सर्वसाधारण प्रवृत्ती होती, असे दिसून येते.[१]

१९ व्या शतकाच्या प्रथमार्धात त्या वेळच्या मुंबई प्रांतातील मराठीभाषी भागात सामाजिक सुधारणेच्या चळवळींची मुहूर्तमेढ रोवली गेली. मुंबई आणि पुणे या शहरातील अभिजनवर्गात ज्ञानाची पूर्वतपासणी आणि परंपरेवरील चिकित्सक टीका सुरू झाली. नव्या राज्यकर्त्यांनी साध्य केलेल्या गोष्टी आणि त्यांचे श्रेष्ठत्व यांनी प्रभावित झालेला तसेच खिस्ती मिशनऱ्यानी आव्हान दिलेल्या बंगालप्रमाणेच मुंबई प्रांतातील अभिजनवर्गाने भारतीय समाजपध्दती, तसेच धार्मिक श्रद्धा आणि सांस्कृतिक परंपरा यांची चिकित्सक पाहणी करण्यावर भर दिला. त्यांचा सर्व भर ताबडतोबीच्या राजकीय सुधारणांपेक्षा सामाजिक सुधारणांवर होता. व्यक्तिस्वातंत्र्य आणि मानवी प्रतिष्ठेची जाणीव ही पाश्चिमात्य मूल्ये या सामाजिक सुधारणांच्या पुरस्कर्त्यांनी आत्मसात केली. स्त्री आणि पुरुष, स्त्रियांचे हक्क आणि त्यांचे शिक्षण या स्वरूपाच्या कौटुंबिक संबंधांच्या सुधारणा त्यांनी प्रथम हाती घेतल्या. समाजातील वरिष्ठ जातींच्या संदर्भातच या सुधारणा असल्याचे दिसून येईल. चालू शतकात कुटुंबसंस्था सुधारणेपासून जातिव्यवस्थेविरुध्द बंड करण्यापर्यंत बदल झाला आहे. त्यातील महत्त्वाचा विचार म्हणजे समतेचा प्रश्न.

आपल्या समाजाची नवीन पायावर मांडणी झाली पाहिजे, नवी मूल्ये (समतेची) आपण आत्मसात केली पाहिजेत असे प्रतिपादन करणारे फार मोठे विचारवंत महाराष्ट्रात झाले. बाळशास्त्री जांभेकर (१८१२-१८४६), गोपाळ हरी देशमुख (लोकहितवादी) (१८२३-१८९२), महात्मा फुले (१८२७–१८३०), रामकृष्ण गोपाळ भांडारकर (१८३७-१९२५), महादेव गोविंद रानडे (१८४२-१९०१), गोपाळ गणेश आगरकर (१८५६-१८९५), धोंडो केशव कर्वे (१८५८-१९६२), विठ्ठल रामजी शिंदे (१८७३-१९४४), कोल्हापूरचे शाहू महाराज (१८७४-१९२२) भाऊराव पाटील (१८८७-१९५९) या सर्व थोर पुरुषांनी आपल्या समाजाची मूलभूत पायावर मांडणी झाली पाहिजे यावर भर दिला.

आचार्य बाळशास्त्री जांभेकर यांच्या डोळ्यांपुढे राजा राममोहन रॉय यांचा आदर्श होता. मुंबईत ' दर्पण ' पत्र सुरू करून जांभेकर यांनी बंगाल जसा पुढे गेला आहे तसे आम्ही

लवकरच होऊ असा आशावाद निर्माण केला. धार्मिक आणि सामाजिक सुधारणांच्या बाबतीत ते प्रागतिक होते. श्रीपाद शेषाद्रीस मिशनऱ्यांच्या तावडीतून सोडवून पुनः हिंदू समाजात स्थिर करण्यात त्यांनी पुढाकार घेतला, छळही सोसला.

दादोबा पांडुरंग यांनी मुंबईस एक ' परमहंस मंडळी ' या नावाची ' गुप्त ' संस्था जातिभेद मोडण्याच्या उद्देशाने काढली होती. या सभेच्या सभासदांत मुसलमान व ख्रिस्ती लोकही होते, आणि तिच्या शाखा मुंबईच्या बाहेर काही ठिकाणी होत्या. या सभेचे काम १८६० पर्यंत म्हणजे सुमारे १५ वर्षे चालले. कोणी सभासदानी सभासदांची नावे प्रकट केली, त्यामुळे सामाजिक बहिष्काराच्या भीतीने सर्वच सभासद घरी बसले. या संस्थेच्या राखेतूनच पुढे १८६७ साली मुंबई प्रार्थनासमाजाची स्थापना झाली असे न. र. फाटक यांनी लिहिले आहे. प्रार्थनासमाजास न्या. रानडे व डॉ. भांडारकर यांच्यासारखे विद्वान आणि सच्छील लोक मिळाल्यामुळे त्याचा बोलबाला झाला; तरीही बंगालमधील ब्राह्मो समाजाप्रमाणे या समाजाला महाराष्ट्रीय जीवनात महत्त्वाचे स्थान कधीच प्राप्त झाले नाही. चिपळूणकर, आगरकर आणि टिळक यांनी महाराष्ट्रात राष्ट्रवाद आणि बुद्धिवाद यांची प्रेरणा दिली, आणि या नवीन विचारांमुळे महाराष्ट्रीय जीवनात प्रार्थनासमाजाला काही स्थान उरले नाही.

आद्य सुधारकांचा विचार करताना प्रथम गोपाळराव हरी देशमुख म्हणजेच लोकहितवादींचा विचार प्रथम केला पाहिजे. बाळशास्त्री जांभेकर यांच्या सहाय्याने भाऊ महाजन यांनी १८४१ मध्ये मुंबईस सुरू केलेल्या ' प्रभाकर ' नावाच्या पत्रात त्यांचे लेख प्रथमतः येऊ लागले, त्यामुळे त्यांच्या मतांचा प्रसार मोठ्या प्रमाणावर होण्यास मदत झाली. त्यांच्या वेळचेच ब्राह्मण लोक इंग्रजी राज्याला शिव्या देत असत, त्यामुळे आपणास अवनत दशा प्राप्त झाली, असे म्हणत असत व पेशवाईची आठवण काढून रडत असत. पुण्यातील ब्राह्मणांना बंगालमधील हिंदूप्रमाणे इंग्लिश राज्य हे मुसलमानांच्या जुलमातून सोडविण्यास परमेश्वराने येथे धाडले आहे असे वाटण्याचे तसेच आपली या राज्यात फार भरभराट होत आहे असे वाटण्याचे कारण नव्हते. '' सर्व इंग्रज आणि नेटिव यात मोठा भेद आहे तो मोडून एकसारखे होण्याकरिता हिंदुस्थानचे देशात पार्लमेंट ठेवावे '' अशी घोषणा प्रथम करणारे लोकहितवादी. अशा सभेत जातीविषयी निवड नको, विद्वान आणि चांगल्या लोकांनाच नेमले पाहिजे यावर त्यांनी भर दिला. ' ब्राह्मणास गर्विष्ठपणा फार आहे, त्याकरिता ती जात थोडी असली पाहिजे ' असे सांगायलाही त्यांनी कमी केले नाही. त्यांनी १८४८ च्या सुमारास हे प्रतिपादन केले होते.

लोकहितवादींच्या काळात विष्णुबुवा (गोखले) ब्रह्मचारी (१८२५-७१) यांनी ' सुखदायक राज्यप्रकरणी ' निबंधात समाजवादाची तरफदारी केलेली आढळते. वैदिक धर्मावर दृढ

श्रद्धा आणि आपल्या प्राचीन संस्कृतीतूनच आपणास भावी अभ्युदयाचा मार्ग उपलब्ध होईल, असे त्यांना वाटत होते. ही सर्व यंत्रकला आणि भौतिक विद्या लोकांचे देश लुबाडण्यासाठी उपयोगात न आणता, आणि तिच्या साह्याने मूठभर लोकांनी नवकोट नारायण बनून कोट्यवधी जनतेला आपले दास न बनविता ही यंत्रकला व भौतिक विद्या यांचा उपयोग प्रजेचे मुलाप्रमाणे प्रतिपालन करणाऱ्या राजसत्तेने करावा आणि प्राचीन ऋषींनी प्रतिभाबलाने पाहिलेल्या विश्वकुटुंबाची स्थापना करावी असे त्यांचे विचार होते.

हिंदुस्थान पार्लमेंट व स्वराज्य उपभोगू लागला, तर तो अमेरिकेप्रमाणे स्वतंत्र होईल असे सांगणारे लोकहितवादी आणि समाजवादाची तरफदारी करणारे विश्वकुटुंबवादी विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचे वरील विचार पाहता एक महत्त्वाची गोष्ट स्पष्ट दिसते की, त्यांचे विचार आजच्या परिभाषेत बोलायचे म्हणजे धर्मनिरपेक्ष (Secular) होते. विशिष्ट धर्माचा प्रचार वा आचार हे त्यांचे ध्येय नव्हते.

**ब्राह्मणेतर चळवळ आणि अस्पृश्यता**

' सायमन परत जा ' अशी चळवळ (१९२८) चालू होती, त्यावेळी ' पाटील ' मंडळीची पुण्यात एक परिषद झाली (६ जानेवारी १९२८). शेतीच्या तुकडेजोडीसंबंधीच्या कायद्याला त्यांनी विरोध केला, आणि डॉ. आंबेडकर यांनी पिण्याच्या पाण्यासाठी महाडला केलेल्या सत्याग्रहाला त्यांनी सहानभूती व्यक्त केली. पुणे जिल्हा ब्राह्मणेतर कॉंग्रेस कमिटीची स्थापना झाली. केशवराव जेधे सेक्रेटरी झाले. मार्च १९२८ मध्ये ' राष्ट्रीय ' ब्राह्मणेतरांची एक परिषद नाशिक येथे बोलावण्यात आली. सायमन कमिशनचा निषेध करावा व ब्राह्मणेतरांनी त्या कमिशनपुढे साक्ष देऊ नये असा ठरावही त्या परिषदेत संमत करण्यात आला. १७ जुलै १९२८ला कल्याण येथे ब्राम्हणेतर परिषद बोलावण्यात आली. ब्राह्मणेतर राजकीय पक्ष हाच खरा राष्ट्रीय पक्ष असल्याचे घोषित करण्यात आले. जातीय प्रतिनिधित्वाची मागणी करण्यात आली. जवळकरांनी मुंबईत कामगारवर्गात ब्राह्मणेतर पक्ष स्थापन करण्याचा प्रयत्न केला, पण कामगारांनी एका जाहीर सभेत त्याचा निषेध केला. ' सायमन परत जा ' या चळवळीला जवळकरांनी ब्राह्मणेत्तरांचा पुढारी म्हणून पाठिंबा दिला. मुंबई प्रांत ब्राम्हणेतर परिषदेने सायमन कमिशनशी सहकार्य करण्याचा आदेश दिला असल्याचे ब्राह्मणेतरांचे पुढारी भास्करराव जाधव यांनी घोषित केले. सायमन कमिशनवरील बहिष्काराबाबत उघड चर्चा सुरू झाल्याने ब्राह्मणेतर पक्षातील फूट उघड झाली.

महात्मा गांधीनी पुरस्कारलेल्या कायदेभंगाच्या लढ्यापासून परावृत्त व्हावे, आणि अस्पृश्यता निवारणाचे विधायक कार्य करावे, अशी अखिल भारतीय ब्राह्मणेतर परिषदेने विनंती केली, पण ब्राह्मणेतर पक्षातील तरुण गटाला (जेधे-जवळकर) हे मान्य नव्हते. महात्मा गांधींच्या अटकेचा तसेच कायदेभंगाची चळवळ दडपून टाकण्याच्या सरकारच्या धोरणाचा त्यांनी निषेध केला.

पश्चिम खानदेश (आता धुळे) ब्राह्मणेतर काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष विश्वासराव पाटील यांनी ११ एप्रिल १९३० रोजी पत्रक काढून ब्राह्मणेतरांनी काँग्रेस स्वयंसेवक दलात सामील व्हावे, आणि कायदेभंगाच्या चळवळीत सक्रिय भाग घ्यावा असे आवाहन केले.

डॉ. आंबेडकरांनी पिण्याच्या पाण्यासाठी महाड येथे चवदार तळ्यावर सत्याग्रह केला (२० मार्च १९२७). त्या सत्याग्रहात ब्राह्मणांना सामील करून घेऊ नये अशी ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनी बाबासाहेबांना विनंती केली; आंबेडकरांनी ती विनंती फेटाळली आणि सर्वच ब्राह्मणांना अस्पृश्यांचे शत्रू लेखणे चुकीचे असल्याचे जाहीर केले. ब्राह्मणांच्या उच्च जाती आणि कनिष्ठ जाती असे मानणाऱ्यांचा, माणसांचा माणसाला विटाळ होतो असे मानून वरिष्ठांना सामाजिक खास हक्क देऊन कनिष्ठांना विषमतेने वागविण्याच्या प्रथेचा आपण निषेध करतो, त्याला विरोध करतो असे आंबेडकरांनी सांगितले. ब्राह्मणेतर पुढाऱ्यांना त्यांच्या ध्येय-धोरणाबाबत निष्ठा राहिली नाही, फुले यांच्या ब्राह्मणेतर जातींना समानतेच्या पायावर एकत्र आणण्याच्या तत्त्वाचा त्यांना विसर पडला अशी आंबेडकरांनी टीका केली. ब्राह्मणेतरांच्या शैक्षणिक परिषदांतूनसुध्दा विटाळ होऊ नये म्हणून अस्पृश्यांना अलग बसविण्यात येत होते. अशा वागण्यामुळे ब्राह्मणेतर चळवळीत अस्पृश्यांना स्थान उरले नाही. मुंबई विधिमंडळातील ब्राह्मणेतर सदस्यांनी अस्पृश्यतानिवारणासंबंधीच्या विधेयकाला तसेच महार वतन विधेयकालाही विरोध केला. हे पाहून मराठे हे पुरोगामी विचारांचे नसल्याचे आंबेडकरांचे मत झाले. सोळाव्या सत्यशोधक परिषदेच्या निमित्ताने सत्यशोधक मासिकाला दिलेल्या संदेशात ते म्हणाले, " ब्राह्मणेतरांनी जोतीबा फुले यांची आठवण पूर्णपणे पुसून टाकली आहे. इतकेच नव्हे तर त्या वर्गाने निर्लज्जपणे त्यांच्या तत्त्वज्ञानाचा घात केला आहे."

१९३० मध्ये दिनकरराव जवळकर इंग्लंडला गेले होते. ते तिकडून परत आले ते पार बदलले होते. भारत हा भांडवलशाही, ब्राह्मण्य आणि साम्राज्यशाही या तिघांच्या पकडीत सापडला असल्याचे त्यांनी वर्णन केले (१९-७-१९३०). आपल्या देशबांधवांनी सरकारशी सहकार्य करू नये असे त्यांनी सांगितले. १९३० साली सरकारविरोधी भावना शिगेला पोहोचली होती, आणि त्यामुळे ब्राह्मणेतर पक्षाला राष्ट्रीय लढ्यात भाग घेऊन काँग्रेसचे निर्णय मान्य करण्याशिवाय दुसरा पर्याय नव्हता, ब्राह्मणेतर पक्षाचे नाव ' शेतकरी कामगार पक्ष ' असे ठेवावे या जवळकरांनी घेतलेल्या भूमिकेचे न. चिं. केळकर यांनी स्वागत केले, कारण जवळकर आदि मंडळी त्यांची पूर्वीची जातिविषयक मते सोडून राष्ट्रीय प्रवाहात सामील होत होती.

गांधीजींचे प्रभावी व्यक्तिमत्त्व, आणि राजकारणावरील त्यांची पकड यामुळे ब्राह्मणेतरातील शेतकरीवर्ग काँग्रेसकडे ओढला जाण्याची क्रिया वेगाने चालू झाली; कारण राजकीय

कार्यक्रमाशी त्यानी सर्व सुधारणांची सांगड घातली होती. काँग्रेसमध्ये असलेले नवपुढारीपण–नेहरू– समाजवादाचा प्रचार करीत होते. यामुळे ब्राह्मणेतरातील तरुण वर्ग काँग्रेसकडे खेचला गेला. युवक चळवळ (यूथ लीग) ही महाराष्ट्रातील राष्ट्रवादी लढाऊ चळवळ होती. १९३० च्या पूर्वी न. वि. गाडगीळ हे यूथ लीगमध्येच होते. ब्राह्मणेतर चळवळीकडे जातीय दृष्टीने न पाहता त्यातील लढाऊपणा राष्ट्रीय चळवळीकडे कसा खेचला जाईल याचा विचार यूथ लीगचे न. वि. गाडगीळ प्रभृती करीत होते.[२] पर्वती देवस्थानविरूध्द मंदिरप्रवेशाचा एक लढा पुण्यात झाला. अस्पृश्यांना मंदिरात प्रवेश मिळत नव्हता. २२ सप्टेंबर १९२९ ला सभेत सत्याग्रह करायचे ठरले. सत्याग्रह मंडळाचे अध्यक्ष होते शिवराम जानबा कांबळे व चिटणीस होते पां. ना. राजभोज. न. वि. गाडगीळ, विनायकराव भुस्कुटे, वा. वि. साठे, केशवराव जेधे हे सल्लागार समितीत होते. युवक संघाच्या कार्यकर्त्यांनी सत्याग्रहाला पाठिंबा दिला. न. चिं. केळकर, भोपटकर, श्री. म. माटे यांना अस्पृश्यांचा मंदिरप्रवेश मान्य होता, सत्याग्रहाला त्यांचा पाठिंबा नव्हता, १३ ऑक्टोबर १९२९ला पर्वतीच्या पायऱ्या चढण्यासाठी सुमारे ३०० युवक आणि कार्यकर्ते जमले. दगडांच्या माराने कित्येक जखमी झाले. वि. रा. शिंदे व जेधे यांनी भाषण करून मारहाण करणाऱ्या सनातनी सवर्ण हिंदूंचा निषेध केला.

## वि. रा. शिंदे यांचे योगदान

काँग्रेसच्या कार्यक्रमात अस्पृश्यतानिवारणाचा अंतर्भाव असावा असे शिंदे यांनी आग्रहाने प्रतिपादन केले. त्यांच्या प्रयत्नामुळे १९१७च्या कलकत्ता काँग्रेसने अस्पृश्यतानिवारण हा एक कार्यक्रम स्वीकारला.

शिंदे यांनी १९२० मध्ये अखिल भारतीय अस्पृश्यताविरोधी परिषद संघटित केली. अध्यक्ष होते गांधीजी. अशा रीतीने त्यांनी या प्रश्नाला भारतीय स्वरूप दिले. १९२० मध्ये मुंबई विधिमंडळाच्या निवडणुका झाल्या. त्यांच्या स्वतंत्र जनपद पक्षातर्फे ते उमेदवार होते. ' मराठा ' म्हणून निवडणूक लढविण्याचे त्यांनी नाकारले. ब्राह्मणेतर चळवळीचे पुढारीपण वर्गीय भाषेत खालीलप्रमाणे सांगता येईल :––(१) भास्करराव जाधव आणि ए. वी. लठ्ठे यांच्यासारखे शहरी बुध्दिजीवी पुढारी; (२) ग्रामीण भागातील शिक्षक, जेधे यांच्यासारखे कमी शिक्षित कार्यकर्ते; (३) मुकुंदराव पाटील यांच्यासारखे शेतकरी पुढारी.

ब्राह्मणेतर चळवळीतील ब्रिटिशधार्जिण्या गटातील लोकांच्या कारवायांनी भ्रमनिरास झालेला, काही प्रमुख ब्राह्मणेतर पुढाऱ्यांच्या डावपेचांनी उद्वेग आलेला, या तथाकथित पुढाऱ्यांनी सत्तास्थाने मिळविण्यासाठी केलेल्या गलिच्छ कारवायांनी संतप्त झालेला असा एक वर्ग ब्राह्मणेतर पक्षापासून दूर गेला, आणि काँग्रेसमध्ये सामील झाला. हा काळ म्हणजे काँग्रेसने कायदेभंगाची चळवळ सुरू करण्यासाठी तयारी करण्याचा काळ होता.

ही प्रक्रिया वेगाने होण्याला कारणीभूत झालेली मोठी व्यक्ती म्हणजे विठ्ठल रामजी शिंदे. शिंदे हे ब्राह्मणेतर पक्षात कधीच नव्हते. शाहू छत्रपती त्यांना क्षात्र जगद्‌गुरु करणार होते; पण त्यांनी या योजनेला साफ नकार दिला. धार्मिक वृत्तीचे अण्णासाहेब शिंदे हे प्रार्थनासमाजवादी. सामाजिक दृष्टीने पुरोगामी, अस्पृश्यांच्या उद्धाराचे व्रत घेणारे आणि त्यांचा प्रश्न राष्ट्रीय स्तरावर नेणारे, राष्ट्रवादी – अशा शिंदे यांच्या प्रभावाखाली जेधे आणि त्यांचे सहकारी काँग्रेसमध्ये आले आणि कायदेभंगाच्या चळवळीत त्यांनी भाग घेतला. ब्राह्मणेतर पक्षाच्या पूर्वीच्या ध्येय-धोरणाला धक्काच बसला. जेधे यांच्याप्रमाणे जवळकरही काँग्रेसचे ' डिक्टेटर ' म्हणून चळवळीत आले.

ब्राह्मणेतर पक्षाचे एक पुढारी शंकरराव मोरे यांनी ब्राह्मणेतर चळवळीची मीमांसा करताना म्हटले, ' स्वतःचे प्रभुत्व ' टिकविण्यासाठी मराठे जमीनदारांनी ब्राह्मणेतर चळवळ उभारली, आणि त्याला खतपाणी घातले.[३]

## जातीय/धार्मिक प्रश्न

असहकारितेच्या सुरुवातीच्या काळात हिंदू आणि मुसलमान यांनी सरकारविरोधी भूमिका घेतली असल्याने धार्मिक भावनेतून दंगे उद्‌भवले नाहीत; पण नंतर धार्मिक भावनेतून अलगता दिसू लागली.[४] मुसलमानातील अतिरेकी धार्मिक द्वेष/कडवेपणा निर्माण करण्यात यशस्वी झाले. अली बंधू इस्लामचे सर्वश्रेष्ठत्व सांगू लागले. परकी सरकारच्या मगरमिठीतून आपली सुटका करण्यासाठी अफगाणिस्थानच्या अमिराला मदत करणे जरूर आहे अशी भूमिका घेण्यात आली. यामुळे असहकाराच्या चळवळीपासून हिंदू अलग झाले. बेफाट आणि विध्वंसक अशा भाषणासाठी अली बंधूंना सरकारची माफी मागावी लागली. मालेगाव (नाशिक)ला एक सब-इन्स्पेक्टर आणि चार पोलिसांची हत्याही झाली.

पहिल्या महायुध्दानंतर महत्वाचे प्रकरण उद्‌भवले, ते म्हणजे खिलाफत. महायुध्दात इस्लामी धर्माच्या जगद्‌गुरूचे - खलिफाचे - ठिकाण जे तुर्कस्तान ते इंग्रजांच्या विरूध्द लढत होते. त्या वेळी सरकारने हिंदी मुसलमानांना असे आश्वासन दिले की तुमच्या धार्मिक भावना तुर्कस्तानात दुखावल्या जातील असे आम्ही काही करणार नाही. परंतु युध्द संपल्यानंतर ब्रिटिश मुत्सद्यांनी या आश्वासनांना हरताळ फासला व सत्तेच्या दृष्टीने तुर्कस्थानचे तुकडे होणार अशी चिन्हे दिसू लागली.

ब्रिटिशांनी दिलेली ही आश्वासने खरी करावयाची तर मेसापोटेमिया, अरबस्तान, सीरिया, पॅलेस्टाईन या सर्वांवर असलेली खलीफांची सत्ता, धर्मसत्ता व राजसत्ता यांना धक्का लावता आला नसता; पण युध्दसमाप्तीनंतर ब्रिटिश व फ्रेंच मुत्सद्यांनी वर उल्लेखिलेल्या मुस्लिम देशांवरील तुर्कस्थानचे साम्राज्य नष्ट केले, आणि मॅंडेटच्या नावाखाली त्यातील प्रदेश आपापसात वाटून घेतले. ही वाटणी करण्याकरिता राष्ट्रसंघाच्या नेतृत्वाखाली एक

कमिशनही नेमण्यात आले होते. अशा रीतीने ब्रिटिशांनी दिलेली आश्वासने मोडून हिंदी मुसलमानांच्या धर्मभावनांवर आघात केला होता.

युध्दोत्तर काळात पंजाबमध्ये जो असंतोष माजला, त्यामुळे जमावाने पाच इंग्लिश लोकांची हत्या केली. या अमानुष घटनेबाबत लिहिताना महात्माजींनी म्हटले आहे की, जमावाने केलेले अत्याचार अक्षम्य होतेच, जनरल डायर, कर्नल फ्रँक जॉन्सन, कर्नल ओब्रायन इत्यादी लष्करी अधिकाऱ्यांनी जनतेवर जो सूड उगवला, त्याला इतिहासात तोड नाही. युरोपीय देशात खिलाफत आणि पंजाब यांच्यासारखे अन्याय झाले असते तर रक्तरंजित क्रांती झाली असती.

खिलाफत आणि पंजाबवरील अन्यायांविरुध्द असहकार्यतेची चळवळ उभी करावी, या उद्देशाने गांधीजींनी असहकारितेचा कार्यक्रम जाहीर केला. काँग्रेस अधिवेशनात संमत करून घेण्यासाठी एक ठरावही तयार केला, शौकतअल्लीनी त्यांना तशी विनंतीही केली होती. त्यांच्या त्या ठरावाला कोण पाठिंबा देईल, वा विरोध करील याची त्यांना कल्पना नव्हती. मोतीलाल नेहरू आणि विजयराघवाचारीयर यांनी पंजाब, खिलाफत यांच्याबरोबर स्वराज्यप्राप्ती ही मागणी त्यात घालावी अशी सूचना केली, गांधीजींनी ती तत्परतेने मान्य केली, आणि असहकारितेचा ठराव एकमताने मान्य झाला.

खिलाफतीच्या निमित्ताने हिंदू-मुसलमान बंधुभावाचे सर्वत्र प्रदर्शन झाले, पण २ वर्षांतच हा पूर ओसरला. नोव्हेंबर १९२२ मध्ये मुस्ताफा कमाल पाशा यांनी जुन्या खलिफाला पदच्युत केले, आणि त्याच्या जागी नामधारी खलिफा म्हणून एकाची निवड केली. पदच्युत केलेला सुलतान म्हणजेच खलिफा ब्रिटिश जहाजातून माल्टाला गेला. कमाल पाशा तुर्कस्तानचे अध्यक्ष झाले, त्यांनी सर्व सत्ता आपल्या हाती केंद्रित केली आणि भारतीय मुसलमानांनी खिलाफतीच्या बाबतीत जरी काहीही केले तरी काही उपयोग नव्हता. त्याबाबतचा लढा संपलाच होता.मोठ्या शहरात नैराश्यापोटी हिंदू-मुसलमान दंगे झाले. राष्ट्रवाद मागे पडला. जातीयवाद बोकाळला. टीकाकारांनी या सर्वांचे खापर गांधीजींवर फोडण्याचा प्रयत्न केला. गांधीजींनी ' यंग इंडियात ' त्याला सडेतोड उत्तरे दिली. जनतेत झालेली जागृती हीच खरी फलनिष्पत्ती असल्याचे त्यांनी जोरदारपणे सांगितले.

मुस्लिम लीगची स्थापना, १९१६चा लखनौ करार, माँटफर्ड सुधारणा, खिलाफत चळवळ, असहकारिता, मोपल्यांचे बंड या सर्वांमुळे जातीय तणाव वाढीस लागत होता. १९२५ पर्यंत हिंदूमहासभेची अधिवेशने काँग्रेसच्या मंडपातच होत. स्वामी श्रध्दानंदांचा खून (२३-१२-२६) ही नंतरची घटना, शुध्दि आणि संघटना ही हिंदूसभेची स्वीकृत धोरणे जाहीर झाली. या सर्वांमुळे काँग्रेस आणि हिंदूसभा यांच्यातील दरी वाढतच गेली. हिंदू राष्ट्रवाद वाढीस लागला. १९२५ साली नागपूरला राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची स्थापना झाली, आणि

' हिंदुस्थान हिंदूओंका ' घोष होऊ लागला. राऊंड टेबल परिषदेतून बाहेर आलेला जातीय मतदारसंघाचा वाद, त्याविरूध्द उठलेले वादळ, त्याला हिंदूसभेचा विरोध, जातीय मतदारसंघ मान्यही नाही, आणि अमान्यही नाही असा काँग्रेसचा ठराव – या सर्वांमुळे हिंदुसभावादी मंडळी काँग्रेसपासून दूर जाऊ लागली. डॉ. मुंजे, न. चिं. केळकर, भोपटकर ही काँग्रेसच्या राजकारणातील मंडळी हिंदुमहासभावादी झाली. डॉ. मुंजे (१९२७) हे पाटणा, तसेच न. चिं. केळकर हे जबलपूर (१९२८) आणि दिल्ली (१९३२) येथील हिंदुमहासभा अधिवेशनाचे अध्यक्ष झाले. इंग्रजांच्या आश्रयानेच इस्लामी राष्ट्रवादाचे उद्दिष्ट गाठता येईल हे मुसलमानानी जाणले व मुस्लिम लीगने काँग्रेसबरोबर वैराचा पवित्रा घेतला. अशा रीतीने एकीकडून मुस्लिम जातीयवाद आणि दुसरीकडून हिंदू जातीयवाद यांच्या तणातणीत भारतीय धर्मनिरपेक्ष राष्ट्रवाद सापडला.

१९२४ साली दिल्लीला हिंदू-मुसलमानांचा दंगा झाला, गांधीजींनी २१ दिवसांचे उपोषण केले.

महाराष्ट्रात अखिल भारतीय राजकारणाचे पडसाद उमटले. बाबासाहेब आंबेडकरांनी महाडला चवदार तळ्यावर पाण्यासाठी सत्याग्रह केला. ते म्हणाले, '' महाडच्या चवदार तळ्यातून पाणी काढून ते पिण्याने आपल्याला हत्तीचे बळ प्राप्त झाले.'' वि. दा. सावरकर रत्नागिरी येथे स्थानबद्ध होते. त्यांनी शुद्धी, संघटन, अस्पृश्यतानिवारण या कार्याला जोर लावला. श्री. म. माटे अस्पृश्यतानिवारणाच्या कामाने ' महार माटे ' म्हणून ओळखू लागले. मसूराश्रमामार्फतही अशीच कामे होऊ लागली. सहभोजने, मंदिरप्रवेश (नाशिक येथील काळाराम मंदिरात प्रवेशासाठी सत्याग्रह झाला). अशा विषयांना प्राधान्य मिळाले. राजकारणात लोकशाही स्वराज्यपक्ष आणि समाजकारणात हिंदुसभा अशी काहींनी विभागणीही केली.

भारतीय राष्ट्रवादी चळवळ अशा रीतीने जातीयवादाच्या खडकावर दुभंगली हे पाहून व्हाईसरॉय लॉर्ड रीडिंगने '' Our bad days are over, Hindu-Muslim unity is no more '' असे उद्‌गार काढले असल्यास नवल नाही. ' फोडा आणि झोडा ' ही नीती यशस्वी झाली.

सरकारची भेदनीती ओळखून आणि मुस्लिम लीगचा घातक पवित्रा जाणून मुसलमानातील राष्ट्रीय प्रवृतीच्या कार्यकर्त्यांनी ऑल इंडिया नॅशनॅलिस्ट मुस्लिम परिषद स्थापन करून अलाहाबाद येथे २७ जुलै १९१९ रोजी अधिवेशन घेतले. मौलाना आझाद हे परिषदेचे अध्यक्ष होते. त्यात अ. भा. नॅशनॅलिस्ट मुस्लिम पक्षाची स्थापना करण्यात आली. शेरवाणी सेक्रेटरी झाले. आझाद, अन्सारी हे कार्यकारी मंडळावर होते. ब्रेल्वी,

मेहेरअल्ली हे संघटक झाले. त्याचाच भाग म्हणून मुंबई काँग्रेस मुस्लिम पक्षाची स्थापना झाली. ब्रेल्वी अध्यक्ष व तय्यबजी उपाध्यक्ष झाले. गांधीजींनी संदेश पाठवला होता.

वरील त्रोटक वृत्तांतावरून हे दिसेल की, हिंदूतील परंपरावादी, धर्माधिष्ठित राजकारण करणारे आणि मुसलमानातील त्याच विचारांचे लोक यांचा सामना उभा राहिला. हिंदूंचे पुढारीपण जमीनदार-श्रीमंत शेतकऱ्यातून आलेले, आर्थिक पिळणूक आणि त्यातून उद्‌भवणारे वर्गीय लढे दाबून टाकणारे, व त्यासाठी धर्माचा उपयोग करणारे होते. मुसलमानातील मागासलेपणा, आणि धर्मवेडेपणा यांचा त्यांच्या पुढारीपणाने जातीय दंगे पेटविण्यासाठी उपयोग करून घेतला.

जातीय दंगे काबूत आणून ते समूळ नाहीसे करण्यासाठी कायदा अपुरा पडतो असे वाटल्यावरून मध्यवर्ती असेंब्लीत ऑगस्ट १९२७ मध्ये एक विधेयक मांडण्यात आले. एखादा माणूस दुसऱ्या धर्माच्या अनुयायांचा धर्म आणि धार्मिक श्रद्धा याबाबत जर अपमान वा निषेधात्मक वागणूक करीत असेल तर त्याला दोन वर्षांच्या तुरुंगवासाची शिक्षा वा दंड वा दोन्हीही देण्यात येईल. या विधेयकाला दोन दिवसांच्या चर्चेनंतर मान्यता देण्यात आली. लहान-मोठे असे २५ वर दंगे उद्‌भवले. मध्यवर्ती असेंब्लीत २९ ऑगस्ट १९२७ रोजी भाषण करताना मागील अठरा महिन्यांत २५० मृत्यू आणि २,५०० जखमी झाल्याचे व्हाईसरॉय लॉर्ड आयर्विन यानी सांगितले. व्हाईसरॉयनी हिंदू-मुसलमान ऐक्य परिषद स्थापन करावी असे सुचविले, पण त्याला प्रतिसाद मिळाला नाही. अ. भा. काँग्रेस कमिटीने त्यात पुढाकार घेतला, आणि २७ ऑक्टोबर १९२७ ला अशी परिषद संघटित केली आणि त्या वेळचे काँग्रेसचे अध्यक्ष श्रीनिवास अय्यंगार यानीच त्याचे उद्‌घाटन केले.

१९१८ पासून मुस्लिम लीग काँग्रेसला धरून वागताना दिसे. पण १९२४ पासून तिची पावले निराळ्या दिशेने पडू लागली. विभक्त मतदारसंघाचे संघराज्य (फेडरेशन) स्थापन करूनच आपला प्रश्न सुटेल असे घोषित करण्यात आले. १९१९ च्या माँटफर्ड सुधारणामुळे राखीव आणि सोपीव अशा पद्धतीमुळे मुसलमानांचे हित होत आहे असाच मुस्लिम-बहुसंख्याक प्रांतानी निर्वाळा दिला. जिना आणि शफी असे लीगमध्ये दोन गट होते.

हिंदू-मुस्लिम ऐक्य परिषदा झाल्या, परंतु त्यांचा काही परिणाम दिसेना. १९२६ च्या डिसेंबरमध्ये स्वामी श्रद्धानंदांचा खून झाला. पंजाब अत्याचारावेळी ' चलाव गोली ' म्हणून छाती उघडी करणारे हे स्वामीजी! त्यांच्या खुनामुळे या प्रश्नाची तीव्रता अधिक वाढली. २० मार्च १९२७ रोजी मध्यवर्ती असेंब्लीचे प्रमुख सदस्य दिल्लीत एकत्र जमले. त्यांनी विभक्त मतदारसंघाऐवजी संयुक्त मतदारसंघ असावेत असा जाहीरनामा काढला. मे १९२७ मध्ये झालेल्या अ. भा. काँग्रेस कमिटीने त्याला मान्यताही दिली. या पायावर हिंदू-मुसलमानांचा समझोता आणि करार होण्याची शक्यता निर्माण झाली होती, असे हे ऐक्याचे प्रयत्न

फलद्रुप होण्याच्या वेळेलाच, त्यांना सुरुंग लावण्यासाठी सायमन कमिशन नेमल्याची घोषणा करण्यात आली.

साम्राज्यशाहीची पिळवणूक चालू ठेवणे, त्यासाठी प्रचलित सामाजिक/आर्थिक संबंधावर, त्यांना वर्गीय लढ्याचे स्वरूप येऊ नये म्हणून धर्माचे आवरण घालणे, धर्माचा बुरखा पांघरणे हे प्रकार सतत चालू असतात. हिंदुस्थानातही तेच झाले. मध्यमवर्गीय जातीयवादी, समाजातील सत्तास्थाने वा नोकऱ्या मिळवण्यासाठी धर्माचा उपयोग करू लागले. बंगाल आणि पंजाबातील हिंदू पुढाऱ्यांमध्ये श्रीमंत जमीनदार, व्यापारी आणि सावकार यांचा भरणा होता. मुसलमान लहान शेतकरी, शेतमजूर आणि ऋणको या स्वरूपातील असतो; उलटपक्षी हिंदू शेतकरी-शेतमजूर असलेल्या भागात मुसलमान जमीनदार असत. 'जातीय' लढ्याचा डांगोरा पिटला जात होता. पण मुस्लिम शेतकऱ्यांचा हिंदू जमीनदारविरोधी, वा मुस्लिम ऋणकोंचा हिंदू सावकाराविरुद्ध किंवा हिंदू कामगारांचा बाहेरून संप फोडण्यासाठी आणलेल्या पठाण संप-फोड्याविरुद्ध लढा चालत असे. याचे वरवर दिसणारे स्वरूप जातीय दिसले, तरी तो वर्गीय लढाच होता. (मुंबईतील कापड गिरणी कामगारांचा १९२८ साली झालेला संप फोडण्यासाठी पठाण लोकांना मुंबईत आणण्यात आले होते.).

**मोपल्यांचे बंड**

मलबारातील मुसलमान स्त्रिया व अरब स्थलांतरित यांची संकर प्रजा म्हणजे मोपले. १९२१ सालच्या ऑगस्ट महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यात मद्रास इलाख्याच्या मलबार जिल्ह्यातील मोपला जातीच्या लोकात भयंकर दंगा पेटला, त्याला बंडाचे स्वरूप प्राप्त झाले. या बंडाचा संबंध खिलाफत वा कॉंग्रेसशी जोडण्यात आलाच. मलबारातील मोपला मुसलमान जवळजवळ दहा लाख होते. हजारात छपन्न लोक ' पढे लिखे ' असायचे. अतिशय धर्मवेडे असे हे लोक. दंगा झाला त्याच्या आधी दोन-तीन महिन्यांपासून स्वयंसेवकाची पथके तयार करण्यात येत होती. ते एकजात गणवेश घालीत असत, व कधी कधी त्या गणवेशावर तलवारीही लटकावीत असत, पुढे ते राष्ट्रद्रोही पत्रके काढू लागले, आणि भाषणे करू लागले.

मोपला हे मुख्यतः शेतकी आणि मासेमारी हे धंदे करणारे. खलिफांचे राज्य प्रस्थापित करण्यासाठी त्यांनी चळवळ करण्यास सुरुवात केली. काही युरोपियनांचे आणि पुष्कळ हिंदूंचेही त्यांनी खून पाडले. मलबारात हिंदू जमीनदार व सावकार होते. काही हिंदूंना जबरदस्तीने इस्लामची दीक्षा देण्यात आली, आणि हिंदू देवळेही भ्रष्ट, उद्ध्वस्त करण्यात आली, या बंडाचा ब्रिटिशांपुढे टिकाव लागला नाही. सैन्याच्या बळावर बंड मोडावे लागले. सौम्य स्वरूपाचा लष्करी कायदाच अंमलात आणावा लागला. " गांधीवाद, खिलाफत आणि असहकारितेच्या प्रचाराचा तो भयानक

परिणाम आहे " असे ॲनी बेझंट यांनी म्हटले (' न्यू इंडिया ' – २९-११-१९२१). खिलाफत पुढाऱ्यांनी मोपला धर्मयुद्ध करीत आहेत म्हणून त्यांच्या अभिनंदनाचे ठराव संमत केले. त्यावेळी हिंदूंमध्ये भीतीची भावना पसरली.

हिंदू जमीनदारांच्या तसेच ब्रिटिश मळेवाल्यांच्या शेतावर राबणारे शेतमजूर म्हणजे हे मोपला. खिलाफत राज्य, स्वराज्य म्हणजे मुस्लिम राज्य या भावनेने पेटून उठलेल्या मोपल्यांनी एका अली मुसलीयार या ७२ वर्षे वयाच्या माणसाला आपला राजा म्हणून घोषित केले. सरकारशी चाललेल्या लढ्यात हिंदूंचा पाठिंबाही त्यांना मिळाला. अलीला पकडल्यावर अहमद हाजी याला त्याच्या जागी नेमण्यात आले. पाच विभाग पाडून सैन्याने बंडखोरांना वेढले. (डिसेंबर १९२१). पुकोट्टूरजवळ पाच तास सैन्य बंडखोरांशी लढत होते. त्यात ४०० मोपला ठार झाले, दोन सैनिकही मारले गेले, पांडिदाद या गावी रात्रीच्या हल्ल्यात सुमारे अडीचशे मोपला मारले गेले. खास गुरखा पलटणीतील ६० सैनिक जखमी झाले. हाजी आणि त्याच्या सहा सहकाऱ्यांना गोळ्या घालून मारण्यात आले. (२०-१-१९२२). तीस हजार मोपला शरण आले. शिक्षा झालेल्या ७० मोपल्यांना गुदमरून प्राण सोडावे लागले. मध्यवर्ती असेंब्लीत यावर चर्चा झाली. त्यावेळी माहिती सांगण्यात आली ती अशी –सैन्यातील ४३ मृत्यू, १२६ जखमी, मोपला-३,२६६ मृत्यू, आणि १,६२५ जखमी. गांधीजी आणि महंमद अली यांना मलबार भागात जाण्यास बंदी करण्यात आली. शांतता आणि सुव्यवस्था याच्या नावाखाली सरकारने फार अत्याचार केले अशा अर्थाचा कॉंग्रेस वर्किंग कमिटीचा ठराव आला. श्री. वि. दा. सावरकरांनी ' मला काय त्याचे? ' अर्थात् ' मलबारातील मोपल्यांचे बंड ' या नावाने लिहिलेले पुस्तक त्या काळात खूपच गाजले. (अधिक तपशील ' Peasant Movements in India ' या डॉ. धनागरे यांच्या पुस्तकात सापडेल.)

### जातीय वळण

हिंदूंचे दारिद्र्य निराळे, मुसलमानांचे निराळे, असे कधी नसते. दारिद्र्य हे हिंदुस्थानचे, तेव्हा दोन्ही जमाती धार्मिक दृष्टींनी विभागण्यात साधत काय असेल तर पिळणुकीच्या पद्धतीचे रक्षण, रजनी पाम दत्त या संदर्भात म्हणतात–-" जनतेच्या हितसंबंधाचे रक्षण आणि व्यापक लोकशाही आंदोलनाच्या पायावर उभारलेल्या जनतेच्या चळवळीची जशी प्रगती होत जाईल, तसे जातीय वैर संपूर्णपणे अखेरचे नाहीसे होईल." (' इंडिया टुडे ').

मद्रास (१९२७) येथील कॉंग्रेसच्या अधिवेशनाचे अध्यक्ष डॉ. अन्सारीनी म्हटले आहे, संयुक्त मतदारसंघ आणि प्रौढ मताधिकार हेच हिंदू मुसलमान आणि शीख यांच्यातील चर्चेचा पाया होऊ शकतील. राष्ट्रीय मुसलमानांना वरील दोन घटक असलेली कोणतीही योजना मान्य होईल. जुलै १९२९ मध्ये अ. भा. नेशनॅलिस्ट मुस्लिम परिषद डॉ. अन्सारींनी संघटित केली. पुढील वर्षी सरहद्द गांधी खान अब्दुल गफारखान यांनी खुदाई खिदमतगार

(यांना लाल डगलेवाले म्हणत) संघटनेची स्थापना केली. काँग्रेसचा महत्त्वाचा घटक आघाडी हा होता. १९२९ मध्ये शिया राजकीय परिषद संघटित झाली, मोमीन १९२३ सालीच संघटित झाली होती, आणि खिलाफतीतूनच निर्माण झालेला अहरार पक्ष राष्ट्रीय चळवळींना पाठिंबाच देत राहिला.

कायदेभंगाचे वातावरण असल्याने व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांनी मध्यवर्ती विधिमंडळाच्या निवडणुका स्थगित केल्या. ते लंडनला जाऊन आले, आणि १९२९च्या ऑक्टोबर अखेरीस त्यांनी जाहीर केले की, सायमन कमिशनचा सर्व पक्षांचे अंतिम अहवाल आल्यानंतर त्यातील योजनासंबंधी जास्तीत जास्त मत एकत्र होण्यासाठी एक गोलमेज परिषद घेण्यात येईल. गांधी आणि मोतीलाल नेहरू यांच्या नेतृत्वाखालील सर्वपक्षीय परिषदेने आयर्विनच्या या घोषणेचे स्वागत करणारे पत्रकच काढले आणि ब्रिटिशांच्या सदिच्छेचे प्रतीक म्हणून सर्व राजकीय बंदिवानांची सुटका करावी, असे आवाहन केले. जवाहरलाल नेहरू आणि सुभाषबाबू यांनी गांधी, मोतीलाल यांच्याविरोधी कोणतीही तडजोड न स्वीकारता लढा करावा असे पत्रक काढण्याची योजना तयार केली होती, पण नेहरूंनी गांधीजींच्या निवेदनावर स्वाक्षरी केली. अखेरच्या क्षणी गांधीजींनी नेहरू-सुभाष यांच्या पूर्ण स्वराज्यासंबंधी तडजोडवादी भूमिका स्वीकारली. ३० डिसेंबर १९२९ रोजी काँग्रेसने एक प्रस्ताव संमत केला. लॉर्ड आयर्विन यांची भूमिका लक्षात घेता काँग्रेसने गोलमेज परिषदेत भाग घेऊन काही फायदा होणार नव्हता. नेहरू अहवालही आता कालबाह्य झाला असल्याने संपूर्ण स्वातंत्र्यासाठी मोहीम उभारण्याची आवश्यकता निर्माण झाली असल्याचे घोषित करण्यात आले. मे १९२८ मध्ये नेहरू रिपोर्ट बाहेर आला. ' जातीवादाने निर्माण केलेल्या अडचणींना तोंड देण्यासाठी केलेला अतिशय प्रामाणिक प्रयत्न ' असे त्याबद्दल म्हटले जाई. या प्रयत्नाने जातीय प्रश्न सुटण्याऐवजी अधिकच तीव्र बनला; कारण त्यातील शिफारशीमुळे मुसलमानांचे समाधान झाले नाही, आणि सर्वपक्षीय परिषदेमध्ये जिनांनी सुचविलेल्या दुरुस्त्या जयकर आदी हिंदू पुढाऱ्यांनी स्वीकारल्या नाहीत. जिनांनी सुचविलेल्या योजनांमुळे जिनांची लोकप्रियता कमी झाली; त्याचा परिणाम म्हणजे १ जानेवारी १९२९ ला दिल्ली येथे मुस्लिम परिषदेवर अल्ली बंधू यांच्यासारखे जातीयवादी आणि शफी यांचे वर्चस्व प्रस्थापित झाले. नेहरू रिपोर्ट अमान्य करण्यात आला. जातीयवाद्यांना जिनांना त्यांच्या बाजूला वळवण्यात यश आले. ' हिंदू-मुस्लिम ऐक्याचा वकील ' असे जिना जात्यंध मुसलमानांचे मुखंड बनले आणि त्यांनी चौदा मागण्या पुढे आणल्या. संयुक्त मतदारसंघ, संघराज्य आणि बलिष्ठ केंद्र ही मूलभूत तत्त्वे असलेला नेहरू रिपोर्ट त्यांनी ठोकरला. जिनांच्या चौदा मागण्या ह्या त्यांच्या राजकारणातील खास डाव होता. त्यांच्या सत्तासंपादनाच्या लढ्याची ती नांदीच होती.

मुस्लिम लीगच्या छायेत असणारे राष्ट्रवादी मुसलमान नॅशनल मुस्लिम पार्टीकडे आले. (जुलै १९२९). मुस्लिम लीग काँग्रेसपासून पूर्णपणे दुरावली, ' मुस्लिमांसाठी स्वतंत्र देश ' असा नारा देऊ लागली, आणि सर्व पक्षांनी स्वीकारली जाईल अशी घटना तयार करण्यासाठी चाललेले प्रयत्न विफल झाले.

सर्वपक्षीय परिषदेपुढे (डिसेंबर १९२८) नेहरू रिपोर्ट चर्चेसाठी आला. डॉ. अन्सारी अध्यक्ष होते. अल्पसंख्याकांसाठी असलेल्या खास संरक्षक तरतुदीसंबंधीची त्यांना कल्पना होती. ' अल्पसंख्याकांना खरे संरक्षण म्हणजे बहुसंख्याकांची सदिच्छा ' असे त्यांनी राष्ट्रसंघाच्या एका समितीच्या अहवालातून उद्धृत करून सांगितले. अधिक विशद करताना ते म्हणाले, ''बहुसंख्यांकडून जास्तीत जास्त विशेषाधिकार मिळविण्याने अल्पसंख्यातकांचा दर्जा ठरत नसतो आणि त्यांचे कल्याण होत नसते; तर ' देशाभिमान, समाजाकरिता वा राष्ट्राकरिता काम करण्याची भावना आणि राष्ट्रनिष्ठा ' यावर ते ठरते. ''

जिनांनी नेहरू रिपोर्ट मान्य केला नाहीच. त्यांनी केंद्रात मुसलमानांना एकतृतीयांश प्रतिनिधी असावेत, आणि शेषाधिकार प्रांतांकडे असावेत अशी मागणी केली. ना. आगाखान हे सर्वपक्षीय मुस्लिम परिषदेच्या अध्यक्षस्थानी होते. ३१ डिसेंबर १९२८ ला ही परिषद दिल्लीला सुरू झाली.

अशा रीतीने सर्वपक्षीय तसेच अल्पसंख्यांकांना मान्य असा राजकीय तोडगा निघू शकला नाही. आगामी लढ्याला या सर्व प्रश्नांना तोंड द्यायचे होते.

## संदर्भ

(१) B. B. Misra, ' Political Parties of India ', p. 4. 5.

(२) प्रेमा कंटक, ' सत्याग्रही महाराष्ट्र ', पृ. २४०-२६०.

(३) शंकरराव मोरे, ' केसरी ', ८-५-६०.

(४) India, 1923-24, G.O.I. Publication, p. 5873.

# ५. घटनात्मक पवित्रे

२० ऑगस्ट १९१७ रोजी भारतमंत्री मॉंटेग्यू यांनी पार्लमेंटात प्रथमच घोषणा केली, आणि जबाबदार पद्धतीचे सरकार भारतात प्रस्थापित करणे हे भारतीय राजकीय सुधारणेचे धोरण असल्याचे सांगितले, ते क्रमाक्रमाने प्रगमनशील असले पाहिजे आणि प्रशासनाच्या प्रत्येक विभागात स्वयंशासित संस्थांचा काळजीपूर्वक विचार करून ते प्रत्यक्षात आले पाहिजे. प्रत्यक्षात मात्र परिणामकारक सत्ता ब्रिटिश हितसंबंधियांच्या हातात राहणार होती. या घोषणेने मॉंटेग्यूने मवाळांना वश केले, पण तो जहालांना वश करू शकला नाही. राष्ट्राच्या मागणीपेक्षा त्या सुधारणा अपुऱ्या होत्या. प्रांतात दुहेरी सरकार येणार होते.

गव्हर्नर-जनरल आणि त्याचे कार्यकारी मंडळ यावर विधिमंडळाची सत्ता नव्हती, हाच त्या सुधारणांचा निराशाजनक असा भाग होता. त्याच वेळी सर्व प्रांतांवर गव्हर्नर-जनरलचा निरंकुश अंमल होता. मतदारसंघ अत्यंत मर्यादित असल्याने खऱ्या अर्थाने त्यांना लोकशाही असे म्हणणे हास्यास्पद होते. प्रागतिकांनी/मवाळांनी मॉंटेग्यू अहवालाचे स्वागत केले, पण टिळकांनी त्या सुधारणा ' संपूर्ण त्याज्य ' असल्याचे घोषित केले. तर ' निराशाजनक आणि असमाधानकारक' असल्याबद्दल कॉंग्रेसने ठराव केला, आणि प्रांतिक स्वायत्ततेची मागणी केली.

१८ फेब्रुवारी १९२४ ला मध्यवर्ती असेंब्लीत एक प्रस्ताव मान्य झाला, त्याचा आशय असा –स्वतंत्र हिंदुस्थानचा घटनेचा मसुदा तयार करण्यासाठी एक गोलमेज परिषद भरवावी. निवडणुका घेणे व मध्यवर्ती विधिमंडळातून ती मान्य करून घेणे हे तिचे काम राहील याला पार्लमेंटची मान्यता पाहिजे. हा प्रस्ताव मोतीलाल नेहरूंनी मांडला होता. लोकनियुक्त नेत्यांनी याबाबत खूप हालचाली केल्या, पण सरकार थंडच राहिले.

**सायमन कमिशन**

१९१९चा कायदा आणि त्याची प्रत्यक्ष कार्यवाही कशी चालली आहे, तसेच '' सरकारच्या कार्यपद्धतीची चौकशी करणे, शिक्षणाचा प्रसार, ब्रिटिश हिंदुस्थानातील प्रातिनिधिक संस्थांचा विकास याबाबत चौकशी करणे '' यासाठी सर जॉन सायमन यांच्या अध्यक्षतेखाली ब्रिटिश सरकारने एक कमिशन नेमले (७ नोव्हेंबर १९२७). '' हिंदुस्थानात जबाबदार राज्यपद्धती सुरू करावी काय, तिची व्याप्ती किती असावी, तिचा विस्तार कसा व्हावा, तसेच तीत सुधारणा कशा कराव्यात, वा तिचे नियंत्रण कसे करावे '' याबाबत कमिशनला अहवाल सादर करावयाचा होता. या कमिशनवर कोणाही हिंदी माणसाची नियुक्ती नव्हती. भारताला स्वराज्य पाहिजे, आमची घटना आम्हीच तयार करणार ही राष्ट्रीय भावना होती. ही व्यक्त करण्यासाठी बनारस येथे डॉ. अन्सारी यांच्या अध्यक्षतेखाली एक सर्वपक्षीय सभा भरली, आणि सर्वानुमते कमिशनवर बहिष्कार घालण्याचा ठराव मंजूर झाला.

वास्तविक हे कमिशन दोन वर्षे आधीच नेमले गेले. १९१९च्या घटना कायद्याप्रमाणे असे कमिशन दर दहा वर्षांनी नेमण्याची तरतूद होती. १९२९च्या ब्रिटिश पार्लमेंटच्या निवडणुकीत मजूर पक्ष अधिकारावर येईल, आणि नेमलेले कमिशन भारतीय लोकशाहीला पोषक होईल अशा कल्पनेने लॉर्ड बर्कनहेडनी हे कमिशन नेमण्याची घाई केली. भारताची भावी घटना देशातील निरनिराळ्या राजकीय पक्षांच्या प्रतिनिधींची गोलमेज परिषद भरवून ठरवावी असा ठराव मध्यवर्ती असेंब्लीने केला होता. सायमन कमिशनची नेमणूक हा त्या ठरावाचा अधिक्षेपच आहे असे सर्वांना वाटले. याचा परिणाम म्हणजे प्रागतिक पक्षापासून मुस्लिम लीगपर्यंत सर्व पक्षांनी या कमिशनवर बहिष्कार घालण्याचा ठराव केला. डॉ. अन्सारी यांना लिहिलेल्या पत्रात (४-१२-२७) बॅ. बॅप्टिस्टांनी म्हटले आहे. '' सायमन कमिशनवरील बहिष्कारामुळे भारतीय लोकशाहीची प्रगती खुंटेल व सायमन कमिशन आणि ब्रिटिश सरकार द्विदल राज्यपद्धतीच्या अवशेषावर एकाधिकारशाहीची प्रस्थापना करील अशी मला भीती वाटते.'' सर्वपक्षीय मुस्लिम परिषदेच्या कार्यकारी मंडळाने सायमन कमिशनचा धिक्कार केला, कारण ' दिल्ली येथे झालेल्या सर्वपक्षीय मुस्लिम परिषदेच्या मागण्या त्यात मान्य झाल्या नाहीत, शिवाय ते प्रतिगामी स्वरूपाचे आहे.' मुंबईचे ' बॉंबे क्रॉनिकल ' हे राष्ट्रीय कॉंग्रेसचे मुखपत्रच. ' उद्दाम साम्राज्यवादी भारतातील दुहीचा फायदा उठवून अपमानित अशी घटना भारतावर अप्रामाणिकपणे लादीत आहेत ' या शब्दात त्या पत्राने सायमन कमिशनची संभावना केली आहे. कमिशनवर भारतीय प्रतिनिधी न घेणे हा देशाचा अपमानच असल्याची तीव्र भावना भारतात होती. यामुळे पूर्वी कधीही एकत्र न आलेले सर्व राजकीय पक्ष या कमिशनवर बहिष्कार घालण्यासाठी एकत्र आले. दिनशा वाच्छासारख्या पुढाऱ्यांनी कमिशनविरोधी जाहीरनामा स्वतःच्या स्वाक्षऱ्या घालून काढला. सर तेज बहादूर सप्रू यांच्यासारख्या व्यवहारी आणि समतोल अशा पुढाऱ्यांची सहानुभूती कमिशनला राखता आली नाही. मध्यवर्ती विधिमंडळात लाला लजपतराय यांनी हिंदुस्थानच्या खजिन्यातून एकही पैसा खर्च करू नये असा ठराव मांडला आणि तो संमत झाला.

## जनतेची लढाऊ निदर्शने

हे कमिशन जेव्हा भारतात येईल तेव्हा जनतेने त्याविरुद्ध उग्र निदर्शने करावीत, आणि जागृत लोकमत त्यांना दाखवावे, असा कॉंग्रेसच्या मद्रास अधिवेशनात (डिसेंबर १९२७) आदेश देण्यात आला. संपूर्ण स्वातंत्र्य हे भारताचे ध्येय असल्याचा पुकारा त्या अधिवेशनात करण्यात आला.

कमिशनबाबत घोषणा करताना व्हाईसरॉय लॉर्ड आयर्विन यानी मध्यवर्ती विधिमंडळातील लोकनियुक्त सदस्यांची एक संयुक्त निवड-समिती नेमावी, आणि त्या समितीने लोकांच्या साक्षी घ्याव्यात असे सुचविले, पण जागृत लोकमत त्याविरुद्ध होते, कारण हे कमिशन भारताचा स्वयंनिर्णयाचा हक्क डावलूनच नेमण्यात आले होते.

३ फेब्रुवारी १९२८ रोजी कमिशन मुंबईस आले. त्या दिवशी देशभर हरताळ पाळूनच कमिशनवरील बहिष्काराची नांदी झाली. लहानमोठ्या शहरांत ' सायमन परत जा ' अशा तऱ्हेच्या कापडफलकावर जाहिरातीत, झेंड्यावरील घोषणानीच कमिशनचे जनतेने स्वागत केले. कॉ. मिरजकर यांनी सर जॉन सायमन यांना पत्र पाठवून जनतेचा क्षोभच नोंदविला. ते म्हणतात, " संपूर्ण स्वातंत्र्य मिळविण्याचा क्रांतिकारक भारतीय जनतेचा निर्धार आहे. शोषक ब्रिटिशांची या देशात इतःपर जरुरी नाही, म्हणून कोणत्याही चौकशीची आवश्यकता नाही, तेव्हा हा तमाशा बंद करून आपण इंग्लंडला परत जावे. तुमच्याशी सहकार्य करण्यास पुढे आलेले लोक देशद्रोही आणि जनतेचे शत्रू आहेत. वेळ येताच त्यांचा योग्य तो निकाल लावता येईल. ' ब्रिटिश साम्राज्यशाही मुर्दाबाद ' ही आज जनतेची घोषणा आहे....तुमचे कमिशन हे चोरांचे एक टोळके आहे."[१] मद्रासची जस्टिस पार्टी, काही मुस्लिम संघटना, डॉ. आंबेडकर यांनी कमिशनबरोबर सहकार्य करण्याचा पवित्रा घेतला होता.

कमिशनवरील बहिष्कार सार्वत्रिक आणि प्रखर होऊ लागला. त्यामुळे सरकारचे डोके ठिकाणावर राहिले नाही. अनेक ठिकाणी निदर्शनावर लाठीहल्ले झाले. पंजाबकेसरी लाला लजपतराय यांच्या छातीवर लाठीचे तडाखे बसले. त्यातच या ६४ वर्षे वयाच्या पुढाऱ्याचा शोचनीय अंत झाला. (१९ नोव्हेंबर १९२८). सर्व राष्ट्र खवळून उठले. जवाहरलाल नेहरूंवरील लाठी गोविंद वल्लभ पंतानी मानेवर घेतली, त्यामुळे त्यांच्या मानेला कंप निर्माण झाला. असे अत्याचार देशभर होतच होते; पण सरकारने त्यांची चौकशी करण्याचे नाकारले.

६ फेब्रुवारीला कमिशनने व्हाईसरॉय आयर्विन यास पत्र पाठवून कमिशनचे सात सभासद आणि मध्यवर्ती विधिमंडळाचे सात सभासद यांची संयुक्त परिषद बोलावण्याची सूचना केली. प्रांतिक विधिमंडळांनी तशाच स्वरूपाची समिती तयार करावी अशीही सूचना केली, पण त्याला काहीही प्रतिसाद मिळाला नाही. मध्यवर्ती विधिमंडळातील लोकप्रतिनिधींनी त्याची दखलही घेतली नाही.

समाजवादी विचारसरणीचे कार्यकर्ते आणि पुढारी या सायमन बहिष्काराच्या चळवळीच्या अग्रभागी होते. कामगारांनी त्यात भाग घेतल्याने १९२८-२९च्या राष्ट्रीय चळवळीला नवीनच उधाण आले. ' सायमन परत जा ' या घोषणेने विद्यार्थिवर्गाचे संघ व नंतर त्यांचे फेडरेशन उभे राहिले. राष्ट्रीय लढ्यात उतरलेल्या या वर्गाने विद्यार्थ्यात समाजवादी विचार प्रसृत करण्यास प्रारंभ केला. मोठमोठ्या शहरातून कामगारांच्या संपाची लाट उसळली.

मद्रास काँग्रेसने (१९२७) सायमन कमिशनवर बहिष्कार घालण्याचा आदेश दिला, इतकेच नव्हे तर साम्राज्यवादविरोधी संघाशी (लीग अगेन्स्ट इंपीरियालिझम) तसेच आपल्या मुक्ततेसाठी करीत असलेल्या लढ्यात चिनी जनतेशी संबंध दृढ करणे, आणि स्वतंत्र भारताची घटना तयार करणे असेही आदेश दिले होते. मद्रास काँग्रेसचे अध्यक्ष डॉ. अन्सारी

यांनी विधिमंडळातील कामावर कडक टीका करून असहकार आंदोलनाच्या काळाप्रमाणे कार्य करण्याचे आवाहन केले.

कामगार शेतकरी पक्ष हा एक संघटित असा गट काम करीत होता. समाजवादी विचारांनी भारलेले नवीन तरुण यात अग्रभागी होते. कॉ. मिरजकर, जोगळेकर इत्यादी कामगार कार्यकर्ते आघाडीवर होते. सायमन कमिशनच्या संदर्भात काढलेल्या प्रकटनात (मॅनिफेस्टो) म्हटले आहे, '' सायमन कमिशनवरील हा बहिष्कार केवळ संसदीय निदर्शन म्हणून राहता कामा नये. स्वराज्य संपादनाच्या अंतिम लढ्यात त्याचे पर्यवसान झाले पाहिजे. यासाठी काँग्रेस ही जनतेची झाली पाहिजे. तिने राष्ट्रीय घटनासमिती बोलवावी. तिने संपूर्ण राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि प्रत्येक बाबतीत राष्ट्रीय जीवनाचे लोकशाहीकरण याची हमी द्यावी. यासाठी आपली घोषणा ' जमीन, भाकरी आणि शिक्षण ' ही असली पाहिजे.[२] २९ जानेवारी १९२८च्या ठरावात ३ फेब्रुवारी रोजी हरताळ पाळून निदर्शने करण्याचा आदेश दिला. त्यात ' साम्राज्यशाही व सायमन कमिशन मुर्दाबाद, राष्ट्रीय स्वातंत्र्य, राष्ट्रीय घटना समिती, प्रौढ मतदान, जीवनवेतन, आठ तासांचा दिवस, कसणारांना जमीन ' या प्रमुख घोषणा द्याव्यात असे पत्रक कॉ. मिरजकर, निमकर यांनी काढले. तसेच सर्वपक्षीय बहिष्कार समितीशी सहकार्य करण्याचे आवाहनही केले. या समितीवर कम्युनिस्ट पक्षातर्फे मिरजकर व निमकर यांना नेमण्यात आले. चिमणलाल सेटलवाड हे अध्यक्ष व सरोजिनी नायडू या समितीच्या कार्यवाह होत्या. अशा तऱ्हेचे कमिशन नेमण्याचा ब्रिटिश पार्लमेंटला अधिकारच नाही ही कामगार शेतकरी पक्षाची भूमिका होती, आणि त्याने हा दृष्टिकोन या आंदोलनात अखेरपर्यंत ठेवला. कामगारवर्गात ही जागृती होत आहे हे पाहिल्यावर भांडवलदारवर्गात घबराट उत्पन्न झाली. ऑक्टोबर १९२८ मध्ये कमिशन नेमण्याच्या वेळी बहिष्कार उठवावा अशा हालचाली चालू झाल्या. जागृत जनतेची त्यांना भीती वाटत होती हेच त्याचे कारण ! राष्ट्रीय बहिष्काराबरोबरच मुंबईतील व इतर औद्योगिक शहरातील कामगारांनी साथ द्यावी असा कामगार शेतकरी पक्षाने प्रयत्न केला. काळे झेंडे घेऊन विद्यार्थी व युवक या मोर्चात समाविष्ट झाले. सायमन बहिष्कारावर टीका आलेल्या ' टाइम्स ' च्या अंकाची होळी करण्यात आली.

१ मे १९२७. मुंबईत साजरा झालेला पहिलाच कामगार दिन. त्यानंतरचा प्रचंड मोर्चा म्हणजे सायमन कमिशन मुंबईत आले त्याच्या निषेधार्थ निघालेला ५०-६० हजारांचा तो मोर्चा होता. कामगारांचा या मोर्चात प्रचंड सहभाग होता. लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर इतके प्रचंड निदर्शन मुंबईत झाले नव्हते. सायमन सप्तक प्रतिनिधी मंडळाचे, गवत आणि फटाक्यांनी भरलेले पुतळे सभेच्या शेवटी निषेधांच्या गर्जनात कामगारांनी जाळले. कामगारांनी फार मोठ्या प्रमाणात भाग घेतलेले हे मुंबईतील पहिलेच निदर्शन होय.

या सभेत झाबवाला, निमकर आणि मिरजकर यांची भाषणे झाली.[३] अशाच प्रकारची निदर्शने सर्व महाराष्ट्रभर झाली.

काँग्रेसच्या मद्रास अधिवेशनात जहालांचे दडपण आले त्यामुळे संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव संमत झाला. कामगार शेतकरी पक्ष हा काँग्रेसमधील डावा विचार मांडीत होता. नेहरू-सुभाष हे तरुणांचे पुढारी होते. जवाहरलाल सोव्हिएत रशियाचा दौरा करून आल्यापासून समाजवादाचा उघड प्रचार करू लागले. ' लीग अगेन्स्ट इंपीरिॲलिझम 'शी त्यांनी उघड संबंध ठेवले होते. अशा परिस्थितीत ' सायमन परत जा ' हे आंदोलन म्हणजे साम्राज्यविरोधी लढ्याचे पुढचे पाऊलच ठरले. त्यायोगे राष्ट्रीय चळवळीतील साम्राज्यविरोधी शक्ती बळकट होण्याची क्रिया वेगाने चालू झाली.

## कलकत्ता काँग्रेस

स्वराज्य पक्षाच्या रूपाने काँग्रेसमधील संसदीय आघाडी आगेकूच करीत होती, तरी जवाहरलाल नेहरू व सुभाष बोस यांच्या नेतृत्वाखालील काँग्रेसमधील डावे गट अधिक संघटित होण्याचा प्रयास करीत होते. साम्राज्यवाद आणि वसाहतवाद यांच्याविरोधी व राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या बाजूने असणाऱ्या आंतरराष्ट्रीय परिषदेच्या ब्रुसेल्स अधिवेशनाला १९२७ मध्ये जवाहरलाल नेहरू प्रतिनिधी म्हणून गेले होते, त्यांनी त्या परिषदेचा अहवाल काँग्रेसला दिला आणि अ. भा. काँ. कमिटीने नेहरूंच्या या कामाबद्दल त्यांची प्रशंसा केली; साम्राज्यवाद व वसाहतवादविरोधी परिषद करीत असलेल्या कामाबद्दल तिला धन्यवाद दिले आणि काँग्रेसची सहकारी संस्था म्हणून तिला मान्यता द्यावी असा ठराव केला. स्वातंत्र्यासाठी चिनी जनतेला पाठिंबा देण्यात आला आणि चीनला सरकार सैन्य पाठवीत असल्याबद्दल सरकारचा धिक्कार केला.

मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या कलकत्ता (१९२८) काँग्रेसने खालीलप्रमाणे ठराव केला; जर १९२९ च्या अखेरपर्यंत सरकारने नेहरू अहवालाचा स्वीकार केला नाही तर काँग्रेस सविनय कायदेभंगाची देशाला हाक देईल. जवाहरलाल नेहरू व सुभाष बोस हे काँग्रेसचे दोन सेक्रेटरी. मद्रास (१९२७) काँग्रेसने स्वीकारलेला संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव अमलात आणण्याची निकड त्या दोन डाव्या विचारसरणीच्या नेत्यांनी प्रतिपादन केली. कलकत्ता काँग्रेसचे वैशिष्ट्य म्हणजे सहानुभूतीचे, अभिनंदनाचे आणि पाठिंब्याचे आलेले संदेश. त्यात डॉ. सन-अत-सेन, रोमाँ रोलाँ, अमेरिकेला गेलेल्या सरोजिनी नायडू यांसारख्या थोर व्यक्ती होत्या, तसेच पर्शियन सोशॅलिस्ट पार्टी, न्यूझीलंडची कम्युनिस्ट पार्टी, मानवी हक्कांचा संघ अशा संस्थांही होत्या. अ. भा. काँ. कमिटीने परदेशस्थ व्यक्तींशी संबंध ठेवण्यासाठी परदेश खाते काढण्याची सूचना केली. अखिल आशियायी राष्ट्रांच्या संघराज्याची कल्पनाही काहींनी मांडली. साम्राज्यविरोधी

संघाच्या दुसऱ्या अधिवेशनाचे स्वागत करण्यात आले. बारडोली लढ्यात वल्लभभाईंनी जे यशस्वी पुढारीपण केले, त्याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

मद्रास काँग्रेस (१९२७) मध्ये डाव्या गटाचा विजय हा दिखाऊ होता; त्याला प्रखर विरोध नव्हता. सायमन कमिशनविरोधी यशस्वी निदर्शने, १९२८ सालात उठलेली संपाची लाट, नवीन स्थापन झालेल्या स्वातंत्र्य संघ (Independence League), विद्यार्थी व तरुणांच्या संघटनात झालेली वाढ, यामुळे काँग्रेसच्या तडजोडवादी पुढारीपणाला काँग्रेसमधील डावे गट संघटित होत असून आज ना उद्या ते संपूर्ण काँग्रेसचा कब्जा करतील असे वाटू लागले.

**नेहरू अहवाल**

हा नेहरू अहवाल म्हणजे काँग्रेसमधील व काँग्रेसबाहेरील प्रतिगामी शक्तींनी वाढत्या क्रांतिकारक शक्ती पाहून केलेला एक बनाव होता. ब्रिटिश साम्राज्यांतर्गत स्वराज्य हा त्याचा पाया होता, संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी त्यांनी केव्हाच बाजूला सारली होती.

नेहरू अहवालाचा विचार करण्याकरिता दिल्ली येथे १२ फेब्रुवारी १९२८ रोजी सर्वपक्षीय सभा आयोजित करण्यात आली होती. अ. भा. ट्रेड युनियन काँग्रेस (आयटक), कामगार शेतकरी पक्ष , कामगारांचे प्रतिनिधी म्हणून कम्युनिस्ट पक्ष यांच्या प्रतिनिधींना आमंत्रणे पाठविण्यात आली होती. कामगार शेतकरी पक्षाने सर्वपक्षीय परिषदेला उद्देशून एक प्रकटन काढले. आयटकने भारतासाठी कमगारांची घटना तयार करण्याकरिता एक उपसमिती नेमली. पी. स्प्रॅट त्याचे निमंत्रक होते. कामगारांचे ध्येय म्हणजे समाजवादाची प्रस्थापना अशी स्थिती असल्याने कामगार घटना म्हणजे, स्वतंत्र लोकशाही समाजवादी गणराज्याचीच घटना होय असे त्यानी सांगितले. ' कामगार आणि स्वराज्य ' या पत्रकात, आयटक राजकीय लढ्यापासून अलिप्त राहावी असे स्प्रॅट यानी प्रतिपादन केले. कामगार शेतकरी पक्षाचे प्रतिनिधी होते कॉ. डांगे. ही सर्वपक्षीय परिषद हा निव्वळ देखावा असून प्रौढ मतदानाने निवडलेली घटना समितीच घटना तयार करण्याला योग्य होय असे प्रतिपादन कॉ. डांगे यांनी १९ मार्च १९२८ च्या सभेत केले. ब्रिटिश राज्यकर्त्यांपासून सत्तांतर होणे हा मध्यवर्ती प्रश्न असल्याचे कामगार शेतकरी पक्षाने स्पष्ट केले. अहवालाचा उद्देशच त्याज्य ठरवून, देशात सायमन कमिशनविरोधात जी साम्राज्यवादविरोधी लढाई जागृत झाली आहे तिचा द्रोह करून, तसेच मद्रास अधिवेशनात जो संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव संमत झाला आहे त्यापासून काँग्रेस दूर जात असल्याचे का. शे. पक्षाने घोषित केले. जातीय वादावरील तोडगा, कामगारवर्ग आणि इतर कष्टकरी जनतेने साम्राज्यविरोधी, तसेच सरंजामशाही आणि भांडवलशाही शोषणाविरुद्ध केलेल्या संयुक्त लढ्यात निघू शकेल हे आयटक आणि का. शे. पक्षाच्या दस्तऐवजावरून दिसून येते.

नेहरू अहवाल तयार करताना काँग्रेसचे उद्देश बाजूला सारले जात आहेत याबद्दल जवाहरलाल अस्वस्थ होते. स्वातंत्र्यप्राप्तीच्या ध्येयाला अप्रतिष्ठा आणणाऱ्या कोणत्याही गोष्टीशी संबंध न ठेवण्याचा त्यांनी व त्यांच्या पाठीराख्यांनी निर्णय घेतला. ते म्हणाले, '' महाप्रचंड निमसरंजामदारी इस्टेटीमधील मालमत्तेचा हक्क हा राज्यघटनेचा एक अबाधित पाया असावा हा मला गुन्हा वाटतो '' काँग्रेस समाजातील '' आहेरे '' गटाशी हातमिळवणी करीत होती, हे पाहून जवाहरलालनी काँग्रेसच्या सरचिटणीस पदाचा राजीनामा सादर केला. त्यांनी व सुभाष बोस यांनी ' स्वतंत्र भारत संघ '' (Independence of India League) स्थापन केला. काँग्रेस नेतृत्वाने राजीनामा स्वीकारला नाही. काँग्रेस पक्षाचे सदस्य राहूनही ते स्वतंत्र भारत संघाचे काम करू शकतील असे जवाहर-सुभाष यांना सांगण्यात आले.

काँग्रेस पक्षात राहून नेहरूंनी स्वतंत्र भारत संघाच्या कामावर आपले लक्ष एकवटले. ' सबंध हिंदुस्थानभर भक्कम संघटना उभारायची आणि स्वातंत्र्याच्या व समाजवादाच्या प्रचारासाठी तिचा वापर करायचा ' असा त्यांचा इरादा होता. सामाजिक लोकशाहीवादी राज्यासाठी व उत्पादनाच्या साधनांवर आणि वाटपावर सरकारी नियंत्रण आणण्यासाठी लढा देण्याचा त्यांचा उद्देश होता. काँग्रेसमधील डावा गट दुहेरी डावपेच लढवीत होता. सर्वपक्षीय परिषदेला सर्वसाधारण पाठिंबा, पण वसाहतीच्या स्वराज्याबाबत मात्र तीव्र नापसंती-विरोध सर्वपक्षीय परिषदेला कॉ. मिरजकर यांनी पत्र पाठवून सार्वत्रिक प्रौढ मतदानावर आधारित अशी राष्ट्रीय घटनासमिती बोलवावी अशी विनंती केली होती.

भारताच्या संपूर्ण स्वातंत्र्याच्या मागणीला स्वतंत्र मजूर पक्ष (Independent Labour Party) बांधला गेल्यानंतर फेनर ब्रॉक्वे यांनी मजूर आणि सोशॅलिस्ट इंटरनॅशनल यानी वासाहतिक प्रश्नासंबंधी धोरण ठरवावे असा प्रयत्न केला. मंद गतीने हे काम चालले होते. कम्युनिस्टांनी पुढाकार घेऊन ' लीग अगेन्स्ट इंपीरिॲलिझम ' फेब्रुवारी १९२७ मध्ये स्थापन केली. ब्रुसेल्स येथे भरलेल्या परिषदेला जवाहरलाल काँग्रेसचे प्रतिनिधी म्हणून हजर होतेच. लेन्सबरी, ब्रॉक्वे इत्यादी मजूर पुढाऱ्यांनी १९२९ पर्यंत या लीगशी संबंध ठेवले होते. सोशॅलिस्ट इंटरनॅशनलच्या ध्येय-धोरणाशी विरोधी अशा संस्थेशी संबंध ठेवला या आरोपाला उत्तर देताना, ब्रिटनमधील डावे साम्राज्यविरोधी आहेत अशी भारतीयांची खात्री पटावी यासाठी हे आवश्यक असल्याचा खुलासा ब्रॉक्वे यांनी केला.[४]

## डाव्यांची निदर्शने

अशा रीतीने संपूर्ण स्वातंत्र्याच्या मागणीतील सार्वत्रिक पाठिंबा मिळावा, वसाहतीच्या दर्जाचे स्वराज्य हे ध्येय नसून संपूर्ण स्वातंत्र्य स्वराज्य हे ध्येय हे असल्याचे, तसेच त्याच बाबतीत नेहरू अहवाल आम्हाला मान्य नाही अशा तऱ्हेचे पत्रक जवाहरलाल, सुभाष व

श्रीनिवास अय्यंगार या काँग्रेसमधील डाव्यानी काढले. मोतीलाल, सप्रू, जिना किंवा बेझंट यांच्याशी चर्चा न करता गांधीजींनी डाव्यांना आश्वासन दिले की जर डिसेंबर १९२९ अखेर वसाहतीचे स्वराज्य मिळाले नाही, तर आपण संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी करू.

कलकत्ता काँग्रेस आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीसाठी लक्षात राहील–ती म्हणजे कलकत्त्याच्या आसमंतातील सुमारे ५० हजार कामगार काँग्रेस मैदानावर आले, शिस्तबद्ध रीतीने राष्ट्रीय झेंड्याला प्रणाम केला, अधिवेशनाच्या मंडपाचा दोन तास ताबा घेतला, राष्ट्रीय स्वातंत्र्याचा ठराव संमत केला, आणि शांततेने मंडपातून गेले. त्यानी ' भारतीय स्वातंत्र्य ' आणि ' भारताचे स्वतंत्र समाजवादी गणराज्य ' याबाबत घोषणा दिल्या. कामगार शेतकरी पक्षाच्या कार्यकर्त्यांनी हे निदर्शन संघटित केले होते. सोहनासिंग जोश परिषदेच्या अध्यक्षस्थानी होते.

नेहरू अहवालाबाबत कॉ. जोगळेकर म्हणाले, " चालू काळात (सध्या) शेकडा ९९ टक्के लोक ज्या पिळवणुकीखाली पिचून निघत आहेत, ती पिळवणूक या अहवालाने कायमच ठेवली आहे. पंडितजींनी आणि गांधीजींनी मागील काळात देशासाठी अमोल सेवा केली आहे, पण देश हा त्यांच्यापेक्षा मोठा आहे. ज्याला काही जाणीव आहे, असा माणूस गांधींना मत देणार नाही. वसाहतीचे स्वराज्य स्वीकारल्याने मृत्यूचा परवानाच आम्ही काढला आहे. [५] "

मुख्य ठरावाला उपसूचना सुचविताना कॉ. निमकर म्हणाले " हा अहवाल असमाधानकारक म्हणून त्याज्य आहे. . .संपूर्ण राष्ट्रीय स्वातंत्र्य हे ध्येय असल्याचे ही काँग्रेस घोषित करते. हे स्वातंत्र्य सामाजिक, आर्थिक आणि राजकीय समतेवर आधारलेले आणि ब्रिटिश साम्राज्यापासून मुक्त असेल. [६] "

## संदर्भ

(१) कॉ. मिरजकर, ' अंधारातून प्रकाशाकडे ' पृ. ५४.
(२) Dr. Adhikari, C.P.I. Documents, p. 306
(३) कॉ. मिरजकर, पूर्वोक्त, पृ. ५२.
(४) सुभाष बोस, ' Indian Struggle ' p. 181.
(५) Mitra, Annual Register, 1928, p. 365.
(६) Ibid, p. 235.

# ६. प्रभावी घटना

१९०५ ते १९०८ या काळात झालेल्या 'स्वदेशी बहिष्कार ' या चळवळीत स्वातंत्र्यलढ्याची एक आगळीच लाट पहायला मिळाली. जनतेत जागृती होत होती. त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांनी लिहिलेल्या एका अहवालात झारची दडपशाही आणि तशाच प्रकारची भारतातील राजवट यांच्या धोक्याबाबत तुलना करण्यात आली होती. १९०८ साली लोकमान्य टिळकांना झालेल्या अमानुष शिक्षेबाबत लेनिननेही ' युरोपातील वर्गजागृत कामगारांना आता आशियातही सहकारी मिळाला असून त्यांची संख्या आता नित्य वाढतच जाणार आहे ' असे उद्‌गार मुंबईच्या कामगारांनी टिळकांच्या शिक्षेबाबत केलेल्या उत्स्फूर्त संपाला उद्देशून काढले होते.

लोकमान्यांनी त्यांच्या उत्तर आयुष्यात मुंबई येथील कामगारांशी नित्य संबंध ठेवले होते. २९ नोव्हेंबर १९१९ ला परळच्या मैदानात गिरणी कामगारांनी त्यांना मानपत्र अर्पण केले, तेव्हा मुंबई ही भांडवलवाल्यांची नसून कष्टकऱ्यांची आहे असे टिळक म्हणाले. आपल्याला जे स्वराज्य हवे ते धनिक वर्गासाठी नाही अशी ग्वाही देऊन आपल्या देशात लोकशाहीची स्थापना होईल तेव्हा कामगारांच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष होणार नाही असा लोकमान्यांनी मद्रासच्या कामगारांना दिलासा दिला. (१८ डिसेंबर १९१९). लोकमान्यांनी वर्गीय भाषेत बोलण्यास प्रारंभ केला होता.

असहकारितेचे आंदोलन सुरू होण्यापूर्वी हिंदुस्थानच्या राजकारणावर प्रभाव पाडणाऱ्या दोन महत्त्वाच्या घटना घडल्या; (१) आंतरराष्ट्रीय साम्यवादाचा आलेला प्रभावी विचार, आणि (२) सर्वसाधारणपणे परंपरावादी संकुचित जातीय वा वांशिक विचारांच्या अधीन जाणारे वरिष्ठवर्गीय राष्ट्रवादी १९२०च्या सुमारास उदारमतवाद्याप्रमाणे वर्गसमन्वयाची भूमिका घेऊन ब्रिटिशांच्या अधिराज्याखाली सत्ता मिळवावी अशा मताचे झालेले होते. अशा वेळी जहालमतवादी आणि उदारमतवादी यांच्यापुढे एकच शक्ती खडी होती, ती म्हणजे आंतरराष्ट्रीय कम्युनिझम. सर्व जगभर भांडवलदारी जगताला हाच धोका वाटत होता.[१]

## १. रशियन क्रांती

१९०५ ते १९०८ या कालखंडात झालेल्या स्वदेशी बहिष्काराच्या आंदोलनात स्वातंत्र्यलढ्याचे पहिले रूप दिसून आले. जनता जागी होऊ लागली होती. लॉर्ड कर्झनने एक निवेदन तयार केले आणि त्यात त्याने जुलमी झारशाहीपुढे उभे ठाकलेले धोके आणि तशाच प्रकारचे भारतातील जुलमी राज्य यांच्यातील साम्य वर्णन केले होते. रूसी-जपान युद्धात जपानसारख्या एका चिमुकल्या राष्ट्राने रशियाचा पराभव केल्याने आशियायी अस्मितेचा उदयही झाला होता.

याच संदर्भात ता. १४ ते २० ऑगस्ट १९०४ या काळात ॲमस्टरडॅम येथे आंतरराष्ट्रीय समाजवादी परिषद (इंटरनॅशनल सोशॅलिस्ट कॉंग्रेस) भरली होती. जगातील सर्व भागातून या परिषदेला प्रतिनिधी आले होते. साम्राज्यवाद आणि वसाहतीविषयीचे धोरण हा चर्चेचा मुख्य विषय होता. दादाभाई नवरोजी भारताचे प्रतिनिधी म्हणून या परिषदेला हजर होते. सर्व प्रतिनिधींनी उत्थापन देऊन जयघोषपूर्वक दादाभाईंचा सन्मान केला. दादाभाईंनी आपल्या भाषणात ' शोषणाचा सिद्धान्त (Drain Theory) व भारताचे दारिद्र्य ' याबाबत विवेचन केले. ' दादाभाईंचे निकराचे भाषण ' यावर टिळकांनी केसरीत (२० सप्टेंबर १९०४) लेख लिहून सोशॅलिस्ट चळवळ आज ना उद्या यशस्वी होईल अशी आशा व्यक्त करून वेळप्रसंगी भारताच्या स्वातंत्र्यासाठी सोशॅलिस्टांची मदत घेण्याचेही सूचित केले. श्यामजी कृष्ण वर्मा (१८५७-१९३०) क्रांतिकारकांना आश्रय व विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या देऊन ' इंडियन सोशॉलॉजिस्ट ' मार्फत क्रांतिकारक विचार मांडीत होते. मॅडम कामांचाही यात वाटा होताच. या पार्श्वभूमीवर नेत्यांनी रशियात झालेल्या समाजक्रांतीचे स्वागत केले यात नवल नाही. मॅडम कामानी १९०७ मध्ये फ्रेंच सोशॅलिस्ट पक्षाचे सदस्यत्व पत्करले. एस. बी. राणा यांच्याबरोबर स्टटगार्ड येथे ऑगस्ट १९०७ मध्ये दुसऱ्या आंतरराष्ट्रीय परिषदेला त्या उपस्थित राहिल्या. तेथे त्यांनी साम्राज्यशाही युद्ध, स्वयंनिर्णय याबाबत बोलताना लेनिन यांना प्रथम पाहिले-ऐकिले. लेनिनबद्दल आणि रशियन साम्यवादी क्रांतिकारकांबद्दल मॅडम कामा आम्हाला माहिती सांगत असे वीरेन चट्टोपाध्याय (सरोजिनी नायडूंचे बंधू) यांनी १९३४ साली एका भाषणात सांगितले. ते १९२० मध्ये मॉस्कोला गेले होते. भारतीय स्वातंत्र्याचा ध्यास घेतलेले अनेक क्रांतिकारक रशियन क्रांतीनंतर रशियाकडे जाऊ लागले. १९२२ साली क्रांतिकारक पार्टीची पुनर्रचना करण्यात आली व भाई अंतोखासिंग यांना प्रमुख कार्यवाह निवडण्यात आले. ते व रतनसिंग लेनिन यांना भेटले व कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या ४ थ्या कॉंग्रेसला हजरही राहिले.

१९१७ साली रशियातील हंगामी सरकारविरुद्ध तेथील कामगार नि शेतकरी रस्त्यावर आले, तेव्हा त्यांचे स्वतःचे प्रश्न त्यांना सोडवायचे होते. ' भाकरी नि शांतता ! ' आणि ' सर्व सत्ता सोव्हिएतांकडे ! ' या त्यांच्या घोषणा दारिद्र्याचा, युद्धाचा नि हक्कांच्या अभावाचा अंत करू पाहात होत्या. हे काही केवळ मागासलेल्या रशियाचेच दुखणे नव्हते, सर्व श्रमिक लोकांचे ते निकडीचे प्रश्न होते. म्हणूनच ऑक्टोबर क्रांतीविषयी जग बेपर्वा नव्हते. त्यानंतरही ते बेपर्वा राहू शकत नव्हते म्हणूनच क्रांत्युत्तर रशियातील घडामोडीकडे संबंध मानवजात आस्थेने पाहात आली. शांतता, स्वातंत्र्य नि न्याय या अजूनही साकार न झालेल्या पूर्वापार ध्येयांना अनुकूल सामाजिक बदलांचा पायाभूत प्रयोग करणाऱ्या देशाकडे मानवजात सोत्कंठ नजरेने बघत होती. काहीजण या प्रयोगाचे समर्थन करीत होते तर काहीजण त्याची निर्भर्त्सना करीत होते. तथापि सामाजिक विकासाचा अंतिम आढावा

इतिहासच घेत असतो, आणि या ऐतिहासिक नोंदीत समाजसत्तावादी पद्धतीची यथार्थता नि गतिमानता नमूद झाल्याचेच दिसून येते.

१९१७ च्या महान ऑक्टोबर समाजवादी क्रांतीला भारताच्या स्वातंत्र्यलढ्यात महत्त्वाचे स्थान आहे. या क्रांतीने सामाजिक बदलांचा पाया घातला. या क्रांतीने शासनाची सूत्रे श्रमजीवी जनतेच्या हाती सोपविली. कामगारवर्ग व श्रमिक शेतकरी यांच्या हाती नवी राजकीय सत्ता सुपूर्द केली, आणि श्रमजीवी जनतेचे शोषण, राष्ट्रीय व सामाजिक विषमता यांपासून मुक्ती आणि स्वातंत्र्य, शांतता व सामाजिक प्रगति ही ध्येये कार्यवाहीत आणण्यास समर्थ अशा समाजाचे त्यांना क्रियाशील उभारणीकार बनविले. ही जनतेची क्रांती होती. या क्रांतीचे नेते होते–लेनिन. या क्रांतीने समाजवादाचे युग अवतरले.

१९१८-२० च्या राष्ट्रीय चळवळीत रेल्वे संपाची दहशत होती. गांधी टोपी आणि स्वयंसेवकदले यांच्या संरक्षणासाठी गिरण्या बंद करून हजारोंच्या झुंडीने शहर गर्जनामय करून सोडणाऱ्या चपळ व आत्मविश्वासू कामगारांच्या राजकीय संपाचीही धास्ती होती. ही एक नवीनच सेना रशियन क्रांतीनंतर राष्ट्रीय चळवळीत अवतरली. शेतकरीवर्गातही नवी जाणीव ' जमीन किसने पैदा की है? जमीन तो ब्रह्माने (ब्रह्म म्हणजेच समाज) पैदा की है, जमीनदारने नही.[२] या रूपाने निर्माण झाली. रशियन राज्यक्रांतीने लोककल्याण हे सरकारचे कर्तव्य आहे हे एक नवे नैतिक मूल्य तसेच आर्थिक नियोजन ही महत्त्वाची देणगी जगाला दिली. भौतिकवादाचा शास्त्रशुद्ध विचार जगाचे लक्ष वेधून घेणारा ठरला. गुलाम देश स्वतंत्र झाले. ही क्रांती साम्राज्यशाही देशांचा कर्दनकाळ व समाजसत्तावादी जगाची जन्मदात्री, तसेच स्वातंत्र्यलढ्याचीही गंगोत्री ठरली.

रशियन क्रांतीसंबंधी मुंबईचा ' बॉम्बे क्रॉनिकल ' (११ जानेवारी १९१९) लिहितो– ' बोल्शेव्हिकांचा रशियांतील विजय हा सामान्य माणसाचा विजय आहे. वरिष्ठ वर्गाची सत्तेतील मक्तेदारी नाहीशी करून सामान्य माणसाचा आत्मविश्वास वाढविण्याच्या दृष्टीने लेनिनला यश मिळाले आहे '. ' मॉडर्न रिव्ह्यू ' (फेब्रुवारी १९२९) लिहितो– ' रशियाची जडणघडण नवीन तत्त्वानुसार करण्याचा बोल्शेव्हिकाचा प्रयत्न कौतुकास्पद आहे. भारताने रशियापासून स्फूर्ती घेतली पाहिजे.' ' केसरी ' (११ ऑगस्ट १९२०) ने म्हटले, ' ७ नोव्हेंबर जगाच्या इतिहासातील अविस्मरणीय दिवस. . . . लेनिनचे नेतृत्व आणि रशियन जनतेचा सहभाग महत्त्वाचा. साम्यवादाच्या आणि जगाच्या इतिहासात लेनिनचे नाव अजरामर राहील.' लेनिनच्या मराठीतील आद्यचरित्राचे लेखक व केसरीचे सहसंपादक रा. गो. भिडे यांनी लेनिन व रशियन क्रांतीपासून स्फूर्ती घ्यावी असे आवाहन केले.

या क्रांतीमुळे ब्रिटिश साम्राज्यशाही कमकुवत होईल अशी लोकमान्य टिळकांना मोठी आशा वाटत होती, आणि त्यांचेच समकालीन पुढारी लाला लजपतराय यांना या क्रांतीत सर्व दलित राष्ट्रांच्या स्वातंत्र्याची बीजे दिसत होती.

जवाहरलाल नेहरू हे त्यांच्या बरोबरीच्या सर्व भारतीय नेत्यांपेक्षा अधिक हिरीरीने ऑक्टोबर क्रांतीचा पुरस्कार करीत असत. त्यांनी या महान घटनेविषयी अनेक वेळा लिहिले आहे. काँग्रेसला समाजवादाच्या मार्गावर नेण्याबाबतचे बरेचसे श्रेय जवाहरलाल नेहरू यांनाच द्यावे लागेल. ' भारताचा शोध ' या आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथात त्यांनी लिहिले आहे की, '' सोविएत क्रांतीने मानवसमाजाची एका विराट झेपेने प्रगती घडवून आणली आहे आणि जी विझवता येणार नाही अशी ज्योत पेटविली आहे, आणि तिने मानवसमाजाने ज्या संस्कृतीकडे वाटचाल करावी, अशा संस्कृतीचा पाया घातला आहे.'' त्यांनी लिहिले आहे : '' ही क्रांती मुळातच एक प्रचंड घटना होती, जागतिक इतिहासातील ती अनन्यसाधारण घटना होती. अशा प्रकारची ही पहिलीच क्रांती असली तरी ती फार काळ एकमेव राहणार नाही, कारण इतर देशांना ती आव्हान ठरली आहे, आणि जगभरच्या अनेक क्रांतिकारकांना मार्गदर्शक ठरली आहे. रशियात असलेल्या ऐतिहासिक नि आर्थिक परिस्थितीचे ते अपत्य होते. युद्धामुळे झालेली प्रचंड हानी नि हालअपेष्टा यांमुळे ही परिस्थिती निकराला आली आणि क्रांतीचे शिल्पकार नि धीमान लेनिन यांनी तिचा लाभ घेतला. '' नेहरूंनी १९२७ साली सोविएत संघराज्याला भेट दिली होती. ऑक्टोबर क्रांतीचा त्यांच्यावर आणि त्यांच्यामार्फत भारतीय काँग्रेसवर उल्लेखनीय प्रभाव पडला. बहुतांशी जवाहरलाल नेहरू यांच्या प्रभावानेच भारताच्या राष्ट्रीय चळवळीला आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन मिळाला. या चळवळीचा उद्देश '' सर्वत्रच राजकीय व आर्थिक साम्राज्यशाहीचे उच्चाटन आणि स्वतंत्र राष्ट्रांचे सहकार्य हा होता.''

रवींद्रनाथ टागोर यांनी ' नवयुगाचा सूर्योदय दाखवणारा पहाटतारा ' असेच या क्रांतीचे वर्णन केले (१९१८). ते १९३० साली सोविएत संघराज्याला गेले आणि त्यांनी आपल्या ' रशियातून पत्रे ' या पुस्तकात तेथे पाहिलेल्या चमत्काराविषयी; नवे जग निर्माण करण्याच्या निश्चयाविषयी; लोभ व असमानता यांचे उच्चाटन आणि राष्ट्रांची मुक्ती यांविषयी लिहिले आहे. त्यांनी असेही लिहिले आहे की, '' मी जर येथे आलो नसतो तर माझी जीवनयात्रा अपूर्ण राहिली असती.'' १९२७-२८ पासून भारत मे-दिन, लेनिन दिन, सोविएत क्रांती-दिन वगैरे दिन साजरे करीत आला आहे.

ऑक्टोबर क्रांतीच्या कोणत्या अंगाने भारतीय स्वातंत्र्ययोद्ध्यांवर सर्वाधिक प्रभाव पाडला होता? सोविएत राज्याची पहिली आज्ञापत्रे हे ते अंग होते. शांततेबाबतचा हुकूमनामा, जमिनीबाबतचा हुकूमनामा आणि विशेषतः लोकांच्या हक्कांबाबतच्या हुकूमनाम्याने त्यांच्यावर खूपच प्रभाव पाडला होता. हे हुकूमनामे म्हणजे जगातील दलित जनतेच्या स्वप्नांची परिपूर्ती आहे. शांतता, स्वातंत्र्य, समानता आणि प्रगती या कल्पनांचे मूर्तिमंत रूप आहे असे त्यांना वाटत होते. या क्रांतीने जगातील राष्ट्रांच्या आर्थिक धोरणाने सामाजिक आशय प्राप्त करून

दिला आहे. ' स्वातंत्र्य ' या शब्दाच्या अर्थाला नवा आशय प्राप्त करून दिला आहे, हे कुणालाच नाकारता येणार नाही. फ्रेंच राज्यक्रांतीने स्वातंत्र्य आणि समतेच्या पुरस्कर्त्यांना अद्यापही स्फूर्ती प्राप्त होते, तर ऑक्टोबर क्रांती हे जगातील सर्व दलित जनतेचे सतत स्फूर्तिस्थान बनले. महात्मा गांधींनी लिहिले, (' यंग इंडिया ', १५-११-२८) ' खाजगी मालकी नष्ट करणे म्हणजे अपरिग्रहाचा आदर्शच आहे..... लेनिनचे उदाहरण सुवर्णाक्षरांनी लिहिले जाईल.' १९१९ साली प्रसिद्ध क्रांतिकारक राजा महेंद्रप्रताप लेनिन यांना भेटले. लेनिनने त्यांना स्पष्टपणे सांगितले की '' महेंद्र, आमच्या देशात टॉलस्टॉय प्रभृती लोकांनी धर्मप्रचार करून स्वातंत्र्य मिळविण्याचा प्रयत्न केला; परंतु त्यात त्यांना काहीही यश आले नाही व ते येणार पण नाही. हिंदुस्थानात परत जाऊन जातीय वाद मिटवून, सामुदायिक शक्ति निर्माण करण्याचे तू प्रयत्न कर; स्वातंत्र्याचा मार्ग मोकळा होऊन जाईल.''[२]

भारतात नवीन बदलाचा वारा वाहू लागला. जहाल राष्ट्रवादी लाला लजपतराय कलकत्याच्या काँग्रेसच्या खास अधिवेशनाचे ( सप्टेंबर १९२०) अध्यक्ष होते. त्या अधिवेशनात गांधीजींच्या असहकाराचा ठराव संमत झाला होता. ऑक्टोबर १९२० मध्ये लालाजींच्या अध्यक्षतेखाली ' आयटक 'ची स्थापना झाली. इतर अनेक विषयांवर बोलताना ते म्हणाले, ' स्वाभाविक क्रमानेच आमची स्वातंत्र्य चळवळ सखोल व विस्तृत करणे म्हणजेच राष्ट्रीय मुक्तिलढ्याशी अखंडपणे सांगड असलेल्या कम्युनिझमचा उदय होय.' भाषणाच्या शेवटी लालाजींनी कामगारांची प्रबल संघटना बांधणे, त्यांना वर्गजागृत करणे, यावर भर दिला. स्टँडिंग कमिटीत लालाजी, डी. डी. साठे, ब्रेल्वी, कानजी द्वारकादास, बॅ. व्ही. एम्. पवार, सत्यमूर्ती, के. संथानम्, अच्युतराव कोल्हटकर, अवंतिकाबाई गोखले इत्यादी राष्ट्रीय लढ्याशी निगडित अशा व्यक्ती होत्या. लोकमान्यांना उपाध्यक्ष निवडण्यात आले होते पण अधिवेशनापूर्वीच त्यांचे निधन झाले.

१९२१ च्या डिसेंबरात काँग्रेसच्या अहमदाबाद अधिवेशनासमोर भारताच्या संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी करण्यात आली. त्याला हसरत मोहानीसारख्या जवानांनी पाठिंबा दिला. ही संपूर्ण स्वातंत्र्याची घोषणा त्याचवेळी प्रथम उठविण्यात आली. यामागे रशियन क्रांतीपासून स्फूर्ती घेतलेले तरूण होते सिंगारवेलू. १९२२ च्या अधिवेशनात डांगे आदि तरूण मंडळींनी ही मागणी, तसेच जमीनदारीचे उच्चाटन, मोठ्या उद्योगधंद्यांवर नियंत्रण, कामगारांच्या समित्या, तसेच घटनासमितीची स्थापना याही मागण्या उठवल्या. दरम्यान परदेशात असलेले वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय, मानवेंद्रनाथ रॉय, अवनी मुकर्जी भारतीय स्वातंत्र्याचा परदेशात पाठपुरावा करीतच होते.

या काळातील एक निर्देशनीय गोष्ट म्हणजे कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या चौथ्या काँग्रेससाठी (१९२२) पाच भारतीयांना आलेली आमंत्रणे. ते म्हणजे एम्. एन्. रॉय, डांगे, नलिनी गुप्ता, सुभाष बोस व चित्तरंजन दास (दासबाबूंचे चिरंजीव), गया येथील काँग्रेस अधिवेशनाचे अध्यक्ष (१९२२) म्हणून भाषण करताना चित्तरंजन दास यांनी ' ९८ लोकांसाठी स्वातंत्र्य ' असा स्वातंत्र्याचा अर्थ केला. काँग्रेस पुढारी ' आयटक ' च्या (मध्यवर्ती कामगार संघटना) अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून तसेच किसानांचे पुढारी म्हणून काम करीत होते. अशा रीतीने भारतीय पुढारीपण रशियन क्रांतीच्या प्रकाशात भारतीय स्वातंत्र्याची मांडणी करू लागले होते. कॉ. सरदेसाई म्हणतात, " त्या पुढाऱ्यांना दोन महत्त्वाच्या गोष्टींबद्दल आकर्षण वाटले, समाधान वाटले. झारच्या अमलाखालील परतंत्र देशाला त्यांनी मुक्त करून स्वातंत्र्य दिले आणि जमीनदारांच्या जमिनी कसणाऱ्या शेतकऱ्यांना वाटून दिल्या."[३] ' ही सहानभूती दाखवणारी आणि मदत करणारी ताकद आहे ' असे ते मानीत. लढ्याची गती त्यांनी वाढविली. औद्योगिक कामगारांना राजकीयदृष्ट्या जागृत करून राष्ट्रीय लढ्यात त्यांना भागीदार करून भारतीय स्वातंत्र्यलढ्याचा पाया विस्तृत करण्याला त्याने मदत केली. स्वातंत्र्यलढ्याच्या राजकीय जाणीवा त्याने विस्तृत केल्या. राष्ट्रीय लढ्याला पुरोगामी असा जागतिक दृष्टिकोन त्यामुळे प्राप्त झाला. भांडवलदारी पद्धतीने चिरंतनत्व ही कल्पना त्याने धुळीला मिळविली. मॉंटफर्ड अहवालात म्हटले आहे, ' जुलमी राजवटीवर मिळालेला विजय असेच भारतात मानण्यात येत होते....भारताच्या राजकीय आकांक्षांना त्यांनी प्रेरणा दिली.' आमच्या राष्ट्रीय लढ्याला त्या क्रांतीने आकार दिला.

राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याबाबत नवा दृष्टिकोन येत चालला, मार्क्सवादाच्या राजकारणामुळे जहाल होत चाललेले तरूण आणि परंपरागत विचारसरणीचे काँग्रेसजन यांचे मार्ग भिन्न होत चालले. या दृष्टीने मार्क्सवाद आणि त्याच्या प्रभावाखाली आलेले तरूण (ज्यांनी पुढे कम्युनिस्ट पक्षाची स्थापना केली) भारतीय राजकारण अधिक वस्तुनिष्ठ आणि जनताभिमुख करू लागले. राजकीय लढ्याच्या कक्षेत नवीन आलेला कामगारवर्ग आपल्या लढ्यात संपूर्ण स्वातंत्र्याची घोषणा करू लागला. राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि लोकशाही यासाठी साम्राज्यशाहीशी तडजोडविरहित लढणारी जनता आघाडी तयार करण्यासाठी तो कंबर कसू लागला. डॉ. अधिकारी म्हणतात, " १९२१ मधील राजकीय घटना खालील प्रकारे मांडता येतील : (१) गांधीजींच्या असहकाराच्या कार्यक्रमाकडे खेचलेली जनता आणि (२) कामगार, शेतकरी आणि इतर जनता यांचे उत्स्फूर्त लढे - उठाव हे असहकार कार्यक्रमाचे भाग नव्हते, पण त्याच्या राष्ट्रव्यापी प्रभावाखाली विकसित झाले (३) असहकारी अहिंसात्मक चळवळ गांधीजींनी थांबवली, त्यायोगे तरुणांत नैराश्याची लाट पसरली, चळवळीचा फेरविचार चालू झाला आणि एक वर्ग समाजवादाच्या दिशेने वाटचाल करू लागला. [४]

एप्रिल १९२१ च्या सुमारास एस. ए. डांगे यांनी लिहिलेल्या ' गांधी विरूद्ध लेनिन ' या पुस्तकात रशियन क्रांतीने आणि लेनिन यांनी गाठलेली उद्दिष्टे कथन केली. नंतर त्यानी ' सोशॅलिस्ट ' हे पत्र काढले. त्यातील विचारात जरी परिपक्वता नसली ( हे त्यांनीच नंतर मान्य केले आहे) तरी भारतीय स्वातंत्र्याचा लढ्याचा पर्यायी कार्यक्रम आणि मार्ग यांचे पुस्तकात दिग्दर्शन केले होते ही महत्त्वाची गोष्ट होती, असे डॉ. अधिकारी म्हणतात.[५] गांधीजींवर मार्च १९२२ मध्ये राजद्रोहाचा खटला झाला. त्यांनी भर कोर्टात सांगितले, '' जनतेच्या पिळवणुकीवरच हे कायद्याने प्रस्थापित झालेले राज्य चालले आहे.'' तरूण वर्ग समाजवादाकडे आकर्षित होत होता. चंद्रशेखर आझाद व भगतसिंग इत्यादींनी त्यांच्या क्रांतिकारक संस्थेला ' हिंदुस्थान सोशॅलिस्ट रिपब्लिक असोसिएशन ' असे उघड नाव घेतले. समाजवाद आणि प्रजासत्ताक राज्य यांचा उद्‌घोष केला. क्रांतिकारकांचे मुकुटमणी भगतसिंग यांनी १९३०च्या २१ जानेवारी (लेनिन दिन) रोजी मॉस्कोला तार पाठविली–'' लेनिन यांचे विचार कृतीत उतरविण्यासाठी जे प्रयत्नशील आहेत, त्यांना आम्ही अभिवादन करीत आहोत. भांडवलशाहीचा नाश होऊन कामगारांचा विजय होईल. साम्राज्यशाही मुर्दाबाद ! '' फाशी जाण्यापूर्वी ते लेनिनचे ' शासनसंस्था आणि क्रांती ' हे पुस्तक वाचीत होते. वारा कोणत्या दिशेने वाहत होता हे यावरून दिसत होते.

गांधीजींच्या असहकाराच्या कार्यक्रमाने प्रगती होत नव्हती. '' विलायत सरकारने सोव्हिएट रशियाविरूद्ध युद्धाची तयारी करणे हे आमच्या मते निंद्य आहे, निर्भेळ स्वातंत्र्य हेच राष्ट्रीय सभेचे ध्येय असले पाहिजे, चीन, इराक येथून हिंदी सैन्य बोलवावे अशी आमची मागणी आहे, साम्राज्यशाहीविरोधी संघास आमची मान्यता आहे '' अशा अर्थाचे काँग्रेसचे ठराव होऊ लागले. ' भारताला रशियाचा धोका ' ही कल्पना राष्ट्रीय चळवळीने त्याज्य ठरविली होती. भारतीय पुढारीपणाने मीरत खटल्याबाबत घेतलेली भूमिका, लीग अगेन्स्ट इंपीरियालिझमला भारतीय काँग्रेस जोडणे, लाहोर काँग्रेसचा (१९२९) स्वातंत्र्याचा ठराव, कराची काँग्रेसचा (१९३१) मूलभूत स्वातंत्र्याचा ठराव (यांचे विवेचन नंतर येईलच) या सर्वांवर रशियन राज्यक्रांती व समाजवादाच्या विचारांचा प्रभाव पडला होता हे उघड दिसते.

## २. युद्धोत्तर उठाव

राष्ट्रीय स्वयंनिर्णयाच्या मागणीचा जोर वाढत असताना ' स्वराज्या ' ची चळवळ (होमरूल) वाढीस लागली असताना या वाढत्या जन-आंदोलनांना पायबंद घालण्यासाठी सरकारने रौलेट बिल आणले. हिंदुस्थानी राजद्रोही चळवळींना आळा घालण्यासाठी रौलेट या इंग्रज न्यायमूर्तींच्या अध्यक्षतेखाली सरकारने एक समिती नेमली. दोन हिंदी हायकोर्ट न्यायाधीश या समितीचे सदस्य होते. या समितीचा अहवाल १९१९ साली प्रसिद्ध झाला.

या अहवालावर आधारलेली दोन बिलेही सरकारने मध्यवर्ती विधिमंडळात मांडली. अराजक गुन्ह्यांची चौकशी हायकोर्टाच्या तीन न्यायाधिशांसमोर व्हावी, या कोर्टाच्या निर्णयाविरुध्द अपील करण्याची सवलत नसावी, संशयावरून एखाद्या व्यक्तीला अटक करण्याची, तुरुंगात डांबून ठेवण्याची सोय या बिलात करण्यात आली. या बिलाने व्यक्तिस्वातंत्र्यावरच हल्ला आला व बेदरकार वृत्तीने वागणाऱ्या पोलिसांच्या हातात नवे हत्यार आले. सर्व देशभर या बिलाच्या निषेधार्थ सभा झाल्या; पण अखेरीस सरकारने या सर्व विरोधाला पायाखाली तुडवून दिल्लीच्या विधिमंडळात ते संमत करून घेतले (६ फेब्रुवारी). महात्माजींनी याविरुद्ध सत्याग्रह करण्याची घोषणा केली (१८ मार्च), आणि ६ एप्रिल हा या कायद्याच्या निषेधाचा दिवस म्हणून जाहीर केला, आणि सर्व देशभर तो उत्साहाने पाळला गेला. यात हिंदू-मुसलमानांच्या एकीची अभूतपूर्व दृष्ये दिसली. दिल्लीतील मिरवणुकीचे पुढारी स्वामी श्रद्धानंद यांच्यावर गोळी चालवण्याची धमकी देण्यात आली, पण त्यांनी ' चलाव गोली ' असे म्हटले, तेव्हा गोळी चाललीच नाही! [पण इंग्रजी नीतीने हिंदू-मुसलमानांत फूट पाडून स्वामीजींवर एका मुसलमानाला गोळी चालवायला लावले].

अहमदाबादला इंग्रज आणि हिंदी अधिकारी मारले गेले, कलकत्त्यालाही गोळीबारात ५/६ मृत्यूमुखी पडले, वीस जखमी झाले. या सर्व हिंसात्मक वातावरणामुळे गांधींनी सत्याग्रह मागे घेतला. लाहोर आणि अमृतसर येथे लष्करी कायदा पुकारण्यात आला. १३ एप्रिलला जालियनवाला बागेतील वीस हजारांच्या सभेवर जनरल डायरने १,६५० गोळ्या झाडल्या. जवळच्या गोळ्या संपल्यामुळे गोळीबार थांबला. ३७९ लोक मृत्यूमुखी पडले, दोन हजारावर जखमी झाले. सार्वजनिक ठिकाणी अनेकांना फटके मारण्यात आले. खटल्यात अनेकांना लष्करी अमलाच्या खाईत पोटावर सरपटत जाण्याची सक्ती करण्यात आली. ५१ लोकांना फाशी, ४६ लोकांना जन्मठेप अशा शिक्षा ठोठावण्यात आल्या. हे कशाकरिता तर जरब बसविण्याकरता. गव्हर्नर सर मायकेल ओडवायर यांनी डायरला शाबासकी दिली. या अत्याचाराची चौकशी व्हावी असा ध्वनी देशभर उठला. चौकशीसाठी सरकारने हंटर-कमिटी नेमली. त्या कमिटीबरोबर सहकार्य करणे अशक्य असल्यामुळे काँग्रेसने म. गांधी, मोतीलाल नेहरू, चित्तरंजन दास, जयकर, फझलूल हक्क इत्यादींची समिती नेमली.

आतापर्यंत गांधी तसे राजनिष्ठच होते, पण जालियनवाला बागेत निरपराध स्त्री-पुरुषांची झालेली कत्तल पाहून ते संपूर्ण असहकारवादी झाले. त्यांनी व्हाईसरॉयला पत्र धाठवून आतापर्यंत मिळालेली पदके परत केली, काही मानसिक त्रास न होताना! याबाबत असलेल्या गुप्त अहवालात, गांधीनी भारताला बोल्शेव्हिझमपासून वाचवण्यासाठी असे केले असा उल्लेख आहे![६] हंटर कमिटी जालियनवाला बागेत बळी पडलेल्यांना काही न्याय देईल अशी गांधीना आशा वाटत होती.

काँग्रेसने नेमलेल्या चौकशी-समितीच्या मते तो ' मानवतेविरुद्ध गुन्हा ' होता; ब्रिटिशांच्या आधुनिक प्रशासनाच्या इतिहासात निःशस्त्र व निरपराध स्त्री-पुरुष-बालकांची शस्त्रे चालवून झालेली हत्या केवळ अपूर्व होती! पण हंटर कमिटीने या हत्याकांडावर केवळ निर्णयशक्तीची गंभीर चूक ( a grave error of Judgment ) अशी रंगसफेती केली, सरकारने डायरच्या कृत्याचे समर्थन केले. शिवाय इंग्लंडमध्ये डायरच्या कृत्यासंबंधी ज्या प्रकारे लोकमत दिसून आले, त्यावरून ब्रिटिशांच्या न्यायप्रियतेवरील गांधींचा विश्वास कायमचाच ढासळला. २८ मे १९२० ला हंटर कमिटीचा अहवाल प्रसिद्ध झाला, आणि गांधींनी-पंजाबातील हत्याकांड आणि खिलाफत प्रकरणातील अन्याय या दोन्हींविरुद्ध १ ऑगस्टपासून असहकारितेची चळवळ सुरू करण्यात येणार असल्याची घोषणा केली. कलकत्ता येथील काँग्रेसच्या खास अधिवेशनात तारीख ४ सप्टेंबरला त्याला मान्यता देण्यात आली. पंजाब, खिलाफत याच्याबरोबर त्या ठरावात स्वराज्यप्राप्तीचा ठराव अंतर्भूत करावा अशी सूचना मोतीलाल नेहरू आणि विजयराघवाचारीयर यांनी केली, गांधींनी ती मान्य केली, आणि ' एक वर्षात स्वराज्य ' अशी धाडसी घोषणा केली.

### ३. खिलाफत आणि हिजरात

ब्रिटिशांची हकालपट्टी करा ही खिलाफत चळवळीतील घोषणा ही धार्मिक विचारांवरच आधारलेली होती. इस्लामचे राजकीय वैभव त्याला पुनः प्राप्त करून देणे हीच त्यातील प्रेरणा होती, स्वराज्य मिळवणे हा हेतू नव्हता, कलकत्ता काँग्रेस (सप्टेंबर १९२०) मध्ये २,७३५ पैकी १,८५५ जणांनी गांधींना पाठिंबा दिला, ८७३ विरुद्ध होते! जिनाशिवाय इतर मुसलमान प्रतिनिधींनी पाठिंबा दिला, जिना यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या मुस्लीम लीगच्या अधिवेशनात जिना म्हणाले[७] '' असहकारचे धोरण स्वीकारणे जरूर आहे, पण गांधींच्या कार्यक्रमाने नव्हे '' काँग्रेसच्या नागपूर अधिवेशनातही स्वराज्यप्राप्ती हे ध्येय ठरावात घालण्यात आहे. होमरूलचे रूपांतर स्वराज्य सभेत करण्यात आले. गांधी त्या सभेचे अध्यक्ष झाले. धार्मिक आणि आर्थिक शक्तींची एकजूट घडून आल्यानेच काँग्रेसला विराट रूप प्राप्त झाले.[८] ' शांततामय आणि कायदेशीर मार्गांनी स्वराज्यप्राप्ती हे काँग्रेसचे ध्येय असल्याची घोषणा नागपूर काँग्रेसने केली. चार खांबावर आधारित असा कार्यक्रम निश्चित करण्यात आला : (१) शाळा, कॉलेजावर बहिष्कार; (२) टिळक स्वराज्य फंडाची उभारणी; (३) हिंदू-मुस्लीम ऐक्य; (४) अहिंसेवर भर. लोकांच्या मागण्यांकडे सरकार सतत दुर्लक्ष करीत असल्याने युवराजाच्या आगमनप्रसंगी देशात संपूर्ण हरताळ पाळून लोकांच्या भावना व्यक्त कराव्यात असाही आदेश देण्यात आला. मुंबईत युवराजाच्या आगमनप्रसंगी झालेल्या दंगलीत ५३ जण ठार झाले, आणि सुमारे ४०० जण जखमी झाले.

पहिल्या महायुद्धात दोस्तांना विजय मिळाला. या युद्धात तुर्कस्तान, ब्रिटनविरुद्ध जर्मनीस सामील झाला होता. तुर्कस्तानचा खलिफा राजकीय आणि धार्मिक दृष्टीनी हिंदी मुसलमानांना जवळचा वाटत होता. त्यामुळे तुर्कस्तानची खिलाफत सुरक्षित राहील असे

लॉईड जार्ज यांनी पार्लमेंटात वचन दिले. यावर विश्वास ठेऊन हिंदी मुसलमान तुर्कस्तानविरुद्ध लढले. युद्धानंतर तुर्कस्तानचे तुकडे झाले. खिलाफत नष्ट होण्याची कल्पना हिंदी मुसलमानांना सहन झाली नाही. २४ नोव्हेंबर १९१८ रोजी दिल्लीत खिलाफत परिषद भरली. गांधीजी अध्यक्ष होते. सर्व ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याची भाषा हसरत मोहानी यांनी काढली.

मुसलमानांचे धार्मिक हितसंबंध आणि हिंदूंचे राजकीय हितसंबंध या खिलाफत प्रकरणामुळे एकत्र आले. त्यातून जी चळवळ निर्माण झाली तीत-असहकारितेत-हिंदू व मुसलमान सरकारविरोधी पवित्र्यात उभे ठाकले आणि त्या काळात कोठेही जातीय दंगे झाले नाहीत. (इंडिया १९२३-२४, पृ. ७८)

अशा या खिलाफत चळवळीने मुसलमानात ब्रिटिशविरोधी भावना निर्माण झाली. त्याचे मूळ तुर्कस्तानातील खलीफाच्या गादीत होते. पण मुस्तफा केमाल पाशा यांनी सुलतानाला पदच्युत केले, कारण तो ब्रिटिशांचा अंकित होता. तो ब्रिटिश जहाजातून पळून गेला. अशा परिस्थितीत भारतातील मुसलमान सुकाणू नसलेल्या नावेप्रमाणे झाले. पुनः जातीय-वादाला बहर आला. मलबारात तर मोपल्यांनी हिंदूंवर अमानुष अत्याचार केले. मोठ्या शहरांत--मुंबई, दिल्ली, नागपूर, अलाहाबाद इत्यादी शहरात हिंदू-मुसलमान दंग्यांनी पेट घेतला. मशिदीतून हिंदू-मुसलमान ऐक्यावर असहकाराच्या काळात व्याख्याने देऊन त्यांना लढ्यात ओढणारे स्वामी श्रद्धानंद यांचाही एका धर्मवेड्याने खून केला. या सर्व प्रकारांची प्रतिक्रिया म्हणजे हिंदू-महासभेची स्थापना आणि वाढ. संघटना, शुद्धी, अस्पृश्योद्धार या सर्व चळवळीना गती आली. डॉ. मुंजे, केळकर यांनी या चळवळीना हात घातला. असहकार बाजूला सारून प्रतिसहकार स्वीकारावा या विचाराने पुनः जोर केला.

१९२० साली हिंदुस्तानच्या राजकीय समुद्रात ' हिजरत 'ची जी प्रचंड लाट उसळली, त्या लाटेने पंजाबातील असंतुष्ट निर्धन शेतकरी व लहान लहान व्यापारी आणि दुकानदार आपल्याबरोबर तर दूर नेले, पण देशातील कित्येक सुशिक्षितांना--ज्यांना स्वातंत्र्याची पूर्ण कल्पना होती अशांनाही पण दूर नेले. अनत्याचारी, असहकारितेचा कार्यक्रम त्यांना आकर्षू शकत नव्हता. अन्य देशांच्या इतिहासाच्या अभ्यास करण्याची संधी त्यांना प्राप्त झाली.

प्रथमतः हिजरात ही एक धार्मिक चळवळ होती. तुर्कस्तानाच्या खिलाफतीच्या बाबतीत ब्रिटिश सरकारने जे अन्यायी धोरण स्वीकारले त्यामुळे चिडून गेलेल्या मुसलमानांची, मुसलमानांकरता ती चळवळ होती. ब्रिटिश अमलाखाली ज्यांना सुख वाटत नसेल, जे त्यांच्या राज्यात असंतुष्ट असतील, त्यांनी ताबडतोब ब्रिटिश राज्याचा त्याग करून परदेशातील कोणत्याही मुसलमानी सत्तेखाली जाऊन रहावे असा त्या चळवळीचा उद्देश होता, नव्हे, तिचा तसा आदेशच होता. हिजरतची म्हणजे देशत्यागाची चळवळही खिलाफतीतूनच उदय पावली.

सुमारे ३६ हजार मुसलमान अफगाणिस्तानच्या अमीराकडे गेले! हजारो नंतर परत आले, उपासमारीला त्याना तोंड द्यावे लागले. अशी हिजरत केलेल्या कॉ. शौकत उस्मानी यांनी त्याचे वृत्त 'From Peshawar to Moscow' (देशत्यागाँचा इतिहास) या पुस्तकात दिले आहे.

## ४. चौरीचौरा प्रकरण

संयुक्त प्रांतातील गोरखपूर जिल्ह्यातील एक गाव चौरीचौरा. फेब्रुवारी ४, १९२१ या दिवशी असहकारवादी जमावाने २२ पोलिसांना (२१ पोलीस व १ इन्स्पेक्टर याना) जिवंत जाळून मारले. पोलीस ठाणे जाळले. पोलिसांनी जमावावर गोळीबार केला होता. तसेच जमीनदारीविरोधी लढ्यात पोलिसांनी शेतकऱ्यांवर अत्याचारही केले होते. त्यामुळे झालेल्या लोकक्षोभाचा हा उद्रेक होता! या भयानक घटनेने सारा भारत हादरला.

बार्डोलीमध्ये सारावाढीविरुद्ध लढा संघटित होत होता, हिंसेचा उद्रेक झाल्याने तो लढा चालू करू नये असा काँ. वर्किंग कमिटीने फेब्रुवारी १२ ला ठराव केला. फेब्रुवारी २४ ला झालेल्या अ. भा. काँग्रेसने वरील ठरावाला पुष्टीच दिली, आता सर्व काँग्रेस सदस्यांनी सूत कताईसारख्या विधायक कामास लागावे असे गांधीनी सुचविले. बारडोलीच्या शेतकऱ्यांना हा 'मरणान्तक धक्काच' (Staggering blow) बसल्याचे सुभाषबाबू म्हणाले. हा राष्ट्राचा अवमानच असल्याचे महाराष्ट्रीय प्रतिनिधी बोलत होते. या संदर्भात अनेक पुढाऱ्यांनी गांधीजींवर टीकास्त्र सोडले. गांधीनी फेब्रुवारी १२ ला पाच दिवसांचा उपवास जाहीर केला. 'यंग इंडिया' च्या फेब्रुवारी १६ च्या अंकात गांधीजींचे पत्रक प्रसिद्ध झाले.

चौरीचौरा प्रकरण व लढ्याची तहकुबी या घटनेवर राजकीय वर्तुळात सतत चर्चा होत राहिली. मोतीलाल नेहरू व दास यानी तुरुंगातूनच याबाबत निषेध नोंदविला. लालाजी, अल्ली बंधु, आझाद यानीही निषेध व्यक्त केला. पण गांधीजी निश्चल राहिले. 'सरकार माघारीच्या पावित्र्यात असताना ही घटना घडली ही राष्ट्रीयदृष्ट्या आपत्तीच होय' अशी टीका सुभाषबाबूनी 'Indian Struggle' या पुस्तकात केली आहे. पोलिसांकडून दडपशाही होत असताना आपणापैकी किती जण शांत राहतील? हीच जर राष्ट्रीय लढ्याची कसोटी असेल तर अहिंसात्मक मार्ग सदैव अपयशच आणणार!' असे जवाहरलालजींनी "Towards Freedom" या ग्रंथात म्हटले आहे.

या प्रकरणात १७२ लढाऊ शेतकऱ्यांना फाशीच्या शिक्षा झाल्या, पण कोणाही पुढाऱ्याने त्यावर आवाज उठवला नाही, त्याबाबत कम्युनिस्टांनी प्रखर प्रतिक्रिया व्यक्त केली. एम्. एन्. रॉय यांनी भारतीय कम्युनिस्ट पक्षाच्या वतीने लिहिले, "शोषित शेतकऱ्यांनी केलेल्या बंडास १७२ जवानांना फाशी दिल्याने न्यायदेवतेचा भ्रष्टाचारच दिसून येतो. या जवानांचा अपराध हाच की, आपल्याला जंगण्याचा हक्क आहे हे त्यांनी घोषित केले,

आणि त्यांना सतत उपासमार करायला लावणाऱ्या या अधिकाऱ्यांना निधड्या छातीने आव्हान दिले. ''[९]

चौरीचौरा येथे झालेल्या हिंसेमुळे गांधीजींनी बारडोलीचा लढा तहकूब केला यावर केळकर यांनी केसरीत 'बारडोलीचा बार फुकट गेला' असा अग्रलेख लिहिला. महाराष्ट्रातील फेरवाल्या पक्षाच्या मनोभावनांचे ते आविष्करण होते. १६ फेब्रुवारी १९२२ च्या 'यंग इंडिया'त गांधींनी लिहिले, "सबंधच्या सबंध चढाईचा कार्यक्रम इतक्या निष्ठुरपणे रद्द करणे राजकीयदृष्ट्या समर्पक वा शहाणपणाचे वाटले नाही तरी धार्मिकदृष्ट्या ते निःसंशय समर्पक होते." तसेच 'सविनय कायदेभंगात कोठल्याही प्रकारचा क्षोभ असता कामा नये' असाही इशारा दिला. केळकरांनी याला 'उलटी उडी' असे म्हटले. त्यावर त्याला गांधींनी उत्तर दिले, "रणमैदानात सैन्याची रचना तासातासाने बदलावी लागते. जितक्या म्हणून 'उलट्या उड्या' मारण्यात आल्या त्या आवश्यक होत्या."

## असहकार लढ्याची माघार

गांधींनी त्यांच्या कृत्याचे समर्थन केले. जवाहरलाल यांना लिहिलेल्या पत्रात ते म्हणाले, "जर ही चळवळ स्थगित केली नसती, तर आपणाला अहिंसात्मक लढा न लढता हिंसात्मक लढाच लढावा लागला असता. या माघारीने आपले स्वीकृत कार्य अधिक उजळ रीतीने फोफावेल". (Nehru : A bunch of old letters).

अहिंसात्मक लढा मागे घेण्यात आला आणि त्यामुळेच समाजवादाच्या विचारांना चालना मिळाली. रशियातील ऑक्टोबर क्रांतीचा परिणाम-प्रभाव राजकीय कार्यकर्त्यांवर होताच. या असहकार चळवळीत भाग घेतलेले कॉ. डांगे नवीनच दिशेने विचार करायला लागले. त्यांनी 'गांधी विरुद्ध लेनिन' हे पुस्तक लिहून (एप्रिल १९२१) गांधीजींचा मार्ग सोडून आता लेनिनचा मार्ग स्वीकारला पाहिजे, कामगार-शेतकऱ्यांच्या वर्गजागृत संघटना बांधल्या पाहिजेत असा पुकारा केला. या पुस्तकाने गांधीवादावर नवीनच प्रकाश टाकला. जरी त्यांचे विचार परिपक्व नव्हते तरी भारतीय स्वातंत्र्यलढ्याला त्यांनी एक पर्यायी कार्यक्रम दिला ही महत्त्वाची गोष्ट आहे, असे डॉ. अधिकारी यांनी म्हटले आहे.[१०]

बारडोली लढा स्थगित करण्यात आला, कार्यकर्त्यांत गोंधळ उडाला, अशा वेळी सरकारने गांधीजींना अटक केली, आणि 'यंग इंडिया' तील तीन लेखांबाबत त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरला. 'हे सरकार जनतेची पिळवणूक करीत आहे' असे त्यांनी कोर्टात सांगितले. गया काँग्रेसचे अध्यक्ष चित्तरंजन दास यांनी स्वराज्य हे ९८ टक्के लोकांसाठी पाहिजे असे सांगितले.दास, जवाहरलाल, सुभाष यांनी आयटकशी संबंध जोडले. शेतकऱ्यांच्या चळवळी स्वातंत्र्यलढ्यामागील एक शक्ती झाली. राष्ट्रीय क्रांतिकारक भगतसिंग आणि त्याचे सहकारी लेनिनचा अभ्यास करू लागले. फाशीची शिक्षा डोक्यावर टांगली असताना त्यांनी

२१ जानेवारी १९३० (लेनिन दिन) या दिवशी मॉस्कोला ' थोर लेनिनचे विचार अंमलात आणण्यासाठी जे प्रयास करीत आहेत त्यांना अभिवादन करीत आहोत.....भांडवलशाहीचा विनाश होऊन कामगारांचा विजय होणारच. साम्राज्यशाहीचा नाश होवो ' अशी तार पाठवली[११]. त्यामुळे विचारांचा वारा कसा वाहत होता हे कळून येते. या संदर्भात मीरत कटाच्या खटल्याबाबत राष्ट्रीय पुढारीपणाने घेतलेली भूमिका, ' लीग अगेंस्ट इंपीरिॲलिझम ' शी काँग्रेसने जोडलेला संबंध, १९२९ च्या लाहोर व १९३१ च्या कराची येथील अधिवेशनात संमत झालेले ठराव पाहिले तर समाजवादी विचार राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीत येऊ लागले होते, तसेच आपल्या लढ्यात सोवियटविरोध या विचारसरणीला आपण कधीच थारा दिला नाही..... हे दिसून येईल.' इन्किलाब झिंदाबाद ' ही राष्ट्रीय चळवळीतील घोषणा भगतसिंग आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी दिलेली देणगीच. याच काळातील बारडोलीचा लढा थांबविण्याबाबत काँग्रेस वर्किंग कमिटीने जो ठराव संमत केला त्यात ' मालमत्ता जप्त करणे ' आणि ' वर्गयुद्ध ' यांना आपला विरोध असल्याचे म्हटले आहे.

'' काँग्रेसचे कार्यकर्ते आणि संघटना यांनी शेतकऱ्यांनी जमीनदारांना खंड देऊ नये असा प्रचार करणे हे काँग्रेसच्या ठरावाच्या विरोधी व देशाला हानिकारक आहे असा काँग्रेस वर्किंग कमिटीने सल्ला दिला आहे ''. वर्गीय हितसंबंध राखणे व वर्गीय पिळवणूक अबाधित ठेवणे यासाठीच ' अहिंसा ' ही शब्दप्रणाली जाणून वा अजाणतेपणी वापरण्यात आली आहे, असा निष्कर्ष काढता येईल. भांडवलदारी पुढारीपणाने बारडोली लढ्याचा विश्वासघात केला, कारण जनतेच्या उठावाला त्या पुढारीपणाचा विरोध होता.[१२] सरकारी अहवालात पुढे म्हटले आहे, ' भारताच्या राजकीय पुढाऱ्यांच्या भाषणात सामान्यतः न आढळणारी अशी समाजवादी विचारसरणी दास यानी आपल्या भाषणात मांडली होती. स्वराज्य हे जनतेसाठी असते आणि मूठभर उच्चवर्गीयासाठी नसते..... गया काँग्रेसच्या अधिवेशनात लगेचच दास यांनी केलेल्या भाषणात व त्यांनी मांडलेल्या कार्यक्रमात सोव्हिएट विचारसरणी दिसून येते........ पण त्यानी कामगारवर्गाच्या हुकुमशाहीचा स्वीकार केलेला नाही ''.[१३]

' आयटक ' (A.I.T.U.C.) च्या कार्यकारी मंडळाला मदत करण्यासाठी काँग्रेस वर्किंग कमिटीने एक समिती नेमली. शेतमजूर व औद्योगिक कामगार यांच्या प्रातिनिधिक संघटनेवर पुढील सदस्य होते : (१) सी. एफ्. अँड्र्यूज, (२) जे. एम्. सेनगुप्ता, (३) एस्. एन्. हलधर, (४) स्वामी दीनानंद, (५) सिंगारवेलू चेट्टियार, (६) मुंबईचे डॉ. डी. डी. साठे सरकारी अहवालात म्हटले आहे : '' गांधीजींचा सविनय कायदेभंगाचा लढा ही सविनय अशी जनतेची क्रांतीच होय. तो ज्या वेळी कार्यवाहीत येईल, तेव्हा सरकारचा अधिकार संपलेला असेल. तसेच सरकार आणि त्याचे कायदे उघडपणे धुडकावून लावलेले असतील व कायदा आणि सुव्यवस्थेला धोका निर्माण झालेला असेल.''[१४]

## संदर्भ

(१) B. B. Misra, *op cit,* p. 174-175

(२) शं. दि. करंदीकर 'अप्रकाशित राजनैतिक इतिहास'

(३) S. G. Sardesai, 'Russion Revolution', p. 29.

(४) Dr. G. Adhikari, Documentries of the C. P. I., p. 269.

(५) Ibid, p. 277.

(६) B. B. Misra, *op cit,* p. 179.

(७) Ibid, p. 181.

(८) Ibid, p. 182.

(९) Vanguard, March 12, 1823.

(१०) G. Adhikari, *op cit,* I, p. 277.

(११) 'October Revolution and India's Independence' p. 128.

(१२) R. P. Dutt, *op cit,* p.p. 288-89.

(१३) India, 1922-23, p. 290.

(१४) India, 1922-23, p. 245.

# ७. राजकीय पक्षांचा प्रभाव

१९२० ते १९३० या कालखंडात निरनिराळ्या राजकीय पक्षांनी राष्ट्रीय चळवळीवर अनेक दृष्टींनी प्रभाव पाडला. काँग्रेस हा एक मोठा प्रवाह होता; पण काँग्रेसप्रणीत राष्ट्रीय चळवळीच्या गतीने ज्यांना जाता आले नाही, ते त्या प्रवाहापासून अलिप्त राहिले, आणि त्यांनी काँग्रेसच्या सविनय कायदेभंगाच्या कार्यक्रमाला विरोध केला. या विरोधकात लिबरल पक्ष, स्वराज्य पक्ष, प्रतियोगी सहकारिता पक्ष आणि नॅशनल पार्टी हे पक्ष होते. काँग्रेसपासून निराळा असलेला, पण काँग्रेसची ध्येय-धोरणे अत्यंत लढाऊ करण्यात भारतीय कम्युनिस्ट पक्षाचा आणि त्यांचे उघड व्यासपीठ (प्लॅटफॉर्म) असलेल्या कामगार शेतकरी पक्षाचा त्यात मोठा वाटा होता. वर उल्लेखिलेल्या राजकीय पक्षांच्या भूमिकांबाबत थोडक्यात विवेचन केले आहे.

### (१) लिबरल (उदारमतवादी/नेमस्त)

भारतातील उदारमतवाद हा युरोपीय संस्कृतीचा परिपाक आहे, त्या संस्कृतीचे फळ आहे. उदारमतवादाला वैचारिक प्रेरणा ग्रेट ब्रिटनचीच, सामाजिक सुधारणा कायदे करून आणि जनतेला शिक्षण देऊन अमलात आणता येते, असा विचार ते मांडत. त्यांच्या डोळ्यांपुढे लोकशाहीची ध्येये होती.

गांधीजींच्या व्यक्तित्वाबद्दल या उदारमतवाद्यांना आदर होता; पण गांधीजींच्या कार्यपद्धतीमुळे राष्ट्राला हानिकारक परिणाम भोगावे लागतील, असे त्यांचे मत होते. मॉंट-फर्ड सुधारणा अंमलात आणणे, त्यात प्रभुत्व मिळविणे आणि त्यांचा विस्तार करूनच भारताच्या आकांक्षा फलद्रूप होतील असा त्यांचा दृढ विश्वास होता. गांधीजींनी काढलेल्या मोहिमांत सहभागी होण्याचे त्यांनी नाकारले. भारतमंत्र्यांच्या (सेक्रेटरी ऑफ स्टेट) नियंत्रणातून मुक्त होऊन भारत सरकारला भारताचा त्वरित राजकीय विकास करण्याची आवश्यकता त्यांना वाटत होती, ब्रिटिश साम्राज्याच्या इतर वसाहतीतील भारतीयांना जी वागणूक दिली जात होती त्यामुळे साम्राज्याला धोका निर्माण होईल असे त्यांना वाटे. काँग्रेससंबंधीचा त्यांचा दृष्टिकोन थोडक्यात खालीलप्रमाणे सांगता येईल : '' प्रस्थापित सरकारच्या विरोधी जोपर्यंत काँग्रेस लढा पुकारीत आहे, क्रांतीची उघड भाषा बोलत आहे, सरकारविषयीची निष्ठा कमी करीत आहे, आणि धडक राजकीय कार्यक्रम हाती घेत आहे, ..... अशा वेळी आपण काँग्रेसशी मतभेद व्यक्त केला पाहिजे, आणि तिला विरोध केला पाहिजे.'' म्हणून देशाच्या भल्यासाठीच त्यांनी सरकारला तसेच समयबद्ध प्रगती करण्याच्या विचाराला पाठिंबा दिला. राष्ट्रीयदृष्ट्या लिबरल पक्ष सरकारशी एकरूप झालेला होता, असेच दिसले.

भारताच्या नेमस्त पुढाऱ्यांचा सत्तेच्या केंद्रीकरणाला विरोध होता. वाढत्या स्थानिक स्वायत्ततेचा त्यांनी पुरस्कार केला, भांडवलदारी आशा-आकांक्षांचे तसेच कनिष्ठ मध्यमवर्गाचे प्रवक्ते म्हणूनच ते कार्य करीत. राजकीय सत्तेला नैतिक पाया असतो यावर तसेच ईश्वरी किंवा दैवी संकेतावर उदारमतवादी पक्षाचा विश्वास होता. गोपाळ कृष्ण गोखले हे स्वराज्याचे फार मोठे प्रेषित होते, असे मोतीलाल नेहरू म्हणत. अथक परिश्रम आणि त्याग यांच्या योगे राष्ट्रवादाचा दृढ पाया घालता येईल यावर गोखले यांचा विश्वास होता. राष्ट्रीय एकत्रीकरण वा दृढीकरणावर त्यांचा विश्वास होता. राजकारणात नैतिक मूल्ये आणणे या विचारावर ते खंबीरपणे उभे होते, राजकीय तंत्र म्हणून मर्यादितपणा वा नेमस्तपणा बुद्धिवाद आणि तडजोड यांचा त्यांनी पुरस्कार केला.

### (२) स्वराज्य पक्ष

असहकारितेची चळवळ स्थगित झाल्यानंतर काँग्रेस दोन गटात विभागली गेली. फेरवादी आणि नाफेरवादी. चित्तरंजन दास आणि मोतीलाल नेहरू यांच्या पुढारीपणाखालील काँग्रेसच्या गटाने, बारडोलीच्या ठरावानंतर (१९२२) ' गांधींचे अव्यवहार्य व वांझ धोरण ' असे संबोधून ते त्या मार्गापासून दूर गेले, आणि काँग्रेसमध्ये राहून नवा पक्ष स्थापन केला. नवीन विधानसभांच्या निवडणुकी लढवून नवीन विधानसभात संसदीय पातळीवर लढा देणे हे त्यांचे ध्येय होते.

१९२२ च्या गया काँग्रेस अधिवेशनात परदेशात आश्रय घेतलेल्या भारतीय कम्युनिस्ट पक्षाने ' राष्ट्रीय मुक्तता आणि पुनर्रचना ' असा कार्यक्रम पाठविला होता : संपूर्ण राष्ट्रीय स्वातंत्र्य, जनतेला सार्वभौम सत्ता आणि भारतीय प्रजासत्ताक संघराज्य असा त्याचा आशय होता.

१९२३ मध्ये चित्तरंजन दास यांनी अखिल भारतीय स्वराज्य पक्षाची स्थापना केली. दास अध्यक्ष झाले आणि मोतीलाल नेहरूंना कार्यवाह करण्यात आले. मानवतावादी सामाजिक सुधारणा, ब्रिटिश साम्राज्यांतर्गत वसाहतीचे स्वराज्य, आणि भांडवलशाहीचा मुक्त विकास-- हा कार्यक्रम पक्षाने घेतला होता, १९२४ मध्ये कौन्सिल प्रवेशाची शाखा म्हणून काँग्रेसने या पक्षाला मान्यता दिली. १९२५ मध्ये कानपूर येथे भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात, स्वराज्य पक्ष काँग्रेसमध्ये विलीन झाला. भारतीय राष्ट्रवादाची (राष्ट्रीयत्त्वाची) कल्पना पाश्चात्यांकडून घेतलेली नव्हती,असे दास यांचे मत होते. ईश्वराने व्यापलेल्या अस्तित्वाची उत्क्रांती म्हणजेच राष्ट्रीयत्व असे ते म्हणत. देशाच्या कल्पनेमध्ये त्यांना दिव्यत्वाचे प्रकटीकरण दिसे. मोतीलाल नेहरू स्वराज्य पक्षातील पुराणमतवादी विचारांचे होते; तर दास हे डाव्या विचारसरणीचे आणि उदारमतवादी होते, राष्ट्रवादाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन मॅझिनीसारखा होता. बहुजनसमाजाच्या चळवळीतील कमकुवतपणा

लक्षात घेता, निवडणुका आणि विधिमंडळावरील बहिष्कार उठविण्याचा पक्षाचा निर्णय हे एक पुढचे पाऊल होते. काँग्रेसमधील नाफेरवाद्यांनी काँग्रेसमध्ये त्यांना विरोध केला. काँग्रेसमधील सूतकताई, मद्यपानर्निषेध, अस्पृश्यतानिवारण तसेच अशासारख्या सामाजिक सुधारणांच्या कार्यक्रमामुळेच राष्ट्रीय मुक्ती मिळेल अशा गांधीजींच्या 'विधायक कार्यक्रमाला' ते चिकटून राहिले, अधिक निश्चित स्वरूपाचे धोरण मान्य असणाऱ्या काँग्रेसमधील गटाला (फेरवाद्यांना) आपले धोरण पटवून देऊन ते अमलात आणण्याच्या बाबतीत ते कमकुवत होते. १९२५ मध्ये काँग्रेसने स्वराज्य पक्षापुढे संपूर्ण आणि बिनशर्त शरणागती स्वीकारली. गांधीजी काही काळ का होईना जनतेच्या दृष्टीआड झाले. वैचारिक दृष्टीने पाहता स्वराज्य पक्ष पुरोगामी भांडवलदारी विचारसरणीचा पक्ष; या वरिष्ठ वर्गाच्या मागण्यांवरच त्याचे अस्तित्व अवलंबून होते. भांडवलशाही आणि जमीनदारशाहीवरच हा पक्ष उभा होता. त्याच्या कार्यक्रमात खालील भाग होता—" खाजगी आणि व्यक्तिगत मालमत्तेला मान्यता व तिचे रक्षण केले जाईल. स्थावर आणि जंगम अशा व्यक्तिगत संपत्तीच्या वाढीला मान्यता मिळेल. स्वराज्य पक्ष हा शेतकऱ्याला न्याय देणारा आहे, तसाच तो जमीनदारांनाही न्याय देणारा आहे."[१]

म्हणून स्वराज्य पक्ष हा एखादे पाऊल पुढे टाकण्याच्या इराद्याने स्थापन झाला असला, तरी प्रत्यक्षात जनतेच्या लढ्याचा जोर ओसरल्यानंतर त्याची पीछेहाटच झाली. 'संसदीय कार्याच्या उतरत्या पातळीवर येऊन स्वराज्य पक्ष साम्राज्यशाहीशी सहकार्य करीत आहे "[२] एक बलाढ्य पक्ष म्हणून स्वराज्य पक्ष केंद्रीय विधिमंडळात शिरला. त्यामुळे स्वतंत्रांशी (पूर्वीचे नेमस्त) एकजूट वा सहकार्य करून जमेल तर सरकारात बहुमत प्रस्थापित करण्याचा त्याचा उद्देश होता. (फरीदपूर योजना). १९२६ च्या वसंत ऋतूत झालेल्या साबरमती करारात अधिकार-स्वीकार अभिप्रेत होता; पण जनतेच्या विरोधामुळे ती कल्पना सोडावी लागली. १९२६ च्या पावसाळयात झालेल्या निवडणुकांत, मद्रास सोडून इतर भागात पक्षाची पीछेहाट झाली.

तत्त्वतः फेरवादी खाजगी मालमत्तेला मान्यता देत होते व त्याचा प्रतिपाळ करावा त्याचप्रमाणे 'आहिरे' आणि 'नाहीरे' यांच्यात न्याय्य आणि सुसंवादी संबंध असावेत अशा मताचे होते; 'कामगारांना निःसंशय रक्षणाची आवश्यकता असते तशीच औद्योगिक साहसालाही असते.' व्यावहारिक दृष्टीने विचार करता मध्यवर्ती विधिमंडळाच्या कामकाजातील त्यांची जमेची बाजू म्हणजे पोलाद संरक्षण विधेयकाचा त्यांनी केलेला पाठपुरावा; कारण टाटा स्टील कंपनीला अनुदान मिळण्याची त्यात सोय केली होती.[३] थोडक्यात सांगावयाचे म्हणजे, असहकार ह्या क्रांतिकारक चळवळीची भरती (जोर) रोखून धरून निर्माण झालेल्या उच्च-मध्यमवर्गीयांचे प्रतिनिधित्वच फेरवादी करीत होते.

गांधीजींची सुटका झाल्यानंतर बेळगाव येथे भरणाऱ्या कॉंग्रेसच्या अधिवेशनाचे (१९२४) अध्यक्ष म्हणून त्यांना निवडण्यात आले. फेरवादी व नाफेरवादी यांचे मार्ग भिन्न होणार असे दिसू लागले.

कॉंग्रेस पक्षाने अडवणुकीचे धोरण ठेवले तरी सरकारने आपल्या पसंतीने दिवाण नेमले होते; फक्त मध्यप्रांतातील स्वराज्य पक्ष दिवाणावर अविश्वासाचा ठराव पसार करू शकला; परंतु सरकारच्या हाती सर्व सत्ता असल्यामुळे गव्हर्नरने सोपीव खाती स्वतःकडे घेतली आणि राज्यकारभार चालू ठेवला. र. पु. परांजपे यांना साठे-परांजपे (शिक्षणाबाबत) योजना दडपून ठेवावी लागली. ना. भास्करराव जाधव शिक्षण खात्याचे दिवाण असताना त्यांनाही एल्फिन्स्टन हायस्कूलसाठी युरोपियन प्रिन्सिपॉल शोधावा लागला! सरकारला मनाई करण्याचा (व्हेटो) व नवीन करायला प्रवृत करण्याचा अधिकार होते. त्यामुळे सरकार आपला ग्रास सुखाने घेत असता कायदेमंडळांना निराश व नाउमेद होऊन तोंडाकडे बघत बसणे भाग पडले. बारीकसारीक गोष्टीतसुद्धा सरकार कायदेमंडळाच्या इच्छेचा आदर करीत नव्हते.

महात्माजी तुरुंगातून सुटल्यानंतर कौन्सिलप्रवेशाचा वाद चांगलाच रंगला होता. ते म्हणत, '' कायदेकौन्सिलाचा काही फायदा होत असेल तरच मी कौन्सिलात जाईन... कॉंग्रेसच्या विधायक कार्यक्रमास पुष्टी देण्याचा प्रयत्न करीन.... मी देश कायदेभंगाला तयार करीन. '' मोतीलाल नेहरू व दास यांचे म्हणणे असे-- '' गांधींनी सुचविलेले उपाय आम्हांस मान्य आहेत; व त्यांची कायदेभंगाची सूचनाही कबूल आहे. स्वाभिमानाला सोडल्याशिवाय कौन्सिलात काम करणे अशक्य वाटले तर आम्ही कौन्सिलातून जरूर बाहेर पडू, तोपर्यंत देश कायदेभंगास तयार झाला नसल्यास गांधींच्या हाताखाली काम करून तो तयार करू.''[४]

ज्यांनी सरकारी पदव्या, शिक्षणसंस्था, कोर्ट आणि कौन्सिले यावर बहिष्कार घातला नाही, व विधायक कार्यक्रमावरील आपला विश्वास जे सूत कातून दर्शवीत नाहीत, त्यांनी कॉंग्रेसच्या कार्यकारी मंडळावर राहू नये असे गांधीजींनी म्हटले होते, कॉंग्रेसला कायदेभंगासाठी तयार करावे म्हणून तीत शिस्त व एकसूत्रीपणा आणण्यासाठी त्यांनी हे पाऊल उचलले होते; पण स्वराज्य पक्षाने ' आम्हाला कॉंग्रेसमधून हाकलून देण्यासाठीच हा सर्वाधिकारी हुकूम काढला ' अशी ओरड केली. ' महात्माजींनी लोकशाहीच्या तत्त्वाला मूठमाती देऊन झारशाही सुरू केली ' अशी टीका करून केळकर म्हणाले, '' पुनः बहिष्कारपंचकाची मढी उकरून काढून राजकारणाला भेडसावण्याचा व स्वराज्य पक्षाला नामशेष करण्याचा डाव गांधींनी सुरू केला आहे.'' गांधीजींच्या सूचनेप्रमाणे गांधीवादी गट प्रांतिकपासून काही काळ अलग झाला व तो खादीकार्याकडे वळला. यानंतर

अहमदनगरचे चौकर महाराष्ट्र प्रां. कौ. कमिटीचे अध्यक्ष झाले. ल. ब. भोपटकरांनी दिलेली नावेच कार्यकारी मंडळात आली. स्वराज्य पक्षाला मोकळी वाट करून देण्यात आली.

शंकरराव देवांनी. शि. म. परांजपे यांचे ' स्वराज्य ' पत्र घेऊन ते ' यंग इंडिया ' च्या धर्तीवर चालवायचे ठरविले. हरोलीकर प्रकाशक बनले. वि. भ. भुस्कुटे संपादकवर्गात दाखल झाले. शं. द. जावडेकरही त्यात लेख लिहू लागले. विधायक कार्य करणाऱ्यांचे ते मुखपत्र बनले.

' स्वराज्य ' पत्रातील दोन लेखांबाबत शंकरराव देव व हरोलीकर यांना कारावासाच्या शिक्षा झाल्या.

१९२५ च्या अखेरीस प्रतियोगी सहकारिता ही विचारसरणी निश्चितपणे पुढे येत होती. केंद्रीय विधिमंडळ सुरू होण्यापूर्वी (जानेवारी २०, १९२६) मुंबई कौन्सिलमधील स्वराज्य पक्षाने ठामपणे आपला पाठिंबा प्रतियोगी सहकारिता पक्षाला दिल्याचे त्यांनी सुरू केलेल्या प्रचारावरून दिसून आले.

राष्ट्रीय लढ्यातील शक्ती कमकुवत होताक्षणी, तसेच जनतेच्या लढ्यापासून स्वराज्य पक्षाने फारकत घेतली आहे आणि ते अटी घालून त्याचे समर्थन करीत आहेत, अशा वेळी मागील काळात येथील भांडवलदारवर्गाला आर्थिक सवलती देण्याचे धोरण साम्राज्यशाहीने पुनः अवलंबायचे ठरविले. सप्रू, जिन्हा, र. पु. परांजपे या पुढाऱ्यांनी, द्विदल राज्यपद्धतीला अपयश आले आहे, आणि त्याच्या जागी नवीन राज्यपद्धती शोधायला पाहिजे असे ठामपणे सांगायला प्रारंभ केला.

१९२५ च्या डिसेंबरमध्ये विधिमंडळात स्वराज्य पक्षाने केलेल्या कामगिरीचा आढावा काँग्रेसने घेतला, आणि देशातील जनतेला त्यांच्या राजकीय मताधिकाराच्या असलेल्या मागणीला जर प्रतिसाद मिळत नसेल, तर त्यांनी विधिमंडळातून निवृत्त व्हावे असा आदेश दिला. राष्ट्रीय मागणीला नोकरशाहीचा पाठिंबा मिळविण्यासाठी केलेल्या प्रयत्नात अपयश आलेले पाहून मोतीलाल नेहरूंनी आपल्या अनुयायांना मध्यवर्ती असेंब्लीबाहेर पडण्यास सांगितले.

### (३) फेर–नाफेरवाद

१९२२ पासून काँग्रेसमध्ये कौन्सिल बहिष्कारवादी व कौन्सिल प्रवेशवादी असे दोन तट पडले. पहिला पक्ष पूर्वीच्या असहकारितेच्या कार्यक्रमास चिकटून राहणारा असल्यामुळे त्याला त्याच्या प्रतिपक्षाने ' नाफेरवादी ' किंवा ' सनातनी ' असे नाव दिले आणि आपणांस ' फेरवादी ' किंवा पर्यायाने ' नवमतवादी ' असे नाव घेतले. या वादाचे बीज १९२० साली भरलेल्या खास अधिवेशनात पेरले गेले होते. मध्यंतरी दीड वर्षांच्या लढाऊ कार्यक्रमाच्या मोहिमेमुळे त्याला अंकुर फुटला नव्हता. देशबंधु दास यांनी गांधीजींना कौन्सिल

बहिष्कारासंबंधी जोराचा विरोध केला असला, तरी ते सहकारवादी म्हणजे मॉंट-फर्ड सुधारणा चालवून घ्याव्यात या मताचे पूर्वीपासूनच नव्हते व अखेरपर्यंत त्यांनी कौन्सिलातील अडवणुकीचे धोरण सोडले नाही. कौन्सिलातील सनदशीर विरोध–सतत विरोध–हे त्यांचे सतत धोरण होते, व यासच ते कौन्सिलातील असहकारिता असे म्हणत. या धोरणात पं. मोतीलाल नेहरू आणि देशबंधु चित्तरंजन दास यांना अनत्याचारी असहकारितेच्या तत्त्वाशी विरुद्ध असे काही आहे असे वाटत नसे; म्हणून ते आपणांस असहकारी म्हणवून घेत. १९२३ च्या दिल्ली येथील राष्ट्रसभेच्या खास अधिवेशनाने या पक्षास कौन्सिलात जाऊन कार्य करण्यास परवानगी दिली व १९२३ अखेर झालेल्या निवडणुकीत पक्ष सर्वत्र यशस्वी होऊन बहुमताने निवडून आला.

आपले बल विधायक कार्य हेच असून ज्यावेळी आपल्या कौन्सिलातील कार्याचा उपयोग होत नाही असे आपणास दिसून येईल त्यावेळी आपण कौन्सिले सोडून बाहेर येऊ आणि महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली राष्ट्रसभेची शिस्त पाळून शांततेच्या कायदेभंगाची किंवा सत्याग्रहाची चळवळ करण्यास पुढे येऊ असे दास–नेहरूंनी महात्माजींना लेखी आश्वासन दिले व तसे जाहीरही केले.

कॉंग्रेसच्या कलकत्ता अधिवेशनाला (१९२०) जाण्यापूर्वी पुणे येथील सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यात केळकरांचे व्याख्यान झाले. त्यांनी स्पष्ट सांगितले, " असहकाराला आमचा विरोध आहे. मिळेल ते पदरात पाडून घेण्याचे व अधिकाराकरिता भांडण्याचे आमचे धोरण आहे. तथापि आमच्या विरोधाला न जुमानता जर राष्ट्रीय सभेत महात्माजींचा ठराव पास झाला, तर तो आम्ही विनातक्रार मान्य करू." पुढील काळात महाराष्ट्रात गांधी-पक्षीय व केळकर-पक्षीय असे दोन तट पडले. केळकरांनी असहकाराचा पुरस्कारही केला नाही व त्याला विरोधही केला नाही.

महाराष्ट्रातील फेरवाद्यांचे पुढारी होते केळकर. तो पक्ष अधिक संघटित होता. नाफेरवाल्यात जुन्यापेक्षा नव्यांचाच भरणा होता; पण ते सर्व असंघटित होते. शंकरराव देव, दास्ताने असे नवे कार्यकर्ते उदयास येत होते. दास्ताने यांनी प्रो. द. रा. घारपुरे आणि डॉ. भडकमकर यांच्या मदतीने ' सत्याग्रही ' हे वर्तमानपत्र सुरू केले. पुण्यास त्याचे संपादन देव करीत.

केळकरांनी प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिल्याने जमनादास मेहता प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे हंगामी अध्यक्ष झाले. ' राष्ट्रातील राजकीय चळवळीचा यज्ञकुंडातला अग्नि विझत चालला आहे. त्याला काही तरी व्यवहार्य अशा कार्यक्रमाचे खाद्य घालून तो अग्नि चेतवला पाहिजे ' असे केळकर त्यांच्या फेर पक्षाचे समर्थन करीत होते.

महाराष्ट्र प्रांतिक कमिटीच्या वार्षिक निवडणुकीची बैठक त्या समयी विरारला भरण्याचे ठरले होते. फेर व नाफेर हे दोन्ही पक्ष प्रांतिक जिंकण्याच्या दृष्टीने प्रयत्नशील होते. फेर पक्षाच्या मंडळींना जमनादास मेहता यांना अध्यक्ष करायचे होते. शि. म. परांजपे स्वत:चीच उमेदवारी करीत होते. पुण्याहून परांजपे, देव, वासूकाका जोशी, घारपुरे, गुलाम दस्तगीर इत्यादी मंडळी डेरेदाखल झाली होती.

प्रांतिकचे हंगामी अध्यक्ष जमनादास मेहता विरारला आलेच नाहीत. वासूकाका जोशी यांनी दास्ताने यांचे नाव अध्यक्षपदासाठी सुचविले. फेरवाद्यांनी त्याला विरोध केला. फेर-नाफेरवाले यांच्यात रणधुमाळी झाली. परांजपे प्रांतिकचे अध्यक्ष म्हणून निवडून आल्याचे घोषित झाले.

या विरारच्या बैठकीनंतर महाराष्ट्रात दोन प्रांतिक कमिट्या अस्तित्वात आल्या. त्यांचे भांडण अ. भा. कॉंग्रेस कमिटीकडे गेले. गंगाधरराव देशपांडे आणि सेनगुप्ता यांची याबाबत कमिटी नेमण्यात आली. त्यांनी तडजोड काढली की प्रत्येक पक्षाचे ८/८ सभासद अ. भा. कॉं. क. कडे पाठवावेत. गया कॉंग्रेसमध्ये कौन्सिल बहिष्काराचा ठराव पसार झाला, तर प्रांतिक नाफेरवाद्यांच्या हाती द्यावी. ही तडजोड उभय पक्षांना मान्य झाली. राजगोपालाचारींमुळे गया कॉंग्रेसमध्ये नाफेरवाद्यांचे धोरण यशस्वी झाले तरी फेरवादी पक्ष हातातील कमिटी सोडण्यास तयार होईना.

महाराष्ट्र प्रांतिकचे कार्यालय पुण्यास गायकवाड वाड्यात होते. नव्या अधिकारी मंडळांना त्याचा ताबा मिळाला नाही. त्यांनी १८० बुधवार येथे आपले कार्यालय सुरू केले. दोन्हीही पक्षांतर्फे ' जनतेने आम्हासच पाठिंबा द्यावा ' अशी विनंती करण्यात आली. गंगाधरराव देशपांडे यांनी फेर-नाफेरवाद्यात एकी करण्याचा प्रयत्न केला. नाफेरवाद्यांवर निष्क्रियतेचा आरोप करण्यात येऊ लागला.

महात्माजींनी या फेर-नाफेर प्रकरणातून पुरता हात काढून घेतला होता. त्यांनी चरखा संघ, गोसेवा संघ काढून विधायक कामाकडे दृष्टी वळविली, तरी देशात सत्याग्रहाचे वारे होते. नागपूर झेंडा सत्याग्रह, दुसरा आर्म्स ॲक्ट, मिरज संस्थानातील शिखरे आणि पुंडलीकजी यांचा सारावाढीविरुद्ध केलेला सत्याग्रह – त्या काळात असे सोळा सत्याग्रह झाले.[५]

देवांनी फेर-नाफेरवाद्यात समझोता घडवून आणण्याची उमेद धरली. नाफेरवाद्यातील परांजपे गटाला ही कल्पना मान्य नव्हती. टिळक पुण्यतिथीच्या दिवशी पुण्यात टिळकभक्तांचे संमेलन झाले (१९२७). या संमेलनाला देव-प्रभृतींना आमंत्रण होते, २७५ लोक हजर होते. देवांची समेटाची कल्पना केळकरांनी उचलून धरली. दा. वि. गोखले प्रभृतींना ही कल्पना मान्य नव्हती.

केळकर, विजापूरचे श्रीनिवासराव कौजलगी, देव, ल. ब. भोपटकर, रा. ग. सोमण, गोखले, डॉ. फाटक व ना. रा. बामणगावकर यांची कमिटी नेमण्यात आली. कमिटीने चर्चा करून एकूण दहा ठराव सभेसमोर आणले व ते पसार झाले. स्वदेशी, बहिष्कार व कौन्सिलबाबत एकमत झाले नव्हते.

राष्ट्रीय सभेत आपले बहुमत होण्याची शक्यता नसली तरी स्वतंत्रपणे पक्ष स्थापन करण्याची कल्पना फेरवाद्यांच्या मनात जोर धरू लागली. मुंबईस एक तात्पुरता टिळक पक्ष निघालाही. विरार परिषदेनंतर महाराष्ट्रात दोन कमिट्या काम करीत होत्याच, देशपांडे–सेनगुप्ता कमिटीने परांजपे कमिटीला मान्यता दिली. जमनादास मेहता यांनी प्रांतिकच्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. फेरवाद्यांनी कॉंग्रेस वर्किंग कमिटीचा निर्णय मानला नाही, शेवटी हा वाद अ. भा. कॉंग्रेसकडे नेण्यात आला. अ. भा. कॉंग्रेसने मुंबईच्या बैठकीत मुरारीलाल, शफी, जोसेफ व कृपलानी यांना पंच नेमून पुनः चौकशी करविली. तिनेही वर्किंग कमिटीचा निर्णय कायम केला. या निर्णयाने फेरवाद्यांनी नाफेरवाद्यांकडे दप्तर दिले; पण शिल्लक रक्कम खास ठरावाने खर्च करून !

कौन्सिल प्रवेशाच्या अभिनिवेशात महात्माजींना विरक्त संन्यासी मानून त्यांच्या विधायक कार्यक्रमाचा ' निवृत्ति ' असा केळकरांनी विपर्यास केला (तारीख २ ऑक्टोबर १९२३ च्या सभेतील केळकर-जयकरांची भाषणे). कौन्सिल प्रवेशाचा विचार करण्यासाठी कॉंग्रेसचे खास अधिवेशन बोलाविण्यात आले होते, तरी ' जादा कॉंग्रेसने कौन्सिल बहिष्काराचा ठराव जरी पास केला तरी आम्ही तो थोडाच मानणार आहोत '? असे केळकर भाषणात म्हणाले.

एप्रिल १९२२ मध्ये पेण येथे दुसरी महाराष्ट्र प्रांतिक परिषद भरली, कृ. प्र. खाडिलकर अध्यक्ष होते. असहकाराच्या कार्यक्रमात फेरफार करण्याचा मोघम ठराव संमत झाला. महात्माजी महाराष्ट्रातील प्रस्थापित पुढारीपणाबाबत जागरूक होते. अणे केळकरांना लिहितात, " साबरमतीच्या तीरावरील आश्रमातून एक एक नवीन हुकूम सुटावेत आणि आम्ही भ्रमिष्टपणाने त्यांचा जप करीत बसावे हे बस्स झाले !"[६] साबरमतीचा आश्रम टिळकांचे तत्त्वज्ञान हाणून पाडण्यासाठीच आहे असा ग्रह काहींनी करून घेतला होता.

महाराष्ट्र प्रांतिक कमिटीत फेरवाल्या पक्षाचे वर्चस्व होते, अन्सारी व राजगोपालाचारी यांनी गया कॉंग्रेससाठी महाराष्ट्र प्रांतिक आपल्या ताब्यात घेण्यास नाफेरवाल्या पक्षास सूचना केली. केळकरांनी प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला व कौन्सिल प्रवेशाच्या प्रचारास प्रारंभ केला.

## (४) प्रतियोगी सहकारिता पक्ष

हकीम अजमलखान यांच्या अध्यक्षतेखाली काँग्रेसने सविनय कायदेभंग चौकशी समिती लोकांच्या प्रतिक्रिया अजमावण्यासाठी नेमली.गया काँग्रेसच्या अधिवेशनाचे अध्यक्ष चित्तरंजन दास यांनी अध्यक्षीय भाषणात कौन्सिल प्रवेशाची योजना घोषित केली. मोतीलाल नेहरूंनी त्यांना पाठिंबा दिला. ब्रिटिश सरकार राष्ट्राची मागणी मान्य करणार नसेल तर कौन्सिल बरखास्त करण्याचा कार्यक्रम हाती घ्यावा असा त्यांचा उद्देश होता. अणे, जयकर आणि मालवीय यांचे विचार निराळे होते. राष्ट्रीय दृष्टीने कौन्सिल प्रवेश करावा असे त्यांचे मत होते. याचा अर्थ कौन्सिले मोडू नयेत; पण मिळालेल्या संधीचा जास्तीत जास्त उपयोग करावा. न. चिं. केळकर यांनी प्रतियोगी सहकाराचे तत्त्व स्वीकारले, आणि कौन्सिल प्रवेशाला मान्यता दिली.

स्वराज्य पक्षाने अधिकारस्वीकाराला नकार दिल्याने केळकर व जयकर यांनी कार्यकारी मंडळाचे राजीनामे दिले. लगेचच त्यांनी प्रतियोगी सहकारिता पक्षाची स्थापना केली, आणि स्वराज्य पक्षाचा मुंबई कौन्सिलमधील मोठा गट त्या पक्षाला मिळाला. ' अमृतसरकडे परत ' यावर जोर दिला; ' प्रतियोगी सहकारिता ' असा त्याचा ते अर्थ करीत. अमृतसर काँग्रेसमध्ये (१९१९) लोकमान्य टिळकांनी ही घोषणा केली होती.

केळकरांनी आपल्या पक्षाचा जाहीरनामा प्रसिद्ध केला. सुधारणा (मॉंट-फर्ड) या असमाधानकारक, निराशाजनक, आणि अपुऱ्या असल्या, तरी त्या राबवाव्यात यावर त्यांनी जोर दिला. काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचा जो कार्यक्रम टिळकांनी आखला तोच कार्यक्रम केळकरांनी स्वीकारला. विधिमंडळात सरकारला संपूर्ण विरोध हे धोरण पक्षाला पसंत नव्हते; तारतम्य पाहून सरकारला विरोध करण्यास ते अनुकूल होते, तसेच स्वराज्य पक्षाचे मुसलमानांना अनुकूल असे धोरणही त्यांना मान्य होते. जातीय संघर्ष, खिलाफत चळवळ, आणि मोपल्यांनी मलबारात केलेले अत्याचार--यांमुळे प्रतियोगी सहकारिता पक्षाने हिंदू महासभा बळकट करण्याचे धोरण स्वीकारले. महाराष्ट्रात केळकर काँग्रेस सोडण्यापूर्वीच हिंदू महासभेला मिळाले होते व कानपूर अधिवेशनाचे ते अध्यक्षही झाले होते. वि. दा. सावरकरांचे हिंदू महासभेसंबंधीचे विचार त्यांनी कधीच स्वीकारले नव्हते. सर्वसाधारणपणे, हिंदूमहासभेचे व्यासपीठ काँग्रेसविरुद्ध आणि विशेषेकरून गांधीजींविरुद्ध त्यांनी वापरले.

लोकमान्य टिळक हे राजकीय विचारवंत आणि जनक्षोभाच्या चळवळीचे यशस्वी पुढारी होते; पण टिळकांचे अनुयायी केळकर हे चळवळीचे नेते नव्हते. पूर्वी टिळकांच्या सान्निध्यात आलेल्या व्यक्तींच्या विचाराशी मिळते जुळते असेच केळकरांचे विचार होते. टिळकांच्या प्रमाणे विचारांची नवनिर्मितिक्षमता, तसेच टिळक आणि गांधी यांच्याप्रमाणे जनआंदोलनांचे

नेतृत्व करण्यास आवश्यक असलेले आकर्षक व्यक्तित्त्व (करिष्मा) केळकरांच्यापाशी नव्हते, असेच याबाबत अनेकांनी लिहिले आहे.

केळकरांचा पक्ष स्वराज्य पक्षापासून वेगळा होताच, त्याचा कॉंग्रेसशी असलेला संबंध दुरावत चालला. १९२६ च्या असेम्ब्लीच्या निवडणुका प्रतिसहकार पक्षाने त्याचप्रमाणे नाफेरवाल्यांनीही लढविल्या. पुण्यात निवडणूक मंडळ नेमले गेले. शंकरराव देव व नाना मराठे चिटणीस झाले. जळगाव, येवले व भुसावळ येथील शिवरामपंत परांजपे यांच्या सभा उधळण्याचा प्रयत्न झाला. या निवडणुकीत केळकर व जयकर विजयी झाले. नागपूरला मोरोपंत अभ्यंकर पडले व डॉ. मुंजे यशस्वी झाले. फेर–नाफेर असा वाद न राहता आता फेरवाल्यांतच दोन तट पडले होते.ते वाद मिटविण्यासाठी कॉंग्रेसचे अध्यक्ष श्रीनिवास अय्यंगार पुण्यात आले होते. कॉंग्रेसचे उरलेसुरले नियंत्रणसुद्धा काढून टाका असा प्रतिसहकार पक्ष हट्ट करीत होता. मात्र कॉंग्रेसच्या कारभारात आमचे म्हणणे ऐकले पाहिजे ही त्यांची अट कायम होती.

साताराच्या प्रांतिक परिषदेत (१० मे ) अध्यक्ष चौकर गैरहजर राहिले. नंतर त्यांनी अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. भोपटकर यांनी सूत–अट काढून टाकण्याचा ठराव आणला व विठ्ठलभाई पटेल यांनी त्याला अनुमोदन दिले. रामराव देशमुख यांनी ' महात्माजी कॉंग्रेस सोडून गेल्यास बरे होईल ' असे उद्‌गार काढले.

तांबे यांनी मध्यप्रांतात दिवाणगिरी स्वीकारली म्हणून केळकरांनी तार पाठवून त्यांचे अभिनंदन केले.पटेल व तांबे एकाच गोटात येतात. ' पटेल सरकारी खजिन्यातून पगार घेतात (असेंम्ब्लीचे अध्यक्ष म्हणून), मोतीलालजी स्कीन कमिटीत गेले ' अशी टीका जयकरांनी केली. (कमिटीच्या सभासदांना भत्ता मिळतो). या टीकेमुळे मोतीलालजींनी स्कीन कमिटीचा राजीनामा दिला.

तांबे यांना तार पाठविण्यात उतावळेपणा झाला, हे केळकरांनी मान्य केले तरी देखील ' महाराष्ट्रीय पक्ष हा स्वराज्य पक्षरूपी शरीराचा कुजलेला भाग आहे, तो कापूनच काढला पाहिजे ' अशी मोतीलालनी टीका केली होती. यावर ' माझा जसा हा अविचार तसा पंडितजींचा हा प्रत्यविचार ' झाल्याबद्दल केळकरांनी पंडितजींना दूषण दिले, व स्वराज्य पक्षातून महाराष्ट्रीय पक्षाने राजीनामे देऊन आपला वेगळा प्रतिसहकार पक्ष काढला (नोव्हेंबर १९२५). १९२५ च्या जूनपासून प्रतियोगी सहकारितेचा प्रचार चालू झाला होताच. जुलैमध्ये दासबाबू वारले व मोतीलाल स्वराज्य पक्षाचे पुढारी झाले व गांधीनी वर्षाचा करार रद्द करून कॉंग्रेसची सर्व सूत्रे त्यांच्या हाती दिली. ' हल्ली स्वराज्य पक्षात अधिकाराचे केंद्रीकरण अतिरेकाला गेले आहे. ते किंचित ढिले करून प्रत्येक प्रांताला आपापल्या

प्रांतापुरते धोरण आखण्याला स्वातंत्र्य दिले गेले तर त्या पक्षाची कामगिरी याहून वाखाणण्याजोगी होईल ' असे खापर्डे म्हणाले. ' प्रतियोगी सहकारितेचा ' त्यांनी पुकारा केला; पण ' हे शरणागतीचे धोरण आहे ' असे बिपिनचंद्र पाल म्हणाले.[७] स्वराज्य पक्षात असे संघर्ष होत होते. शेवटी जयकर-केळकरांनी नोव्हेंबर १०, १९२५ ला कार्यकारी मंडळाचे राजीनामे दिले, नंतर अणे यांनीही राजीनामा दिला.

मुंबईत संयुक्त बैठक भरवून तडजोड करण्याची इच्छा नेहरूंनी स्वतःच पत्र लिहून व्यक्त केली. त्याप्रमाणे मुंबईस दोन्ही पक्षांचे लोक व श्रीनिवास अय्यंगार, सरोजिनीदेवी वगैरे अध्यक्ष एकत्र जुळून कानपूर काँग्रेसपर्यंत (डिसेंबर १९२५) सर्व चळवळ बंद करण्याचे ठरले. कानपूर अधिवेशनात ' सविनय कायदेभंगासाठी लोकांना तयार करण्यासाठी जो कार्यक्रम उपयोगी पडेल तोच हाती घेण्यात येईल व त्यास विरोधी अशा कोणत्याही चळवळीत काँग्रेस भाग घेणार नाही ' असा ठराव संमत झाला. यानंतर केळकर, जयकर, अणे इत्यादी प्रतियोगी सहकारवाद्यांनी स्वराज्य पक्षाचे राजीनामे सादर केले. अकोला येथे जयकर यांच्या अध्यक्षतेखाली मोठी परिषद झाली (फेब्रुवारी १४, १९२६), व रीतसर प्रतियोगी सहकारिता पक्षाची स्थापना झाली. या पक्षाने सर्व प्रांतांना आपापल्या परिस्थितीप्रमाणे काँग्रेसचे सभासद होण्याबाबत मुभा दिली होती, तरी महाराष्ट्रात सक्ती होती.

' साबरमती ' करार मोडला गेला व दोन्ही पक्ष एकमेकांना दोष देऊ लागले. ठरावाच्या अर्थाबाबत मतभेद झाले. सरोजिनी देवींनी प्रतियोगी सहकार पक्षास अहमदाबाद अ. भा. काँ.क. च्या वेळी तडजोड करण्यास बोलावले; पण केळकरांनी व त्यांच्या पक्षाने नकार दिला. प्रतियोगी सहकार पक्षाच्या सभासदांनी स्वतंत्रपणे निवडणुका लढविल्या, ' वृक्षाच्या फांदीवर बसून फांदीच्या मुळाशी कुऱ्हाडीचे घाव ' मारणे बरे नाही असा टिळकांनी दिलेला दृष्टान्त समर्पक होता असे असहकारवादी म्हणू लागले.

### (५) नॅशनॅलिस्ट पक्ष

हा पक्ष प्रतियोगी सहकारिता, स्वतंत्र आणि नेमस्त अशांचा बनलेला होता. त्याची परिषद मुंबईला एप्रिल ३, १९२५ ला भरली होती. त्याला १२५ प्रतिनिधी उपस्थित होते, कट्टर स्वराज्य पक्षीय व असहकारितावादी मात्र त्यात नव्हते. सप्रू अध्यक्षस्थानी होते. र. पु. परांजपे, एन. एम. जोशी, मालवीय, ॲनी बेझंट, सेटलवाड, जयकर, चिंतामणी इत्यादी पुढारी परिषदेला उपस्थित होते. कायदेशीर (सनदशीर) मार्गाने ब्रिटिश साम्राज्यांतर्गत जबाबदार राज्यपद्धती प्राप्त करून घेणे हे ध्येय होते (जनतेचा सविनय कायदेभंग आणि करबंदी हे मार्ग त्यांना मान्य नव्हते). जरूर तर विधिमंडळात प्रतियोगी सहकारितेचा अवलंब करण्याचे स्वातंत्र्य देण्यात येईल, असेही जाहीर करण्यात आले.

हा पक्ष म्हणजे स्वराज्य पक्षाला आव्हानच आहे असे मोतीलाल नेहरूंना वाटले.

एप्रिल २१, १९२५ ला साबरमती येथे एक सभा झाली. या सभेला गांधीजी, नेहरू, लजपतराय, केळकर, जयकर, अणे, मुंजे ही मंडळी उपस्थित होती. ' मंत्र्याला त्याचे कार्य परिणामकारकपणे करण्यासाठी आवश्यक असे अधिकार, जबाबदारी आणि उपक्रमशीलता जर दिली ' तर ते समाधानकारक होईल असे समजण्यात येईल. या संदर्भात, मोतीलाल नेहरू आणि जयकर यांच्या समितीने मध्यवर्ती विधिमंडळाचे सदस्य निश्चित करावेत असा निर्णय करण्यात आला. हाच **साबरमती करार** होय. या कराराच्या अर्थाबाबत खूप गरमागरम चर्चा झाली व स्वराज्यपक्षीय आणि प्रतियोगी सहकाऱ्यात फूट पडली.[८]

१९२७ मध्ये कार्य करणाऱ्या शक्ती खालीलप्रमाणे होत्याः (१) विशेषतः वकील, पत्रकार, उच्चविद्याविभूषित, लक्षात घेण्याजोगा व्यापारी (विशेषतः शहरातील मोठा) वर्ग, तसेच ब्रिटिश सरकारशी तडजोड करण्याच्या राजकारणाला पाठिंबा देणारा भांडवलदारवर्ग, मध्यमवर्गीय, बुद्धिवादी–अशांची निर्माण झालेली भांडवलदारी लोकशाही शक्ती. (२) गरीब मध्यमवर्ग,– विद्यार्थी, कचेऱ्यातील कर्मचारी, लहान शेतकरी, ब्रिटिश साम्राज्यापासून पूर्ण फारकत म्हणजेच स्वातंत्र्य असे समजून त्यासाठी लढण्यास तयार असलेला औद्योगिक कामगारवर्ग–यांचे प्रतिनिधित्व करणारा क्रांतिकारक प्रवाह.(३) धर्म किंवा जात यांनी विभागलेले राजकीय पक्ष व त्यांचा जातीय प्रभाव.[९]

### (६) कामगार शेतकरी पक्ष

१९२७–२८ सालापासून भारतात मे दिन, लेनिन दिन, रशियन क्रांति दिन हे आणि अशा स्वरूपाचे दिन साजरे होऊ लागले. मुंबईतील गिरणी कामगारांच्या शांततामय मिरवणुकीवर पोलिसांनी गोळीबार केला (एप्रिल २३, १९२८). त्यात एक कामगार ठार झाला, आणि कित्येक जखमी झाले. गोळीबारात ठार झालेला परशराम जाधव हा संप संघटित करण्यासाठी कामगारांना आवाहन करीत होता. जाधवांची प्रचंड प्रेतयात्रा ही कामगारांना कृति करण्याला प्रेरक अशी निशाणीच ठरली. ३ मे रोजी संपसमितीने आपल्या मागण्या गिरणी मालकांना सादर केल्या. कनिष्ठ जातीय कामगारात भेदाभेद करू नये, तसेच ५० स्वयंसेवकांचे पथक उभारावे, हिंदू-मुस्लिम ऐक्य राखावे–हे करण्याचा निश्चय त्यांनी व्यक्त केला.

१९२७ मध्ये कानपूर येथे भरलेल्या आयटक (ऑ. इं. ट्रेड युनियन कॉंग्रेस) चे अध्यक्ष दिवाण चमनलाल यांनी आपल्या भाषणात प्रतिनिधींना जमीन आणि उद्योगधंद्यांचे राष्ट्रीयीकरण, कामगारांचे राज्य, मानवता आणि शांतता यांचे रक्षण करण्यासाठी आवश्यक अशी आर्थिक पद्धती यांची मागणी करून या उच्च ध्येयांचे निशाण उंच फडकत ठेवण्याचे आवाहन केले.

या घटनांची मीमांसा रजनी पाम दत्त यांनी मार्मिकपणे केली आहे. '' विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकाच्या मध्यात प्रथमच एक नवीन घटक विकसित झाला, आणि राष्ट्रीय लढ्याला त्याने निर्णायक गति दिली. त्याचे पुढारीपण प्रस्थापित झाले नाही तरी औद्योगिक कामगारांची स्वतंत्र ताकद उदयाला आली. तो कामगार स्वतःचे लढे अत्यंत उत्साहाने आणि वीरश्रीने लढवून स्वतःचे पुढारीपण विकसित करीत होता. अशा प्रगतीमुळे कामगारवर्गाची म्हणजेच समाजवादाची विचारसरणी राजकीय घटक म्हणून भारतात प्रथमच उदयाला आली, आणि त्या विचारांचा प्रभाव, तरुण तसेच भारतीय राष्ट्रवादी चळवळीतील डाव्या विचारसरणीच्या लोकांवर पडला आणि त्यामुळे चळवळीला नवीन जोम आणि प्रोत्साहन मिळाले व तिचे क्षितिज विस्तार पावले.''[१०]

१९२१ मध्ये सरकारच्या अधिकाराचा प्रतिकार करण्यात दिसून येणारा जोम वा जोश हा सार्वजनिक जीवनाचा मोठाच भाग झाला होता. आपल्या भोवतालची परिस्थिती लक्षात घेऊन तसेच त्यांना भेडसावणाऱ्या स्थानिक आणि नागरी प्रश्नांच्या बाबतीत देशाच्या निरनिराळ्या भागात लोकांनी त्या तंत्राचा उपयोग केला. भारताच्या राष्ट्रीय चळवळीच्या इतिहासात वाढते महत्त्व असलेली दुसरी महत्त्वाची घटना असहकारितेच्या नंतरच्या कालखंडात दिसून आली. ती म्हणजे सोशालिस्ट व कम्युनिस्ट गटांची वाढ, तसेच कामगारवर्गाच्या स्वतंत्र, आर्थिक व राजकीय संघटनांचा उदय. [११] कानपूर बोल्शेव्हिक कटाच्या खटल्याने (१९२५) डाव्या चळवळींना गति प्राप्त झाली. राष्ट्रीय चळवळीवर त्याचा प्रभाव पडला.

मुंबईतील कामगार शेतकरी पक्षाची स्थापना १९२७ साली झाली. १९२५ पासूनच मुंबईत काँग्रेस कामगार गट काम करीत होता. ' **क्रांति** ' हे या पक्षाचे मराठी मुखपत्र होते. राष्ट्रीय स्वातंत्र्यलढ्यासाठी ऑक्टोबर क्रांतीचे महत्त्व हा पक्ष जनतेत लोकप्रिय करीत होता, आणि १९२७ मध्ये प्रथमच या पक्षाने ऑक्टोबर क्रांतिदिन मुंबईत एका सार्वजनिक सभेत साजरा केला. या पक्षाने आपल्या कार्यक्रमात काँग्रेस ही धनिक वर्गाचे प्रतिनिधित्व करते म्हणून वर्गीय हितसंबंधांच्या बेड्या तोडून तिला मुक्त करण्याच्या कार्यक्रमावर भर दिला. काँग्रेसचे ध्येय संपूर्ण स्वातंत्र्य प्रौढ मतावर आधारित असे स्वराज्य हे असावे आणि जनतेची व्यापक जागृती झाल्यास ' प्रत्यक्ष कृती ' आणि ' सविनय कायदेभंग ' यांचा यशस्वीपणे वापर करणे शक्य होईल. काँग्रेस ही अधिक लोकशाहीवादी करावी, तसेच राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याचे अ. भा.हत्यार म्हणून तिचे रूपांतर करावे असे त्या पक्षास वाटत होते, हे उघड होते.

मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटीत ' काँग्रेस लेबर पार्टी ' या नावाने काम करणाऱ्या पक्षाची परिषद काँग्रेस हाऊसवर भरविण्यात आली आणि त्यात या गटाचे नाव ' कामगार

शेतकरी वर्ग ' असे एकमताने ठेवण्यात आले. या पक्षाचे अध्यक्ष म्हणून धुंडिराज ठेंगडी यांना निवडण्यात आले. मिरजकर यांना सेक्रेटरी, झाबवाला आणि एस. व्ही. घाटे यांना कार्यकारी मंडळाचे सदस्य; लालजी पेंडसे यांना कॉंग्रेसकार्य, के. एन. जोगळेकर यांना कामगार चळवळ, निमकर यांना शिक्षण आणि जे. बी. पटेल यांना कामगार शेतकऱ्यांच्या चळवळी अशी कामाची वाटणी झाली. राष्ट्रीय कार्यकारिणीवर निमकर, जोगळेकर, घाटे आणि डांगे हे मुंबईचे प्रतिनिधी म्हणून घेण्यात आले.[१२]

कामगार शेतकरी पक्षाचा जाहीरनामा उघडपणे काढण्यात आला आणि तो मद्रास कॉंग्रेस अधिवेशनात (१९२७) वाटण्यात आला. त्या जाहीरनाम्यात खालील घोषणा होत्या :– '' सायमन कमिशनवर बहिष्कार, गोलमेज परिषदांना विरोध, राष्ट्रीय घटना समिती, सार्वजनिक प्रौढ मतदान, राष्ट्राला संपूर्ण स्वातंत्र्य, बहुजनसमाजाच्या कृतीमागे सर्व समाजाचा पाठिंबा मिळविणे, उभा करणे, सार्वत्रिक संप आणि करबंदी, कसणाऱ्या शेतकऱ्याला जमीन, कष्टकऱ्याला भाकर आणि सर्वांना शिक्षण.''[१३]

कामगार शेतकरी पक्षाचे सदस्य म्हणून कम्युनिस्टांनी संप समिती संघटित करण्यात पुढाकार घेतला आणि गिरणी कामगारांच्या संपाला पुढारीपण दिले. १९२८–२९ मध्ये झालेल्या संपाचा उठाव, आणि जनतेच्या इतर चळवळीत कामगार शेतकरी पक्षाने पहिल्यांदा बंगालमध्ये (१९२६) आणि नंतर मुंबईत (१९२७) पुढाकार घेतला.

१९२८ डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यात कॉंग्रेसचे अधिवेशन कलकत्ता येथे भरणार होते, त्या वेळेस २१ ते २४ डिसेंबर या काळात कलकत्ता येथे कामगार शेतकरी पक्षाचे पहिले अ. भा. अधिवेशन कॉ. सोहनसिंग जोश यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाले. साम्राज्यशाहीविरोधी, सरंजामशाहीविरोधी, आणि लोकशाहीवादी असा स्पष्ट कार्यक्रम, संपूर्ण स्वातंत्र्यासाठी राष्ट्रव्यापी लढा उभारण्याची मागणी या अधिवेशनात करण्यात आली आणि या मागण्यांसाठी कॉंग्रेसच्या मंडपासमोर प्रचंड निदर्शने करण्यात आली.

१९२९ च्या अखेरीस कामगार शेतकरी पक्षाचे काम स्थगित झाले. १९२९ च्या कॉंग्रेसच्या अधिवेशनाच्या वेळेला, कामगार शेतकरी पक्षाची दुसरी परिषद लाहोरला भरविण्यात आली. मुंबईच्या कामगार शेतकरी पक्षाचा छापील जाहीरनामा तेथे वाटण्यात आला. त्यात सांप्रदायिकपणा (पंथप्रवृती–Sectarian) दिसून येऊ लागला. त्याच्या पहिल्या पानावर एक अवघड प्रश्न होता– '' साम्राज्यांतर्गत वसाहतीच्या स्वराज्यात गांधी आणि नेहरू यांच्याबरोबर साम्राज्यशाही मशिनगन्स तुमचे संरक्षण करतील का? संपूर्ण स्वातंत्र्यासाठी चाललेल्या लढ्यात कामगाराबरोबर **मशिनगन्सना** तुम्ही तोंड द्याल ? '' तथापि, कॉंग्रेसच्या संपूर्ण स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्यांना कामगार शेतकऱ्यांच्या लढ्यात समभागी होऊन, हा

लढा ग्रामीण भागात नेला पाहिजे असे त्यांनी काँग्रेसच्या अनुयायांना आग्रहाने सांगितले. साम्राज्यशाही लढ्यात सक्रिय भाग घेण्यासाठी, तसेच कामगार शेतकऱ्यांच्या वर्गीय मागण्या मिळविण्यासाठी त्यांनी जनतेला संघटित केले. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याच्या विकासावर त्याचा परिणाम झालाच. स्वतंत्र राजकीय पक्ष म्हणून काम करण्याऐवजी काँग्रेसमधील डावा गट म्हणूनच कामगार शेतकरी पक्ष काम करीत होता. काँग्रेसमधील डावे गट व कम्युनिस्ट आणि कामगारवर्ग यांच्या एकजुटीमुळेच कामगार शेतकरी पक्ष संघटित झाला होता. काँग्रेसच्या मद्रास येथील अधिवेशनात (१९२७) कामगार शेतकरी पक्षाचे निराळे कार्य आहे असा उल्लेख भाषणात आला नव्हता. इतकेच नव्हे तर ' जर काँग्रेसला राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा चालू करायचा असेल तर काँग्रेस हा जनतेचा पक्ष झाला पाहिजे ' असेही घोषित करण्यात आले. [१४]

डिसेंबर २३ ते २५, १९२८ या काळात कलकत्त्याला झालेल्या पक्षाच्या पहिल्या अखिल भारतीय अधिवेशनात ' इंडिपेन्डन्स फॉर इंडिया लीग ' वर प्रखर टीका करण्यात आली. ' त्याच्या भूमिकेत काही विशेष नसून ती स्वीकारण्याजोगी नाही, भांडवलदारांतील अधिक नेमस्तांनाही ती संपूर्णतः मान्य होणार नाही. ' चळवळीची गति वाढवण्यासाठी सर्व संघटनांची एकत्रित आघाडी उभी करण्यावर त्यांनी भर दिला. वाढत्या जनआंदोलनाची खरीखुरी प्रातिनिधिक अशी कामगार शेतकरी पक्षाची भूमिका होती.[१५]

पक्षाच्या पहिल्या अधिवेशनात (कलकत्ता) संमत झालेल्या प्रस्तावात म्हटले आहे–'' नेहरू अहवाल ही संपूर्णपणे फार पुरोगामी नसलेली भांडवलदारी लोकशाही योजना आहे. साम्राज्यशाहीच्या संबंधात विचार करता भांडवलदारांची ती कमीत कमी मागणी आहे. त्याचा स्वीकार म्हणजे एक वर्षापूर्वी (म्हणजे १९२७ मध्ये मद्रास अधिवेशनात) काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी घेतलेल्या भूमिकेपासून निर्णायक माघार होती. किरकोळ मतभेद बाजूला सारून केलेली दिलजमाई, साम्राज्यशाहीपुढे शरणागती, कमीत कमी करण्यात आलेल्या मागण्यां–या पायावर जनतेपासून संपूर्णपणे दूर गेलेला एकमेव प्रतिगामी गट या स्वरूपात भांडवलदारी योजनेचे दृढीकरण झाले होते.''. [१६] या ठरावात पुढे म्हटले होते–'' आंतरराष्ट्रीय क्षेत्रात कामगार चळवळीने स्पष्ट धोरण स्वीकारले पाहिजे. कामगार चळवळीतील उजव्या विचारसरणीच्या लोकांचा ॲमस्टरडॅम येथील मध्यवर्ती कामगार संस्थेशी (टी. एफ. टी. यू.) कामगार युनियन जोडण्याचा डाव सर्व साधनांनिशी हाणून पाडला पाहिजे व त्या मॉस्कोतील आर. आय. एल. यू. शी जोडल्या पाहिजेत.........साम्राज्यविरोधी संघाशी (लीग अगेन्स्ट इंपीरियालिझम) सुद्धा जोडल्या पाहिजेत.''[१७]

पक्षाने पुढील कामे हाती घेण्यास तरुणांना आवाहन केले :––(१) राष्ट्रीय चळवळीत भाग घेणे, (२) तरुण कामगारांना कामगार चळवळीत खेचून ती वाढविणे व कामगारांच्या

परिस्थितीचा अभ्यास करणे, (३) विशेषतः बेकार तरुणांच्या खास तक्रारी दूर करण्यासाठी लढणे, (४) राजकीय परिस्थितीचा अभ्यास करणे व स्वतःची तयारी करणे, (५) कामगार, शेतकरी व विद्यार्थी यांना राजकीय आणि आर्थिक विषयांचे शिक्षण देणे, (६) अस्तित्वात असलेल्या तरुणांच्या संघटनांमध्ये पुरोगामी विचार आणि सुसंगत असे दृढ धोरण आखून त्यांचा प्रचार करणे.[१८]

कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या सहाव्या जागतिक परिषदेत (मॉस्को–जुलै–ऑगस्ट १९२८) कामगार शेतकरी पक्षाचे भावी काळातील लढ्यात स्थान काय असावे या प्रश्नांबाबत ब्रिटनची कम्युनिस्ट पार्टी आणि सोव्हिएट युनियनची कम्युनिस्ट पार्टी यात मतभेद होऊन फूट पडली. काँग्रेसमध्ये शिरून प्रभाव पाडण्यात, किंवा भारतात क्रांतिकारक पक्षाचा पाया घालण्यात कामगार शेतकरी पक्ष अपयशी झाल्याचे मान्य करण्यात आले.

बारडोलीत चळवळ करणारे शेतकरी मुख्यतः श्रीमंत आणि भरभराटीला आलेले पाटीदार असल्याने पक्षाच्या कलकत्ता परिषदेत त्यांच्यासंबंधी छोटे, अस्पष्ट आणि सहानुभूती दाखवणारे असे पत्रक पक्षाने काढले. मुंबईच्या पक्षाने एक पाऊल पुढेच टाकले. र. शि. निमकर या आघाडीच्या पुढाऱ्याने बारडोली चळवळीवर जोरदार टीका केली. त्यांची भूमिका अशी होती–" जमीनदारांच्या पिळणुकीविरुद्ध ही चळवळ नव्हती. कामगार शेतकऱ्यांच्या खऱ्या हितसंबंधाशी मुळीच सहानुभूती नसलेले असे कित्येक घटक या संमिश्र साम्राज्यवादविरोधी चळवळीत होते. पक्षाच्या काही पत्रकात ' चळवळीचा विश्वासघात करणारे ' ' बारडोलीचे पवित्र पुढारी ' या शब्दात दुःख व्यक्त करण्यात आले होते.

सी. पी. दत्तांनी म्हटले, ' बारडोलीची चळवळ अशी आहे की, तिला आपला पाठिंबा पाहिजे. .... कामगार शेतकरी पक्षाच्या पुढाऱ्यांनी त्याबाबत पाळलेल्या मौनाने त्यांचे काही बरे झाले नाही. शेतकरी, तो गरीब असो वा श्रीमंत असो, त्याचे रास्त असे गाऱ्हाणे असते. पक्षाने त्याबाबत प्रथमपासूनच निश्चित धोरण अंगिकारले असते तर तो शेतकऱ्यांचा कैवारी म्हणून पुढे आला असता, " परंतु नंतर त्यांनी सरदार पटेल यांना पत्र पाठवून शेतकऱ्यांच्या जमीनमहसूल कमी करण्याच्या मागणीला पाठिंबा दिला, आणि मुंबईचे कामगारही त्या लढ्याला पाठिंबा देत आहेत असल्याची ग्वाही दिली.[१९]

एम. एन. रॉय यांनी त्यांच्या अनुयायांना दोन पक्ष संघटित करण्याचा सल्ला दिला. एक म्हणजे कामगार शेतकरी पक्ष व दुसरा भारतीय कम्युनिस्ट पक्ष. भारतातील पहिली संघटित डावी चळवळ असूनही संपूर्णपणे ती शेतकऱ्यांची नव्हती, पण ' कामगार ' असा कंसात उल्लेख असायचे कारण तो पक्ष त्या पक्षाचा ज्येष्ठ भागीदार होता.

या पक्षाचे अस्तित्व मुंबई, पंजाब, संयुक्त प्रांत, बंगाल या भागात जाणवे. या पक्षाच्या चौकटीत कम्युनिस्टांनी एक आघाडीचा पक्ष म्हणून बांधणी चालू केली. कामगारांच्या युनियन संघटित करण्याकडे त्यांनी अधिक लक्ष दिले; पण देशातील शेतकऱ्यांना संघटित करण्यात त्यांनी थोडे किंवा मुळीच लक्ष दिले नाही. ' शेतकऱ्याला जमीन ' हा शेतकरी आघाडीवर त्यांचा कार्यक्रम होता, पण त्यांच्या कार्यात शेतकऱ्यांकडून अनुकूल प्रतिसाद मिळाला नाही. शेतकरी आघाडीवर पक्षाला आलेले अपयश अंशतः कार्यकर्ते व साधनांचा तुटवडा हे होते, तसेच अंशतः चळवळ दडपण्यासाठी सरकारने योजलेले दडपशाहीचे उपाय हेही होते. मुंबईचे पुढारीपण मुख्यतः मध्यमवर्गीय होते. शहरी मध्यमवर्गीय कुटुंबातूनच ते आले होते. त्यात एकही शेतकरी पुढारी नव्हता.

गिरगावसारख्या मध्यमवर्गीय वस्ती असलेल्या विभागात विद्यार्थ्यांची सायमन कमिशनविरोधी निदर्शने व सभा ३ फेब्रुवारी १९२८ ला सर्व दिवसभर चालू होत्या. कामगार शेतकरी पक्षाच्या कार्यकर्त्यांनी ती संघटित केली होती. ही निदर्शने मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटीच्या सहकार्याने होत, कारण निमकर त्याचे सेक्रेटरी होते, तसेच युथ लीग इ. संघटनांच्या मार्फतही होत असत. सरोजिनी नायडू व के. एफ. नरीमन यांनी निदर्शने रद्द करण्यासाठी तरुणांचे मत वळविण्याचा प्रयत्न केला, पण ते चौपाटीवर गेले, तेथे विद्यार्थ्यांची निराळी सभा होऊन त्यात कामगार शेतकरी पक्षाच्या कार्यकर्त्यांची भाषणे झाली.

हा पक्ष नेहमी काँग्रेसला जोड असा किंवा काँग्रेसचे शेपूट या स्वरूपात काम करीत होता; म्हणून त्यातून खरी क्रांतिकारक संघटना निर्माण होऊ शकली नाही. केवळ शाब्दिक जहालपणा मात्र वाढला. पोरकट किंवा बालिश क्रांतिकारक ध्येयवाद या पक्षाला भोवला.

## कम्युनिस्टांची भूमिका

वासाहतिक क्रांति कोण करणार व कशी होणार हा नित्याचा व जिव्हाळ्याचा प्रश्न ७० वर्षांपूर्वी होता.

पहिल्या महायुद्धानंतर भांडवलशाहीचा विस्तार या देशात होऊ लागला. सरकारी दडपशाही जोरात चालू होतीच. अशा परिस्थितीत या लढ्याचे पुढारीपण कोण व कसे घेणार हा नित्याचा प्रश्न होताच. शेतकरी कामगार, मध्यमवर्ग हा राष्ट्रीय लढ्यात सहभागी होत होताच. पण भांडवलदार वर्ग यात काय भूमिका घेणार? तो लढ्याला पाठिंबा देणार का साम्राज्यशाहीचा हस्तक म्हणून राष्ट्रीय चळवळीविरोधी भूमिका घेणार हा खरा प्रश्न होता.

कम्युनिस्ट इंटरनॅशनलमध्ये या विषयावर खूप वादविवाद झाले होते. कॉ. एम. एन. रॉय यांनी भांडवलदार वर्ग हा साम्राज्यशाहीविरोधी राष्ट्रीय लढ्यात विरोधी भूमिका घेईल, साम्राज्यशाहीशी त्यांचे घनिष्ठ संबंध प्रस्थापित झाले आहेत अशी भूमिका घेतली. कॉ. लेनिन यांच्याशी त्यांचा याबाबत वाद झाला होता. वासाहतिक आणि राष्ट्रीय प्रश्न राष्ट्रीय स्वयंनिर्णयाच्या मार्गाने सोडवावा असे लेनिनचे म्हणणे. या लढ्यात राष्ट्रीय भांडवलदार वर्ग हा महत्त्वाचे व क्रांतिकारक स्वरूपाचे कार्य करू शकतो म्हणून कम्युनिस्टांनी या लढ्यात भांडवलदार वर्गाला पाठिंबा दिला पाहिजे हे लेनिनचे म्हणणे कॉ. रॉय यांना मान्य नव्हते. त्यातूनच अनेक वाद निर्माण झाले. गांधींच्या पुढारीपणाला भांडवलदारी पुढारीपण म्हणून रॉय यांचा विरोध झाला. भांडवलदार वर्गाला विरोध करायचा म्हणून राष्ट्रीय लढ्यापासून अलिप्त राहण्याचे धोरण कम्युनिस्टांनी स्वीकारले.

१९२८ च्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या ६व्या काँग्रेसने हेच एकांगी धोरण स्वीकारले व त्यामुळे राष्ट्रीय चळवळीकडे पाहण्याचा कम्युनिस्टांचा दृष्टिकोनच बदलला.

भारतीय कम्युनिस्ट पक्षाची स्थापना १९२५ मध्ये कानपूरला झाली. कॉ. घाटे सेक्रेटरी होते. २० मार्च १९२९ ला भारतातील ३१ निवडक कम्युनिस्ट व कामगार पुढाऱ्यांना मीरत कटात गोवण्यात आले. त्यामुळे एस्. व्ही. देशपांडे व बी. टी. रणदिवे हे कामगार चळवळीत पूर्वानुभव नसलेले पार्टीचे पुढारी झाले.

यासंबंधीची सविस्तर चर्चा डॉ. अधिकारी यांनी " डॉक्युमेंट्स ऑफ दि कम्युनिस्ट पार्टी ऑफ इंडिया " या ग्रंथाच्या १९२० ते १९२८ या काळातील संपादित केलेल्या अनेक खंडात केली आहे. त्यातील आवश्यक तो संदर्भ येथे दिला आहे. तारीख २६ जानेवारी १९३० च्या चौपाटीवरील सभेत राष्ट्रीय निशाणाशेजारी लालबावटा लावण्यासाठी देशपांडे-सुहासिनी यांनी भाग घेतला, पण दांडी-मार्च नंतर राष्ट्रीय चळवळीला उधाण आले तेव्हा देशपांडे यांनी पार्टीचा चळवळीला विरोध असल्याचे सांगितले. घाटे मीरत कटात गोवले गेल्याने देशपांडे पार्टीचे सेक्रेटरी झाले होते.

याच वेळी कॉ. सरदेसाई चळवळीत पडायच्या तयारीत होते. देशपांडे यांनी त्यांना पार्टीचे धोरण सांगून विरोध केला. सरदेसाई यांनी दांडी-मार्च चालू असताना महात्माजींची भेट घेऊन त्यांच्याशी चर्चा केली. महात्माजींनी त्यांना " प्रथम चळवळीत सामील हो " असा सल्ला दिला. सरदेसाई शंकरराव देवांना भेटले. संगमनेरच्या जंगल सत्याग्रहाचे अधिकारपत्र शंकरराव देवांनी सरदेसाई यांना दिले. मुंबईचे सरदेसाई, लालजी पेंडसे, विठ्ठलराव चौधरी इ. अनेक वैयक्तिकरीत्या चळवळीत भाग घेऊन तुरुंगात गेले.

एका संप प्रकरणी रणदिवे तुरुंगात होते. त्यामुळे राष्ट्रीय प्रक्षोभ कसा तीव्र असतो हे त्यांना कळले नाही असे कॉ. उषाबाई डांगे यांनी " पण ऐकतो कोण? " या आत्मवृत्तात म्हटले आहे, ते लक्षात घ्यावयास हवे.

पुढे १९३१ च्या मार्चमध्ये " गांधी आयर्विन " करार झाला. सत्याग्रही सुटले. मीरत कटातील कार्यकर्त्यांना सोडावे असा मुंबईच्या कार्यकर्त्यांनी ठराव केला, पण सरकारने त्यांना सोडले नाही. त्यांच्यावरील खटला चालूच होता. यासंबंधी कॉ. लालजी पेंडसे यांनी त्यांच्या " सप्तदशी " या लेखसंग्रहातील " डांगे-रणदिवे " यांच्यावरील लेखात केलेली चर्चा जिज्ञासूंनी अवश्य वाचावी.

कॉ. डांगे हे टिळकांचे चेले आहोत असे म्हणवीत, पण ते आस्ते आस्ते लेनिनचे शिष्य होऊ लागले. " काँग्रेसमधील जहाल विचारांच्या कार्यकर्त्यांसाठी काँग्रेसचीच " इंडियन नॅशनल लेबर पार्टी " स्थापन करावी अशी सूचना त्यांनी केली होती (" सोशॅलिस्ट " १६ सप्टेंबर १९२२). सुभाषबाबू कम्युनिस्टांविषयी अत्यंत सहानुभूतीने वागत. अवनी मुकर्जी व नलिनी गुप्ता या भूमिगतांना त्यांनीच आश्रय दिला होता, कम्युनिस्टांच्या पाठिंब्यामुळे सुभाषबाबू अ. भा. ट्रेड युनियन काँग्रेसचे अध्यक्ष झाले व एस् व्ही. देशपांडे सेक्रेटरी झाले.

डावे राष्ट्रवादी आणि कम्युनिस्ट यांच्यातील या वाढत्या सहकार्याला कॉमिन्टर्नच्या सहाव्या काँग्रेसने जबरदस्त धक्का दिला. सविनय कायदेभंगाची चळवळ भांडवलदारांनी चालू केली असून डावे राष्ट्रवादी आणि तोतये क्रांतिकारकांचे वस्त्रहरण करणे हे कर्तव्य मानण्यात आले, गांधी, नेहरू व सुभाषबाबू भांडवलदार वर्गाचे प्रतिनिधी आहेत आणि ते श्रमजीवी जनतेच्या मूलभूत हक्काशी विरोधी काम करीत आहेत, नेहरू व सुभाष भांडवलदारांचे हस्तक म्हणून राष्ट्रीय चळवळीत वावरत आहेत असा पुकारा करण्यात आला. डाव्या राष्ट्रवादाशी असलेले संबंध तोडण्यात आले. " आयटक " फोडण्यात आली, आणि " लाल आयटक " स्थापन करण्यात देशपांडे- रणदिवे धन्यता मानू लागले.

सर्वच कम्युनिस्टांनी कॉमिन्टर्नचा आदेश मानला नाही. ज्यांनी त्या विचाराला विरोध केला त्यात कॉ. डांगे आणि पी. सी. जोशी हे अग्रभागी होते. त्यावेळी ते मीरत कटाच्या खटल्यात गोवले गेल्याने मीरतच्या तुरुंगात होते. त्यांनी त्यांच्या सहकाऱ्यांना सविनय कायदेभंगाच्या चळवळीत भारतीय स्वातंत्र्याच्या तडजोडवादीविरोधी भूमिका घेऊन भाग घ्यावा असे निरोप पाठविले. पुढे कम्युनिस्टांपासून दूर झालेल्या फिलिप स्प्रॅटनी त्यांच्या

'' ब्लोइंग अप इंडिया '' या पुस्तकात असे लिहिले आहे. बंगालचे बंकिम मुकर्जी, रेझाक खान, बंगला देश कम्युनिस्ट पार्टीचे मौनी असे त्यात प्रमुख होते.

१९३३ फेब्रुवारीमध्ये सुभाषबाबू युरोपात गेले. लंडनमधील भारतीयांच्या राजकीय परिषदेत बोलताना त्यांनी भारतात '' समाजवादी पक्ष '' संघटित करण्यावर भर दिला. '' या योजनेने राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याला मदत होणार नसून श्रमजीवी जनतेचे दास्य वाढणार आहे..... गांधी आणि बोस यांच्यातील फरक इतकाच की बोस हे अधिक चांगली तडजोड करतील '' अशी टीका कम्युनिस्टांनी केली.

यासंबंधी डॉ. शेषाद्री म्हणतात,' कम्युनिस्टांच्या धोरणावर सुरुवातीपासून रॉय यांचा प्रभाव होता. भारतात झालेली भांडवलशाहीची वाढ आणि देशातील लढ्यात कामगारांचे स्थान याबाबत रॉय यांचा दृष्टिकोन एकांगी (सांप्रदायिक–सेक्टेरियन) होता आणि त्याचेच पडसाद अनेक वर्षे उमटत राहिले. आणि त्यामुळे राष्ट्रीय चळवळ आणि कम्युनिस्ट यांच्यात विरोध निर्माण झाला.' (डॉ. शेषाद्री – '' मार्क्सिझम अँड इंडियन पॉलिटी '' पृ. १३५)

पुढे कित्येक वर्षांनी हे धोरण एकांगी (लेफ्ट सेक्टेरियन) होते असे अनेक कम्युनिस्ट पुढाऱ्यांनी म्हटले आहे.(समारोपात त्याचा परामर्श घेण्यात आला आहेच–लेखक).

कम्युनिस्टांच्या धोरणाबाबत गो. द. साने यांनी लिहिले आहे. '' स्वातंत्र्याच्या चळवळीबरोबरच कामगारांच्या चळवळींना उधाण येत होते, इतकेच नव्हे तर दोन्ही चळवळींचा संगम होण्याची स्पष्ट चिन्हे दिसत होती. महात्मा गांधींचे सुरुवातीपासूनच असे म्हणणे होते की, कामगार संघटनांच्या कार्यकर्त्यांनी कामगार चळवळीत राजकारण आणू नये, अहमदाबादच्या मजूर-महाजनला असहकाराच्या चळवळीपासून गांधींनी अलग ठेवले होते. तथापि लाला लजपतराय, चित्तरंजन दास वगैरे कॉंग्रेस पुढाऱ्यांचा दृष्टिकोन वेगळा होता. लाला लजपतराय यांच्यासारखे पुढारी '' संघटित कामगार हाच भांडवलशाही व साम्राज्यशाहीवर उतारा आहे '' असे म्हणत होते, तर '' राष्ट्रीय चळवळीत व कामगारांच्या चळवळीत झगडा येण्याचे कारण नाही; स्वराज्य जनतेकरिताच आहे '' असे चित्तरंजन दास म्हणत होते.

'' ट्रेड युनियन कॉंग्रेसची स्थापना झाली तेव्हा ती जवळ जवळ कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांच्या वर्चस्वाखालीच होती. तथापि त्याच सुमारास भारतात कम्युनिस्ट विचारसरणीने प्रभावित झालेल्या तरुण कार्यकर्त्यांनी कामगार संघटनांतून काम करण्यास सुरुवात केली. हे कामगार-चळवळीचे लढाऊ नेतृत्व होते, इतकेच नव्हे तर कामगारांत वर्गीय जागृती करण्याच्या कामाला त्यांनीच सुरुवात केली. बरोबर याच वेळी अशा तीन घटना झाल्या

की, ज्यामुळे राष्ट्रीय चळवळीचा व कामगारांच्या चळवळीचा स्पष्ट संगम होण्यात विघ्न निर्माण झाले. चौरीचौरा प्रकरणाचे निमित्त करून १९२२ साली गांधींनी असहकाराची चळवळ मागे घेतली. त्यामुळे जहालांचा विरस झाला. राष्ट्रीय चळवळीला येणाऱ्या उधाणात एकाएकी खंड पडला. कम्युनिस्टांची सुरुवातीची भूमिका अशी होती की, काँग्रेसच्या पुढारीपणाखाली चालू असलेल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यात भाग घ्यावा व त्याबरोबरच ह्या लढ्याला जहाल बनविण्याकरिता कामगारांच्या व शेतकऱ्यांच्या स्वतंत्र संघटनाही बांधाव्यात. १९२० च्या अहमदाबादच्या काँग्रेसच्या अधिवेशनास व १९२२ मध्ये गयेला भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनास कम्युनिस्टांनी जे संदेश पाठविले व ज्या सूचना केल्या त्यावरून हे स्पष्ट होते, पण याच वेळी भारतातील कम्युनिस्टांचे त्या वेळचे नेते कॉ. मानवेंद्रनाथ रॉय यांनी असे धोरण स्वीकारले की, ज्यामुळे कामगार-चळवळ व राष्ट्रीय काँग्रेसची चळवळ यांचा सांधला जाणारा दुवा कमकुवत झाला. रॉय यांच्या मते महात्मा गांधी ह्यांची विचारसरणी मध्ययुगीन असल्यामुळे त्यांच्या नेतृत्वाखाली होणारा काँग्रेसचा लढा पुरोगामी व क्रांतिकारक असणे शक्य नाही. चौरीचौरानंतरची गांधींची माघार ही त्याची साक्ष होती. तेव्हा कम्युनिस्टांनी स्वतःच्या स्वतंत्र पुढारीपणाखाली राष्ट्रीय चळवळ संघटित केली पाहिजे. काँग्रेसच्या चळवळीत व कम्युनिस्टांच्या कामगार-चळवळीत रॉयवादी विचारसरणीमुळे अंतर पडू लागले. अशाच वेळी (१९२४ साली) ब्रिटिश सत्तेने '' कानपूर कट '' नामक खटल्याखाली कम्युनिस्ट नेत्यांना अटक केली.

'' स्वातंत्र्याच्या चळवळीत विशिष्ट पद्धतीनेच (सत्याग्रह, कायदेभंग व वैयक्तिक सत्याग्रह) व विशिष्ट प्रमाणातच जनतेला सामील करण्याचे महात्मा गांधींचे धोरण, साम्यवाद्यांचा काँग्रेसप्रणित चळवळीकडे बघण्याचा एकांगी दृष्टिकोन आणि '' फोडा नि झोडा '' धोरणास अनुसरून अगोदर कम्युनिस्टांवर नि नंतर राष्ट्रीय चळवळीवर आघात करणारे ब्रिटिश सत्तेचे धोरण आपापल्या परीने राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीचा नि कामगारांच्या चळवळीचा दुवा सांधण्याच्या आड येत होते. १९३० सालाच्या कायदेभंगाच्या चळवळीत हेच दिसले. हा एकंदर इतिहास बारकाईने अभ्यासला जाणे अवश्य आहे. १९२० च्या सुमारास कामगारांच्या संपाची लाट भारतात पसरत होती. १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीच्या अगोदरही तेच दृश्य दिसत होते. इतकेच नव्हे तर या वेळी कम्युनिस्ट नेतृत्व कामगारांचे लढे नेटाने लढवत होते. कम्युनिस्ट कार्यकर्ते काँग्रेसमध्येही यावेळी काम करीत होते. राष्ट्रीय चळवळीचा नि कामगार चळवळीचा संगम होण्याची स्पष्ट चिन्हे दिसत होती. बरोबर याच वेळी (मार्च १९२९) परकीय सत्तेने '' मीरत कटाचे '' निमित्त दाखवून कम्युनिस्ट नेत्यांना तुरुंगात टाकले. मागे राहिलेल्या अननुभवी तरुण कम्युनिस्ट कार्यकर्त्यांना १९३० सालच्या कायदेभंगाचे नीट मूल्यमापन करता

नाही. काँग्रेसची चळवळ देशभर जे चैतन्य निर्माण करीत होती ते मुख्यतः लक्षात न १९३०–३४ च्या काँग्रेसच्या चळवळीत जनतेच्या क्रांतिकारक उत्साहाला मुसक्या घालण्याचेच ...ोत आहे व त्याकरिताच सत्याग्रहासारखे तंत्र वापरण्यात येत आहे याकडेच मागे राहिलेल्या ...स्टांचे लक्ष गेले. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट-चळवळीच्या काही निर्णयांनी त्याला मजबुती ...ली (कम्युनिस्ट इंटरनॅशनलची ६वी काँग्रेस –१९२८). सत्याग्रहाच्या चळवळीला काँग्रेसमधील ...ांचाही पाठिंबा होता, त्यामुळे कम्युनिस्टांच्या मते महात्मा गांधीच्या पेक्षाही हे जहाल पुढारी ... दोषी ठरत होते.

१९२५ पासून कामगार चळवळीत कम्युनिस्टांचा बराच प्रभाव होता. लढाऊ ...ार-चळवळीचे नेतृत्व त्यांच्याकडेच होते असे म्हटले तरी चालेल, पण स्वातंत्र्य-संग्राम व ... कामगार चळवळ यांचे फासे प्रत्येक मोक्याच्या वेळी उलटे पडत गेले. त्यामुळे दोन्ही ...ळीचे नुकसान झाले. टाळता आल्या असत्या अशा फुटी १९२९ व १९३१ मध्ये ...ार-चळवळीत पडल्या तर राष्ट्रीय आघाडीवर कराची काँग्रेसच्या घोषणा मागे पडल्या. गोरी ...शाही घालवून त्या जागी देशी नोकरशाही स्थापन व्हावी हे भारतीय जनतेच्या ...-आकांक्षांशी कधीच जुळणारे नव्हते. खुद्द लाला लजपतराय, सी. आर. दास, नेहरू ...सारख्या काँग्रेसच्या पुढाऱ्यांनाही जनतेचे स्वातंत्र्य हवे होते. " ( ' भारतीय प्रबोधन ' मधील ... साने यांचा लेख–समाज प्रबोधन संस्था, पृ. २७५ ते २७७.)

## संदर्भ

(१) रजनी पाम दत्त, उपरोक्त ग्रंथ, पृ. २९२.
(२) तत्रैव.
(३) पी. डी. कौशिक.
(४) बी. बी. मिश्र, उपरोक्त ग्रंथ, पृ. २२१–२२२.
(५) प्रेमा कंटक, ' सत्याग्रही महाराष्ट्र ', पृ. २३०.
(६) न. चिं. केळकर, ' गतगोष्टी ', पृ. ५१७.
(७) न. चिं. केळकर, ' गतगोष्टी ', पृ. ४८३.
(८) इंडिया (१९२५–२६) भारत सरकार प्रकाशन.
(९) बी. बी. मिश्र, उपरोक्त ग्रंथ, पृ. २५२.
(१०) रजनी पाम दत्त, उपरोक्त ग्रंथ, पृ. २९३-२९४.

(११) ए. आर. देसाई, उपरोक्त ग्रंथ, पृ. ३३०–३३९.

(१२) जी. अधिकारी, 'डॉक्युमेंट्स ऑफ दि हिस्टरी ऑफ दि सी.पी.आय.' खंड ३ब, पृ. १५९.

(१३) तत्रैव, पृ. १९.

(१४) जी. अधिकारी, खंड–३सी, पृ. १६९–१७०.

(१५) जी. अधिकारी, खंड–३सी, पृ.७२०.

(१६) जी. अधिकारी, खंड–३सी, पृ.७१४.

(१७) जी. अधिकारी, खंड–३सी, पृ.७२९–७३०.

(१८) जी. अधिकारी, खंड–३सी, पृ.२७१.

(१९) जी. अधिकारी, खंड–३सी, पृ.८५.

# ८. गांधी, नेहरू आणि काँग्रेस विचारप्रणाली

१९२० हे वर्ष एका नवीन ऐतिहासिक कालखंडाचा प्रारंभ समजला जातो. यालाच भारताच्या इतिहासातील, विशेषतः काँग्रेसच्या इतिहासातील गांधी (संघर्ष वा लढ्याचा) प्रारंभ कालखंड असे समजतात. काँग्रेसचे ब्रिटिश सरकारशी असलेले जाहीर संबंध आणि तिचे चळवळीचे घटनात्मक मार्ग – हे त्यांनी बाजूला सारून वा दूर करून काँग्रेसच्या ध्येय-धोरणात फरक केला. असहकारितेवरील ठराव चित्तरंजन दास यांनी मांडला व लाला लजपतराय यांनी त्याला अनुमोदन दिले.

### गांधीजींचे पुढारीपण

गांधीजींच्या पूर्वीची काँग्रेस म्हणजे ' मध्यमवर्गीय चर्चामंडळा ' पेक्षा जरा अधिक पुढे गेलेली होती. '' गांधींनी काँग्रेसचे लोकशाहीवादी आणि बहुजनसमाजाच्या संघटनेत रूपांतर केले. आतापर्यंत काँग्रेस लोकशाहीवादी होती, पण मताधिकार मर्यादित होता आणि वरिष्ठवर्गाशीच तिची बांधिलकी होती. आता शेतकरी नवीन पेहरावात आला. मध्यमवर्गाचा मोठ्या प्रमाणावर शिडकावा असलेले विशाल शेतकरी संघटन असेच त्याला रूप प्राप्त झाले. ''[१]

लाला लजपतराय यांच्या म्हणण्याप्रमाणे गांधीपूर्व कालखंडातील काँग्रेसने जनतेकडून स्फूर्ती घेतलेली नव्हती, किंवा तिच्या कामात नियोजन नव्हते, किंवा ती चळवळ जनतेतून आलेली नव्हती. बहुजनसमाजाची ती चळवळ नव्हती.

गांधीजींच्या पुढारीपणाने काँग्रेसमध्ये नवीन चैतन्य आणले. याच नवीन कालखंडाने नवीन प्रकारच्या राष्ट्रवादाचा उदय पाहिला. राष्ट्रवाद्यांची धार्मिक आस्था किंवा कळकळ त्याचप्रमाणे नेमस्तांचा बुद्धिवाद यात आहे. '' गांधीजी हे नैतिक अधिष्ठान असलेले नेते आहेत..... त्यांनी राष्ट्रीय लढ्याला नैतिक लढ्याचे मोठेपण प्राप्त करून दिले ''[२] ' साध्य हे साधनांचे समर्थन करते ' हा पाश्चात्त्य विचार त्यांनी बाजूला सारला. आपले ध्येय साध्य करण्याकरता पाश्चात्य राष्ट्रवाद दोन गोष्टी जाणतो : घटनात्मक चळवळ आणि हिंसक क्रांती. शत्रूला सोसायला लावण्याऐवजी आत्मक्लेशावर आधारित प्रत्यक्ष अहिंसात्मक कृतीचे नवीन विशेष हत्यार गांधींच्या पुढारीपणाने राष्ट्रवादाला दिले. या नवीन कालखंडानी त्यांच्या मागोमाग नवीन मानसशास्त्रही (मनःप्रवृती) आणले.

गांधी जसे प्रेषित तसे मुत्सद्दी, पुराणमतवादी तसेच सुधारणावादी, पुनरुज्जीवनवादी तसेच क्रांतिकारक होते. या स्वरूपात गांधीजी लोकांपुढे आले. स्वराज्य ही संज्ञा ते व्यापक अर्थाने घेत. ' आम्ही आमच्यावर राज्य करायला शिकतो अशी अवस्था '[३] अशी व्याख्या त्यांनी १९०८ साली केली होती. त्यांना स्वराज्य म्हणजे बाह्य परिस्थिती, तसेच आंतरिक

सद्‌गुण वाटे. सामाजिक दर्जा, आर्थिक ( शोषणापासून ) मुक्तता, आणि राजकीय स्वातंत्र्य ज्यात आहे अशी समाजव्यवस्था आणणे म्हणजे स्वराज्य यासाठी त्यांनी प्रत्यक्ष कोणतीही क्रिया न करता केवळ आज्ञा न जुमानून केलेला विरोध (Passive resistance) हा मार्ग सांगितला.

राष्ट्रवादी तरुणांना नवीन पुढारीपणाची आणि प्रत्यक्ष कार्यक्रमाची आवश्यकता होती. १९१९ नंतर गांधीजींनी हे पुढारीपण दिले. नवीन पुढारी, नवीन ध्येय, नवीन घटना, आणि जनतेच्या मूलभूत परिस्थितीचे आकलन करण्यासाठी बांधलेली नवीन संघटना म्हणजे काँग्रेस. काँग्रेसने राष्ट्राला सत्याग्रहासाठी तयार केले. हा सत्याग्रह म्हणजे राजकीय कृती करण्याची नवीन पद्धती होती. ती क्रांतिकारक होती, आणि तिने घटनात्मक मार्गाचा त्याग केला नव्हता. मॉस्कोत राहणाऱ्या लोकांना लेनिनने सांगितले की भारताच्या स्वातंत्र्यासाठी जनतेच्या चळवळीचे नेते आणि स्फूर्तिदाते गांधीजीच होत.

-राजकारणाला बुद्धीचे अधिष्ठान देण्याचा प्रयत्न गांधींनी केला, लढाऊ राष्ट्रवाद्यांनी त्याला भावनात्मक रूप दिले, गांधींनी त्याचे अध्यात्मीकरण केले. गांधींच्या राष्ट्रवादाचा पाया मानवतावाद होता. मानवी व्यक्तित्वाच्या पायावर अधिष्ठित असा त्यांचा लोकशाहीवरील विश्वास होता.

निःशस्त्र प्रतिकार हे दुर्बलांचे हत्यार आहे, असे गांधींना वाटे; पण सत्याग्रह हे बलिष्ठांचे हत्यार आहे, असे ते म्हणत. कोणत्याही स्वरूपात असलेले शारीरिक बल सत्याग्रहात नसते. सत्याग्रह सत्य, प्रेम आणि अहिंसा यासाठी असतो. या संदर्भात ते म्हणत – '' भारताने आपला स्वतःचा अपमान भ्याडपणाने प्रत्यक्ष पाहण्यापेक्षा, वा लाचार होण्यापेक्षा स्वतःचा मान राखण्यासाठी शस्त्र धारण केले तरी मला चालेल. ''[४]

## क्रियावान पुरुष

गांधी क्रियाशील पुरुष होते, ते स्वप्नाळू नव्हते.भारताची आराधना (सेवा) म्हणजे मूलतः किंवा तत्त्वतः मानवतेची, ईश्वराचीच पूजा आहे, असे त्यांना वाटे. दयानंद आणि टिळक यांच्यासारख्यांची पुनरुज्जीवनवादी लढाऊ परंपरा ते चालवीत होते. आर्थिक राष्ट्रवाद आणि सांस्कृतिक व धार्मिक राष्ट्रवाद यांच्या शक्ती त्यांच्या ठायी एकत्रित झाल्या होत्या.

गांधीजींची अहिंसा म्हणजे कालानुसार केलेली पुनर्मांडणी होती, त्यात दुसरे काही नव्हते. त्यांनी प्राचीन पवित्र ग्रंथातून स्फूर्ती घेतली होती, इंग्लिश उदारमतवादातून नव्हे. ' अहिंसा ही सर्व धर्मात समानच आहे, पण तिचे प्रकटीकरण आणि व्यवहारात आणण्याचे काम हिंदू धर्माने अधिकाधिक केले आहे ' असे त्यांचे मत होते.[५] त्यांनी आपल्या आत्मचरित्राला ' सत्याचे प्रयोग ' असे संबोधिले आहे.

गांधींनी राष्ट्रीय चळवळीचे लोकशाहीकरण केले. त्यांनी जनतेत आत्मविश्वास निर्माण केला, आणि तिला निर्भय केले, आणि अधिकारावर असलेल्यांच्या मनमानी कारवायांचा प्रतिकार करण्याला त्यांना समर्थ केले. त्यांनी सरकारविरुद्ध उघड बंड पुकारले, आणि प्रस्थापित अधिकाराला आव्हान दिले. देशात ब्रिटिश सत्तेला आव्हान देऊन, निश्चित कृती करण्याचा कार्यक्रम जनतेपुढे ठेवला व त्यांची सर्व शक्ती कामाला लावली.

आगाखानांनी गांधीजींना विचारले, " मार्क्सवाद, मार्क्स, एंगल्स, लेनिन, स्टॅलिन यांबद्दल आपले काय मत आहे? " गांधी म्हणाले, "...मार्क्सने वर्णिलेली अखेरची अवस्था जर प्रथम आली, आणि लेनिनची आर्थिक ध्येय-धोरणे ताबडतोब कृतीत आणली, तर मी शंभर टक्के कम्युनिस्ट होईन. " राज्य हे खऱ्या अर्थाने विरून जाऊ द्या. त्यामुळे निर्माण होणारे सौख्य हे इतके विशाल आणि सर्वांना इतके बंधनकारक असेल की इतर देशांना लाज वाटेल व ते भांडवलदारी–साम्राज्यवादी–समाज विरून टाकतील. " [६]

१९०५ मध्ये गांधींनी दक्षिण आफ्रिकेतून लिहिले की मिठावरील कर रद्द व्हावा. जानेवारी १९३० मध्ये लॉर्ड आयर्विनकडे पाठविलेल्या मागण्यांत मिठावरील कराचा समावेश होता. फेब्रुवारी ५ पर्यंत, म्हणजे दांडी यात्रा (दांडी मार्च) निघण्यापूर्वी फक्त पाच आठवडे, मिठावरील कराच्या संदर्भात गांधी सविनय कायदेभंगाचा लढा हाती घेतील, असे वृतपत्राच्या प्रतिनिधींनी प्रसिद्ध केले; परंतु फेब्रुवारी १९२७ पर्यंत गांधीजींनी याबाबतची भूमिका स्पष्ट केली नाही.' हवा आणि पाणी याच्या खालोखाल जीवनात कदाचित मिठाची सर्वात जास्त गरज असावी. गरिबांना हा फक्त एकमेव मसाल्याचा पदार्थ आहे. ' मिठावरील कर अमानुष आहे असे ते म्हणत.

मिठाच्या एकाधिकाराविरुद्धचा लढा दुसरीकडे वळविण्याचे गांधीजींनी ठरविले; ती मोहीम स्वतःच्या तसेच निवडलेल्या अनुयायांच्या हाती राहावी असा त्यांचा हेतू होता. जनतेच्या लढ्याचे पुढारीपण आपल्या हाती ठेवणे, तसेच त्यावर नियंत्रण ठेवणे हा त्यांचा उद्देश होता. १९३० मध्ये गांधीजींनी व्हाइसरॉयला अकरा मागण्या सादर केल्या, पण त्यांनी जमीनदारविरोधी शेतकऱ्यांच्या मागण्यांचा त्यात समावेश केला नाही. अशा प्रकारची वर्गीय मागणी भारतीय राष्ट्रीय चळवळीत आणण्याची त्यांची इच्छा नव्हती; यासाठी डाव्या विचारसरणीच्या कार्यकर्त्यांनी त्यांच्यावर टीका केली. त्यांनी अकरा मागण्या मागितल्यामुळे संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी ही केवळ सौदेबाजीसाठीच होती. पहिल्या असहकारितेच्या चळवळीच्या वेळी (१९२०) स्वातंत्र्य हे भाकरीच्या रूपातच जनतेपुढे येईल, असे त्यांनी म्हटले होते. दुसऱ्या गोलमेज परिषदेत (१९३१) भाषण करताना ते म्हणाले, " देशभर सर्वत्र विखुरलेल्या मुक्या व अर्धपोटी जनतेचे प्रतिनिधित्व मुख्यतः कॉंग्रेस करते. या मूक अर्धपोटी जनतेचे हितसंबंध इतर कोणाहीपेक्षा कॉंग्रेसच रक्षण करते, आणि त्यासाठी

कोणताही त्याग करायला ती तयार आहे. पण मे १९२१ मधील गुप्त सरकारी नोंदीत म्हटले आहे की, गांधींनी बोल्शेव्हिझमपासून वाचविण्यासाठी हे केले. '' [७]

## जवाहरलाल नेहरू

' आहिरे ' आणि ' नाहिरे ' यांच्या हितसंबंधातील लढ्याकडे नेहरूंनी मुख्यतः लक्ष वेधले. भारताच्या स्वातंत्र्याला ते साधन मानीत. साध्य म्हणजे लोकांचे कल्याण. नवीन आर्थिक विचार आणि कालबाह्य जुनी विचारसरणी यांच्यातील द्वैतांकडे झगड्याकडे त्यांनी लक्ष वेधले. '' शोषित जनतेच्या मुक्ततेसाठी सर्व जगभर चाललेल्या मोठ्या लढ्याचा भाग म्हणजेच भारताचा स्वातंत्र्यलढा. जरी त्यांनी राष्ट्रवादाचा बुरखा घेतला असला तरी मूलतः हा आर्थिक लढा आहे, भूक आणि गरजा या त्याच्या प्रवर्तक शक्ती आहेत.''[८] असे नेहरूंनी म्हटले आहे. भारतीय स्वातंत्र्य-संग्रामातील डाव्या विचारसरणीच्या कार्यकर्त्यांच्या आंतरराष्ट्रीय संबंधांची त्यांना पुरेपूर जाण होती. कम्युनिस्टांबरोबरच डाव्या विचारसरणीच्या राष्ट्रवाद्यांचे श्रम त्याला कारणीभूत झाले आहेत. त्यांनी काँग्रेसचा कार्यक्रम आणि दृष्टिकोन यांना संथ गतीने डावी आणि क्रांतिकारक दिशा लावली.[९] भारतीय जनतेच्या शोषणाचा अंत हेच भारताचे ताबडतोबीचे ध्येय असले पाहिजे, खास वर्गीय सवलती आणि गुंतलेले हितसंबंध यांचा नाश झाला पाहिजे, सर्व जगभर वसाहतवाद आणि वंशवाद यांच्या विरोधी चाललेल्या लढ्याशी भारताचा स्वातंत्र्यलढा संबंधित होता, असे नेहरूंचे मत होते.

जवाहरलालजी हे थोर मानवतावादी होते. व्यक्तिस्वातंत्र्याचे विचार त्यांनी स्वीकारले, पण सामाजिक परिस्थितीचा विचार करता त्याला दुय्यम स्थान होते. व्यक्ती समाजासाठी किती श्रम करते व सामाजिक प्रगतीत तिचा किती सहभाग असतो यावर व्यक्तीचे मूल्य अवलंबून असते. या संदर्भात ते म्हणाले, '' कोट्यवधी जनता लेनिनला आपला रक्षणकर्ता आणि या युगातील सर्वश्रेष्ठ पुरुष आहे असे मानते. ''[१०] अशा परिस्थितीत जवाहरलालजी डाव्या विचारसरणीच्या भारतीय युवकांचे नेते झाले. युरोपात स्थापन झालेल्या फॅसिझम व साम्राज्यवादविरोधी लढणारांच्या संघाचे (' लीग फॉर स्ट्रगल अगेन्स्ट फॅसिझम आणि इंपीरिॲलिझम ') ते सदस्य झाले, हा संघ सोव्हिएट युनियनने मॉस्कोत स्थापन केला होता व तो जागतिक कामगारवर्गाच्या तिसऱ्या इंटरनॅशनलशी सहानुभूती बाळगणारा होता.

महात्माजी व जवाहरलालजी यांच्या नेतृत्वाखाली भारताच्या स्वातंत्र्यसंग्रामाला वंशविरोधी व साम्राज्यवादविरोधी असे स्पष्ट स्वरूप प्राप्त झाले. देशाच्या संपूर्ण राजकीय स्वातंत्र्याच्या मागणीमागे ते खंबीरपणाने सतत उभे राहिले, त्यामुळे चळवळीचे लोकशाहीकरण होण्याला मदत झाली. तिरस्करणीय वसाहतवादाचे जूं झुगारून देण्यासाठी बलिष्ठ राष्ट्रव्यापी उठावाची बलिष्ठ लाट सिद्ध झाली आणि त्यामुळे राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा एका नवीन उच्च अवस्थेला पोचला.[११]

काँग्रेसच्या मद्रास (१९२७) येथील अधिवेशनात संपूर्ण स्वातंत्र्य हे ध्येय घोषित झाले. असा ठराव जवाहरलालजींनी मांडला व सुभाषबाबूंनी अनुमोदन दिले. नंतर गांधीजींनी त्या ठरावाबद्दल ' घाईगर्दीने आणलेला व अविचाराने संमत केलेला ' असे उद्‌गार काढले. मद्रास अधिवेशनात भारतीय काँग्रेस नवीन प्रस्थापित झालेल्या ' साम्राज्यविरोधी आंतरराष्ट्रीय संघा'ला (इंटरनॅशनल लीग अगेन्स्ट इंपीरिॲलिझम) जोडण्यात आली.

कलकत्ता काँग्रेस (१९२८) मध्ये गांधीजींनी नेहरू अहवाल (अध्यक्ष–मोतीलाल नेहरू) पुढे रेटण्यासाठी खूप प्रयत्न केला, आणि तोही अगदी थोड्या मताधिक्याने. डिसेंबर ३१, १९२९ च्या आत सरकारने जर हा अहवाल स्वीकारण्याचे आश्वासन दिले नाही, तर काँग्रेस, अहिंसात्मक असहकाराचा अवलंब करील, आणि करबंदीची मोहीम सुरू करण्यासाठी जनतेला चेतावणी दिली जाईल, हे गांधीजींनी मान्य केले.

लाहोर काँग्रेसने (१९२९-अध्यक्ष–जवाहरलालजी) योग्य वाटेल त्या ठिकाणी करबंदी करण्याचा सविनय कायदेभंगाचा कार्यक्रम हाती घेण्यास काँग्रेस कमिट्यांना अधिकार दिले. स्वातंत्र्यलढ्यातील निरनिराळ्या शक्तींचा समतोल गांधीजींनी अजमावला. डॉ. पट्टाभी यांच्या म्हणण्याप्रमाणे हा लढा अखेरपर्यंत स्वातंत्र्य मिळेपर्यंत लढायचा होता. यशासाठी अहिंसा तत्त्वाचे केसाच्या जाडीइतके (अत्यंत थोडे) जरी उल्लंघन झाले तरी यशापेक्षा पराभव पत्करला अशी गांधीजींची धारणा होती. मे १९३० मध्ये व्हाइसरॉयला पाठविलेल्या पत्रात त्यांनी म्हटले, " आम्हाला दोन आघाड्यांवर लढायचे आहे : एक ब्रिटिश राजवट, आणि दुसरी देशांतर्गत शत्रू – म्हणजे हिंसा. " यावर रजनी पाम दत्तांनी टीका केली : " दोन आघाड्यांवरील हा लढा भारतीय भांडवलदारवर्गाशी साधर्म्य दाखवतो. तो भारतीय जनतेला अहिंसात्मक, पण साम्राज्यशाहीला तसा नाही. साम्राज्यशाही पुरेपूर हिंसा करते, आणि अखेरीस यशस्वी होते. "

### ' लीग अगेन्स्ट इंपीरिॲलिझम ' (साम्राज्यविरोधी संघ)

" इंडिपेंडन्स फॉर इंडिया लीग ही देशातील आणि काँग्रेसमधील डाव्या विचारसरणीची आघाडी आहे, काँग्रेसमध्ये सर्व गट समाविष्ट होतात, पण वरील लीगमध्ये डाव्या विचारसरणीचेच गट असतात. हे गट काँग्रेसला विरोधी वा पर्यायी असे नसतात, पण खरे सांगायचे तर काँग्रेसवर डाव्या विचारांचा प्रभाव पाडून काँग्रेस आपल्या बाजूला वळविणे हे त्यांचे ध्येय असते. " असे जवाहरलालजींनी म्हटले आहे.

' इंडिपेन्डन्स फॉर इंडिया लीग ' हिची स्थापना होऊन तिला काँग्रेसच्या राजकारणी मंडळीत पाठिंबा मिळाला, तिचे धोरण तपशीलवार तयार झालेले नव्हते याचा अर्थ गंभीरपणाने घेतला तर जनतेची क्रांती असाच त्याचा अर्थ होईल.

या लीगची पायाभरणी परिषद फेब्रुवारी १९२७ मध्ये ब्रुसेल्स येथे झाली. अधिकात अधिक साम्राज्यविरोधी राष्ट्रीय संघटना आणि सर्व देशातील कामगार संघटना या लीगला जोडून घ्याव्यात असा या परिषदेत निर्णय करण्यात आला. मे १९२७ मध्ये अखिल भारतीय काँग्रेस कमिटीच्या बैठकीत जवाहरलालजी आणि अ.भा.काँ.क. वरील कामगार शेतकरी पक्षाच्या सदस्यांनी पुढाकार घेतला, आणि काँग्रेसला या लीगचे सदस्य करण्याचा निर्णय केला.

निरनिराळ्या प्रांतात संघटित झालेल्या कामगार शेतकरी पक्षांची अ. भा. परिषद डिसेंबर १९२८ मध्ये कलकत्ता येथे भरली. तेव्हा कामगार शेतकरी पक्ष हा लीग अगेन्स्ट इंपीरिॲलिझमला जोडावा असा ठराव समंत झाला. (मुंबईच्या कामगार शेतकरी पक्षाची पहिली परिषद मार्च १८, १९२८ ला डी. आर. ठेंगडी यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती). कामगारवर्गाची क्रांतिकारक संघटना, आणि वसाहतींच्या मुक्ततेसाठी चालू असलेली क्रांतिकारक चळवळ असे साम्राज्यविरोधी लढ्यातील सर्व प्रवाह आणि शक्ती यांचे ऐक्य राखणे व त्यात समन्वय साधणे हे त्यामागील तत्त्व होते.

तरुणांतील एक गट गांधीजींच्या कार्यक्रमाच्या विरोधी होता. जवाहरलाल आणि सुभाषबाबूंच्या विचारांनी तो प्रभावित झाला होता. डिसेंबर १२, १९२८ ला पुणे येथे भरलेल्या मुंबई इलाखा युवक परिषदेत भाषण करताना जवाहरलालजींनी घोषित केले, " आपल्या राष्ट्राचे ध्येय सहकारी समाजवादी राज्याची स्थापना हे आहे आणि समाजवादी राज्यांचे जागतिक संघराज्य हे आपले आंतरराष्ट्रीय ध्येय आहे."[१२] बुद्धिवादी विचारांची सुसंगत आणि तर्कशुद्ध अशी मांडणी त्यात नव्हती, पण जवाहरलालजींनी काळाला आवश्यक अशी मूल्ये त्यात अंतर्भूत केली होती. विचारांचा साचेबंदपणा टाकला आहे असा मार्क्सवादी, नागरी स्वातंत्र्याशी बांधिलकी असलेला समाजवादी, अहिंसेचा स्वीकार केलेला अत्यंत पुरोगामी, भारताशी संपूर्ण बांधिलकी असलेला आंतरराष्ट्रीय मुत्सदी, आणि मुख्यतः प्रगतीचा वेग मंदावला तरीही जनतेला आपल्याबरोबर घेऊन गेले पाहिजे यावर विश्वास असणारा पुढारी—अशी त्यांची रूपे झाली.[१३]

जो जनतेच्या सुप्त शक्ती जागृत करतो, आणि विरोध करणाऱ्या कठीण अशा शक्ती स्वराज्यप्राप्तीसाठी उपयोगात आणतो तो भारताचा थोर सुपुत्र होय असे नेहरूंना वाटे. हे श्रेष्ठ गुण त्यांनी महात्माजींत पाहिले, अनुभवले.

नेहरूंचे व्यक्तिमत्त्व पाश्चिमात्य विचारांवर अधिष्ठित होते. ते बुद्धिवादी होते, आणि भौतिक शास्त्रे आणि तंत्रज्ञान यांच्यामुळेच दारिद्र्य आणि जनतेच्या प्रत्यक्ष हालअपेष्टा नाहीशा होतील असा त्यांना विश्वास वाटत होता.

गांधीजी पूर्णपणे अंतःप्रेरणेवर अवलंबून असत, त्याला ते ' आतला आवाज ' असे म्हणत असत. ते स्वतःविषयी व देशाविषयी महत्त्वाचे निर्णय घेत असत, ते सर्वस्वी त्यांच्या अंतःप्रेरणेनुसारच. बुद्धीच्या शिस्तीत ही अंतःप्रेरणा बसत नाही. ते राजकीय बुद्धिवाद्या-पेक्षा पुष्कळच अधिक होते.

स्वतःला फेबियन म्हणवून घेणाऱ्या प्रारंभीच्या काळातील ब्रिटनमधील समाजवादी विचारवंतांच्या लिखाणातून व भाषणातून नेहरूंची सामाजिक विचारांची बैठक तयार झाली होती. जी. बी. शॉ, सिडने आणि बिॲट्रिस वेब, ग्रॅहॅम वॅलास हे त्यात प्रमुख होते. ' त्यांच्या समाजवादी प्रेरणांचा प्रतिनिधी लेनिन होता ' असे ते म्हणत.

भारताच्या ' धार्मिक मनोवृत्तींचे ' प्रतिनिधी गांधी होते, तर नेहरू ' धर्मनिरपेक्ष मनोवृत्ती ' चे प्रतिनिधी होते, हा गांधी आणि नेहरू यांच्यात मूलभूत फरक होता. धर्म आणि राजकारण हे एकमेकांपासून अलग करता येणार नाहीत असे गांधी समजत, पण ' समाजाच्या कल्याणापेक्षा स्वतःचा मोक्ष हाच महत्त्वाचा असे धार्मिक वृतीचा माणूस समजतो. धर्म हा ईश्वरासाठी किंवा सर्वशक्तिमान अशा अमूर्त तत्त्वासाठी सामाजिक शोध '[१४] असतो असा नेहरूंचा दृढ विश्वास होता. वर्गविग्रहाचे तत्त्व गांधीजींनी नाकारलेच होते. तसेच खाजगी मालमत्तेचा विनाश हे अशक्य म्हणून मानले. आर्थिक प्रश्न सोडविण्याचा मार्ग म्हणून ' विश्वस्त ' पद्धती हा प्रसिद्ध सिद्धांत त्यांनी पुरस्कृत केला; उलट ' जगाचे तसेच भारताचे प्रश्न सोडविण्याचा मार्ग समाजवाद हाच आहे, अशी नेहरूंची खात्री झाली होती. ' गांधी आणि नेहरू या दोघांचे ध्येय भारताचे दारिद्र्यनिर्मूलन हे होते. हे ध्येय साध्य करण्यासाठी गांधींचे कार्यक्रम सूतकताई व ग्रामीण उद्योगधंदे, स्वदेशी, सत्याग्रह, विश्वस्त पद्धती आणि जमीनदारांचे हृदयपरिवर्तन असे होते. नेहरूंचा कार्यक्रम कुळांच्या खंडात कपात, शेतकऱ्यांची कर्जे रद्द करणे व जमीनदारी पद्धतीचे उच्चाटन हा होता. गांधी नैतिक (नीतीवादी) मार्गी होते, नेहरू लोकशाहीवादी होते. सुभाषबाबू हे सतत भारतीय राष्ट्रवादी होते.

समाजवादी, कम्युनिस्ट व नेहरूंच्यासारखे विचारवंत यांच्या प्रभावामुळे भारतीय राष्ट्रवादी चळवळीला सामाजिक व आर्थिक आशय प्राप्त झाला व त्यामुळे तिला आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन प्राप्त झाला. जवाहरलालजी जरी संघटित समाजवादी चळवळीच्या बाहेर होते, तरी जुने पुढारीपण आणि उगवते समाजवादी पुढारीपण यांच्यात सेतुबंधासारखे काम ते करीत. १९३३ मध्ये लिहिलेल्या ' व्हिदर इंडिया ' या पुस्तिकेत त्यांनी दाखवून दिले, '' परकीय सरकारच्या जागेवर जर एतद्देशीय सरकार आले, आणि त्यांनी पूर्वीचेच आर्थिक हितसंबंध कायम ठेवले, तर ती स्वातंत्र्याची छायासुद्धा असणार नाही, ..... भारताचे तातडीचे ध्येय म्हणजे जनतेची पिळवणूक नाहीशी करणे हेच आहे. याचा अर्थ राजकीय दृष्टीने स्वातंत्र्य, ब्रिटिशांच्या बंधनापासून म्हणजेच साम्राज्यवादी वर्चस्वातून मुक्तता, आर्थिक आणि सामाजिक

दृष्ट्या सामाजिक व वर्गीय खास हक्क आणि गुंतलेले वर्गीय हितसंबंध यांचा नाश करणे. '' भारताला स्वातंत्र्य आवश्यक आहे, कारण बहुजनसमाज व मध्यमवर्ग यांवरील बोजा असह्य झाला आहे. तो कमी केला पाहिजे, व नंतर नाहीसा केला पाहिजे. स्वातंत्र्याचे मोजमाप म्हणजे हा बोजा कमी करणे. भारतात आणि बाहेरील हितसंबंधी गट आणि परकीय सरकार यांच्यामुळे हा बोजा निर्माण झाला आहे. '' [१५] कॉग्रेसच्या लाहोर अधिवेशनात नेहरू म्हणाले '' मी समाजवादी आणि प्रजासत्ताकवादी आहे, राजे, महाराजे, युवराज यांच्यावर विश्वास ठेवणारा नाही. तसेच जुन्या राजे-रजवाड्यांपेक्षा लोकांच्या संपत्तीवर व जीवितावर अधिसत्ता गाजवणाऱ्या आधुनिक उद्योगपतींना जन्म देणाऱ्या पद्धतीचाही पुरस्कर्ता नाही; कारण त्यांचे मार्ग लुटारू आणि सरंजामशाहीतील जुलूमशहासारखे होते..... '' जगातील सर्व देशातील समाजात समाजवादाचे तत्त्वज्ञान हळूहळू झिरपत आले आहे; आणि वादाचा एकच मुद्दा आहे आणि तो म्हणजे संपूर्ण समाजवाद प्रस्थापित करण्यासाठी त्याची गती आणि अवलंबिण्याच्या पद्धती, भारताला दारिद्र्य आणि विषमता नाहीशी करावयाची असेल तर त्या मार्गाने गेले पाहिजे. '' '' कामगारवर्गाच्या चळवळीचे राजकीय महत्त्व जाणून त्याला पाठिंबा मिळविण्यासाठी, तसेच काँग्रेसला पुरोगामी राजकीय कार्यक्रम देण्यासाठी, नेहरू अधिकाधिक उघडपणे समाजवादाचा प्रचार करू लागले. ''[१६] असे कॉ. सरदेसाई यांनी म्हटले आहे.

### सत्याग्रहाचे गांधीवादी तंत्र

आध्यात्मिक ऐक्याच्या पायावर गांधीवादी तत्त्वज्ञान उभारलेले आहे. सत्य हे सर्वांचे मूळ असल्याने त्याचा विकास आणि आविर्भाव यासाठी त्यांचे ज्ञान होणे व त्याला चिकटून राहणे म्हणजेच ' सत्याग्रही ' होणे. सर्वांची सेवा करणे म्हणजे अहिंसेचे पालन अशा रीतीने सत्याचा शोध अहिंसेच्या पालनानेच होतो. अहिंसा म्हणजे सर्वांभूती प्रेम; उपकार किंवा कुकर्म करणाऱ्यावरही प्रेम करणे, सत्याच्या साह्याने अपकारकर्त्याच्या नैसर्गिक किंवा भौतिक शक्तीवर आत्मिक शक्तीने विजय मिळविणे, म्हणजे आपण कष्ट सोसून अपकारकर्त्याचे मतपरिवर्तन करणे. यासाठी गांधीजींनी आंतरिक खात्री झाल्याने ध्येय म्हणून स्वीकारलेली शूराची अहिंसा तसेच उपयुक्तता वा स्वार्थापोटी स्वीकारलेली भ्याडाची अहिंसा यात फरक केला आहे. त्यांच्या मते शूराची अहिंसा फक्त सर्वश्रेष्ठ असते.

शिस्तबद्ध सत्याग्रही परिणामकारक रीतीने काम करणारा व आत्मविश्वास असलेला पुढारी असतो असे गांधीजींनी म्हटले आहे. त्यांनी बहुजन समाजाला संघटित केले. अहिंसात्मक संघटन ही आदर्श लोकशाही होण्याचा प्रयत्न करते. नेहमीच्या कामकाजात बहुमताने निर्णय घेण्यात येतात, व अल्पमताच्या विशिष्ट हितसंबंधाचा विचार पूर्णपणे केला जातो. पक्षाची यंत्रणा काबीज करण्यासाठी डावपेच, व सत्तेचे राजकारण अशा गोष्टी करण्यासाठी या संघटनेत जागा नसते.

सत्यमय ध्येये प्राप्त करण्यासाठी अहिंसात्मक साधनांचा निष्ठुरपणे पाठलाग करणे म्हणजे सत्याग्रह. त्याच्या जोडीला प्रत्यक्ष कृती म्हणजेच सर्व विधायक कामे. विधायक त्याचप्रमाणे आत्मशुद्धीसाठी केलेला सत्याग्रह हा सामाजिक उन्नतीचे हत्यारच असते. सत्याग्रह्यांनी राजकीय सत्ता व राज्ययंत्रणा हस्तगत करण्यापूर्वीसुद्धा विद्यमान समाजव्यवस्थेचे अहिंसात्मक मार्गावर परिवर्तन करण्याचे ते तंत्र असते. विधायक कार्यक्रम हा ' सामुदायिक शुद्धीचा प्रयत्न असतो, ' सत्याग्रहाची सर्वश्रेष्ठ प्रसिद्धी ' असते. प्रतिकाराचा प्रकार म्हणून सत्याग्रह हा अन्यायाविरुद्ध प्रतिकार आणि आपसातील तंटे मिटविण्याचे तंत्र असते. शत्रूचे हृदयपरिवर्तन आणि त्याच्यात न्यायाची जाणीव निर्माण करणे हा सत्याग्रह्यांचा उद्देश असतो. पिळवणुकीवर आधारलेली समाजव्यवस्था नाहीशी करून न्याय आणि अहिंसा यावर आधारलेली सहकारी समाजव्यवस्था उभारणे हे सत्याग्रहात अभिप्रेत असते, असे गांधीजी म्हणत.

गांधीच्या विचाराने वर्गहीन आणि राज्यहीन समाज म्हणजेच स्वयंनियंत्रित ज्ञानी लोकांचे ' अराजक '. त्यात सामाजिक एकता ही अंतर्गत आणि जुलूम-जबरदस्ती न करणाऱ्या बाह्य शक्तींच्या योगाने राखली जाते. अशा प्रकारचे राज्य म्हणजे विकेंद्रित लोकशाही, ग्रामीण सत्याग्रही समाजांचे संघराज्य होय. सामाजिक आणि अंदाजे आर्थिक समता हे वैशिष्ट्य असलेला समाज म्हणजेच अहिंसात्मक राज्याच्या आर्थिक जीवनाचे महत्त्वाचे वैशिष्ट्य होय.

राजकीय आणि आर्थिक विकेंद्रीकरण, राज्याची कार्ये आणि त्यांचे महत्त्व यात कपात, आपण होऊन (कोणत्याही अपेक्षा न करता) तयार झालेल्या संघटनांचा विस्तार, मानवास असंस्कृत करणाऱ्या दारिद्र्याचे आणि संपत्तीच्या अतिरेकाचे निराकारण, नवीन शिक्षण आणि अन्यायाचा अहिंसात्मक प्रतिकार या सर्वांमुळे मानवाची समज वाढेल आणि त्यामुळे समाज व राष्ट्र लोकशाहीवादी बनेल. अहिंसात्मक प्रतिकारपद्धती ही क्रांतीचे तत्त्वज्ञान आणि तंत्राला गांधीजींनी दिलेली एक मोठी देणगी होय.

सत्याग्रहाच्या तत्त्वज्ञानाने मानवी कल्याणाला मोठा हातभार लावला आहे, त्याचे कारण काही प्रमाणात गांधीजी हे केवळ राजकीय विचारवंत, मुत्सद्दी किंवा विद्यापीठातील विद्वान तत्त्वज्ञानी नव्हते, पण त्यापेक्षा ते अधिक होते. भारतीय जनतेवर राज्य करण्याचा ब्रिटिशांना नैतिक अधिकार काय आहे असा गांधीजी आणि त्यांचे अनुयायी सरकारला प्रश्न करीत. अधिकाऱ्यांवर दबाव आणून जनतेला सवलती मिळाव्यात यासाठी त्यांनी चळवळी केल्या. ध्येय म्हणून त्यांची अहिंसेवर निष्ठा होती. ते जसे पुनरुज्जीवनवादी, तसेच क्रांतिकारकही होते. ते लोकशाहीवादी तसेच आधुनिकवादीही होते. भेकडाने अहिंसेच्या मागे आश्रय घेण्याला त्यांनी विरोध केला. भारतातील ब्रिटिश सत्तेला आव्हान देण्याचा त्यांचा कार्यक्रम

कृतीत आणण्यासाठी त्यांनी जनतेची सुप्त शक्ती जागृत केली. '' सुरुवातीच्या काळात गांधीवाद हा राष्ट्राला, विशेषतः राष्ट्रीय भांडवलदारवर्गाला उपकारक होता.''[१७] गांधींचा मुख्य आधार म्हणजे शेतकरी होता.[१८]

जवाहरलाल नेहरूंची समाजवादी विचारधारा विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकातच सर्वांना दिसून आली. त्यांनी सोव्हिएट युनियनला भेट दिली (१९२७). काँग्रेसच्या मद्रास अधिवेशनाच्या वेळी (१९२७) आपला स्वातंत्र्यलढा व शोषितांचा जागतिक पातळीवरील लढा यातील संबंधावर त्यांनी विचारझोत टाकला. कलकत्ता (१९२८) आणि लाहोर (१९२९-३०) अधिवेशनात त्यांनी संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयावर भर दिला. कराची काँग्रेस (१९३१) मध्ये संमत झालेल्या मूलभूत हक्काच्या ठरावाचे ते शिल्पकार होते. गौहत्ती अधिवेशनात (डिसेंबर १९२६), ब्रुसेल्स येथे फेब्रुवारी १९२७ मध्ये भरलेल्या लीग अगेन्स्ट इंपीरिअॅलिझमच्या अधिवेशनात भारतीय काँग्रेसचे प्रतिनिधी म्हणून त्यांची नेमणूक झाली होती. त्या अधिवेशनात ते म्हणाले '' या ब्रुसेल्स परिषदेमुळे वासाहतिक आणि परतंत्र देशातील लोकांचे प्रश्न समजायला मला मदत झाली...... कम्युनिस्ट इंटरनॅशनलची दुसरी काँग्रेस व तिसरी काँग्रेस यामध्ये माझी सहानुभूती तिसऱ्या काँग्रेसकडे आहे. '' काँग्रेसच्या विचारांवर त्यांच्या अन्य विचारसरणीचा प्रभाव पडू लागला.

## असहकार आणि महाराष्ट्र

असहकारितेचे युग आले त्या सुमारास महाराष्ट्रातील पुढारी केळकर होते. '' टिळकांनंतर महाराष्ट्रातील राजकारणाचे पुढारीपण ओघानेच मजकडे आले. या वेळी मला तुल्यबल असा प्रतिपक्षी किंवा प्रतिस्पर्धी दुसरा कोणी नव्हता. टिळकांनी विलायतेला मलाच सहायक म्हणून नेले. होमरूल लीगचा चिटणीस मीच होतो. ' केसरी ' चे संपादकत्व मजकडेच होते. प्रांतिक परिषदेचा अध्यक्ष मलाच निवडले, त्यापूर्वी काँग्रेसचा एक चिटणीस म्हणून माझीच निवडणूक १९१८ साली झाली. काँग्रेसच्या शिष्टमंडळाचा व्यवस्थापकही मलाच नेमण्यात आले, आणि १९२५ साली काँग्रेसच्या अध्यक्षपदाकरिता माझे एकच नाव कित्येक प्रांतांकडून सुचविण्यात आले होते. या सर्व गोष्टीवरून त्यावेळी महाराष्ट्राचे पुढारीपण मजकडे होते हे दिसून येतच होते. इतकेच नव्हे तर पुढे असहकारितेचे धोरण काँग्रेसने स्वीकारल्यानंतरही काँग्रेस वर्किंग कमिटीत महाराष्ट्रातर्फे मीच एक सभासद निवडला गेलो, आणि राष्ट्रीय सभेची नवीन अशी पहिली घटना तयार करण्याचे काम विठ्ठलभाई पटेल यांच्याबरोबर गांधींनी मजकडे सोपविले यावरूनदेखील महाराष्ट्राचे राजकीय पुढारीपण त्या वेळी मजकडे होते ही गोष्ट दिसून आल्याशिवाय राहत नाही. '' असे केळकरांनी आपल्या ' गतगोष्टी ' या आत्मचरित्रात जे म्हटले आहे ते खरेच होते.

बहुजनसमाजाच्या दृष्टीशी समरस असा राजकीय कार्यक्रम आणि उच्च आदर्शवाद घेऊनच गांधीजी असहकारितेचे पुढारी म्हणून देशापुढे आले, असहकारितेचा कार्यक्रम हा वर्गविशिष्ट नसून बहुजनसमाजाशी समरस झालेल्या व रात्रंदिन गरीब जनतेच्याच दुःखांचा व प्रश्नांचा विचार करणाऱ्या गांधींनी तयार केला होता. गरीब प्रजा व श्रीमंत यांच्यातील पडदा गांधीजी फाडू पाहत होते. स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, लवाद कोर्टांची स्थापना या गोष्टी सर्वांनाच मान्य होत्या; पण शिक्षणसंस्था, न्यायकोर्टे व कौन्सिले यांवरील बहिष्कार याबाबतच वाद होता.

असहकाराबाबत जे लिखाण झाले आहे त्याचा थोडा परामर्श वर आलाच आहे. सी. के. अहलुवालिया आणि त्यांच्या पत्नींनी लिहिलेल्या 'आर्किटेक्टस ऑफ स्वराज्य' या पुस्तकात देशातील असहकार चळवळीचे जनक महात्मा गांधी नसून लोकमान्य टिळकच होते असे प्रतिपादन केले आहे. असहकाराचे बीज १९०६ मध्ये लोकमान्यांनी रोवले : 'आणीबाणीची वेळ' (केसरी १५ ऑगस्ट १९०६) या लेखात लोकमान्यांनी परकीय राजसत्तेविरुद्धच्या संघर्षात बहिष्काराचे महत्त्व सांगितले होते. दिल्ली काँग्रेस (१९०७) मध्ये 'पक्षाची नवी तत्त्वे' या गाजलेल्या भाषणात टिळक म्हणतात : "आम्ही सशस्त्र नाही, आणि त्याची आवश्यकताही नाही. आमच्याकडे या शस्त्रापेक्षाही शक्तिशाली असे बहिष्काराचे राजकीय अस्त्र आहे. तुम्हाला क्रियाशील प्रतिकार करणे शक्य नसेल तर तुम्ही परकीय राजसत्तेशी सहकार्य करण्याचे नाकारा! यालाच बहिष्कार म्हणतात. परकीय राजसत्तेस महसूल गोळा करण्यात त्याच्या प्रशासनाला सहकार्य केले नाही, त्यांचा न्याय न स्वीकारता आपण आपलीच न्यायालये स्थापन केली, आणि हे आपण निश्चयाने करू शकलो तर उद्या आपल्याला स्वातंत्र्य मिळेल."

गांधीजींचे असहकाराचे धोरण, त्यातून निघालेला फेर-नाफेरवाद, स्वराज्य पक्ष, प्रतिसहकार पक्ष याबाबत आतापर्यंत पुष्कळच विवेचन झाले आहे. महाराष्ट्र त्याबाबत काय भूमिका घेत होता याचे थोडक्यात विवेचन करीत आहे.

असहकारितेच्या ठरावाला अनुकूल १८५५ व प्रतिकूल ८७३ मते पडली (९सप्टेंबर १९२०). दासबाबूंनी त्याला विरोध केला. गांधीजींनी म्हटले 'मी वकील वर्गावर अवलंबून नाही बहुजनसमाज हा माझा आधार आहे. मला असहकार त्यांच्यापर्यंत न्यावयाचा आहे.' केळकर म्हणाले, "सभेचा निर्णय अपेक्षेबाहेर आला. त्यामुळे आम्ही सर्वजण डोक्यावर मोठा आघात व्हावा त्याप्रमाणे सुन्न व स्तंभित झालो."[१९] 'केसरी' केळकरांच्या हाती होता. त्यांच्या सान्निध्यात वाढलेला सरंजामदार वर्ग होता, त्यामुळे केळकर पक्षाला असहकारितेच्या चळवळीला बरीच खीळ घालता आली. त्यांनी काँग्रेसशी बंडखोरी करून उघड विरोध केला असता तर चळवळ अधिक वाढली असती, गांधींना महाराष्ट्रात जो पाठिंबा मिळाला

तो केळकर पक्षाला न जुमानता मिळाला. त्यांच्या चळवळीचा लोंढाच एवढा वेगवान होता की असले लहानसहान बंधारे त्याला आडवू शकले नाहीत,[२०] हे लक्षात घ्यावयास पाहिजे. असहकाराला मनातून विरोध, पण उघड मात्र त्यांचे समर्थन अशी परिस्थिती होती. यासंबंधी केळकरांनी ' गतगोष्टी ' या आत्मचरित्रात विरोधकांबद्दल खूपच उपहासाने लिहिले आहे.

केळकरांनी दास व नेहरू यांचे अनुकरण केले नाही. तसे केले असते तर उच्च साहित्यिक यापेक्षा शतपटीने अधिक असा मान त्यांच्या चरणी लोटांगण घालीत आला असता; देव व दास्ताने त्यांच्या हाताखाली राबले असते, असे द. रा. घारपुरे यांनी म्हटले आहे. या संदर्भात शिवरामपंत परांजपे म्हणाले, '' गांधींच्या कार्यक्रमात आम्हास क्रांती दिसते, म्हणून आम्ही त्यांच्या मागे जातो. केळकरांनी क्रांतीचा दुसरा मार्ग काढावा, आम्ही त्यांच्यामागे जाऊ '' टिळकांच्या नावाने गांधींना विरोध,आणि गांधींचे धोरण टिळकांचे तत्त्वज्ञान आणि राजकारण उखडून टाकण्याचे आहे, अशी भावना फैलावण्यात आली होती.

शिवराम महादेव परांजपे (संपादक ' काळ ') व कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर (संपादक ' नवाकाळ ') दोघेही टिळकांचे खरे अनुयायी होते. महाराष्ट्राच्या राष्ट्रीय चळवळीतील एका लढाऊ गटाचे प्रतिनिधित्व ते करीत होते. परकीय सत्तेविरुद्ध बंडाचे निशाण उभे करण्यासाठी जनतेला हा कार्यक्रम तयार करील (हा निर्दोष आहे म्हणून नव्हे) म्हणूनच त्याचा स्वीकार केला आहे अशी या गटाची धारणा होती. केळकर हे फक्त टीकाकारच आहेत, नवीन चळवळ उभी करणारे नाहीत, असे त्यांचे मत होते. गांधीनी पुरस्कारलेल्या आणि काँग्रेसने स्वीकारलेल्या असहकारितेच्या कार्यक्रमाची केळकर आणि त्यांच्या अनुयायांनी चेष्टाच केली. गांधींनी कौन्सिल बहिष्काराची घोषणा करण्यापूर्वी, कौन्सिल प्रवेशाचा स्वीकार करण्याचा विचार टिळकांच्या मनात आला होता, असे केळकरांनी आपल्या आत्मचरित्रात म्हटले आहे. शंकरराव देव आणि व्यंकटेश बळवंत हरोलीकर यांना ' स्वराज्य ' पत्रातील लेख राजद्रोह पसरवीत असल्याच्या आरोपावरून २ वर्षे तुरुंगवासाची खडतर शिक्षा झाली. काँग्रेसमधील प्रतिनिधित्वाबाबत महाराष्ट्रात तक्रारी होत्याच. बंगालचे जतीनमोहन सेनगुप्ता आणि कर्नाटकाचे गंगाधरराव देशपांडे हे याबाबत पंच म्हणून काम करणार होते, फेरवादी व नाफेरवादी अशा दोघांना समान प्रतिनिधित्व देऊन नवीन महाराष्ट्र प्रांतिक काँ. कमिटी स्थापन करण्यात आली. बारडोलीच्या ठरावामुळे काँ. वर्किंग कमिटीची बदनामीच झाली आहे. असे अ. भा. काँ. कमिटीवरील महाराष्ट्रीयन सदस्यांनी प्रस्ताव मांडून काँग्रेसच्या कार्यक्रमात सुधारणा करावी असे सुचविले, पण अ. भा. काँ. कमिटीत तो संमत झाला नाही.

शाळा–कॉलेजांवरील बहिष्काराचा कार्यक्रम महाराष्ट्रात हाती घेण्यात आला होता; त्या अनुरोधाने डिसेंबर ११, १९२० रोजी टिळक महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन झाले. चिंचवडला

बाळूकाका कानिटकर, येवले येथे आपटे गुरुजी, सातारा येथे नाथ घाणेकर व निळूभाऊ घाणेकर, अहमदनगर येथे चौधरी आणि चिंचोरकर—अशांनी राष्ट्रीय शाळांची स्थापना केली.

असहकारितेची चळवळ मागे घेतल्यानंतर महत्त्वाची गोष्ट म्हणजे नागपूरचा झेंडा सत्याग्रह. आपल्या आदेशाशिवाय निदर्शने होता कामा नयेत असे नागपूरच्या जिल्हाधिकाऱ्याने जाहीर केले. तो हुकूम धाब्यावर बसविण्यासाठी मे १९२३ मध्ये चळवळ सुरू झाली. राष्ट्रीय ध्वजाचा मान राखण्यासाठी भारताच्या सर्व प्रांतांतून स्वयंसेवक धावून आले. हजारावर सत्याग्रह्यांना तुरुंगवास घडला. दास यांनी त्याला विरोध केला, पण विठ्ठलभाई पटेल यांनी पाठिंबा दिला. ऑगस्ट २०, १९२३ ला ती चळवळ समाप्त झाली. या सत्याग्रहामुळे महाराष्ट्रातील राष्ट्रीय चळवळ संघटित होण्यास मदत झाली.

वल्लभभाई पटेल हे या सत्याग्रहाचे नेते होते. बारडोली सत्याग्रहानंतर हे ' सरदार ' म्हणून ओळखले जाऊ लागले.

कृ. प्र. खाडिलकर, शिवरामपंत परांजपे, वासूकाका जोशी, चिंतामणराव वैद्य, शंकरराव देव हेच महाराष्ट्रातील असहकाराचे जनक म्हणता येतील. त्या वेळचा मुख्य लढा प्रतियोगी सहकारिता या तत्त्वाचे समर्थन करणारांविरुद्ध होता. परकीय सरकारची प्रतिष्ठा कमी करणे आणि स्वराज्यासाठी त्याग करावयाला किती लोक तयार होतात हे पाहणे – असे या चळवळीचे दोन हेतू होते. स्वराज्याची चळवळ ही फुरसतीने करायची चळवळ नव्हे असा ऐतिहासिक निर्वाळाच या चळवळीमुळे मिळाला.

केळकरांना असहकार मनापासून पटत नव्हता. गांधींच्या नेतृत्वाखाली चळवळ करणाऱ्या कॉंग्रेसपासून अलग राहून, किंबहुना विरोध करून स्वतंत्र पक्षाची स्थापना करण्याचा यत्न केळकरांनी केला. संघशक्ती वाढविण्याचे आणि जनतेत आत्मविश्वास व स्वावलंबन उत्पन्न करण्याचे गांधींचे सामर्थ्य शिवरामपंत ओळखून होते. स्वतः काही एक न करता नुसते प्रतिष्ठित अत्याचारी म्हणून मिरवून कालमानाप्रमाणे स्वीकारलेल्या अनत्याचारित्वाच्या योग्य व न्याय्य मार्गात महात्मा गांधींना शिव्या देण्यात पुरुषार्थ कोणता असा प्रश्नही शिवरामपंतांनी विचारला होता. शिवरामपंतांच्या ' स्वराज्य ' पत्राने महात्मा गांधींचे राजकारण महाराष्ट्रात आणले. म्हणूनच महाराष्ट्रात कॉंग्रेसची चळवळ वाढली व तिचे तेज पडले. खाडिलकरांचा ' नवाकाळ ', सी. के. दामले यांचे ' राजकारण ' यांचाही यात मोठा वाटा होता.

केळकरांचे असहकाराबद्दल मतभेद होते, पण १९२१ मध्ये सोलापुरात केळकरांची जी व्याख्याने झाली त्यात त्यानी असहकाराचे समर्थन केले. " एकीकडून जनतेतील जागृती, आणि नवीन सुधारणेविषयी निराशा अशा दुहेरी कारणांमुळे असहकारितारूपी वृक्ष जोमाने फोफावत जाणार हे निःसंशय आहे " (केसरी २२ मार्च १९२१) असे त्यांनी म्हटले आहे.

## संदर्भ

(१) जवाहरलाल नेहरू, ' डिस्कव्हरी ऑफ इंडिया ', पृ. ३६३–३६४.
(२) व्ही. व्ही. राममूर्ती, ' नॉन व्हॉयलन्स इन पॉलिटिक्स ', बी. डी. कौशिक यांच्या पुस्तकात उद्धृत, पृ. ३५.
(३) एम्. के. गांधी, ' हिंद स्वराज्य ', पृ. ६०.
(४) एम्. के. गांधी, ' यंग इंडिया ', ता. ११ ऑगस्ट १९२०.
(५) एम्. के. गांधी, ' यंग इंडिया ', ता. २० ऑक्टोबर १९२७.
(६) Memoirs of Agakhan, p. 225.
(७) From Government File No. 43 of May 1921 Home (Pol.) quoted by Misra *op cit,* p. 179.
(८) J. Nehru, 'Nehru on Socialism', p. 23.
(९) Mohit Sen, 'Revolution of India', p. 106.
(१०) Nehru in Soviet Perspective, p. 10.
(११) II bid , p. 9.
(१२) Selected Works of Nehru, Vol. III, p. 104.
(१३) S. Gopal, 'J. Nehru,' p. 13.
(१४) J. Nehru, 'An Autobiography', p. 377.
(१५) J. Nehru, 'Wither India', p. 9.
(१६) S.G. Sardesai, 'The Mahatma', p. 36.
(१७) Karunakaran, p. 206.
(१८) Dhanagare, D. N. *op cit*, p. 89.
(१९) त्र्यं. र. देवगिरीकर, ' वासूकाका जोशी यांचा काळ ', पृ. ४५४.
(२०) त्र्यं. र. देवगिरीकर, ' वासूकाका जोशी यांचा काळ ', पृ. ४५६.

# ९. लढ्याची तयारी

सविनय कायदेभंगाच्या आगामी लढ्याच्या दृष्टीने १९२७ ते १९३० या काळातील घटना निर्णायक आहेत. काँग्रेसचे ठराव, युवकांच्या चळवळी, मीरत कटाचा खटला, दांडी मार्च, महाराष्ट्रासाठी युद्धमंडळाची (वॉर कौन्सिल) नेमणूक, आणि २६ जानेवारी १९३० ला सर्व भारतभर स्वातंत्र्यदिनाची प्रतिज्ञा एकाच वेळी वाचण्याची योजना– या घटना साम्राज्यशाहीशी तडजोड न करता लढा देण्याचा जनतेचा निर्धार दाखवतात.

## यूथ लीग

युवकांच्या चळवळीची सुरुवात १९०५ च्या वंगभंग, स्वदेशी, बहिष्कार या चळवळींच्या वेळी झाली. नेमस्तांच्या राजकारणाने समाधान न झालेले तरुण दहशतवादी व क्रांतिकारक मार्गांकडे वळले.

असहकारितेची चळवळ पुकारल्यानंतर काही तरुणांनी दहशतवादाचा त्याग केला, पण चळवळ मागे घेतल्यामुळे ते निराश झाले, आणि विफलतेची भावना त्यांना ग्रासू लागली. अशा वेळी काही युवक संघटना तयार झाल्या. साधारणतः १९२५ पर्यंत त्या संघटनांनी देशाच्या सामाजिक आणि आर्थिक प्रश्नांना हात घातला. कम्युनिस्टांच्या प्रभावाखाली अनेक तरुण कम्युनिस्ट लीगकडे वळले, तरुणांच्या चळवळी सामान्यतः डाव्या विचारसरणीच्या प्रभावाखाली आल्या. या प्रक्रियेमुळेच काँग्रेसमध्ये डाव्या विचारसरणीचे व्यासपीठ तयार झाले. अ. भा. यूथ लीग, स्वाधीन भारत संघ, अ. भा. सोशॅलिस्ट यूथ लीग, अ. भा. स्वयंसेवक दल, अ. भा. इंडिपेन्डन्स लीग – अशा संघटना १९२८ मध्ये उभ्या राहिल्या. यात विद्यार्थ्यांचे वर्चस्व असल्याचे दिसून येते. युवक आणि विद्यार्थ्यांच्या संघटना भारतभर उभ्या राहिल्या; विशेषतः मुंबई आणि बंगाल प्रांतात त्यांचा जोर होता. या संघटनांना यूथ लीग म्हणू लागले. सामान्यतः त्यांचा संबंध काँग्रेसशी होता, आणि कनिष्ठ मध्यमवर्गातील विद्यार्थी आणि युवक यात संघटित होत होता. काही संघटनांनी हॉलंडमधील अर्ड (Earde) येथे १९२७ मध्ये भरलेल्या जागतिक युवक परिषदेला (World Youth Congress) प्रतिनिधीही पाठविले.

काँग्रेसअंतर्गत डाव्या विचारसरणीचा गट समाजवादी विचारांचा होता. स्वातंत्र्य आणि समाजवाद यावर त्यांचा भर होता. तरुणांत होत असलेली साम्राज्यविरोधी विचारांची तीव्र आकांक्षा राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या ध्यानात आली होती. भारतभर होत असलेल्या तरुणांच्या जागृतीच्या संदर्भात सुभाषबाबू म्हणाले, "निरनिराळ्या प्रांतात निरनिराळ्या नावांनी तरुणांच्या संघटना उभ्या राहिल्या, पण त्याच्यामागील प्रेरणा सर्वत्र सारखीच होती. तरुणांत आतुरता किंवा उतावीळपणा, प्रस्तुतच्या कुजलेल्या व तापदायक परिस्थितीविरुद्ध बंडखोरी, आत्मविश्वास आणि देशासाठी जबाबदारीने काम करण्याची जाणीव दिसून येत होती."

१९२७ व १९२८ मध्ये युवक संघटनांनी शास्त्रीय समाजवादाच्या दिशेने वाटचाल चालू केली. रशियन क्रांतीचा प्रभाव त्यांच्यावर होता व त्यामुळे त्यांना स्फूर्ती प्राप्त झाली होती. सायमन कमिशनविरोधी झालेल्या निदर्शनात आणि हरताळात त्यानी सक्रिय भाग घेतला. राजकीय दृष्टीने जागृत अशा तरुणांना कॉंग्रेस पुढाऱ्यांचे, विशेषतः महात्मा गांधींचे, तडजोडीचे धोरण पसंत नव्हते. चौरीचौरा येथे घडलेल्या हिंसक घटनांमुळे असहकारितेची चळवळ बंद करण्यात आली याचा तरुणांना धक्काच बसला, आणि राजकीय पोकळी निर्माण झाली व काही तरुण दहशतवादाच्या छायेखाली गेले. त्या वेळच्या राजकीय परिस्थितीचा तो परिपाक होता. यूथ वर्कर्स लीग, मुंबई व बंगाल प्रांतात संघटित झाल्या.

कामगार शेतकरी पक्ष व भारतीय कम्युनिस्ट पक्ष विद्यार्थी आणि युवक यांना संघटित करण्यात आघाडीवर होते. मार्च १९२६ ते एप्रिल १९२७ या काळात नवजवान भारत सभेने विद्यार्थ्यांत चांगले कार्य केले. वीर भगतसिंग आणि त्यांचे सहकारी या संघटना बांधण्यात आघाडीवर होते. कामगार शेतकरी पक्षाने मुंबईत सायमन कमिशनविरोधी काम केले. वसाहतीच्या स्वराज्याऐवजी संपूर्ण स्वातंत्र्य आणि समाजवाद यांचा जनतेत प्रचार करून त्यांना लोकमान्यता मिळवून दिली, तसेच जातीविरोधी, धर्मातीत अशा लोकशाहीवादी चळवळीत भाग घेण्यास त्यांना स्फूर्ती दिली. जवाहरलाल नेहरूंना डाव्या विचारसरणीच्या तरुणांचा पाठिंबा होता, तसेच युरोप खंडात सोव्हिएट युनियनच्या पुढाकाराने स्थापन झालेल्या तिसऱ्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलची सहानुभूती असलेल्या 'लीग फॉर स्ट्रगल अगेन्स्ट फॅसिझम अँड इंपीरिॲलिझम' चे ते सभासदही झाले होते.

पूर्वीच्या (जुन्या) पुढारीपणाच्या काम करण्याच्या पद्धती आणि त्यांचा कार्यक्रम नवीन जहाल गटाला बहुधा अपुरा आणि परिणामहीन वाटत होता. जनतेच्या चळवळीत आलेली शिथिलता व त्यामुळे आलेले नैराश्य, पुढारीपणाचा निराशाजनक कार्यक्रम, ध्येय साध्य करण्यासाठी आलेला उतावीळपणा, आयर्लंडच्या क्रांतिकारक चळवळीचा प्रभाव-- या सर्वांमुळे नवीन आणि सर्वस्वी निराळी अशी चळवळ, नवीन शक्ती, नवीन कार्यक्रम, म्हणजेच क्रांतिकारक चळवळ उभी राहण्यास मदत झाली.

बारडोलीच्या झुंजार शेतकऱ्यांच्या लढ्याचा युवकांच्या चळवळीवर परिणाम झाला. जुलै ४, १९२८ ला मुंबईत 'बारडोली दिन' पाळण्यात आला. नोव्हेंबर २७, १९२८ ला यूथ लीगची मुंबई इलाखा परिषद जवाहरलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखाली झाली. भाषणाच्या ओघात धर्म अनेक असतात, पण विचार करण्याची बुद्धी एकच असते यावर त्यांनी भर दिला. अखिल भारतीय युवक परिषद झाली--- अध्यक्ष होते, मुंबईचे के. एफ. नरिमन, आणि स्वागताध्यक्ष होते सुभाषचंद्र बोस. परदेशी कापडाची होळी हा एक लढाऊ कार्यक्रम होता.

यूथ लीगच्या कार्यक्रमात अधिक पुरोगामीपणा आणि लढाऊपणा आणण्यास कामगार शेतकरी पक्ष आणि कम्युनिस्ट यांनी त्यांच्या कार्यक्रमात घेतलेला भाग निर्णायक ठरला. काँग्रेसच्या तडजोडवादी पुढारीपणावर त्यांनी हल्ला केला. मुंबई युवक परिषदेच्या अध्यक्षा कमलादेवी चट्टोपाध्याय यांनी डिसेंबर १४, १९२९ ला एक घोषणा दिली—' देशाचे बारडोलीकरण करा, क्रांती चिरायू होवो, ' ' सविनय कायदेभंगाचा लढा चालू करा, स्वतंत्र प्रजासत्ताक भारताची घोषणा करून समांतर सरकार स्थापन करा, मग त्यासाठी कितीही किंमत द्यावी लागली वा त्याग करावा लागला तरी चालेल ' असे त्यांनी काँग्रेसच्या पुढारीपणाला सांगितले. युवकांचे तातडीचे ध्येय संपूर्ण स्वातंत्र्य आहे अशा आशयाची दुरुस्ती सूचना युसुफ मेहरअल्ली यांनी मांडली.

१९२८–२९ या वर्षात युवकात अभूतपूर्व अशी जागृती झाली असल्याचे सुभाषबाबू म्हणाले. यूथ काँग्रेसच्या पहिल्या कलकत्ता (१९२८) अधिवेशनाच्या यशाने युवकांना स्फूर्ती मिळाली आणि जतीननाथ दास यांच्या हौतात्म्यामुळे त्यांना अधिकच प्रेरणा मिळाली.

यूथ लीगचे व्यासपीठ हे राजकीय स्वरूपाचे होते, आणि चळवळ एकाच सर्वश्रेष्ठ प्रश्नावर केंद्रित झाली होती—भारतीय स्वातंत्र्य, आणि तेही तडजोड न करता केलेल्या लढ्याने मिळविण्याचे धोरण. त्यांच्या चळवळींच्या रेट्यामुळे काँग्रेसने ध्येय बदलले, आणि मद्रास काँग्रेस अधिवेशनात (१९२७) ते संपूर्ण स्वातंत्र्य असे झाले. या यूथ लीगच्या चळवळीमुळे १९३०चा लढा अधिक व्यापक होण्यास मदत झाली.

रशियन क्रांतीच्या विजयानंतर भारतीय क्रांतिकारक मार्क्स आणि लेनिन यांच्या विचारांचा अभ्यास करू लागले. मार्क्सवादी विचारांमुळे राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याच्या वैचारिक पायाचे नवीन पद्धतीने मूल्यांकन करण्याला चेतावणी – प्रेरणा मिळाली. स्वातंत्र्यलढा आणि जनतेची आर्थिक उन्नती यांच्यातील संबंधाबाबत नवीन दृष्टिकोन विकसित झाला.

नवीन क्रांतीसाठी राजकीय स्वातंत्र्य ही पूर्वअट होती. भारतीय किंवा परकीय हितसंबंधियांकडून जनतेच्या होणाऱ्या पिळवणुकीचा विनाश म्हणजेच स्वातंत्र्य ही संकल्पना आता रूढ झाली होती. ब्रिटिश साम्राज्यशाहीकडून राजकीय सत्ता हस्तगत करणे म्हणजे स्वातंत्र्य नव्हे– पूर्णतः जनतेचे म्हणजेच कामगार–शेतकऱ्यांचे लोकशाही राज्य प्रस्थापित करणे म्हणजेच स्वातंत्र्य, यूथ लीगच्या चळवळीत काम करणाऱ्या काँग्रेसच्या उदयोन्मुख पुढारीपणाने त्याचा उत्कट भावनेने प्रचार केला.

जातीयवाद आणि भांडवलशाही यांच्याविरोधी लढा देण्याचा यूथ लीगने निर्णय घेतला. राष्ट्रीय चळवळीतील सुधारणावादी प्रवृत्ती असलेले कार्यकर्त्यांचे ते एक जाळेच होते. जगातील युवक आणि युवक संघटना यांना बंधुत्वाचे अभिवादन करण्याचे प्रस्ताव संमत

केल्याने, राष्ट्रीय लढ्याचे साम्राज्यविरोधी स्वरूप आणि आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन स्पष्ट झाला. यूथ लीगच्या प्रचाराने स्वदेशी आणि बहिष्काराची चळवळ बलशाली झाली.

जानेवारी १९२८ मध्ये मुंबई इलाखा यूथ लीगची पहिली परिषद संपन्न झाली. काँग्रेसमधील डाव्या विचारसरणीच्या तरुणांनी यात भाग घेतला. देशाभिमान, जातीयताविरोधी असलेला राष्ट्रवाद आणि सुसंगतपणे साम्राज्यवादविरोध—हे त्यांचे ध्येय होते. सायमन कमिशनवरील बहिष्काराला त्यांनी पाठिंबा दिला. के. एफ. नरिमन यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या परिषदेला इंदुलाल याज्ञिक, डांगे, मिरजकर, युसुफ मेहरअल्ली इत्यादी कार्यकर्ते उपस्थित होते.

१९२९ च्या अखेरीस किंवा १९३० च्या सुरुवातीस ' यंग वर्कर्स लीग ' ही कामगारवर्गीय युवकांची संघटना अस्तित्वात आली. या संघटनेने लढाऊ कामगारांना संघटित करण्यात आणि त्यांना राजकीय क्षेत्रात काम करायला लावण्यात मोलाचे कार्य केले.[१]

पुण्यात राज्यद्रोही काम करण्यात अग्रभागी असलेली संस्था म्हणजे पुणे यूथ लीग. फर्ग्युसन कॉलेज अशा कामाचे केंद्र बनण्याचे मुख्य कारण म्हणजे व्यवसायाने वकील असलेल्या कॉ. के. एन. फडके या कम्युनिस्टाचा तरुणांवरील प्रभाव.[२] कायदेभंग चळवळीत फर्ग्युसन कॉलेजमधील विद्यार्थी बहुसंख्येने ' डिक्टेटर ' झाले याला मुख्यतः के. एन. फडके जबाबदार असल्याचे मानण्यात येत होते. फर्ग्युसन कॉलेजच्या प्राचार्यांनी एस्. एम्. जोशी, ना. ग. गोरे, र. के. खाडिलकर या पदव्युत्तर विद्यार्थ्यांवर शिस्तभंगाची कारवाई केली; कारण ते यूथ लीगचे सदस्य होते. यूथ लीग काँग्रेसच्या लढ्यात एकरूप झाली. प्रचार आणि चळवळ या बाबतीत त्यांनी मोलाचे काम केले. या संदर्भात पुण्याच्या यूथ लीगचा तसेच शिरूभाऊ लिमये यांचा उल्लेख केला जातो. सविनय कायदेभंगाच्या लढ्यात लोकांनी भाग घ्यावा म्हणून त्यांनी बुलेटिन्सही काढली.

महाराष्ट्र प्रांतिक परिषदेचे सहावे अधिवेशन मे ३, १९२८ ला पुण्यात भरले होते, अध्यक्ष होते सुभाषबाबू. मुंबई आणि सोलापूर येथील कामगार संपांना त्यांनी पाठिंबा दिला. जमिनीच्या लहान लहान तुकड्यांचे एकत्रीकरण करणे, आणि तुकडे करण्यास प्रतिबंध करणे यासाठी मुंबई विधिमंडळात आलेल्या विधेयकाबाबत नापसंती व्यक्त करण्यात आली, ते विधेयक फेटाळावे अशी विधिमंडळाला विनंती करण्यात आली. अलिबाग, पेण, देवगड आणि बारडोली या भागांत वाढविण्यात आलेल्या शेतसारावाढीविरोधी सत्याग्रहाला परिषदेने संपूर्ण मान्यता दिली, कार्यकर्त्यांचे अभिनंदन केले, आणि त्या लढ्याला मदत करण्याचे महाराष्ट्रात आवाहन केले.

१९२७–२८ मध्ये यूथ लीग इतक्या बलशाली झाल्या की, मध्यवर्ती सरकारने त्यांची दखल घेऊन एक परिपत्रक काढले, आणि प्रांतिक सरकारानी जवाहरलाल व सुभाषबाबू

यांच्या हालचालींवर बारीक लक्ष ठेवण्यास सांगितले. काँग्रेस सेवा दल वाढतच होते. सरकार त्याला 'काँग्रेसचे लढाऊ सैन्य' (स्टॉर्म ट्रूपर्स) असे म्हणत असे.

डिसेंबर १२, १९२८ ला मुंबई प्रांतिक युवक परिषदेतील भाषणात जवाहरलाल यांनी स्वातंत्र्यलढ्याचा सामाजिक आणि राजकीय आशय विशद केला. ते म्हणाले, " सर्व साम्राज्याचा विनाश करणे व समाजाची नवीन पायावर पुनर्घटना करणे हे आपले ध्येय आहे, सहकार हा त्याचा पाया असला पाहिजे, त्याचेच दुसरे नाव समाजवाद हे आहे. म्हणून आपले राष्ट्रीय ध्येय सहकारी समाजवादी राज्यसंघ व आंतरराष्ट्रीय ध्येय समाजवादी देशांचे जागतिक संघराज्य हे आहे."[३] काँग्रेस वर्किंग कमिटीच्या एका बैठकीत ते म्हणाले, " सुधारणावादी ध्येय आणि पद्धती, आणि क्रांतिकारी दृष्टिकोन, म्हणजेच आपल्या राजकीय आणि सामाजिक रचनेत मूलभूत क्रांतिकारक बदल, यातून काँग्रेसला निवड करावी लागेल."[४]

काँग्रेसमधील स्वराज्य पक्षाच्या वरिष्ठ मध्यमवर्गीय पुढाऱ्यांबद्दल गरीब मध्यमवर्गीय विद्यार्थ्यांना सहानुभूती नव्हती, आणि अशा विद्यार्थी आणि युवकांमध्येच यूथ लीग प्रस्थापित झाली, आणि लोकप्रिय झाली. शिस्तबद्ध रीतीने समाजवादाच्या लढ्यासाठी ते संघटित झाले नव्हते. कामगारवर्गातील जनतेला संघटित करून समाजवादी ध्येयाचे उच्च जीवनमान प्राप्त करून घेण्यासाठी कामगारवर्गाचा पक्ष स्थापण्याचा त्यांनी प्रयत्न केला नाही, वा त्यांना शिक्षण दिले नाही, वा आंतरराष्ट्रीय कामगारवर्गाच्या चळवळीशी भारतीय कामगारवर्गाची सांगड घालण्यासाठी त्यांनी पावले उचलली नाहीत.[५]

## यूथ काँग्रेस

समाजवादी यूथ काँग्रेसचे अखिल भारतीय अधिवेशन कलकत्ता येथे डिसेंबर २७, १९२८ ला भरले होते. जवाहरलाल नेहरू अध्यक्ष व स्वागत समितीचे अध्यक्ष होते डॉ. भूपेंद्रनाथ दत्त. अध्यक्षीय भाषणात नेहरू म्हणाले, " खऱ्या समाजवादानेच देशाचे स्वातंत्र्य साकार होण्याला संधी मिळेल. " समाजवादी विचारांच्या योगाने जातीय भावना दूर करण्यावर त्यांनी भर दिला. त्या परिषदेने मार्क्सवाद, तसेच इतर सामाजिक आणि आर्थिक क्रांतिकारक तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्यावर भर दिला. परिषदेने सार्वजनिक सुरक्षा कायदा (पब्लिक सेफ्टी ॲक्ट) व कामगार तंट्याबाबतच्या (ट्रेड डिस्प्युट्स) विधेयकांचा निषेध केला. संपूर्ण स्वातंत्र्य हे कम्युनिस्ट पद्धतीला आवश्यक असे प्रारंभिक ध्येय वा साध्य असेल. नेहरू अहवाल त्या परिषदेने त्याज्य ठरविला. तथाकथित वसाहतीचा दर्जा प्रस्थापित करून भांडवलदारांनी ब्रिटिश साम्राज्यशाहीशी केलेली ही तडजोड होती, या वसाहतीच्या दर्जात सरंजामशाही, जमीनदार आणि भांडवलशाही यांच्या हितसंबंधांचे रक्षण करून बहुजनसमाजाच्या हितसंबंधांना तिलांजली देण्यात आली होती. सामाजिक आणि आर्थिक

स्वातंत्र्य, त्याच्या सर्व ध्वन्यार्थासह, प्रत्यक्षात आणण्याचा कम्युनिझम हा एकमेव मार्ग आहे असे परिषदेने घोषित केले.

राष्ट्रीय चळवळीला मार्क्सवादाच्या जागतिक दृष्टिकोनाचा प्रचार करून नवीन वळण दिले पाहिजे असा यूथ कॉंग्रेसचा विश्वास होता. शास्त्रीय समाजवादासाठी उभे ठाकल्याचा तसेच भारताच्या बाहेरील समाजवादी व युवक संघटनांशी सहकार्य करण्याचा दावा त्याने केला. परिषदेचा ठराव असा होता "आर्थिक, सामाजिक स्वातंत्र्य मिळविण्यासाठी कम्युनिझम हाच एकमेव मार्ग आहे....... शेतकऱ्यांसह सर्व पीडित आणि शोषित भारतीय समाजाची कामगारवर्गाची हुकूमशाही ही आघाडी आहे."[६]

यूथ कॉंग्रेसचे तिसरे अधिवेशन कलकत्ता येथे डिसेंबर २५, १९२८ ला भरले. अध्यक्ष होते के. एफ्. नरिमन, स्वागत समितीचे अध्यक्ष होते सुभाषचंद्र बोस, युवकांच्या चळवळी सुधारणावादी नसून त्या क्रांतिकारक आहेत असे सुभाषबाबू म्हणाले. समाजवादापेक्षा राष्ट्रीय स्वातंत्र्यावर परिषदेने भर दिला. नरिमन यांनी आपल्या भाषणात मुंबईच्या विद्यार्थ्यांनी फीवाढीविरुद्ध केलेल्या लढ्याचा उल्लेख केला, आणि युवकांची चळवळ ' चैतन्यदायी शक्ती ' असल्याचे सांगितले. बारडोलीसारखी चळवळ करण्याचे आवाहन केले. मुंबईच्या युवकांचे नेते मेहरअल्ली यांनी ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याचा प्रस्ताव मांडला. जातीयवादी आणि भांडवलशाही शक्तीशी सर्व सामर्थ्यांनिशी मुकाबला करण्याची तसेच सायमन कमिशनवर बहिष्कार घालण्याची त्यांनी युवकांना हाक दिली.

मुंबईत जिन्हा हॉलमध्ये सप्टेंबर १९, १९२८ ला भरलेल्या सभेत मेहरअल्ली यांनी सायमन सप्तकाला योग्य उत्तर देण्यासाठी ' स्वतंत्रभारत संघा ' (Independence of India League) ची मुंबई शाखा स्थापन करण्याची अध्यक्षांना विनंती केली. भास्करराव जाधव, डॉ. आंबेडकर इत्यादी सायमन कमिशनबरोबर सहकार्य करणारांचा निषेध करण्यात आला व खुषमस्करे, घरभेदे, आणि बिनबुडाचे (क्षुद्र किंवा दुर्लक्षण्यासारखे) अशी त्यांची संभावना करण्यात आली. ' ब्रिटिश साम्राज्यशाही नष्ट होवो ' असे फलक घेऊन मिरवणुका काढण्यात आल्या. ' जगातील कामगारांनो, एक व्हा ' असे फलक घेऊन कामगार पुढारी या मिरवणुकात भाग घेऊ लागले.[७]

या परिषदांमध्ये वंशवादविरोध, साम्राज्यशाहीविरोध, धर्मनिरपेक्षता, समाजवाद, संपूर्ण स्वातंत्र्य आणि प्रजासत्ताक शासन या संकल्पनांवर जोर देण्यात आला. आपल्या स्वातंत्र्यलढ्याची प्रेरणादायी अशी ही विचारसरणी होती.

### क्रांतिकारक चळवळी

जरी क्रांतिकारक चळवळी इतर चळवळीप्रमाणेच धर्माधिष्ठित राष्ट्रवादावर आधारित होत्या, तरी सरदार भगतसिंग यांच्या पुढारीपणाखाली क्रांतिकारक व त्यांच्याबरोबर काम

करणाऱ्या शूर युवकांनी १९२७ मध्येच समाजवादी तत्त्वज्ञान स्वीकारले. भगतसिंग म्हणतात. " ........ ज्या समाजव्यवस्थेमध्ये कामगारवर्गाची सार्वभौम सत्ता मान्य केली जाईल, तसेच ज्याला कोणापासूनही धोका राहणार नाही, अशा प्रकारची समाजव्यवस्था प्रस्थापित करणे यालाच आम्ही क्रांती म्हणतो. भांडवलशाही आणि साम्राज्यशाही युद्धाच्या बंधनातून मानवजातीला मुक्त करणारे संघराज्य प्रस्थापित करणे म्हणजेच क्रांती."[८]

दहशतवादी क्रांतिकारकांच्या प्रभावाखालील युवक चळवळी आस्ते आस्ते समाजवादी होऊ लागल्या. चंद्रशेखर आझाद, भगतसिंग आणि इतर क्रांतिकारकांनी संघटित केलेल्या हिंदुस्थान सोशॅलिस्ट रिपब्लिकन आर्मीने (एच.एस.आर.ए.) भारत स्वतंत्र करणे व समाजवादी प्रजासत्ताक राज्य प्रस्थापित करणे हे आपले ध्येय असल्याचे घोषित केले. माणसांनी माणसाची केलेली पिळवणूक थांबविण्यासाठी त्यांना क्रांती पाहिजे होती. भगतसिंग आणि त्याचे सहकारी मार्क्सच्या शास्त्रीय समाजवादाकडे जलद गतीने वळले.[९]

महाराष्ट्रात त्या काळात शिवराम हरी राजगुरू, मलकापूरकर, सावरगावकर अशा थोड्याच क्रांतिकारकांनी कटात भाग घेतला. भगतसिंग आणि त्यांचे सहकारी यांच्या हौतात्म्यामुळे सर्वसाधारण जनतेला आणि विशेषतः तरुणांना स्फूर्ती मिळाली. देशाच्या स्वातंत्र्यसंग्रामात उडी घेण्याच्या शपथा हजारो युवकांनी घेतल्या.

## हिंदुस्थानी सेवादल

अमेरिकेत शिक्षणासाठी गेलेले डॉ. एन. एस. हर्डीकर, लाला लजपतराय यांच्या विचाराने प्रभावित झाले. ते १९२१ मध्ये भारतात परत आले, आणि मे १, १९२३ ला त्यांनी नागपूर झेंडा सत्याग्रहात भाग घेतला. त्या वेळी नागपूर तुरुंगात हजारो सत्याग्रही शिक्षा भोगत होते. हर्डीकरही त्याच तुरुंगात होते. काँग्रेसच्या धोरणाप्रमाणे काम करणारी मातृभूमीच्या सेवेसाठी बद्धपरिकर झालेली अखिल भारतीय संघटना स्थापन करण्याची कल्पना निघाली व त्याला नीटस स्वरूपही प्राप्त झाले. स्वयंसेवक संघटनेसाठी घटनेचा मसुदाही तयार करण्यात आला. हर्डीकर यांनी स्वयंसेवक संघटना बांधली व परिणामकारक सेवा करण्याचे शक्तिशाली हत्यार म्हणून ती विकसित केली. १९२३ च्या कोकोनाडा काँग्रेसने स्वयंसेवक दलाचे कामकाज करण्यासाठी नियम तयार केले व त्यांना काँग्रेस पुढारीपणाने मंजुरीही दिली.

नोव्हेंबर ७ ते १८, १९२९ असे ११ दिवसांचे स्वयंसेवकांचे प्रांतिक शिबीर संघटित करण्यात आले. प्रत्येक महिन्याच्या शेवटच्या दिवशी राष्ट्रीय ध्वज फडकवून झेंडावंदन करणे व वंदे मातरम् गीत गाणे असे कार्यक्रम ठरविण्यात आले.

डिसेंबर ३०, १९२८ ला कलकत्ता येथे सुभाषबाबूंच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या परिषदेत जवाहरलाल नेहरूंनी एक ठराव मांडला व तो संमत झाला. ' लीग अगेन्स्ट इंपीरिॲलिझम ' ला सेवादल जोडावे हे त्याचे उद्दिष्ट होते.

डिसेंबर २७, १९२९ ला श्रीनिवास अय्यंगार यांच्या अध्यक्षतेखाली लाहोर येथे झालेल्या परिषदेत एक समिती नेमण्यात आली, आणि काँग्रेसच्या घटनेप्रमाणे सेवादलाचे ध्येय-धोरण बदलावे असा प्रस्ताव संमत झाला. [१०]

के. नवीन खांडवाला ' राष्ट्रीय सेने ' च्या कॅप्टन होत्या. मुंबईत दुसरी संघटना होती, त्याचे नाव ' राखीव दल ' (रिझर्व ब्रिगेड) होते व एन. एम. दीक्षित त्याचे कॅप्टन होते.

ऑगस्ट ११, १९३१ ला महात्मा गांधींच्या अध्यक्षतेखाली हिंदुस्थानी सेवा दलाची विशेष परिषद झाली.

नागपूर झेंडा सत्याग्रहात भाग घेतलेले सत्याग्रही तुरुंगातून सुटल्यानंतर सेवादलाचे सक्रिय कार्यकर्ते झाले व त्यांनी १९३०–३२ च्या सविनय कायदेभंगाच्या लढ्यात मोठा भाग घेतला.

## वानरसेना

या सेनेने पोलिसांशी कधी उघड तर कधी गनिमी काव्याने, निकराचा लढा दिला, आणि त्यांना पराभूतही केले. या सेनेने परदेशी कापड दुकानांवर, दारूच्या दुकानांवर निरोधन केले, तसेच काँग्रेसची गुप्तपत्रके (बुलेटिन्स) सर्वत्र वाटण्यातही मोठा भाग घेतला.

मुंबईत विद्यार्थी मंडळ बेकायदेशीर संस्था म्हणून घोषित झाले आणि विद्यार्थ्यांच्या मिरवणुकांवर निष्ठुर हल्ले चढविण्यात आले. कित्येकांना आपले प्राण गमवावे लागले, पोलिसांनी शिक्षणसंस्थांचे पावित्र्य पायदळी तुडविले. त्यांनी कोणत्याही कॉलेजात जाऊन वर्गातील विद्यार्थ्यांना निर्दय मारझोड केली. पुण्यातील परशरामभाऊ कॉलेजातही पोलीस घुसले.

हिंदुस्थानी सेवादल, नॅशनल मिलिशिया, वानरसेना आणि अशाच प्रकारच्या संघटनांनी कायदेभंगाच्या चळवळीला लढाऊपणा आणला. त्यांना जनतेचा पाठिंबा होता, आणि त्या आपल्या देशभक्तीचे जणू प्रतीकच होत्या.

## इंडिपेन्डन्स ऑफ इंडिया लीग

ऑगस्ट १९२८ मध्ये लखनौ येथे झालेल्या सर्वपक्षीय परिषदेनंतर जवाहरलाल नेहरूंनी ही लीग स्थापन केली. जवाहरलाल व सुभाषबाबू हे कार्यवाह होते. नोव्हेंबर १६, १९२८ ला वर्तमानपत्राला दिलेल्या एका मुलाखतीत नेहरू म्हणाले '' ही लीग देशातील व काँग्रेसमधील डाव्या विचारसरणीचे प्रतिनिधित्व करते. काँग्रेसमध्ये सर्व विचारसरणीचे गट येतात, पण लीगमध्ये फक्त डाव्या विचारसरणीचे विशिष्ट गटच येतात. ही काँग्रेसला प्रतिस्पर्धी नाही, पण काँग्रेसवर तिला प्रभाव पाडायचा आहे, आणि काँग्रेसमध्ये बहुसंख्या करून तिला आपणाकडे वळवायचे आहे.''[११]

या लीगची पहिली बैठक दिल्लीला नोव्हेंबर ३, १९२८ ला श्रीनिवास अय्यंगार यांच्या अध्यक्षतेखाली झाली. जातीय संघटनेत काम करणाऱ्यांना सदस्यत्व नाकारण्यात आले. या लीगने ' लीग अगेन्स्ट इंपीरिॲलिझम ' शी संबंध ठेवावेत आणि पॅरिस येथे होणाऱ्या परिषदेला लीगने प्रतिनिधी पाठवावेत असे ठरविण्यात आले. बंगालमध्ये अशाच प्रकारची लीग होती व सुभाषबाबू त्या लीगचे प्रमुख होते.

**मीरत कटाचा प्रभाव**

१९२७ च्या प्रथमार्धात ब्रिटिश पार्लमेंटचे कम्युनिस्ट सदस्य सकलातवाला यांनी भारतातील कित्येक शहरांना भेटी दिल्या. त्यांच्या भाषणात त्यांनी राजकीय दृष्टीने दोन गोष्टींवर भर दिला : (१) साम्राज्यशाहीविरोधी आणि लोकशाही डावा विचारप्रवाह राष्ट्रीय चळवळीत सतत वाढत आहे. (२) या झेंड्याखाली लढाऊ कामगार व शेतकरी चळवळ वाढत आहे. मार्च १२, १९२७ ला दिल्ली येथे झालेल्या अ. भा. ट्रेड युनियन काँग्रेसच्या अधिवेशनाला ते उपस्थित होते.

सकलातवालांचा भारत दौरा, तसेच अहिंसा, वर्गनिग्रह आणि कामगार चळवळ यांबाबत त्यांचा महात्माजींशी झालेला पत्रव्यवहार यांना भारतीय वृत्तपत्रांतून भरपूर प्रसिद्धी मिळाली.त्याचा राष्ट्रीय चळवळीवरही परिणाम झाला.

सप्टेंबर ४, १९२८ ला सार्वजनिक सुरक्षा विधेयक (पब्लिक सेफ्टी बिल) मध्यवर्ती विधिमंडळात प्रथम मांडण्यात आले, जे भारतीय नाहीत, आणि जे विध्वंसक आणि राज्य उलथून पाडण्याच्या कामात गुंतलेले असतील अशांना भारतातून हाकलून देण्याची या विधेयकात तरतूद असल्याचा होम मेंबरनी आपल्या भाषणात खुलासा केला. लाला लजपतराय म्हणाले, '' बोल्शेव्हिझम किंवा कम्युनिझमपासून आम्हाला धोका नाही.सर्वात मोठा धोका भांडवलशाही पिळवणुकीचा आहे. '' विरोधी पक्षाचे पुढारी मोतीलाल नेहरू यांनी समारोप करताना '' हे विधेयक जर कायद्यात रूपांतरित झाले, तर ' कायद्याच्या ग्रंथावर हा सर्वात मोठा कलंक ठरेल, ' असे म्हटले. अध्यक्ष विठ्ठलभाई पटेल यांनी सरकारविरोधी आपले मत नोंदविले, आणि सरकारचा पराभव झाला. व्हाईसरॉय म्हणाले, '' कम्युनिस्ट विचारसरणीचा अशांत करणारा प्रचार चिंता उत्पन्न करणारा आहे. '' अशा परिस्थितीत गृह मंत्र्यानी दुरुस्त सार्वजनिक सुरक्षा विधेयक फेब्रुवारी ४, १९२९ ला केंद्रीय विधिमंडळात मांडले. या विधेयकालाही सर्व पुढाऱ्यांनी कसून विरोध केला. मोतीलाल नेहरूंनी '' भारतीय राष्ट्रवादावर व काँग्रेसवर प्रत्यक्ष हल्ला '' अशी या विधेयकाची संभावना करून ' भारतीय गुलामगिरी नं. १ ' असे त्याला फटकारले.

निवड समितीकडून आलेले ते विधेयक मार्च २८, १९२९ ला विधिमंडळात मांडण्यात आले. या आधी एक दिवस सरकारने भारतभरच्या कामगार चळवळीतील प्रमुख पुढाऱ्यांना

पकडले, आणि त्यांना एका बाजूला असलेल्या मीरत या गावी खटला चालविण्यासाठी आणले. हाच मीरत कटाचा प्रसिद्ध खटला.

सरकारच्या अहवालात म्हटले आहे, '' काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी स्वीकारलेल्या राजकीय तत्त्वज्ञानामुळे चळवळीला प्रोत्साहन मिळाले, आणि 'युवकांच्या काही संघटनांनी' कम्युनिस्ट तत्त्वज्ञान आणि प्रतीके स्वीकारली आहेत. भारतीय नसलेल्या, पण भारतात राहणाऱ्यांच्या कम्युनिस्ट कार्यक्रमांना पायबंद घालण्याचे काम सार्वजनिक सुरक्षा वटहुकुमाने त्या वर्षात केले. त्या वटहुकुमाने त्या प्रचाराला प्रतिबंध केला.'' कानपूर बोल्शेव्हिक कटाच्या (१९२५) खटल्यानंतर हा मोठाच हल्ला होता.[१२]

गांधीजींच्या मते मीरत कटाच्या खटल्यामागे 'कम्युनिझमचा विनाश करणे हा हेतु नव्हता, तर लोकात घबराट निर्माण करणे हा होता.' मार्च २७–२८, १९२९ च्या काँग्रेस वर्किंग कमिटीने ठरावात म्हटले, '' मीरत खटल्याने देशातील राष्ट्रीय चळवळीवरच हल्ला झाला असून कामगार चळवळीला मोठाच धोका निर्माण झाला आहे.''[१३]

मुंबईतील दंग्याच्या चौकशीसाठी सरकारने एक समिती नेमली. त्या समितीने 'मुंबईतील कम्युनिस्टांच्या कारवायांविरुद्ध कडक व परिणामकारक उपाय योजावेत' अशी शिफारस केली. तसेच 'रजिस्टर झालेल्या ट्रेड युनियनमधून कम्युनिस्ट वगळले जातील' असा ट्रे. यु. कायदा करावा की काय असा प्रश्न त्यानी निर्माण केला.[१४]

मध्यवर्ती विधिमंडळाचे अध्यक्ष विठ्ठलभाई पटेल यांनी मीरत कटाचा खटला चालू असल्याने हे विधेयक तहकूब करावे असा सरकारला सल्ला दिला. या वेळी हे विधेयक प्रस्तुत करण्याला जर सरकार अधिक महत्त्व देत असेल, तर मीरत कटाचा खटला मागे घ्यावा, आणि ते विधेयक प्रसृत करावे.[१५] अध्यक्षांनी त्या विधेयकाबाबत अधिक विचार करणे अशक्य असल्याचे सांगितले; म्हणून व्हाईसरॉय यांनी त्या विधेयकात असलेले अधिकार गव्हर्नर जनरल–इन–कौन्सिलला देणारा वटहुकूम जारी केला.

कामगार-मालक तंट्याबाबत (ट्रेड डिस्प्यूटस् बिल) एक विधेयक सरकारतर्फे मांडण्यात आले, त्याला सर्व पुढाऱ्यांनी कसून विरोध केला, पण एप्रिल ८, १९२९ ला गृहाने ते विधेयक संमत केले. पण सरदार भगतसिंग आणि बटुकेश्वर दत्त यांनी विधिमंडळाच्या प्रेक्षकांच्या सज्जातून दोन बॉंब फेकले. या घटनेने विधेयक संमत करून घेण्याच्या सरकारच्या कृतीला चोख उत्तर मिळाले व ती घटना संस्मरणीय झाली !

पंडित मोतीलाल नेहरू आपल्या भाषणात म्हणाले, '' काटेरी तारांचे कुंपण घालून आणि कृत्रिम रीतीने अटकाव करून काही विचार तुम्ही भारताबाहेर ठेवू शकता का ? असे करण्याचा काळ आता गेला आहे. मला ते लोक (कम्युनिस्ट) माहीत आहेत. ते त्यांच्या

मताशी ठाम आहेत. स्वतःला पटलेल्या विचाराशी प्रामाणिक राहण्यास आवश्यक ते धैर्य त्यांच्याजवळ आहे. त्यांची मते तुम्हाला पटो वा न पटो, समतोलवृतीच्या कोणाही व्यक्तीने त्यांना मान दिलाच पाहिजे.''[१६]

मीरत कटाच्या खटल्यात पकडलेल्या ३१ आरोपीत ८ जण अ. भा. काँग्रेस कमिटीचे सदस्य होते. डांगे, निमकर, जोगळेकर, मुझफर अहमद, सोहनसिंग जोश, ठेंगडी, केदारनाथ सहगल, डॉ. विश्वनाथ मुकर्जी हे ते सदस्य होत. ब्रिटिश ट्रेड युनियन पुढारी सिट्रिन यांना हे दाखवून जवाहरलालजी म्हणाले, '' सरकारने आपले लक्ष फक्त कम्युनिस्टांकडेच दिले आहे असे म्हणणे हे उघडपणे मूर्खपणाचे आहे.'' [१७] कम्युनिस्टांना धर्मविरोधी, राष्ट्रविरोधी, इतकेच नव्हे तर समाजविरोधी असा शिक्का मारून त्यांना राजकीय दृष्टीने राष्ट्रीय चळवळीपासून अलग पाडणे हा साम्राज्यवाद्यांचा डाव होता.

सार्वजनिक सुरक्षा कायदा (पब्लिक सेफ्टी बिल) आणि १९२८ चा कामगार तंटा कायद्याला जोडलेली प्रतिगामी दुरुस्ती – ही मुख्यतः कम्युनिस्टांच्या विरोधी होती. याविरुद्ध कम्युनिस्ट आणि काँग्रेसजन यांचा संयुक्त लढा चाललेला होता.

मीरत कटातील आरोपींच्या बचावाबाबत काँग्रेस व कम्युनिस्ट यांचे झालेले मतैक्य हे कम्युनिस्ट आणि काँग्रेसजन यांचा वरील कायद्याबाबत चाललेला संयुक्त लढाच होता. ' वर्गयुद्धातील एक घटना (उपाख्यान) ' असेच या खटल्याचे रूप होते.

राष्ट्रीय पुढारी आणि राष्ट्रीय वृत्तीची वर्तमानपत्रे यांचे लक्ष या खटल्याकडे वेधले गेले. कम्युनिस्ट आणि कामगार पुढाऱ्यांच्या अटकांविरुद्ध निषेधाचा नुसता ठराव काँग्रेसने केला, इतकेच नव्हे तर त्यासाठी एक बचाव समिती स्थापन केली. मार्क्सवादाच्या प्रचारासाठीचे एक व्यासपीठ म्हणून या आरोपींनी या खटल्याचा वापर केला. आस्ते आस्ते समाजवाद हा आपल्या राष्ट्रीय चळवळी-मागील प्रेरक विचार झाला. समाजक्रांतीची प्रगती थांबविण्यासाठी सरकारने हा कटाचा खटला भरला, पण त्यात त्याला यश आले नाही. या खटल्यातील डॉ. अधिकारी कोर्टापुढील आपल्या निवेदनात म्हणाले, '' सामाजिक गुन्हेगारांचे अधिकृत प्रतिनिधी या खटल्यात फिर्यादी पक्षाच्या बाकांवर बसले आहेत. या ' कटाच्या ' खटल्यामुळे साम्राज्यविरोधी राष्ट्रीय स्वातंत्र्यलढ्याचा विशाल प्रवाह आणि नवीन कम्युनिस्ट चळवळ यांचा सांधा साधला गेला, त्यांचे ऐक्य झाले. या खटल्यातील विशेष गोष्ट म्हणजे ब्रिटिश कामगारवर्गाचे तीन प्रतिनिधी (स्प्रॅट, ब्रॅडले व हचिन्सन) भारतीय कामगारांच्या प्रतिनिधींबरोबर एकत्रित आरोपी म्हणून उभे राहिले. '' ...... आंतरराष्ट्रीय कामगारवर्गाच्या ऐक्याचे ते जागते निदर्शनच होते. ''[१८]

मीरत कटाबाबत हॅरॉल्ड लास्की म्हणाले, '' ब्रिटिश इंडियन सरकारच्या इतिहासातील अत्यंत निर्दय वा कठोर अशी ही घटना आहे. ती या प्रकाराने (सरकारलाच) आरोपी

करीत आहे. भीतीने, व दहशतवादाच्या आश्रयाने ती काम करीत आहे. न्यायदानात उदारता असणे ही आवश्यक बाब असते, ती यात येणे अशक्य आहे. '' '' ब्रिटिश ट्रेड युनियन काँग्रेस आणि इतरांच्या दबावामुळे या खटल्यातील आरोपींच्या शिक्षा नंतर सौम्य करण्यात आल्या, '' असे मायकेल ब्रेचरने म्हटले आहे.'' [१९]

या खटल्यातील एक आरोपी पत्रकार एम्. जी. देसाई यांनी आपल्या ' मीरत कटाचा खटला ' या पुस्तकात म्हटले आहे, '' दुय्यम अधिकारी वकील जे. पी. मित्तर आमच्याशी गप्पा मारीत होते, आणि त्यांनी सांगितले, ' पुराव्यावरून जे सिद्ध झाले आहे ते हे की फिर्यादी पक्ष जवाहरलाल नेहरूंचे नाव आरोपींच्या यादीत सहज दाखल करू शकला असता, ........ परंतु आम्ही जर या थराला गेलो असतो तर एक गोष्ट हमखास घडली असती ती म्हणजे मोतीलाल नेहरू रोजच्या रोज कोर्टात आले असते, आणि बचावाचे नेतृत्व त्यांनी स्वतःकडे घेतले असते, आणि जवाहरलालजींचे पितृ-देव (गॉड फादर) महात्मा गांधी यांनी सारा देश चेतवला असता, आणि सगळ्या देशाला तुमच्या पाठीशी उभे केले असते. नेमके हेच आम्हाला नको होते. राष्ट्रीय चळवळीपासून तुमच्यावरील खटला आम्हाला अलग पडायला हवा होता, आणि त्यात आम्ही यश मिळवलंय. ''(पृ. ५८).

**आगेकूच**

गांधीजींनी त्यांच्या ' यंग इंडिया ' पत्रात (जानेवारी १२, १९२८) मद्रास काँग्रेसच्या अधिवेशनात प्रसृत झालेल्या संपूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावाचा निषेध केला, आणि तो ठराव ' घाईगर्दीने विचारात घेतलेला आणि अविचाराने प्रसृत झालेला ' असे त्याबाबत म्हटले – त्यानंतर नेहरू अहवाल तयार झाला व वसाहतीच्या स्वराज्यालाही नकार मिळताच गांधीजी व काँग्रेस संपूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावाप्रत पुनः आली.

लाहोर काँग्रेसचे (१९२९) अध्यक्ष जवाहरलाल नेहरू आपल्या भाषणात ब्रिटिश साम्राज्याबाबत बोलले; आणि आपण समाजवादी, प्रजासत्ताक असून राजेरजवाड्यांच्यावर आपला विश्वास नसल्याचे त्यांनी सांगितले. तसेच अल्पसंख्यांक, हिंदी संस्थाने, कामगार आणि शेतकरी यांच्या प्रमुख प्रश्नांबाबत त्यांनी विस्ताराने चर्चा केली. अहिंसा ही आपणास ' तत्त्व ' म्हणून मान्य नाही; पण ' धोरण ' म्हणून मान्य असल्याचे त्यांनी सांगितले.

काँग्रेसचा स्वातंत्र्यासंबंधीचा ठराव खालीलप्रमाणे होता : '' व्हाइसरॉयनी स्वराज्यासाठी समझोता करण्यासाठी जे प्रयत्न केले त्याचे महत्त्व काँग्रेस ओळखते .......... प्रस्तावित गोलमेज परिषदेत भाग घेऊन आजच्या परिस्थितीत काही साध्य होईल असे काँग्रेसला वाटत नाही. ......स्वराज्य म्हणजे संपूर्ण स्वातंत्र्य....... नेहरू समितीच्या अहवालानुसार तयार केलेली योजना आता रद्द झाली आहे.जे काँग्रेसजन विधिमंडळाचे आणि समित्यांवरील सभासद असतील त्यांना आपल्या पदांचे त्यागपत्र देण्याचा, तसेच ........ ज्यावेळी

अ. भा. कॉंग्रेस कमिटीची बैठक होईल, तेव्हा करबंदीसह सविनय कायदेभंगाचा कार्यक्रम सुरू करण्याचा आदेश देण्यात येत आहे.''[२०]

डिसेंबर १९२८ मध्ये कलकत्ता कॉंग्रेसमध्ये राष्ट्राच्या स्वराज्याच्या मागणीसाठी एक वर्षाची मुदत सरकारला देण्यात आली होती, आणि डिसेंबर ३१, १९२९ ला रात्री १२ वाजता ती मुदत संपली, त्या क्षणी संपूर्ण स्वातंत्र्याचे निशाण फडकविण्याचा कार्यक्रम कॉंग्रेसने तडफेने हाती घेतला.

लाहोर कॉंग्रेसचे अधिवेशन (१९२९) संपल्यावर श्रीनिवास अय्यंगार आणि सुभाषबाबू यांनी 'कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पार्टी' ही नवीन संघटना स्थापन केल्याची घोषणा केली. या नवीन संघटनेची स्थापना होताक्षणी चित्तरंजन दास यांच्या पत्नी वासंतीदेवी यांना सुभाषबाबूंनी खालील मजकुराची तार पाठविली : "परिस्थिती आणि बहुमताचा जुलूम यामुळे आम्हांला नवीन पक्ष स्थापन करावा लागत आहे. दासबाबूंनी असाच कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्ष गया कॉंग्रेस (१९२२) नंतर स्थापन केला होता. देशबंधूंचा आत्मा आम्हाला मार्गदर्शन करील, आणि तुमचे आशीर्वाद आम्हाला स्फूर्ती देतील." निश्चित स्वरूपाची आणि बलशाली कृती करण्यासाठीच संघटना करण्यात आली. या नव्या पक्षाच्या धोरणात्मक निवेदनात 'आपले ध्येय साध्य करण्यासाठी पक्ष जे कार्यक्रम, धोरण व कृती करण्याचे ठरवील, त्याबाबतीत देशातील इतर पक्षांशी हा पक्ष सहकार्य करील.'[२१]

मर्यादेत वा हुकमतीत न राहणारा जनसमुदाय, आणि त्याच वेळेला चालू असलेल्या युवकसंघाच्या सभा – यांमुळे लढा सुरू करण्याबाबत महात्माजींवर किती दबाव येत होता याचे ते प्रात्यक्षिकच होते. त्यामुळे सविनय कायदेभंग हाच हिंसक वणवा टाळण्याचा एकमेव मार्ग आहे याची गांधींनी खात्री पटवून व हिंसेचे धोके दाखवून दिले.

'न्यूयॉर्क टाइम्स' मध्ये आलेल्या (१ जानेवारी १९३०) अहवालावरून तीन गोष्टी स्पष्ट होतात : (१) गांधीजींच्या नेतृत्वाखालील काम करणाऱ्या 'जहालमतवादी' गटाने वसाहतवादी स्वराज्य का संपूर्ण स्वातंत्र्य या बाबतीत कॉंग्रेसवर संपूर्ण कब्जा केला आहे. (२) 'अविचारी' किंवा 'बेताल' अशा गटालाही गांधीजींनी पराभूत केले. व्हाइसरॉयच्या गाडीखाली बॉंब ठेवल्याबद्दल, तसेच असहकाराचा संपूर्ण कार्यक्रम अंमलात आणण्याबाबत खेद व्यक्त करायचा की नाही हा प्रश्न होता, (३) जरी जवाहरलालजी युवकांचे दैवत झाले होते, तरी 'गांधीजींचे व्यक्तिमत्व लोकांच्या भावविश्वात सर्वश्रेष्ठ वा उत्तुंग असे होते.'[२२]

भारताच्या राष्ट्रीय चळवळीच्या इतिहासात लाहोर कॉंग्रेस ही नवीन कलाटणी देणारी घटना आहे, असे अमेरिकन निरीक्षकांना वाटत होते. उत्तर अमेरिकेतील तेरा ब्रिटिश वसाहतींना स्वातंत्र्य मिळाले, त्या आधी १७७६ च्या अमेरिकन कॉंग्रेसशी भारताच्या लाहोर कॉंग्रेसचे साम्य दिसून येते,[२३] असे अमेरिकन अहवालात म्हटले आहे.

या वेळेला त्यांची विचारधारा निराळेच वळण घेत असल्याचे नेहरूंच्या ध्यानात आले, ज्या वेळी कायदेभंगाचा लढा चालू होईल, तेव्हा हिंसेचा उद्रेक झाला म्हणून तो थांबवला जाणार नाही असे त्यांना वाटे.[२४]

स्वातंत्र्य हे ध्येय आणि सविनय कायदेभंग हे साधन असे घोषित करण्यावाचून काँग्रेसपुढे दुसरा मार्गच नव्हता. त्याची कारणे अशी : (१) दहशतवाद हा ऐनभरात दिसून येत होता; (२) कामगार आघाडीवर काम करणारे कम्युनिस्ट नेते आणि जहाल पुढारी यांची राजकारणात हातमिळवणी झाली होती; (३) कामगारांत संपाची वाढती लाट आली होती; (४) आर्थिक मंदी; (५) मध्यमवर्गातील वाढती बेकारी; आणि (६) घटनात्मक मार्गाने प्रश्न सोडविण्यात आलेले अपयश.

लाहोर काँग्रेस (१९२९) चा राजकीय ठराव म्हणजे त्याच्या आर्थिक धोरणाचे व्यक्त रूप होते. लोकशाहीच्या चौकटीत समाजवादाचा पुरस्कार त्याने केला होता. राजकीय प्रश्नाकडे पाहण्याचा आर्थिक मार्ग म्हणजे धर्माधिष्ठित राजकीय पक्षांना, विशेषतः मुस्लिम लीगला, बाजूला सारण्याचा एक प्रयत्न होता. मोतीलाल नेहरूंनी एका पत्रात (१७ फेब्रुवारी १९३०) डॉ. अन्सारी यांना लिहिले, '' आमचा दारुण पराभव झाला आहे. आमची धोरणे चुकीची होती. हे फक्त आर्थिक पायावरच करता येईल; आणि सत्ता बळकावणाऱ्यांच्या हातून ती मिळवून स्वातंत्र्य प्रस्थापित करण्याचा तो एकमेव मार्ग आहे. ''

गोलमेज परिषदेत वसाहतीच्या दर्जाच्या स्वराज्यामध्ये खरोखर येणाऱ्या अडचणींची चर्चा होईल असे आश्वासन खाजगीरीत्या गांधीजींना पाहिजे होते, असे विठ्ठलभाई पटेल यांचे मत होते. व्हाइसरॉय म्हणाले, ' गोलमेज परिषद ही घटना समिती नव्हे. ' त्यांनी गांधींना ' खोट्या कंड्या उठवून धमकी देणारा, ' आणि त्यांची चळवळ ही त्यांच्याच मार्गाची आहे असे म्हटले.''[२५]

' राजकारणातून गांधींची प्रतिमा नाहीशी होणार नाही ' अशी परिस्थिती ठेवण्याचे ब्रिटिशांचे धोरण होते. अधिक गंभीर आणि कृतिशील अशा दहशतवादी मोहिमांशी सरकार मुकाबला करणार होते. त्यामुळे वाटाघाटींची दारे उघडी असत. लॉर्ड विलिंग्डनने गांधींना आणि ' जो स्वतःच्या फायद्यासाठी परिस्थितीचा विपर्यस्त अर्थ लावील ' असा ' चाणक्य नीतीचा, लहानसा सैतान ' म्हटले.[२६] (आयर्विनने हॅले यांना पाठविलेले पत्र २ मार्च १९३१).

## स्वातंत्र्याची प्रतिज्ञा

नवीन काँग्रेस वर्किंग कमिटीची बैठक जानेवारी २, १९३० ला झाली. काँग्रेसच्या आज्ञेप्रमाणे मध्यवर्ती विधिमंडळाच्या २७ सदस्यांनी राजीनामे दिले. सर्व भारतभर स्वातंत्र्य-दिन म्हणून पाळण्याचे ठरले, आणि त्यासाठी जानेवारी २६ हा दिवस मुक्रर करण्यात आला. जानेवारी २६, १९३० ला वाचायची प्रतिज्ञा अशी होती : '' स्वातंत्र्य

मिळविणे, आपल्या श्रमाच्या फळांचा उपभोग घेणे, तसेच जीवनातील आवश्यक त्या गरजा भागविणे, आणि विकासाच्या सर्व संधी उपलब्ध होणे– हा इतर देशातील जनतेप्रमाणे आमचा काढून न घेण्यासारखा हक्क आहे, असा आमचा विश्वास आहे....... भारताने स्वातंत्र्य प्राप्त करून घेतले पाहिजे. .......भारत आर्थिकदृष्ट्या विनाश पावला आहे........ब्रिटिश राजवटीमध्ये भारत जितका राजकीय दृष्ट्या खालावला आहे, तितका पूर्वी कधीही नव्हता....... स्वातंत्र्य मिळविण्याचा सर्वाधिक परिणामकारक असा मार्ग हिंसा हा नाही.....करबंदीसह सविनय कायदेभंगासाठी आम्ही तयारी करू.....पूर्ण स्वराज्याच्या प्रस्थापनेसाठी काँग्रेस वेळोवेळी ज्या आज्ञा देईल त्या आम्ही पाळू अशी आम्ही गंभीरपणे प्रतिज्ञा करतो.''

लाहोर काँग्रेसच्या ठरावाबाबत सुभाषबाबूंनी लिहिले आहे : '' काँग्रेसने देशात समांतर सरकार स्थापन करावे, आणि त्यासाठी कामगार, शेतकरी आणि तरुण यांच्या संघटना प्रस्थापित करण्याचे काम हाती घ्यावे असा ठराव डाव्या गटातर्फे मांडण्यात आला होता, पण तो फेटाळला गेला. ''

**स्वातंत्र्यदिन (२६ जानेवारी १९३०)**

मुंबईत साजरा झालेल्या स्वातंत्र्यदिनाचा कार्यक्रम पुढीलप्रमाणे होता : (१) शहरातील सर्व विभागात (वॉर्डात) राष्ट्रीय झेंडा रोवणे; (२) काँग्रेस व यूथ लीग स्वयंसेवकांच्या दोन मिरवणुका काढणे; (३) काँग्रेस हाऊसवर स्त्रियांच्या सभा; (४) चौपाटीवर विराट सभा. चौपाटीवरील सभेचे 'खरा मानवसागर' 'पूर्ण स्वराज्याचा मंत्र ऐकणाऱ्या मानवसागराच्या उसळत्या लाटा' असे वर्णन करण्यात आले.

मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटीने नऊ सभा आणि सात मिरवणुका संघटित केल्या आणि स्वातंत्र्याच्या ठरावाच्या एक लाख प्रती वाटण्यात आल्या; आणि तसे अ. भा. काँ. कमिटीला पत्राने कळविलेही.

मुंबई विधिमंडळाचे कौन्सिल सदस्य के. एफ्. नरिमन, आणि पी. जे. जिनवाला यांनी त्यांच्या पदांची त्यागपत्रे दिली, तसेच जमनादास मेहता यांनीही केंद्रीय विधिमंडळाच्या सदस्यत्वाचे त्यागपत्र दिले.

मुंबईच्या स्वातंत्र्यदिनाच्या समारंभाची परिणती चौपाटीच्या वाळवंटावर भरलेल्या प्रचंड सभेमध्ये काँग्रेस व कम्युनिस्ट यांच्या तीव्र संघर्षात झाली. गिरणी कामगार युनियनचे सुमारे १००० कामगार सुहासिनी नंबियार, कांदळकर आणि एस्. व्ही. देशपांडे यांच्या नेतृत्वाने व्यासपीठावर चालून गेले, झोंबाझोंबी झाली, आणि काँग्रेसच्या झेंड्याशेजारी लालबावटा लावण्यात आला. ('इंडियन डेली मेल' २८ जानेवारी १९३०). काँग्रेसच्या तिरंगी झेंड्याचे पूजक व लालबावट्याचे पूजक यांच्यात हातघाईची लढाई झाली. (टाइम्स २७ जानेवारी १९३०).

मुंबईच्या पहिल्या स्वातंत्र्यदिनाचा सरकारी अहवाल पुढीलप्रमाणे होता : '' मुंबईत सकाळी सर्व वार्डात झेंडे उभारण्यात आले होते. ५० ते २,००० असा समुदाय त्याला

हजर होता. ' महात्मा गांधी की जय ' , ' नहीं रखनी नहीं रखनी सरकार जालीम नहीं रखनी ' अशा घोषणा देत मिरवणुका चौपाटीकडे जात होत्या. २५–३० हजारांचा जमाव हे सर्व उत्सुकतेने पाहत होता. १५ ते ३० वर्षे वयोगटातील तरुणांच्या शिस्तबद्ध मिरवणुका सर्व शहराला नवे चैतन्य देत होत्या. सुहासिनी नबियार, कांदळकर व एस्. व्ही. देशपांडे यांच्या नेतृत्वाखाली गिरणी कामगार युनियनच्या सुमारे एक हजार कामगारांनी सभेच्या व्यासपीठावर चाल केली, कॉंग्रेस झेंड्याशेजारी लालबावटा जबरदस्तीने लावण्यात आला व दोन्ही गटात धुमश्चक्री झाली. या दृश्यानेच स्वातंत्र्यदिनाच्या सोहळ्याची समाप्ती झाली. " [२७] पुण्याच्या प्रत्येक विभागात झेंडावंदनापूर्वी मिरवणुका निघत होत्या. हिंदुस्थान सोशॅलिस्ट रिपब्लिकन आर्मीची हिंसात्मक लढा करण्याबाबतची पत्रके जमावात फेकण्यात आली, आणि भगतसिंग, सुखदेव व राजगुरूची छायाचित्रे रस्त्यारस्त्यात विकण्यात आली.

देशात गावागावांतून मिरवणुका निघाल्या, आणि लहान-मोठ्या कार्यकर्त्यांनी सभातून भाषणे केली. महाराष्ट्रातही तोच उत्साह ओसंडून वाहत होता. ' महात्मा गांधी की जय ' ही आता नुसती वैयक्तिक जयजयकाराची घोषणा नव्हती तर आक्रमक राष्ट्रवादाची लढाऊ घोषणा झाली होती. हा लढा नैतिक स्वरूपाचा आहे असे गांधी म्हणत. सरकारच्या संघटित दडपशाहीपेक्षा ते जनतेकडून होणाऱ्या हिंसेला भीत असत. ब्रिटिशांची सत्ता ' हिंसेचा उत्कृष्ट नमुना ' आहे असे त्यांना वाटे.[२८]

### गांधीजींच्या ११ मागण्या

२६ जानेवारी १९३० पहिला स्वातंत्र्यदिन भारतभर उत्साहाने साजरा झाला. लोकांत अभूतपूर्व चैतन्य संचारले होते. १२ मार्चला गांधीजींचा ' दांडी मोर्चा ' चालू झाला. मजल दरमजल करीत गांधी व त्यांच्या बरोबरीचे हजारो लोक लोकांत अभूतपूर्व उत्साह निर्माण करीत होते. " या परिस्थितीत कॉंग्रेस हीच देशावर राज्य करण्यास एकमेव अशी समर्थ संस्था आहे " अशी गांधीजींची खात्री झाली.

गांधींनी ३१ जानेवारीला व्हाइसरॉयला आभाराचे पत्र लिहिले. ' स्वराज्याचे सार दिले तर आपण सविनय कायदेभंगाची चळवळ लांबणीवर टाकू ' असेही जाहीर केले. त्यांनी ११ मागण्या केल्या – (१) संपूर्ण दारूबंदी, (२) रुपयाचा विनिमय दर १६ पेन्स करणे, (३) जमीन महसूल ५० टक्के कमी करणे, (४) मिठाचा कायदा रद्द करणे, (५) सुरुवात म्हणून लष्करी खर्च निम्म्यावर आणणे, (६) सनदी नोकरांचे पगार निम्म्यावर आणणे, (७) परदेशी कापडाविरुद्ध संरक्षक जकाती, (८) किनाऱ्याच्या संरक्षणाबद्दल कायदा करणे, (९) खुनाच्या आरोपाशिवाय इतर कैद्यांची मुक्तता, (१०) गुप्तचर खाते रद्द करणे, (११) स्वसंरक्षणासाठी हत्यारे वापरण्याची परवानगी देणे.

गांधींच्या या ११ मागण्यांमुळे ब्रिटिश वृत्तपत्रे खवळून उठली. यालाही गांधींनी " यंग इंडिया "-तून उत्तर दिले. " कायद्याचे उल्लंघन करणारा आणि सार्वजनिक शांतता धोक्यात आणणारा

मार्ग चालत जाण्याचे तुम्ही ठरविले आहे. याबद्दल व्हाइसरॉय यांना वाईट वाटत आहे" असे चिटणीसामार्फत उत्तर गांधीना पाठविण्यात आले.*

या अकरा मागण्या एकत्र केल्या तरी वसाहतीचे स्वराज्यही होणार नाही, संपूर्ण स्वातंत्र्य तर बाजूलाच राहिले. या पत्रकामुळे लोकांत चिंता निर्माण झाली, आणि डाव्या विचारसरणीच्या कार्यकर्त्यांतही चिंतेचे वातावरण पसरले. जवाहरलालजी, जे काँग्रेसचे अधिकृत नेते होते, तेही या अकरा मागण्यांबाबत साशंक होते. अशा मागण्यांमागे वर्गीय संबंधाचे रक्षण करण्याचाच भांडवलदारी पुढारीपणाचा उद्देश होता. त्यांना साम्राज्यशाहीशी तडजोड पाहिजे होती व चर्चेचा पाया त्यामुळे मिळत होता. **

भारतातील प्रतिनिधींनीही गांधींवर विसंगतीचा आरोप केला. यावर गांधी एवढेच म्हणाले की माझ्या विसंगतीतही एक संगती आहे, आणि मी नेतृत्व करावयास पाहिजे असेल तर हे सर्व खपवून घेतले पाहिजे. फेब्रुवारीत वर्किंग कमिटीची सभा होऊन असे ठरले की अहिंसेवर पूर्ण भरवसा असणाराकडेच सविनय कायदेभंगाची व्यवस्था व जबाबदारी पाहिजे. अत्याचाराच्या भयाने बारडोलीची चळवळ मागे घेतली तसे आता होणार नाही.

यानंतर २ मार्च रोजी गांधींनी व्हाइसरॉयना पत्र लिहिले. त्यांना ब्रिटिश राज्यपद्धतीने केलेल्या सर्व जुलुमांची कहाणी कथन करून अकरा मागण्यांचा उल्लेखही केला आणि हे पत्र पाठविण्यात आपण कसली धमकी देत नसून सविनय कायदेभंग करून दाद मागणाऱ्या माणसाचे कर्तव्यच बजावीत आहोत असे म्हटले. व्हाइसरॉयचे ताबडतोब उत्तर आले. गांधीजींनी कायदा व सार्वजनिक सुरक्षितता यांचा भंग होईल अशा मार्गाने जाण्याचे ठरविले आहे याबद्दल आपणास खेद वाटतो असे त्यांनी गांधींना लिहिले. गांधीना त्याचे आश्चर्य वाटले नाही.†

## दांडी यात्रा (दांडी मार्च)

लाहोर काँग्रेसने २६ जानेवारी १९३० हा स्वातंत्र्यदिन म्हणून पाळण्याचा आदेश दिला व त्याप्रमाणे तो प्रचंड उत्साहात साजरा झाला, आणि देशभर स्वातंत्र्यासाठी त्याग करण्याची तयारी दिसू लागली. जनतेवरील जुलूम वाढतच होता, आणि सरकारचे औदासिन्य असह्य होत होते.

फेब्रुवारी १४ ते १६, १९३० या काळात साबरमतीला काँग्रेस वर्किंग कमिटीची बैठक झाली, आणि 'वाटेल त्या ठिकाणी व वेळेला' सविनय कायदेभंग करण्याचे सर्वाधिकार गांधीजींना देण्यात आले. मिठावरील कर हा गरिबांना जाचक झाला होता म्हणून त्याबाबत जनतेत तीव्र चीड होती. गांधीजींनी मिठावरील कराच्या विरोधी चळवळ करण्याचे ठरविले.

---

* डी. जी. तेंडुलकर, 'महात्मा' खंड ३. पृ. १०.

** ई. एम. एस. नंबुद्रीपाद, 'ए हिस्टरी ऑफ दि फ्रिडम स्ट्रगल" पृ. ३९८-३९९.

† त्र्यं.वि. पर्वते, 'गांधी पर्व' पृ. ११६-११८.

फेब्रुवारी २७ ला त्यांनी या मोहिमेची घोषणा केली, आणि आश्रमातील निवडक ७९ सत्याग्रह्यांसहित आपण प्रथम हा मिठाचा कायदा झुगारून देणार असे घोषित केले.

भारतातील इंग्रजांचे राज्य हा शाप कसा आहे याबाबत गांधीजींनी मार्च २, १९३० ला व्हाइसरॉयला पत्र पाठविले. ' गांधीजींची कृती बेकायदेशीर किंवा सार्वजनिक शांततेला धोकादायक, आहे, असे व्हाइसरॉयनी उत्तरात म्हटले. मार्च १२ ला गांधींनी पुनः लिहिले, " गुडघे वाकवून (नमून) मी भाकरी मागितली, पण त्याऐवजी माझ्या पदरात धोंडाच पडला. मी तुमचा कायदा मानीत नाही. आणि तो मोडणे हे मी माझे कर्तव्य समजतो; कारण दु:खदायक कंटाळवाण्या अशा लादलेल्या शांततेमुळे राष्ट्राच्या हृदयाला स्वतंत्रपणे श्वासही घेता येत नाही. " [२९]

व्हाइसरॉयला लिहिलेल्या पत्रात गांधींनी त्यांच्या ' अकरा मागण्या ' त्यांच्यापुढे मांडल्या या मागण्या जर मान्य झाल्या नाहीत तर सविनय कायदेभंगाचा लढा चालू केला जाईल कारण दुसरा पर्याय नाही, असेही त्यांनी लिहिले.

मार्च १२, १९३० ला सकाळी ६–३० वाजता गांधीजींनी साबरमती आश्रम सोडला. बरोबर ७९ सत्याग्रही होते. त्यात २ मुसलमान, १ खिस्ती, २ अस्पृश्य, २ फिजी व नेपाळातील होते. १६ ते ६० वयाचे होते. (त्यात १४ महाराष्ट्रीय होते.) हाच तो विख्यात दांडी मार्च. चार जिल्ह्यांतून जाणारा २४१ मैलांचा हा मार्ग २४ दिवसांत पुरा करायचा होता. गुजरातच्या पश्चिम किनाऱ्यावर दांडी हे गाव आहे.

मार्च २१ ला अहमदाबाद येथे अ.भा. काँ.कमिटीची बैठक झाली, आणि काँग्रेस वर्किंग कमिटीच्या ठरावाला मान्यता देण्यात आली, गांधीजी त्यांच्या ठरलेल्या ठिकाणी (दांडी) जाऊन प्रत्यक्ष मिठाचा कायदा मोडेपर्यंत देशात कोणीही कायदेभंग करायचा नाही असा आदेशही देण्यात आला. सत्याग्रहाची प्रतिज्ञा सर्वत्र एकाच स्वरूपाची असावी असे वाटल्यावरून गांधीजींच्या मान्यतेने ती तयार करण्यात आली. ७९ सत्याग्रह्यांचा मोर्चा ज्या मार्गाने गेला त्या सर्व मार्गावर शेतकऱ्यांनी त्यांचे मोठ्या उत्साहाने स्वागत केले. गावागावातून झालेल्या सभांतून गांधीनी अहिंसा आणि स्वार्थत्याग यांचा प्रचार केला. सर्व देशभर श्रेष्ठ दर्जाची त्यागाची भावना दिसून येत होती. ७९ सत्याग्रह्यांसह गांधीजी दांडीला पोहोचले, आणि त्यांनी एप्रिल ६ ला समुद्रकिनाऱ्यावरील मीठ उचलून मिठाचा कायदा मोडला. एप्रिल ६ ते १३ हा ' राष्ट्रीय सप्ताह ' साजरा करावा, परदेशी कापडाची होळी करावी, दारूच्या दुकानांवर निरोधन करावे, आणि बेकायदेशीर मीठ तयार करावे किंवा गोळा करावे असे त्यांनी लोकांना आग्रहाने सांगितले.

देशाने ही हाक तत्परतेने ऐकली. गांधीजींचा इतिहासप्रसिद्ध दांडी मार्च (मोर्चा) चे वर्णन निरनिराळ्या पुढाऱ्यांनी पुढीलप्रमाणे केले : ' रामाचा लंकेवरील ऐतिहासिक मोर्चा '

(मोतीलाल नेहरू, डी. जी. तेंडुलकर, महात्मा, खंड ३, पृ. ३०), ' मोझेसच्या नेतृत्वाखालील इस्त्राइलाटस् यांचे मोठ्या प्रमाणावरील निर्गमन ' (पी. सी. रे, उक्त ग्रंथ, पृ. ३१३), ' प्रिन्स सिद्धार्थाचा बनारसला मोर्चा ' (डी. पी. मिश्रा आणि इतर).

दांडी मोर्चाच्या अगोदर, अटक होण्याची अपेक्षा असल्याने, गांधीजीनी फेब्रुवारी २७ ला ' मला अटक झाली तर ' असा लेख लिहिला. हा मोर्चा २४ दिवस चालला होता आणि त्या काळात ते हा मोर्चा म्हणजे एक यात्राच आहे असे लोकांच्या मनावर बिंबवीत होते. सर्व देश जणू पेटून उठलेला दिसत होता, आणि एप्रिल ६ ला मिठासाठी सत्याग्रह करण्याची परवानगी मिळाली होती.सर्व शहरातून प्रचंड सभा भरत होत्या. गांधीजींच्या अटकेबद्दल सहानुभूती म्हणून गावागावातून होणारी निदर्शने हा नित्याचाच भाग झाला होता. मुंबईत उत्स्फूर्त संपूर्ण हरताळ पाळण्यासाठी ती निशाणीच होती. मुंबईत संपूर्ण हरताळ (आजच्या भाषेत ' बंद ' ) होता. ८० पैकी चाळीस गिरण्या बंद होत्या. कामगार निदर्शनात आला तो गांधीजींच्या अटकेचा निषेध म्हणून. कापड व्यापाऱ्यांनी गांधीजींच्या अटकेबद्दल नापसंती दाखविण्यासाठी सहा दिवस हरताळ पाळण्याचा निर्णय केला. पुण्यात संपूर्ण हरताळ होता.

मे ५ ला गांधीजींना अटक झाली, सर्व जगभर तो चर्चेचा विषय झाला. मुंबईत सैन्याच्या तुकड्या महत्त्वाच्या ठिकाणी तैनात करण्यात आल्या. नैरोबीतील भारतीय, पनामातील व्यापारी वर्ग, आणि सुमात्राच्या पूर्व किनाऱ्यावरील भारतीय– या सर्वांनी गांधीजींना सहानुभती व्यक्त केली. निरनिराळ्या दर्जाच्या १०२ अमेरिकन वजनदार धर्माधिकाऱ्यांनी (पाद्र्यांनी) आपल्या सहीने ब्रिटिश पंतप्रधान रॅम्से मॅक्डोनाल्ड यांना गांधीजींबाबत संदेश पाठवला.

देशात दडपशाहीचा नंगा नाच चालला होता. हजारोंना अटक करण्यात आली, आणि त्यांना तुरुंगाचा रस्ता दाखविण्यात आला. सुभाषबाबूंना एक वर्षाची सजा झाली. एप्रिल १६ ला जवाहरलालजींना कारागृहात बंद करण्यात आले. लाठीहल्ले, गोळीबार हे नित्याचेच झाले. १९१० चा प्रेस ॲक्ट (वर्तमानपत्रासंबंधीचा कायदा) पुनरुज्जीवित करण्यात आला.गांधीजी म्हणाले, दडपशाहीच्या या उपायांपुढे ' डायरशाही फिकी (निस्तेज) पडली आहे '[३०](जालियनवाला बागेतील सभेवर जनरल डायर याने अमानुष गोळीबार करून कत्तल केली होती याला उद्देशून ' डायरशाही ' हा शब्द वापरला आहे). मालमत्ता जप्त करणे, पोलिसांचे निर्घृण पाशवी हल्ले, बळाचा वापर करून सभा उधळणे, गोळीबार करणे असे नवीन आक्रमक उपाय सरकारने अमलात आणले. मुंबईत सभांवर घोडेस्वार घातले. स्त्रियांनी त्याला तोंड दिले. कृष्णा सरदेसाई हिचे उदाहरण सर्वश्रुत आहे.

### युद्धमंडळ

मार्च १८ ला महाराष्ट्रातील काँग्रेस कार्यकर्त्यांची एक बैठक पुणे येथे बोलाविण्यात आली होती. अध्यक्ष होते शंकरराव देव. त्या बैठकीत खालील निर्णय करण्यात आले : (१) महाराष्ट्रात सविनय कायदेभगाची चळवळ चालू करणे; (२) मिठाचा कायदेभंग करणे, आणि बेकायदेशीर मीठ तयार करणे; (३) कायदेभंगाच्या कक्षा विस्तृत करणे; (४) रत्नागिरी आणि विलेपार्ले येथे सत्याग्रह-केंद्रे सुरू करणे.या कार्यक्रमासाठी खालील युद्धमंडळ निवडण्यात आले : (१) शंकरराव देव, (२) ग. वि. केतकर, (३) वि. वा. दास्ताने, (४) सातारचे डॉ. वा. वि. आठल्ये आणि (५) रत्नागिरीचे आप्पासाहेब पटवर्धन.

काँग्रेस संस्थेच्या बाहेर युद्धमंडळ स्थापण्यात आले. अशा प्रकारचे युद्धमंडळ नेमण्याची आवश्यकता गांधीजींना वाटली याचे कारण म्हणजे काँग्रेसमध्ये तीन विचारप्रवाह (पंथ) दिसून येत होते :– (१) जवाहरलाल पंथ–जनतेच्या चळवळीवर तसेच अराजक निर्माण करण्यावर विश्वास, शाळा-कॉलेजवर, विधिमंडळे, कोर्ट यांवर बहिष्कार आणि समाजवादाचा प्रचार करणे, (२) सुभाष पंथ म्हणजेच हिंसात्मक पंथ, (३) जयरामदास आणि इतर स्वातंत्र्यावर विश्वास, पण शाळा-महाविद्यालये, कोर्ट, विधिमंडळे यावरील बहिष्कार अमान्य.पहिले दोन पंथ समाजवादी विचारांचा प्रसार करीत होते. तिसऱ्या पंथाकडे गांधींनी कधी लक्ष दिले नाही, कारण तो काँग्रेस यंत्रणेचा भाग राहिला नव्हता.[३१]

विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकात महाराष्ट्र प्रां. काँ. कमिटीवर प्रतियोगी सहकारवाद्यांचे वर्चस्व होते. जानेवारी १२, १९३० ला भरलेल्या बैठकीत संपूर्ण स्वातंत्र्य, गोलमेज परिषदेवर व विधिमंडळावर बहिष्कार यांना विरोध करण्यात आला. त्यामुळे देव आणि इतर असहकारवाद्यांनी सभात्याग केला. जानेवारी १४ ला शंकरराव देव, शंकरराव जावडेकर, विनायकराव भुस्कुटे आणि इतर सहकारवाद्यांनी एक पत्रक प्रसिद्ध केले व महाराष्ट्र प्रां. काँ. कमिटीच्या ठरावाचा निषेध केला. अ. भा. काँ. कमिटीने सर्व प्रांतिक कमिट्यांना नवीन ध्येय–धोरणाच्या पत्रकावर सही करण्याचा हुकुमच काढला होता, म. प्रां. काँ. कमिटी ही दुय्यम असल्याने, नवीन सदस्यांनी ध्येय-धोरणावर सही करण्याशिवाय ते काम करू शकत नव्हते. महाराष्ट्र प्रां. काँ. कमिटीचे अध्यक्ष, ल. ब. भोपटकर यांनी लेख लिहून गोलमेज परिषदेवर बहिष्कार घालू नये असे प्रतिपादन केले, आणि जानेवारी २९ च्या जाहीर सभेत गोलमेज परिषदेवरील बहिष्काराचे समर्थन केले !

म. प्रां. काँ. कमिटीने जानेवारी १२ च्या बैठकीत ' कौन्सिलवरील बहिष्कार राष्ट्रीय ऐक्याला बाधक ठरेल. ' असा ठराव केला, आणि काँग्रेस वर्किंग कमिटीला कौन्सिलवरील बहिष्काराचा ठराव संमत करू नये असे आग्रहाने सांगितले. हा ठराव सात अनुकूल आणि पाच विरोधी असा संमत झाला.

फेब्रुवारी २, १९३० ला शंकरराव देव व महाराष्ट्रातील काँग्रेसानुयायांनी महाराष्ट्र काँग्रेस पक्ष स्थापन करण्याचा निर्णय केला. हा नवा पक्ष स्थापन झाला. या पक्षाने ' महाराष्ट्र

सविनय कायदेभंग कमिटी ' तयार केली. साताराचे डॉ. वा. वि. आठल्ये यांनी महाराष्ट्र प्रांतिक हिंदुस्थानी सेवादलाचे कार्यवाह या नात्याने आगामी लढ्यासाठी तयार राहण्याचे युवकांना आवाहन केले. त्यांनी साताराचे सेवादलाचे कार्यकर्ते कृ. म. साखवळकर यांना सर्व जिल्ह्यात प्रचारासाठी पाठविले.

अ. भा. काँ. कमिटीच्या कार्यवाहानी महाराष्ट्र प्रां. काँ. क. च्या पदाधिकाऱ्यांना लाहोरचा संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव जर मान्य नसेल तर पदाधिकाऱ्यांनी आपल्या पदाची त्यागपत्रे द्यावीत, असे पत्र पाठविले. त्या पत्रानुसार कार्यकारी मंडळाने राजीनामा दिला, आणि काही काळ महाराष्ट्र प्रां. काँ. कमिटीला कार्यकारी मंडळच नव्हते.

लाहोरचा ठराव, स्वातंत्र्यदिनाची प्रतिज्ञा व काँग्रेसचे धोरण यांचा प्रचार करणे हा महाराष्ट्र काँग्रेस पक्षाचा हेतु होता. शंकरराव देवांना त्या पक्षाचे अध्यक्ष करण्यात आले. त्यांनी सर्व महाराष्ट्रभर दौरा केला आणि महाराष्ट्र काँ. पक्ष आगामी लढ्यासाठी १०० सत्याग्रही देईल असे मार्च २, १९३० ला घोषित केले. अ. भा. काँ. कमिटीने प्रांतिक काँ. कमिटीला पाठविलेल्या पत्राच्या प्रतीही त्यांनी मागवून घेतल्या म. प्रां. काँ. क. चे जे सदस्य काँग्रेसच्या धोरणापासून दूर गेले आहेत, त्यांनी आपल्या पदांची त्यागपत्रे द्यावीत असा अ. भा. काँ. क. ने हुकूम काढला. असहकाराचे धोरण न पटल्याने केळकरांनी त्यागपत्र दिले.[३२] त्यागपत्राबरोबर पाठविलेल्या पत्रात केळकर म्हणाले, '' राष्ट्रीय पक्षाच्या धोरणात सविनय कायदेभंगाची चळवळ अंतर्भूत आहे, म्हणून तिचा प्रचार केला पाहिजे.'' मध्यवर्ती विधिमंडळाच्या सदस्यत्वाचे त्यांनी त्यागपत्र दिले. तेथे भाषण करताना केळकरांनी सरकारचे पाय ओढण्याचे आवाहन केले. त्यांनी आपल्या आत्मवृत्तात म्हटले आहे, '' .....ही चळवळ अवेळी चालू होत आहे. सरकारशी एकनिष्ठ आणि सरकारधार्जिणे लोकांनी केले त्याप्रमाणे आमच्या पक्षाने या चळवळीवर बहिष्कार टाकला नाही. जर चळवळ चालू होणार असेल तर आपण तिचा स्वीकार केला पाहिजे. ''[३३] कुलाबा (आता रायगड) चे रा. ना. मंडलीक म्हणाले, '' जर स्वराज्यासाठी चळवळ चालू झाली, तर स्वस्थ बसणे हे योग्य नाही.''[३४] त्यांनी चळवळीत उडी घेतली, आणि पेण हे चळवळीचे लढाऊ केंद्र बनले.

मार्च ८ ला प्रतियोगी सहकारितावाद्यांचा बालेकिल्ला असलेल्या ' केसरी ' चे ग. वि. केतकर यांना महाराष्ट्र प्रां. काँ. कमिटीचे अध्यक्ष करण्यात आले. मार्च १८ ला शंकरराव देवांनी कायदेभंगाच्या चळवळीचा पुढील कार्यक्रम ठरविण्यासाठी महाराष्ट्रातील प्रमुख काँग्रेस कार्यकर्त्यांची बैठक घेतली. सुमारे ७५ कार्यकर्ते हजर होते.

कार्यकारी मंडळाने देव व केतकर यांची एक कायदेभंग समिती नेमली. विलेपार्ले येथे केंद्र स्थापन करण्यात आले. तेथे जमनालाल बजाज यांच्या अध्यक्षतेखाली सत्याग्रह परिषद भरविण्यात

आली. तेथे सत्याग्रह शिबिर चालू करण्यात आले. मुंबईने पैसा आणि स्वयंसेवक दिले. महाराष्ट्राच्या इतर भागांतून स्वयंसेवकांची रीघ लागली. कायदेभंग समितीला हुकूमशाहीसारखे सर्व अधिकार देण्यात आले होते. प्रत्येक जिल्ह्यात युद्धमंडळे तयार करण्यात आली. बाळूकाका कानिटकरांना पुण्याचे डिक्टेटर नेमण्यात आले होते. ठकार हे प्रभातफेरीचे जनक.[३५] (पण मुंबईच्या डी वॉर्डच्या इतिहासाप्रमाणे आपटे यांना प्रभातफेरीचे जनक समजले जाते.) बाळूकाकांनी प्रभातफेरीची कल्पना उचलून धरली, आणि त्यांनी पुणे शहर व कँप प्रभातफेऱ्या काढून चैतन्यमय केला. याचेच अनुकरण सर्व महाराष्ट्रभर झाले.

प्रतियोगी सहकारवाद्यांनी एप्रिल ९ व १० या दिवशी पुण्यातील टिळक मंदिरात सभा घेऊन सत्याग्रहाच्या लढ्याचे नियंत्रण करण्यासाठी एक मंडळ नेमले. महाराष्ट्र प्रां. काँ. कमिटीच्या युद्धमंडळाशी सहकार्य करणे हा त्यामागे हेतू होता. त्या मंडळाचे अध्यक्ष होते न. चिं. केळकर व सेक्रेटरी दि. वा. दिवेकर. केळकरांनी पत्रक काढून त्यांच्या पक्षाच्या कार्यकर्त्यांना सत्याग्रह लढ्यात भाग घेण्यास सांगितले; कारण या सत्याग्रहाने राष्ट्रीय जागृती होत आहे असे ते म्हणाले. परकीय सत्तेविरुद्ध होणाऱ्या सामुदायिक लढ्यात भाग घेण्यासाठी काँग्रेसमधील दोन गट एकत्र येत आहेत हे पाहून गांधीजींनी आपल्या संदेशात आनंद व्यक्त केला.

महाराष्ट्रभर सत्याग्रहाच्या रूपाने उत्साहाचे वारे वाहू लागले. या सत्याग्रहासाठी फुले पथक उभारण्याचा केशवराव जेधे यांचा उद्देश होता. विलेपार्ले शिबिराचे प्रमुख होते जमनालाल बजाज आणि कार्यवाह होते डॉ. वा. वि. आठल्ये. एप्रिल ६ चा गांधींचा दांडी सत्याग्रह म्हणजे सर्व राष्ट्राला फुंकलेले रणशिंगच होते.साने गुरुजींनी पूर्व खानदेश (आता जळगाव) शंकरराव ठकार पश्चिम खानदेश (आता धुळे), आचार्य भागवत कुलाबा (आता रायगड) आणि आप्पासाहेब पटवर्धन, रत्नागिरी यांनी जिल्ह्यांतून तडाखेबंद प्रचाराला प्रारंभ केला.

## संदर्भ

(१) Indian Annual Register, 1928, p. 93.
(२) File No. 4/18 of 1931 (N. A. of India).
(३) S. Gopal, Selected Works of Nehru.
(४) Autobiography, Nehru, p. 176.
(५) Bipan Chandra and Others, 'Freedom Struggle,' p. 155.
(६) Indian Annual Register, 1928, p. 455.
(७) File 143-K VII of 20th September 1928.
(८) Ajoy Ghosh, Bhagat Singh and his Comrades', p. 9.

(९) Indian Annual Register, 1928, p. 80.
(१०) Indian Annual Register 1928, p. 328.
(११) S. A. Dange, Selected Works, II, p. XII.
(१२) India in 1929-30.
(१३) Indian Annual Register, 1928 p. 26.
(१४) R. P. Dutt, *Op cit*, pp. 340-341.
(१५) The 'Central Legislature and Freedom Struggle,' 145.
(१६) Sohan Singh Josh, 'The Great Attack,' p. 49.
(१७) S. A. Dange, *op cit,* p. XVII.
(१८) R. P. Dutt, *op cit,* p. 418.
(१९) Sukhabir Choudhary, 'Peasants' and Workers' Movements' pp. 259-260.
(२०) Dr. Pattabhi, 'History of the Congress.'
(२१) D. C. Gupta, 'Indian National Movements', p. 150.
(२२) Jha, 'India and U.S. A.,' p. 50.
(२३) Jha, *op cit*, p. 59.
(२४) Nehru, 'Autobiography'p. 210.
(२५) Viceroy's Letter to the Secretary of State for India, 22nd May 1930, quoted by Misra, p. 291.
(२६) Irwin's Letter to Hailey, 12th March 1933, quoted by Misra, p. 293.
(२७) File S. D. 148, 30th January 1930.
(२८) S. Gopal, *op cit*, p. 5.
(२९) Tendulkar, D. G. 'Mahatma' III .
(३०) Dr. Tarachand, *op cit* , IV, p. 126.
(३१) Shankarrao Deo,(Marathi) Autobiography, p. 43.
(३२) Home Pol. File No. 247/II of 1930, p. 2.
(३३) न. चिं. केळकर, 'गतगोष्टी' पृ. ७३८.
(३४) प्रेमा कंटक, सत्याग्रही महाराष्ट्र, पृ. २७८.
(३५) प्रेमा कंटक उक्त ग्रंथ, पृ. २७०-२७३.

# १०. ज्वालामुखीचा स्फोट

गांधीजींनी अकरा मागण्या व्हाइसरॉयकडे पाठविल्या होत्या. या मागण्या मान्य झाल्या तर कायदेभंगाचा लढा मागे घेण्याचे आश्वासन त्यांनी दिले होते. या मागण्या सरकार मान्य करणे शक्य नव्हते. लोकांना मात्र त्या मागण्यांविषयी आकर्षण होते. शेतसारा निम्मा करा, आणि मिठावरील कर कमी करा, या मागण्यामुळे गरीब शेतकरी आणि समाजातील पददलित विभाग एकत्र आणणे शक्य होईल असे त्यांना वाटे, कारण या मागण्यांमुळे त्या समाजाच्या दु:खाला गांधींनी वाचा फोडली होती.

गांधीजी जेव्हा दांडीला पोचले आणि त्यांनी कायदा मोडला तेव्हा देशभर पाच हजार सभांतून निदान ५० लाख लोकांनी तरी हा कायदा मोडला. गांधीजींची दांडीकडे कूच चालू असता मार्गावरील गावातील ३१७ पाटलांनी सरकारी धोरणाच्या निषेधार्थ राजीनामे दिले.[१] पश्चिम खानदेश (आता धुळें) १६५ पाटलांनी राजीनामे दिले. पोलीस सब इन्सपेक्टर धनाजी नाना चौधरी यांनी (१६ वर्षांची नोकरी सोडून), तसेच नाशिक जिल्ह्यातील बागलाण तालुक्यातील १०० वर पोलीस पाटलांनी राजीनामे दिले.

## वटहुकुमाचे राज्य

पुढील वटहुकूम काढून दहशतीचा अंमल चालू झाला:–(१) बंगाल वटहुकूम– १९ एप्रिल १९३०; (२) लाहोर कटाचा खटला, १ मे १९३०; (३) वर्तमानपत्रासंबंधी वटहुकूम १९३० चा नं.२ (२७ एप्रिल १९३०,) सोलापूर लष्करी कायदा, १५ मे १९३०.

गुन्हेगारासंबंधीचा दुरुस्त कायदा (दि क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट) खाली ४० संघटना आणि मंडळे, जी चळवळीशी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंधित असतील अशी बेकायदेशीर म्हणून जाहीर करण्यात आली, आणि त्यांची मालमत्ता जप्त करण्यात आली. प्रत्येक ठिकाणी सरकारी आज्ञा आणि वटहुकूम जनता पायदळी तुडवीत होती, त्याबद्दल हजारोंना तुरुंगवास घडला. चळवळीबाबतचीं वार्तापत्रे (त्याला ' बुलेटिन ' म्हणत) नियमितपणे प्रसिद्ध होत असत.

सरकारने प्रतिबंधक (एखादी कृती होऊ नये म्हणून आधीच हुकूम काढून बंदी घालणे) हुकूम जारी केले. ते मानले गेले नाहीत म्हणून अनेक पुढाऱ्यांना पकडण्यात आले, आणि जमावाला पांगविण्यात आले. तुरुंग अपुरे पडू लागले. मे २२ ला मुंबईचे हंगामी गव्हर्नर हॉटसन यांनी तारेने सर्वत्र सूचना पाठविल्या ' स्वयंसेवकांना मीठ नको आहे, आपल्या मागे लोकांचे प्रचंड पाठबळ आहे म्हणून पोलिसांशी नेत्रदीपक असा लढा त्यांना पाहिजे.'

काँग्रेसचा एखादा पदाधिकारी जर पकडला गेला तर त्याची जागा दुसरा घेई. ही साखळी कधी तुटली नाही. (अशी जागा घेणाऱ्यांना ' डिक्टेटर ' म्हणत). ' डिक्टेटर '

सदा तयारच असे. वटहुकूमाचा अंमल तोडणे, सभाबंदीचा हुकूम मोडून जनतेपुढे भाषणे करणे, क्रिमिनल प्रोसिजर कोडाचे १४४ कलम (जमावबंदी) मोडणे, जाहीर सभांतून जप्त राजद्रोही वाङ्मय वाचणे, शाळा, महाविद्यालये, म्युनिसिपल इमारती व अशाच इतर इमारतींवर राष्ट्रीय झेंडा फडकविणे, दारूच्या दुकानांवर निरोधन करणे, शिंदीची झाडे तोडणे, खादीचा प्रचार करणे, परदेशी कापडाची होळी करणे–अशा पद्धतीने हा लढा चालू होता. जवळजवळ प्रत्येक जिल्ह्यात सत्याग्रह्यांच्या शिक्षणासाठी शिबिरे संघटित करण्यात आली होती. विलेपार्ले, सोलापूर, शिरोडे, धारासना या ठिकाणी सत्याग्रही पाठविणे हा यामागे उद्देश होता. पुण्यात १००–१२५ स्वयंसेवकांचे शिबीर सतत चालू असे. संगमनेर व सोलापूर येथे सत्याग्रह चालू झाले, तेव्हा ही संख्या २५० पर्यंत गेली. बेकायदेशीर अशी बुलेटिन्स नियमित प्रसिद्ध होत आणि शाळकरी विद्यार्थीही ती बिनबोभाट वाटीत असत.

' दारू पिऊ नका ' असे सांगणे हा गुन्हा होत नाही, असा हायकोर्टाचा निवाडा असल्याने अशा कार्यक्रमाला नैतिक बळ प्राप्त झाले. लोक इतके दक्ष झाले होते की, ताडीचे लिलाव कोणी घेत नव्हते. कायदेभंगाची चळवळ खालीलप्रमाणे संघटित करण्यात आली होती : रत्नागिरी (६ ठिकाणी); मुंबई उपनगरे (५); सोलापूर (७); ठाणे (६); कुलाबा (आताचा रायगड-३५), नाशिक (१४); नगर (१२); सातारा (३२); पुणे; (१४); जळगाव–धुळे (३९),

कायदेभंगाची चळवळ चालू झाली तेव्हा पुणे, नगर, येवले व सातारा येथील राष्ट्रीय शाळांनी त्यात भाग घेतला; हेतू हा की ' राष्ट्रवादाचा विस्तार ' व्हावा, तो अधिक व्यापक व्हावा. ४५ पदवीधर, ८५ शिक्षक, १९२ माजी विद्यार्थी, १०८ आजी विद्यार्थी– अशा एकूण ४३० जणांनी लढ्यात भाग घेतला व त्यातील २६४ जणांना तुरुंगवास घडला.[२]

मुंबईच्या गव्हर्नरने सातारा जिल्ह्याचा दौरा केला, पण सर्वत्र हरताळ होता. अशा प्रकारची बातमी ' टाइम्स 'नेही दिली (११ जुलै १९३०). ' साइक्स परत जा ' ' साम्राज्यशाहीचा नाश होवो ' अशा घोषणा जनसमुदायातून येत. (या ग्रंथाचा लेखक त्यावेळी विद्यार्थी असताना इतर सहकाऱ्यांसह ' नको असलेला पाहुणा, परत जा ' असा मोठा फलक वाटेवर चिकटविण्यात गुंतला होता). साताऱ्यातील शाळांच्या अधिकाऱ्यांनी ' कोणत्याही विद्यार्थ्याने राष्ट्रीय बिल्ला, खादी टोपी, खादी पोषाखसुद्धा घालून वर्गात येता कामा नये ' असा फतवा काढला; पण सातारच्या विद्यार्थ्यांनी याच्या निषेधार्थ वर्गात न जाण्याचा निर्णय केला.

सरकारी अधिकाऱ्यांना तडकाफडकी निर्णय करण्याचे तसेच काँग्रेसचा निधी जप्त करण्याचे अधिकार द्यावेत असे गव्हर्नर साइक्स यांचे म्हणणे सरकारने मान्य केले नाही. शेतसारा (महसूल) पोलिसांच्या मदतीने वसूल करण्यात येत होता, आणि कर वसूल करण्याकरता तर मुंबईत पोलिसांचा फौजफाटा ठेवण्यात आला होता.[३]

**आक्रमक जनता**

हा लढा मुंबईत भिन्नभिन्न स्वरूपात दिसून आला : (१) विलेपार्ले येथील सत्याग्रह शिबीर; (२) वडाळा येथे प्रचंड प्रमाणावर मिठाचा सत्याग्रह; (३) परकीय मालावर (ब्रिटिश) विशेषकरून कापड दुकानांवर निरोधन; (४) एखाद्या विशिष्ट घटनेबद्दल हरताळ पाळणे, उदाहरणार्थ गढवाल दिन, सोलापूर हुतात्मा दिन, इत्यादी; (५) प्रतिबंधक हुकूम मोडणे; (६) दारूबंदी करणे; (७) काँग्रेस हॉस्पिटल चालविणे; (८) काँग्रेस या बेकायदेशीर संस्थेचे प्रतिनिधी (डिक्टेटर) म्हणून अटक करून घेणे; (९) काँग्रेस लढ्याची वार्ता देणारी 'बुलेटिन्स' छापणे आणि प्रसिद्ध करणे; (१०) शाळा-कॉलेजवर निरोधन करणे (बंद करून विद्यार्थ्यांना लढ्यात आणण्यासाठी); (११) वानरसेना–मुलामुलींचे गट स्थापन करून लढ्याच्या बातम्या पसरविणे, लढ्याला मदत करणे, आणि पोलिसांना गनिमी काव्याने हैराण करणे;(१२) युद्धमंडळे स्थापन करणे इत्यादी. अशा प्रकारची २१ युद्धमंडळे स्थापन झाली होती, आणि जनतेची शूरत्वाची भावना व्यक्त करणाऱ्या कार्यकर्त्यांची एक साखळीच तयार झाली होती.

या कायदेभंगाच्या चळवळीतील मुंबईचा पहिला हुतात्मा म्हणजे एक मुसलमान युवक दाऊद मुन्शी. जुलै ७, १९३० ला 'गढवाल दिना'च्या निदर्शनावर पोलिसांनी केलेल्या अमानुष लाठीहल्ल्यात काँग्रेस हॉस्पिटलमध्ये त्याचा मृत्यू झाला. गोविंदसिंग चिमणासिंग ह्या कॉन्स्टेबलने (बक्कल नं. २९३३) नोकरी सोडून लढ्यात झोकून दिले. अब्दुल मजिद उस्मान हकीम (संपादक 'रिव्होल्ट' बंड), एम्. बी. मिर्झा जाफर, 'गदर' चा संपादक अली गुलाम हुसेन यांना दीर्घ मुदतीच्या शिक्षा देण्यात आल्या. मिर्झा हा मोगल बादशहाचा शेवटचा वंशज होता.

सर्व कार्यक्रमांचे केंद्र काँग्रेस हाऊस होते, त्याच्यावर धाड घालण्यात आली. सायक्लोस्टाइल करण्याची साधने हस्तगत करण्यात आली, आणि अध्यक्ष व कार्यवाहांना पकडण्यात आले. एका पोलीस इन्स्पेक्टरवर हल्ला करण्यात आला, पण लगेच पोलिसांनी निदर्शकांवर बेछूट लाठीहल्ला केला, असे पोलिसांच्या अहवालावरून दिसून येते. पुष्कळ निदर्शकानी क्राफर्ड मार्केटजवळ व बोरीबंदर स्टेशनजवळ रहदारी थांबवली. बाजार भागात पोलिसांनी गोळीबार केला, त्यात चार ठार व ३६ जखमी झाले.

मुंबईच्या पोलिसांनी केलेल्या गोळीबारात २३ व्यक्ती मरण पावल्या, असे मुंबई प्रां. काँ. कमिटीच्या अहवालात म्हटले आहे. मृतात पाच मुसलमान होते. मुंबईत ४,७०० व महाराष्ट्राच्या इतर भागात ४,००० जणांना शिक्षा झाल्या. भारतात ९२,१२४ जणाना कारावासाच्या शिक्षा झाल्या.[४]

घोडेस्वारांनी हल्ला केला तरी अहिंसात्मक मार्गाने लढणारी कृष्णा सरदेसाई या लढ्यात अमर झाली. तिने हल्ला झाला तरी हातातील राष्ट्रीय निशाण सोडले नाही.

मुंबईतील ख्रिश्चनांनी ख्रिश्चन कॉंग्रेस स्थापन केली, आणि लढ्यात भाग घेतला. मुंबईतील घोड्यांच्या रेसवर महिलांनी निरोधन केले. श्रीमती सुलेमान मिठा यांनी मुसलमान स्त्रियांत चरख्यावर सूतकताई लोकप्रिय केली. कॉंग्रेस बुलेटिनच्या संपादिका दिलशाद सय्यद यांनाही सजा झाली.

रूईकर व कांदळकर या कामगार पुढाऱ्यांनी रेल्वे कामगारांचा संप संघटित केला, आणि संपावरील कामगार रेल्वे रूळावर बैठक मारून बसले. पुढाऱ्यांना पकडले तरी कामगारांनी लढा चालूच ठेवला.[५] सुमारे एक लाख लोकांची भव्य मिरवणूक मुंबईच्या रस्त्यांवरून नेण्यात आली. नेत्यांनी वाहतुकीचे नियंत्रण केले, आणि परिस्थिती काबूतही ठेवली.

सार्वत्रिक कायदेभंगाच्या मोहिमेला ' मीठ–मोर्चा ' पासून सुरुवात झाली. मिठाची सरकारी मक्तेदारी लोक सर्वत्र उल्लंघन करीत होते. विशाल संख्येने निदर्शने होत असत, आणि पोलीस वा सैन्यांशी त्यांच्या चकमकी होत असत. स्वयंसेवकांच्या विशेष शिक्षण देऊन तयार केलेल्या तुकड्या ब्रिटिश माल विकणाऱ्या दुकानांवर निरोधन करीत, आणि चौकात ब्रिटिश कापडाच्या होळ्या करीत. या तडाखेबंद चळवळीच्या प्रभावामुळे लक्षावधी लोकांनी त्यात भाग घेतला, चळवळीच्या विस्तारामुळे ब्रिटिश सरकार आणि भांडवलदारी पुढारीपण यांच्यात तडजोडीचे प्रवाह दिसू लागले. कामगार आणि शेतकऱ्यांच्या वाढत्या स्वतंत्र कृतीमुळे ते पुढारीपण भयभीत झाले होते.[६] ' सर्व देश सर्व भागात पेटून उठला होता. [७] कलकत्ता येथील अमेरिकन कॉन्सल–जनरल क्रेझर याने खालील अहवाल पाठविला होता : ''...... १८५७ च्या बंडानंतर अधिक गंभीर व धोकादायक परिस्थिती ब्रिटनपुढे अधिक सुप्त सामर्थ्यानिशी उभी ठाकली आहे. '' अमेरिकन कॉन्सल-जनरलचे ब्रिटनमधील स्तंभलेखक ब्रेल्सफर्डशी अधिक जिव्हाळ्याचे संबंध जडले. ब्रेल्सफर्डने १९३० च्या कायदेभंगासंबंधी लिहिताना, ' मुंबईत दोन सरकारे आहेत : एक ब्रिटिशांचे आणि दुसरे कॉंग्रेसचे,' असे म्हटले– (' रिबेल इंडिया ', पृ. १३).[८] ' भारतातील मुसलमानांची चळवळीबाबत विरोधाची भावना नाही असे कॉन्सल-जनरलने म्हटले. इतरांबरोबर त्यांनी हरताळ पाळण्यात फार मोठ्या संख्येने भाग घेतला. गांधीजींच्या अटकेनंतर तीन दिवसांनी मुसलमानांच्या बकरी–ईदचा सण काहीही जातीय तणाव उत्पन्न न होता शांततेने साजरा झाला.

जुलै ४, १९३० च्या कॉंग्रेस बुलेटिनमध्ये अमेरिकनांना ' समुद्रापलीकडील मित्र ' (कॉमरेड ओव्हर द सीज.) असे म्हटले. जुलै ४, १७७६ च्या स्वातंत्र्याच्या घोषणेची त्यांना आठवण करून दिली, आणि या प्रसंगी ' मित्र आणि बंधू ' असे त्यांचे स्वागत केले आहे : '' बंधूंनो या, स्वातंत्र्याच्या नावाने हस्तांदोलन करा, आणि ब्रिटन हे राष्ट्र लुटारूंचे आहे,

आणि भारतावरील त्यांचे शासन म्हणजे मानवता आणि संस्कृतीवर बलात्कार आहे–निंद्य आहे. ''[९]

## मिठाचा कायदा मोडला

महाराष्ट्रात मिठाचा कायदा मोडणे व बेकायदा मिठाची निर्मिती व विक्री करणे या चळवळी प्रथम विलेपार्ले आणि नंतर शिरोडे, रत्नागिरी, वडाळा आणि धारासना येथे केंद्रित झाल्या होत्या.

१९२२ मध्ये मिठावरील कर दुप्पट करण्यात आला, पण मध्यवर्ती असेंब्लीने अशा तऱ्हेच्या जनताविरोधी कृतीला विरोध केला. व्हाइसरॉय यांनी त्यांचे खास अधिकार वापरले. संस्थानांच्या संरक्षणाचे विधेयक मध्यवर्ती विधिमंडळाने फेटाळले, पण व्हाइसरॉयनी स्वत:चे खास अधिकार वापरून ते लोकांवर लादले. लोकांच्या प्रश्नाबाबत सरकारची ही अशी विरोधी दृष्टी होती.

गरीब जनतेच्या दृष्टिकोनातून विचार करता मिठावरील कर सर्वात जास्त अन्याय्य आहे, असे गांधीजी मानत. [१०] ' स्वातंत्र्याची चळवळ ही मूलतः देशातील गरिबांसाठी आहे, म्हणून चळवळीची सुरुवात या अन्यायापासूनच करण्यात येईल ' असे ते म्हणत.[११] भारत सरकारच्या कर चौकशी मंडळाने सुद्धा हे मान्य केले. ' जे लोक राज्याच्या खर्चासाठी काहीही देऊ शकत नाहीत, अशांकडूनच मिठावरील कराचा अधिकांश भाग जमा होतो ' असे मध्यवर्ती असेंब्लीतील भाषणात न. चिं. केळकरांनी सांगितले होते.[१२]

प्रत्येक जिल्ह्यात सत्याग्रह शिबिरे संघटित करण्यात आली होती, आणि त्यात सत्याग्रह्यांना, मग तो वृद्ध असो वा तरुण असो, सत्याग्रहाचे तंत्र शिकविले जाई. विलेपार्ले हे महाराष्ट्रातील प्रमुख सत्याग्रह शिबीर होते, आणि जमनालाल बजाज यांनी ते नियंत्रित केले होते व त्यांचे त्याला मार्गदर्शन होते. त्यांनी मिठाचा कायदा एप्रिल ६ लाच मोडला व लगेच त्यांना कारावासाची शिक्षा झाली.

एप्रिल ७ तारखेस सकाळी मुंबईची पहिली तुकडी नरिमन यांच्या नेतृत्वाखाली महालक्ष्मीकडे सत्याग्रहासाठी निघाली. त्यांच्याबरोबर सुमारे दहा हजारांचा जमाव होता. त्यांनी मिठाचा कायदा मोडला.

एप्रिलच्या ६ व ७ तारखांना धुळे, जळगाव, मुंबई, पुणे आणि इतर भागातील स्वयंसेवक बेकायदेशीर मीठ तयार करू लागले. यात हजारोजणांनी भाग घेतला. ही चळवळ चिरडण्याकरता सरकारने मोठ्या प्रमाणावर दडपशाही केली. विलेपार्ले शिबिराचे प्रमुख शेठ अब्दुल्ला यांना कारावासाची शिक्षा झाली.

पश्चिम किनारपट्टीला लागून असलेल्या चार जिल्ह्यांत मिठाचा कायदा पायदळी तुडविण्यासाठी भरपूर संधी होती, महाराष्ट्र कायदेभंग कमिटीचे मुख्यालय विलेपार्ले येथे

हलविण्यात आले, आणि पश्चिम किनारपट्टीवरील हा लढा शिस्तीने आणि जोरदारपणे लढण्याचा निर्धार पुढारीपणाने केला.

ठाणे, कुलाबा (आता रायगड), रत्नागिरी आणि आताच्या सिंधुदुर्ग जिल्ह्यात उपशिबिरे उघडण्यात आली. या उपशिबिरात मीठ तयार तरी करण्यात येई, गोळा केले जाई वा विकले जाई. कुलाबा जिल्ह्यात तीन मोठे सत्याग्रह संघटित करण्यात आले होते, आणि ते यशस्वी रीतीने पार पाडण्यात आले. ३० ते ४० हजारांनी मिठाचा कायदा मोडला; जनतेच्या मनावर याचा किती प्रभाव पडला होता हे यावरून दिसते. रत्नागिरीत एप्रिल १० ला प्रचंड प्रमाणावर हे कार्यक्रम झाले. एप्रिल ६ ते मे १२ पर्यंत सुमारे चार लाखांनी तर कायदेभंग केला. मिठाचा कायदेभंग ही नित्याचीच बाब झाली. सत्याग्रह्यांचा निर्भयपणा, आणि अहिंसात्मक दृष्टी सर्वत्र दिसत होती. स्वार्थत्याग आणि हाल सोसण्याची वृत्ती जनतेत होती, आणि ती नमते न घेता आक्रमक होती.

### (१) शिरोडे

रत्नागिरी (आता सिंधुदुर्ग) जिल्ह्याच्या अगदी दक्षिणेकडील टोक, पोर्तुगीज प्रदेशाला जवळ, अशा शिरोड्याला लढ्याचे केंद्र होते. गोव्यात, मीठ करणे ही सरकारची मक्तेदारी नव्हती. सत्याग्रही कर न देता गोव्यातून मीठ आणीत आणि ते शिरोड्यात विकीत. मिठागरांचे मालक त्यांचे मीठ सत्याग्रह्यांना विकायला तयार होते. सरकारला कर न देता मिठागरातील एका आगरापासून ते हलविणे एवढाच प्रश्न होता.

महाराष्ट्र कायदेमंडळाने आपली सर्व ताकद शिरोडे येथे एकवटविण्याचे ठरविले. विनायकराव भुस्कुटे आणि एन्. एम्. गोखले यांना शिरोडे येथे पाठवून मिठागराचे मालक त्यांचे मीठ कायदेभंग कमिटीला देण्यास तयार होतील की नाही यांचा अंदाज घेण्यास सांगितले. दोघांनी ताबडतोब मीठ विकण्याची तयारी दाखविली, आणि इतरांनी तसे आश्वासन दिले. हे सर्व करण्याचा उद्देश म्हणजे सरकारला मिठावरील कर न देणे. पत्रकात म्हटले होते, ' कर न देऊन लोकांनी परकी सरकारचा अंत करावा. ' या पत्रकावर डॉ. वा. वि. आठल्ये, शंकरराव जावडेकर, विनायकराव भुस्कुटे, आणि एन्. एम्. गोखले यांच्या स्वाक्षऱ्या होत्या.मे ११ ला रात्री स्वयंसेवकांची जिल्हावार वाटणी खालीलप्रमाणे होती : पुणे ६०, सातारा ६७, सोलापूर ३७, अहमदनगर ५२, ठाणे ८, कुलाबा (रायगड) २१, रत्नागिरी ६५, नाशिक ४०, जळगाव १०३, धुळे २७, मुंबई उपनगरे आणि इतर १०३ एकूण ५८३.[१३]

मे १२ ला सत्याग्रह्यांनी मिठागारावर हल्ला करून मीठ आणण्यासाठी कूच केले. निरनिराळ्या तुकड्या रामकृष्ण, अजमल, अकबर, स्वातंत्र्य, छत्रपती, अहिंसा, अभिमन्यू अशा नावांनी ओळखल्या जात, मिठागारांचे काही मालकही सत्याग्रही बनले.मिठागारावर सत्याग्रह्यांनी राष्ट्रीय ध्वज लावला, आणि त्याचे रक्षण स्वयंसेवक करू लागले.

मे १५ हा सत्याग्रहाचा अखेरचा दिवस होता. सरकारी नोकरांनी तर कार्यालयाचा कब्जा घेतला. ११ जणांच्या दहा तुकड्या मिठागराकडे कूच करू लागल्या. 'रेड क्रॉसचे लोक सत्याग्रह्यांना औषधोपचार करीत, पण रेडक्रॉसच्या कार्यकर्त्यांना मारहाण केली जात आहे' अशी तक्रार ए. बी. पंडित यांनी केली. पकडलेल्या सत्याग्रह्यांनी वेंगुर्ले येथे पायी चालत जाण्यास नकार दिला. रत्नागिरीच्या कलेक्टरला वेंगुर्ले ते शिरोडे हे आठ मैलांचे अंतर पायी चालून काटावे लागले. सरकारी नोकरांवरील बहिष्कार इतका तीव्र होता की, कलेक्टरला कोणी वाहन दिले नाही.

या मोहिमेत निदान ३०० सत्याग्रह्यांना अटक झाली असावी. ५० वर खटले भरून त्यांना तुरुंगात पाठविण्यात आले. लोकांत सरकारविरोधी भावना इतकी वाढली होती की सत्याग्रह जर पुढे चालू ठेवला तर लोक हिंसात्मक मार्ग स्वीकारतील असे तेथील पुढाऱ्यांना वाटले, आणि त्यांनी सत्याग्रह तहकूब केला. त्यांनी आपल्या पत्रकात सत्याग्रह्यांच्या धैर्याची मोठी तारीफ केली. सत्याग्रह थांबविण्याची आणखी काही कारणे अशी : (१) मुंबईला सत्याग्रह्यांची भरती बंद झाली होती; (२) शिरोड्याकडे येणारे सत्याग्रही वेंगुर्ले येथेच थांबविण्यात आले होते; (३) पाण्याची टंचाई आणि रोगराई पसरण्याची भीती.

सत्याग्रह जरी थांबविण्यात आला, तरी सत्याग्रह-शिबीर होतेच. नोव्हेंबर ९ ला ४०० ते ५०० मण मीठ सत्याग्रह्यांनी लुटले, सरकारने दंडयोजना म्हणून पोलीस नेमून त्याचे बारा हजार रुपये लोकांकडून वसूल करण्याचे ठरविले; पण पुढे जो गांधी-आयर्विन करार झाला त्यानुसार ही योजना रद्द झाली.

या शिरोड्याच्या सत्याग्रहाबद्दल शंकरराव देवांनी म्हटले, 'शिरोड्याच्या भूमीवर महाराष्ट्राने रक्ताचा सडा शिंपला.' [१४] पोलिसांचा अहवाल या बाबतीत फारच बोलका आहे : "....... सरकारी नोकरांवर घातलेल्या सामाजिक बहिष्काराशी मुकाबला करीतच असिस्टंट कलेक्टरला त्यांच्या नोकरांना निकराचे प्रयत्न करून जेवण देता आले. कित्येक वेळा तेथील मुसलमान व्यापाऱ्यांकडूनही आणले........पुष्कळ भागात सरकारी नोकरांवरील सामाजिक बहिष्कार कडक व परिपूर्ण होता, आणि मिठाच्या आस्थापनाला अशा दुःखदायक परिस्थितीत काम करावे लागत होते. सामाजिक दबावाबाबत थोडी तरी शिथिलता शिरोडे येथेच दिसून येईल."[१५]

सरकारी नोकर, विशेषतः पोस्टातील, अत्यंत सहानुभूतीचे होते, आणि ते पोलिसांच्या हालचालीबाबत माहिती पुरवीत. घराघरातून काँग्रेस सत्याग्रह्यांना जेवणखाण आणि इतर साहित्य देण्यात येत होते. लोकांचा सरकारशी संपूर्ण असहकार होता. खेडेगावातून सरकारी नोकरांना राहायला जागा किंवा पिण्यास पाणीही मिळणे मुश्किल झाले. पोलीस मातीच्या डेऱ्यातून पाणी आणत, पण शाळकरी मुले खडे मारून ते फोडीत. त्यांना गावागावातून तांदूळ, साखर, दूध, चहा मिळू शकले नाही, म्हणून ते अस्वस्थ झाले.[१६]

लोक अहिंसात्मक मार्गाचे होते. स्वयंसेवक भाषणातून त्याचा आवर्जून प्रचार करीत; पण त्यात थोडीशी जरी ढिलाई झाली असती, तरी रक्तपात झाला असता. ' अकरा दिवस शिरोड्यात जनतेचे राज्य ' होते.[१७] मिठावरील महसूल गोळा करणारा कलेक्टर एका पत्रात म्हणतो, ' मिठागरावर दरोडा घालण्याचे दुष्कृत्य करणारे निर्धास्त आहेत, त्यांना अटक होत नाही. '[१८]

देशाच्या स्वातंत्र्यासाठी सर्वश्रेष्ठ त्याग करण्याचे आणि देहदंड सोसण्याचे धैर्य शिरोड्याच्या संग्रामभूमीवर ठायी ठायी दिसत होते. अमळनेरचा सत्याग्रही मल्हारी चिकाटे याला पोलिसांनी इतके मारले की अखेर तो बेशुद्ध पडला. रक्तात भिजलेला त्याचा शर्ट अमळनेरच्या जाहीर सभेत दाखविण्यात आला व त्याचा रु. १,५०० ला लिलाव झाला ![१९]

## (२) वडाळा

मे १७, १९३० ला मुंबई काँग्रेस हाऊसपासून मुंबईजवळील वडाळा येथील मिठागरांवर हल्ला करण्यासाठी स्वयंसेवक मोठ्या संख्येने निघाले. शेकडोंना अटक झाली. आठवडाभर मिठागरांवर हल्ला व स्वयंसेवकांना अटक असे सत्र चालू होते. स्वयंसेवकांबरोबर प्रेक्षकही त्यात भाग घेऊ लागले. सरकारी अहवालाप्रमाणे पोलिसांची व्यवस्था अपुरी होती.

या प्रसंगी सर्व प्रकारचा धक्का देणाऱ्या अशा डावपेचांची आखणी करण्यात आली. मिठागरावर हल्ला करणाऱ्या स्वयंसेवकांना त्यांनी बरोबर नेलेल्या पिशव्या मीठ भरून आणण्याची परवानगी देण्यात आली होती. जाण्यास प्रतिबंध असलेल्या भागाशी सत्याग्रही प्रवेश करू लागले की त्यांना पकडण्यात येई,आणि कुंपणाबाहेर नेण्यात येई, नंतर पोलिसांच्या गाडीतून तुरुंगाकडे त्यांची रवानगी होई. पकडलेले सत्याग्रही ' महात्मा गांधी की जय ' अशा घोषणा देत. विजयी वीराप्रमाणे सहानुभूतिदारांच्या घोळक्यातून जात.

दुसरा हल्ला मे २५ ला झाला. स्वयंसेवकांची पोलिसांशी चार तास धुमश्चक्री चालू होती व ते त्यांना यशस्वी रीतीने तोंड देत होते.जमावबंदी असलेल्या भागात घुसला. अदमासे अडीचशे पोलीस, त्यातील काही बंदूकधारी व इतर लाठीधारी, सुपरींटेंडंट स्मिथच्या हाताखाली २८ युरोपियन अधिकारी असा फौजफाटा जमा झाला होता. पोलीस कमिशनर हेले जातीने सर्वांची पाहणी करीत होता.

शंभर सत्याग्रही (त्यात १५ पारशी होते) जेव्हा पकडले गेले तेव्हा जमाव जरा मागे हटला. एका दगड फेकणाराला लोकांनी मारून घायाळ केले, कारण पोलिसांना चिथावणी देण्याकरता तो दगड फेकीत असावा असे जमावाला वाटले. एका माणसाने त्याचा ठावठिकाणा विचारून घेतला, व त्याची सुटका केली.

लंडनच्या ' डेली हेराल्ड ' चा प्रतिनिधी स्लोकंब हा मे १८ च्या सत्याग्रहाच्या वेळी हजर होता. वडाळाच्या सत्याग्रहाचा तो साक्षीदार होता. त्यानी त्याच्या वर्तमानपत्राला बातमीपत्रे पाठविली.[२०]

### (३) धारासना

धारासना हे गुजरातेतील लहान गाव. पण तेथे मिठाचा सत्याग्रह फारच प्रभावी झाला. विशेष म्हणजे त्या सत्याग्रहासाठी मुंबईहून सत्याग्रह्यांच्या दोन तुकड्या पाठविण्यात आल्या होत्या. एक ढवण यांच्या नेतृत्वाखाली, आणि दुसरी शेठ अब्दुल्ला यांच्या नेतृत्वाखाली. त्या दोनही तुकडीतील स्वयंसेवक कसोटीला उतरले.

मे २७ ला विलेपार्ले शिबिरातून धारासनास ७५ सत्याग्रह्यांची तुकडी पाठविण्यात आली. सत्याग्रह्यांनी मिठागरावर हल्ला करताच त्यांना अमानुषपणे मारण्यात आले. घोडदळही सत्याग्रह्यांवर सोडण्यात आले. मारझोडीने पडलेल्या सत्याग्रह्यांना रुग्णशिबिकावरून (स्ट्रेचरवरून) हलविण्यात आले. असह्य माराने जखमी झालेल्या मुंबईचा लढाऊ कामगार बाबू हुले-तेथे गतप्राण झाला. शि. न. कोल्हटकर हे या तुकडीचे कप्तान होते. त्यांनी या ऐतिहासिक लढ्याच्या आठवणी नुकत्याच प्रसिद्ध केल्या आहेत. पहिल्या तुकडीतील संसारे यांना सहा महिन्यांची शिक्षा झाली.

मुंबई शहरात झालेल्या कायदेभंगाच्या लढ्याबद्दल एका निरीक्षकाचा अहवाल पुढीलप्रमाणे होता : '' एस्प्लेनेड मैदानावर (आताचे आझाद मैदान) समारंभपूर्वक बेकायदा मीठ तयार करण्यात येत होते. समुद्राचे पाणी उकळून मीठ तयार करण्यात येई. काही स्वयंसेवक ते करीत व त्यांना संरक्षक असे स्वयंसेवकांचे कडे भोवती असे. पोलिसांना हे कडे मोडूनच काढावे लागे.

'' काँग्रेसचे हजारो समर्थक तसेच प्रेक्षकही—मुंबईच्या बाहेर लोकल, ट्राम, मोटार लॉरी यांच्यातून तीन मैल लांब असलेल्या वडाळा येथे हजारोंच्या संख्येने येत. स्वयंसेवकांचा मिठागरावरील हल्ला थोपविण्यासाठी आवश्यक असा पोलिसांचा संच नव्हता....... कमीत कमी बळाचा वापर करावा असे पोलिसांना हुकूम होते. लष्कराची मदतही घेण्यात येत होती. लाठ्यांचा स्वैरपणाने उपयोग करण्यात येत होता; पण यामुळे मिठाची पळवापळवी करण्यात काहीही कमतरता आली नाही. वडाळा येथे मिठागारांवर हल्ले चालू होते. त्या काळात पोलिसांना सकाळपासून सर्व दिवसभर कामावर ताठावे लागे. रणरणत्यां उन्हात त्यांना मिठागारांवर हल्ले करणाऱ्या स्वयंसेवकांचा पाठलाग करावा लागे.

'' दररोज सभा होत, रस्त्यातून हजारो लोकांच्या मिरवणुका निघत, मोटार लॉरीत बसलेले उत्साही लोक काँग्रेसच्या घोषणा देत. शहरात सतत गडबड गोंधळाची स्थिती असे. सरकारच्या अधिकाराचे प्रतीक म्हणून पोलिसच फक्त लोकांपुढे होते, आणि निर्भर्त्सना किंवा उपहासाचे ते लक्ष्य होते.

'' शहराच्या लोकसंख्येपैकी वीस टक्के प्रत्यक्ष काँग्रेस कार्यकर्ते किंवा सहानुभूतीदार होते, सत्तर टक्के काही तरी कारणांनी पोलिसांच्या विरुद्ध होते......पोलिसांची परिस्थिती

अत्यंत दयनीय होती; प्रत्यक्षातः मिठाचा कायदेभंग, किंवा दुकानावरील निरोधन, जरी ते त्रासदायक असले तरी ते धोकादायक नव्हते. जनतेची संघटित निदर्शने मात्र धोकादायक होती. घोषणा देत प्रचंड मिरवणुका मोठ्या रहदारीच्या रस्त्यावरून जात, अशा वेळी रहदारीचे नियंत्रण करणाऱ्या पोलिसांचे काम ते करीत, पोलिसांचा अवमान करीत, आणि त्यांचा शक्य त्या उपायांनी उपहास करीत. एका वेळी तर घोषणा देत जाणारा ५० हजारांच्या निदर्शकांना अवघ्या दोनशे शस्त्रहीन पोलिसांनी थोपवून धरले होते. त्या पोलिसांच्या हातून दुबळेपणाचे प्रदर्शन झाले असते तर मुंबईचे सोलापूर होण्याला वेळ लागला नसता. जमावाने शिस्तबद्ध अशा पोलिसांवर हल्ला केला नाही. पोलिसांनी आपण भ्यालो असे दाखविले नाही, म्हणून परिस्थिती काबूत राहिली, तिचे रक्षण झाले. पोलिसांवर मात् करण्यासाठीच मुख्यतः ही प्रचंड निदर्शने करण्यात येत होती, यात शंका नाही. आणि जेव्हा त्यांना असे कळून आले की ते तसे करू शकत नाहीत तेव्हा चळवळीची अत्यंत धोकादायक अवस्था समाप्त झाली.''[२१]

फोर्ट विभागात तर दुकानावर निरोधन करणारे लोक गिऱ्हाइकाने दुकानात जाऊ नये यासाठी प्रयत्न करताना दिसत; निरोधकांना बाजूला काढण्यासाठी व पकडण्यासाठी पोलिसांना बोलाविण्यात येई. एका तुकडीला पकडून नेण्यात आले, तर तिची जागा घेण्यासाठी दुसरी तुकडी तयार असे. हजारो लोक हे दृश्य उत्सुकतेने पाहत, आणि त्यामुळे वाहतूक थप्प होई. दुसऱ्या विभागातही मोठ्या प्रमाणावर ठप्प होई. पुष्कळ ठिकाणी लॉरीत भरलेले कापड शहरातून नेण्यासाठी पोलिसांचे संरक्षण घेण्यात येई. लॉरी सुरू करण्यापूर्वी कॉंग्रेसचे स्वयंसेवक लॉरीपुढे आडवे पडत, किंवा वाहनांचे टायर पंक्चर करीत, त्यातील हवा काढून वा अन्य मार्गाने निकामी करीत. ''[२२]

बाबू गेनू या तरुण कामगाराने परदेशी कापड नेणाऱ्या लॉरीपुढे आडवे पडून बलिदान केले. परदेशी कापड बहिष्काराच्या लढ्यात तो हुतात्मा झाला !

जरी काही वेळा पोलीस परिस्थितीची हाताळणी निष्ठुरपणे करीत होते, तरी अधिकारी संयमाने वागत आहेत असे गांधीजी म्हणत. कायदेभंगाशी प्रत्यक्ष मुकाबला न करणारे अधिकारीही थंड आणि निष्क्रिय वृत्तीचा अवलंब करीत.[२३] प्रत्यक्ष पोलिसही कॉंग्रेसच्या या चळवळीबाबत सहानुभूती बाळगत.[२४]

## गढवाली आणि चितगावचे वीर

पेशावरमधील निःशस्त्र निदर्शकांवर सैन्याने गोळीबार केला. सरकारी अंदाजाप्रमाणे ३० मृत व ३० जखमी झाले. कॉंग्रेसच्या चौकशी समितीने १२५ निदर्शकांना गोळीबारात मृत्यू आला असे अहवालात म्हटले आहे. गढवाली रायफलच्या दुसऱ्या पलटणीने निःशस्त्र जमावावर गोळ्या झाडण्याचे नाकारले, कारण ' परकी शत्रूशी लढणे आमचे कर्तव्य आहे;

आमच्याच निःशस्त्र बांधवांवर गोळ्या झाडणे हे कर्तव्य नाही.'[२५] डॉ. गोपाळ यांच्या म्हणण्याप्रमाणे जरी हे बंड अविचारीपणाचे असले तरी ते चितगावच्या शस्त्रागारावरील हल्ल्यापेक्षा अधिक महत्त्वाचे – गंभीर आहे. कायदेभंग हा केवळ नागरिकांशीच संबंधित असा नव्हता असे यावरून दिसून आले. तसेच अशा प्रकारची देशभक्तीची भावना हिंदु आणि मुसलमान यांच्यात दिसून आली, आणि सैन्यात त्याने मूळ धरले, तर भारतीय ब्रिटिश अमलाला हिंसात्मक अरिष्टाला तोंड द्यावे लागेल. रॉयल गुरखा रायफलची २/५ पलटण, गढवाली बटालियनमधून काढून अबोटाबादला तिची बदली करण्यात आली. परंतु पेशावरमधील परिस्थिती इतकी गंभीर होती की एप्रिल २४ च्या रात्री कमिशनरच्या आज्ञेने सर्व सैन्य शहरातून काढून घेण्यात आले. दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे सैन्याने शहर सोडले. शेवटी मे ४ ला निदर्शकांनी शहराचा ताबा परत मिळविला (शहर परत 'पुनः जिंकले.').

आपल्या बांधवांना गोळ्या घालण्यास गढवाली सैनिकांनी नकार दिला, यामुळे भारताच्या पुढील काळातील स्वातंत्र्यलढ्यावर त्याचा परिणाम झाला. मुस्लिम निदर्शकांवर गोळ्या झाडण्याचे हुकूम त्यांनी धाब्यावर बसवले, इतकेच नव्हे तर ते सैनिक रांगेतून बाहेर आले, आणि त्यांनी निदर्शकांना भातृभावाने आलिंगन दिले. सरहद्दगांधी खान अब्दुल गफारखान यांच्या नेतृत्वाखाली 'खुदाई खिदमतगार' (देवाचे सेवक) या संघटनेने बंदुकीच्या गोळ्यांना तोंड देत असता अहिंसात्मक मार्ग स्वीकारला, आणि असीम धैर्याचा धडा लोकांना दिला.

महात्मा गांधींनी उघडपणे या गढवाली सैनिकांचा निषेध केला ते म्हणाले, "गोळी झाडण्याची आज्ञा जो सैनिक मोडतो, तो त्यानी (सरकारला राजनिष्ठ राहण्याची) घेतलेली प्रतिज्ञा मोडतो, आज्ञा न पाळणारा गुन्हेगार ठरतो'[२६] डॉ. पट्टाभि म्हणाले, "गढवाली सैनिकांना एका जाहीर सभेवर गोळ्या घालण्यास सांगण्यात आले होते. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यातील एक महत्त्वाचा टप्पा म्हणजे एप्रिलच्या तिसऱ्या आठवड्यात पेशावरला गढवाली सैन्याने केलेले बंड होय." स्थानिक पुढाऱ्यांच्या अटकेच्या पाठोपाठ संतप्त निदर्शकांना दडपण्यासाठी चिलखती गाड्या पाठविण्यात आल्या. एक चिलखती गाडी जाळण्यात आली, त्यातील सैनिक त्यातून पळाले, त्यानंतर जमावावर झालेल्या गोळीबारात शेकडो लोक प्राणास मुकले, आणि जखमी झाले. १८ रॉयल गढवाली रायफलच्या दुसऱ्या बटालियनच्या दोन पलटणीनी, मुसलमान जमावातील हिंदु पलटणीनी, गोळीबार करण्याचे नाकारले, रांगा सोडून ते बाहेर आले, जमावाशी बंधुभावाचे नाते जोडले, आणि कित्येकांनी आपल्या बंदुका जमावाला दिल्या. हे पहिल्यावर पोलीस आणि लष्कर पेशावरमधून मागे घेण्यात आले. एप्रिल २५ ते मे ४ पर्यंत शहरावर जनतेचा ताबा होता. नंतर पेशावर पुनः जिंकून घेण्यासाठी ब्रिटिश सैन्याच्या तुकड्या आणण्यात आल्या. त्यानंतर सरकारने या प्रकरणाच्या चौकशी-संबंधीच्या सर्व मागण्या फेटाळल्या. गुरखा रायफलच्या सतरा सैनिकांना

लष्करी न्यायालयाने जबर शिक्षा ठोठावल्या. त्यांचा पुढारी ठाकूर चंद्रसिंह होता....... १० वर्षे ते १४ वर्षे सक्तमजुरीच्या शिक्षा सांगण्यात आल्या. ..... मार्च १९३१ मध्ये झालेल्या गांधी-आयर्विन कराराच्या वेळी या कैद्यांच्या सुटकेचा विषय अत्यंत महत्त्वाचा मानला गेला. "[२७] पण गांधी-आयर्विन कराराने त्यांची सुटका झाली नाही; पण काही वर्षांनंतर त्यांच्या शिक्षा कमी करण्यात आल्या. गांधीजींनी गढवाली वीरांबद्दल जरी अनुदार उद्‌गार काढले होते तरी आपल्या देशबांधवांना गढवाली स्फूर्तीचा झराच आहेत असे वाटले. लोकांच्या ह्रदयातील त्यांच्या स्थानाला कधीही धक्का लागला नाही, ते अढळ होते व आजही आहे.

देशाबाहेरील प्रबल सत्तेच्या मदतीशिवाय भारताला स्वातंत्र्य प्राप्त होणार नाही, असा दहशतवादी क्रांतिकारक चळवळीमागील पारंपारिक विचार होता. चितगावमधील क्रांतिकारक तरुणांना हे मानसिक दौर्बल्य नाहीसे करायचे होते. यासाठी उघड सशस्त्र संघर्ष हीच त्यांची योजना होती. एप्रिल १८, १९३० ला सूर्यसेनच्या नेतृत्वाखाली चितगावमधील सैन्याच्या शस्त्रसाठ्यावर तरुण वीरांच्या एका पथकाने हल्ला केला, पुष्कळ बंदुका हस्तगत केल्या; पण दुर्दैवाने मोठी शस्त्रे त्यात नव्हती. त्यांनी एक दिवस का होईना पण चितगावला स्वतंत्र केले. 'हिंदुस्थान प्रजासत्ताक सेना, चितगाव शाखा' या संघटनेचा अध्यक्ष सूर्यसेन याने स्वतंत्र सरकारचा जाहीरनामा वाचला. चितगावजवळील जलालाबाद टेकडीवर सैन्याशी चकमकी झाल्या. चार दिवसांनी दहा युवक या रणसंग्रामात धारातीर्थी पडले.क्रांतिकारकांनी शस्त्रागार आणि बराकीवर कब्जा मिळविला, त्यावर सरकारनेही प्रतिहल्ला केला. क्रांतिकारकांना ही जागा अनुकूल नव्हती, तरी पण सरकारी हल्ला त्यांनी परतवून लावला; एप्रिल २२ ला सायंकाळी ४–३० वाजता पूर्वतयारीनिशी निकराची लढाई झाली. अशा प्रकारचा वीरश्रीयुक्त प्रयत्न झाला तरीही पुढारी पकडले गेले. सूर्यसेन व तारकेश्वर दस्तीदार फासावर गेले, आणि अनेकांना जन्मठेपीच्या शिक्षा झाल्या. कल्पना दत्तला लोक वीरांगनाच मानीत. अठरा वर्षांची कॉलेज कन्यका बंदूक घेऊन लढली. आठ वर्षांची शिक्षा भोगायला गेली. गांधी आणि टागोर अशा श्रेष्ठींनी तिच्या सुटकेसाठी प्रयत्न केले.कल्पना दत्त यांनी चितगाव शस्त्रागाराच्या लढ्याच्या आठवणींवर पुस्तक लिहिले आहे.

गढवाल आणि चितगावच्या वीरांनी स्वातंत्र्यलढा जिद्दीने लढायला लोकांना स्फूर्ति दिली.

## मिठाकडून जंगलाकडे

मिठाच्या सत्याग्रहापेक्षा जंगल सत्याग्रह हा संपूर्ण रीत्या निराळा होता, मिठावरील कर हा जनतेवर अप्रत्यक्ष कर होता; त्यामुळे लोकांना तो प्रत्यक्ष जाणवला नाही, किंवा तो लोकांनी देऊ नये म्हणून त्यांना कोणी परावृत्त करू शकले नाही; परंतु वनचराईसाठीचा आणि इतर कर हे शेतकऱ्यांना प्रत्यक्ष आपल्या खिशातून भरावे लागत. जंगलाचा वापर केल्याबद्दल लोकांनी जो कर द्यावयाचा तो देण्याचे नाकारणे म्हणजे जंगल सत्याग्रह.

या सत्याग्रह्यात सरकारने पुढारी आणि स्वयंसेवक असा भेद केला नाही. दीर्घ मुदतीच्या शिक्षा दिल्या गेल्या व जबर दंड वसूल करण्यात आला.

मुंबई इलाख्यात जंगलांपासून मिळणारे उत्पन्न तीस लाखांवर होते. उपासमारीने हैराण झालेल्या शेतकऱ्यांवर हा प्रत्यक्ष बोजा होता. विशेष म्हणजे ज्या तऱ्हेने तो कर उकळण्यात येत होता, त्यामुळे जंगलाच्या अधिकाऱ्यांना अशिक्षित शेतकऱ्यांची पिळवणूक करण्याचा व त्यांच्यावर जुलूम-जबरदस्ती करायचा जणू परवानाच मिळाला होता. हा अन्याय होता. या गाऱ्हाण्यांची चौकशी करण्यासाठी १९२५ मध्ये एक समिती नेमणे सरकारला भाग पडले; पण या चौकशी-समितीने केलेल्या शिफारशी बासनात गुंडाळून ठेवण्यात आल्या व त्यांची कार्यवाही कधीच झाली नाही.

महाराष्ट्राच्या युद्ध-मंडळाने मे ९ च्या बैठकीत जंगल सत्याग्रह संघटित करण्यासाठी एक समिती नेमली. त्यात खालील सदस्य होते : (१) रामकृष्णदास महाराज, (२) मुंबईचे एक पत्रकार व राजकीय कार्यकर्ते श्री. शं. नवरे, (३) गोविंदराव देशपांडे (नाशिक), (४) डॉ. कृ. भी. अंत्रोळीकर (सोलापूर). श्री. शं. नवरे यांनी ' मिठाकडून जंगलाकडे चला ' असे पत्रक काढले.

जंगल सत्याग्रह समितीने वनचराईचा कर या एकाच गाऱ्हाण्याविरुद्ध सत्याग्रह-लढा करण्याचे ठरविले. शेतकऱ्यांना संरक्षित अशा भागात जाण्यास आणि त्यांनी वनचराईचा कर न देता गवत आणण्यास प्रवृत्त करण्यात आले. दरवर्षी जंगलामध्ये होणाऱ्या लिलावावर निरोधन करण्यात आले आणि लिलाव घेऊ इच्छिणाऱ्यांना त्यापासून परावृत करण्यात आले. गरीब शेतकरी आणि आदिवासींनी, वासाहतिक राजवटीने ' राखीव ' केलेल्या वनसंपत्तीचे परंपरागत नित्याचे हक्क प्रस्थापित करणे म्हणजे जंगल सत्याग्रह.

वासाहतिक भारतात, अधिक विकसित अशा भागातील व्यापारी आणि सावकार यांनी भरमसाट व्याज घेऊन केलेल्या शोषणाचा नवा प्रकार सुरू झाला. या शोषणाने मालमत्तेचे भांडवलदारी संबंध प्रस्थापित झाले नाहीत. या आदिवासी लोकांच्या असंतोषाचे उद्रेक मधूनमधून होत राहिले.

ही चळवळ मोठ्या प्रमाणावर मोठ्या प्रदेशावर पसरली व खरोखरी भीतीदायक झाली; इतकी की वन खात्याच्या प्रमुखाला, कायदेभंगाच्या चळवळीच्या कठीण परिस्थितीत त्याने केलेल्या कामगिरीबद्दल सन्माननीयांच्या यादीत त्यांचे नाव घालावे अशी मुंबई सरकारने नंतर शिफारस केली.

मुंबई शहर वगळता सर्व जिल्ह्यांतील शेतकऱ्यांनी या जंगल सत्याग्रहात मोठ्या संख्येने भाग घेतला. शेतकऱ्यांनी हा लढा आपला आहे असे मानले. महत्त्वाच्या शेतकरी लढ्यांचा हा प्रातिनिधिक आढावा.

कॉ. सरदेसाई हे प्रथमपासूनच राष्ट्रीय चळवळीकडे ओढले गेले होते. ते पं. नेहरूंच्या चर्चेला जात. ' गांधीवादापेक्षा मार्क्सवाद हे अधिक उच्च व शास्त्रशुद्ध तत्त्वज्ञान आहे, हे मत पं. नेहरूंनी निःसंदिग्धपणे मांडलेले मला आठवते. त्याचबरोबर हिंदुस्थानात महात्मा गांधींना वगळून काहीही होणार नाही हेही त्यांचे मत असे. यूथ लीग, स्वदेशी प्रदर्शन अशा स्वरूपांच्या कार्यात नेहरूंना तरुण कार्यकर्त्यांची गरज असे, अर्थात ते कार्यही आम्ही करीत असू, *असे सरदेसाई म्हणतात.

'' लाहोर काँग्रेसपासून (१९२९) कॉ. देशपांडे यानी पद्धतशीरपणे आमची बौद्धिके घेण्यास सुरुवात केली. १९२८ च्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या छुप्या काँग्रेसचा ' वासाहतिक प्रबंध ' ज्यांनी वाचला असेल त्यांना बौद्धिकातील मुख्य प्रतिपाद्य मुद्यांची स्पष्ट कल्पना येईल. कामगारवर्गाच्या नेतृत्वाशिवाय आणि सशस्त्र क्रांतीशिवाय राष्ट्रीय स्वातंत्र्य अशक्य ; राष्ट्रीय भांडवलदार व त्यांचे नेतृत्व करणारे महात्मा गांधी व इतर पुढारी प्रतिक्रांतिकारी; राष्ट्रीय काँग्रेस ही त्यांची संघटना; राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या क्रांतिकारी चळवळीपासून जनतेला परावृत्त करण्यासाठी व अखेर त्या चळवळीचा विश्वासघात करण्यासाठी भांडवलदाराने उभारलेली हुलकावणी म्हणजे कायदेभंगाची चळवळ; या सर्व कारणांमुळे काँग्रेसच्या नेतृत्वाचा बुरखा फाडून राजकीय संपाच्या मागे शेतकऱ्यांशी एकजूट करून सशस्त्र क्रांतीने ब्रिटिश साम्राज्यशाही उलथून पाडणे व देशात सोव्हिएट सत्ता प्रस्थापित करणे हे कामगारांचे ऐतिहासिक कार्य; अर्थात् या सर्व कार्यात पुढाकार घेणे हे कम्युनिस्ट पक्षाचे कर्तव्य हे या बौद्धिकातील सार होते. '' **

१९३० चा लेनिन दिन (२१ जानेवारी) काँग्रेसभवनच्या पटांगणात साजरा झाला. अध्यक्ष नरिमन होते व मेहेरअल्ली आणि कमलादेवी चट्टोपाध्याय हे वक्ते होते. वरील वक्त्यांनी लेनिनच्या गुणांची तारीफ केली. कॉ. देशपांडे यांनी वरील वक्त्यांवर कडाडून हल्ला केला व म्हटले, ' लेनिनच्या मार्गाने जावयाचे असेल तर काँग्रेसने निर्माण केलेल्या भ्रमांचा (इल्यूजन्स) त्याग केला पाहिजे. '

अशा अनेक सभा चालू होत्या.पहिल्या स्वातंत्र्यदिनाची (२६ जानेवारी १९३०) चौपाटीवरील सभा. या सभेत भाग घेण्यासाठी कम्युनिस्ट कार्यकर्त्यांना अधिकृत निमंत्रण होते. लालबाग मैदानावरून दीड-दोन हजार कामगारांची एक मिरवणूक चौपाटीवर आली. स्वातंत्र्यदिनाची प्रतिज्ञा आधीच वाचून झाली होती. तिरंगा झेंड्याशेजारी लालबावटा फडकत ठेवण्यासाठी देशपांडे व सुहासिनी नंबियार हे प्लॅटफॉर्मवर चढले. (हा वृतांत पहिल्या स्वातंत्र्यदिनाची चर्चा करताना आला आहे).

---

* आमचे मास्तर, कॉ. एस. व्ही. देशपांडे गौरवग्रंथ – यातील कॉ. सरदेसाई यांचा लेख. पृ. ३४.
** वरील उक्त ग्रंथ पृ. ३८.

या घटनेनंतर सरदेसाई व इतर ' नवे ' कम्युनिस्ट अस्वस्थ झाले. २६ जानेवारीच्या घडामोडीवर त्यांची बौद्धिके घेण्यात आली. हिंदी भांडवलदारात साम्राज्यविरोधी व साम्राज्यधार्जिणे असा भेद स्टॅलिनच्या लिखाणात आला होता, त्याचा आसरा घेण्याचा सरदेसाई आदि कार्यकर्त्यांनी प्रयत्न केला.

गांधीजींची दांडी-यात्रा चालू झाली.कॉ. देशपांडे यांनी गांधीजींची भेट घ्यावी असा सरदेसाई प्रभृतींनी लकडा लावला. अर्थात् ही सूचना मान्य करण्याचा प्रश्नच नव्हता. मोठ्या प्रयासाने दोघा –तिघांनी दांडी–मार्च पाहून येण्याची परवानगी मिळाली. सुरत व नवसारीच्या दरम्यान १०/१५ मिनिटे गांधीजींची भेट झाली. कॉ. सरदेसाई यांच्याबरोबर पत्रकार श्री. रा. टिकेकर व व्ही. जी. कानेटकर (आजचे निवृत्त पोलीस महासंचालक) होते. गांधीजी उत्तरादाखल एवढेच म्हणाले, ' माझ्या मिठाच्या सत्याग्रहात कोट्यवधी लोक भाग घेतील हा माझा विश्वास आहे. तुम्ही तरुण कम्युनिस्टांनीही हेच करावे '*

मुंबईत सत्याग्रहाची लाट उसळली. काँग्रेसचे नेते जनतेची दिशाभूल करीत आहेत, अशी टीका कामगार विभागातील सभात कम्युनिस्ट वक्ते करीत असत. साहजिकच सभांत खडाजंगी होत असे. गांधींना अटक झाल्यावर मिठाचा सत्याग्रह अनेक ठिकाणीं पसरला. त्यावेळी मधून मधून गोळीबारही होत. त्याच्या निषेधासाठी कम्युनिस्टांनी कामगारांच्या संपाची हाक दिली, पण त्यांना व्यापक स्वरूप आले नाही. (भगतसिंग प्रभृतींच्या फाशीनंतर मात्र मोठा संप झाला).

काँग्रेसचे नेते जंगल खात्याचे कायदे तोडण्याचे व साराबंदीचे कार्यक्रम हाती घेणार नाहीत असे त्या वेळी पक्षाचे मत होते. शंकरराव देव हे त्यावेळी म. प्रां. काँ. कमिटीचे डिक्टेटर होते. सरदेसाई व काही कार्यकर्त्यांनी महाराष्ट्रात काँग्रेसतर्फे जंगल सत्याग्रह संघटित करण्याची सूचना त्यांना केली. तो अधिकार देवांनी कार्यकर्त्यांना दिला व काँग्रेसतर्फे सरदेसाई यांची जंगल सत्याग्रह कमिटीवर नेमणूक झाली. ही बोलणी कॉ. देशपांडे यांच्या संमतीनेच झाली होती. त्यांचा त्यांना विरोध नव्हता. देवांच्या निर्णयानंतर त्यांनी सत्याग्रहाला परवानगी दिली.

### (१) संगमनेर

सरदेसाई, कऱ्हाडकर ही मंडळी जंगल सत्याग्रह संघटित करण्यासाठी नगर जिल्ह्यात संगमनेर, अकोला तालुक्यात गेली. ते व सरदेसाई मुंबईला एकाच खोलीत राहत होते. नंतर नगरचे भाई सथ्था व चौधरी आले. संगमनेरला भाई साने व विठ्ठल चौधरी मिळाले. नंतर अच्युतराव पटवर्धन आले. जंगल सत्याग्रहाबरोबरच सावकारांची कर्जे न देणे, तसेच फॉरेस्ट अधिकाऱ्यांचा ' बंदोबस्त ' करण्याचा प्रचार झालाही, आणि लोकानी ' सत्याग्रहात ' ते प्रकार केलेही ! **

* वरील संदर्भ, पृ. ४१.

** उक्त ग्रंथ, पृ. ४३.

सरदेसाई म्हणतात–'' १९३० मध्ये कम्युनिस्ट व काँग्रेस यांच्यात जी सतत व वाढती झुंज झाली ती 'तरुण कामकरी संघ' विना होऊ शकली नसती.'' 'तरुण कामकरी संघ' ही लढाऊ व कडवी संघटना कम्युनिस्ट कार्यकर्त्यांमागे सतत उभी होती.

अहमदनगर जिल्ह्यातील अकोला या डोंगराळ भागातील जंगल सत्याग्रहाचे हे महत्त्वाचे केंद्र. युद्धमंडळाने रामकृष्ण महाराज, एस्. जी. सरदेसाई आणि लालजी पेंडसे यांना हा सत्याग्रह संघटित करण्यासाठी पाठविले होते. या नवीन आघाडीवरील लढ्याला विलेपार्ले येथील युद्धमंडळाने मान्यता दिली होती. महाराष्ट्रातील हा सत्याग्रह लक्षात भरण्यासारखा व विशिष्ट प्रकारचा होता. जंगलाचा कायदा प्रथम तोडला मा. श्री. तथा बापूजी अणे यांनी, यवतमाळ जिल्ह्यातील पुसद येथे त्यांनी हजारोंच्यासह हा सत्याग्रह केला.

जून १९३० च्या सुरुवातीपासूनच संगमनेर हे महाराष्ट्रातील कायदेभंग चळवळीचे केंद्र बनले होते. जंगल सत्याग्रहासाठी नेमलेल्या युद्धमंडळाने मे २२ पासूनच तेथे शिबीर चालू केले होते. तेथील कार्यक्षेत्र डोंगराळ भागात होते. त्या भागात वांहतुकीच्या सोयी नव्हत्या. मध्यवर्ती योजना अमलात आणण्यासाठी संगमनेर आणि अकोला तालुक्यात अनेक उप-शिबिरे संघटित करण्यात आली होती. महाराष्ट्रात ही चळवळ वणव्यासारखी पसरली.[२८]

महाराष्ट्र प्रां. काँ. कमिटीचे पुढारी शंकरराव देव यांनी जंगल सत्याग्रह संघटित करण्याचे अधिकार सरदेसाई यांना दिले होते. कम्युनिस्ट पक्षाचे लालजी पेंडसे व विठ्ठल चौधरी त्यांच्या बरोबर होते. पत्रकार श्री. शं. नवरे व श्री. रा. टिकेकर इ. मुंबईचे कार्यकर्ते त्यात होते. लोक ह्या कार्यकर्त्यांना 'टिळकांचे लोक' असे म्हणत. जेव्हा सरदेसाई आणि नगरचे भाई सथ्था, चौधरी व इतर पकडले गेले, तेव्हा सुमारे १२०० –१५०० लोक एकत्र जमले, व त्यांनी पोलिसांना घेराव घातला, पोलिसांसमोर या कार्यकर्त्यांनी भाषणे केली. ही लढाऊ शेतकरी चळवळ होती. जंगलाचे रेंजर व काही सावकारांवर हल्लेही झाले.

दोन महिन्यांच्या अथक परिश्रमाने केलेल्या प्रचारानंतर जुलै २० ला संगमनेर भागात सत्याग्रहाला प्रारंभ झाला. सुमारे एक लाख शेतकऱ्यांनी सरकारी कायदे मोडले. त्याचप्रमाणे धुळे, नाशिक, कुलाबा (रायगड), सातारा आणि काही प्रमाणात पुणे भागात प्रचंड प्रमाणावर सत्याग्रह झाला. नाशिक आणि धुळे जिल्ह्यांत शेकडो पोलीस पाटलांनी राजीनामे दिले. बागलाण (जि. नाशिक) तालुक्यातील २४५ पाटलांपैकी २०० जणांनी राजीनामे दिले. पोलीस अधिकाऱ्यांविरुद्ध परिणामकारक सामाजिक बहिष्कार घालण्यात आला होता. ठाणे, पुणे, कुलाबा (रायगड) या जिल्ह्यांतील इमारतीचे लाकूड व जंगलातील गवत यांवरील लिलावावर यशस्वीपणे निरोधन करण्यात आले. लक्षावधी लोकांनी जंगलचे कायदे मोडले, आणि वनचराईचा कर दिला नाही. ही खऱ्या अर्थाने लहान प्रमाणावरील करबंदीचीच चळवळ होती.

मिठाच्या कायदेभंगाने शेतकरी जागा झाला नाही, जंगल सत्याग्रहाने मात्र ते काम केले.हा जंगल सत्याग्रह म्हणजे जनतेचा लढाच होता. या चमत्कृतिपूर्ण बदलाने सरकारही गोंधळून गेले : ही चळवळ दडपण्यासाठी सरकारने कायदेभंग चळवळीशी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंधित अशा संघटना क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्टखाली ऑगस्ट २१ ला बेकायदा ठरविल्या. सर्व सत्याग्रह-शिबिरे जप्त करण्यात आली, आणि सत्याग्रहाचे पुढारी आणि स्वयंसेवकांना पकडण्यात आले; पण त्याचा शेतकऱ्यांवर काहीही परिणाम झाला नाही. सरकारने हिंसात्मक मार्ग स्वीकारला.

जे गावकामगार पाटील काँग्रेसच्या कार्यकर्त्यांविरुद्ध कोर्टात साक्षीदार म्हणून उभे राहिले, त्यांना जनतेच्या बहिष्काराला तोंड द्यावे लागले, आणि त्यांनी सार्वजनिक स्वरूपात जनतेची माफी मागितली तेव्हाच त्यांना गावकऱ्यांनी आपले मानले.

वन विभागाला गांधींचे नाव देण्यात येई–' गांधी-कुरण ' (गांधी फॉरेस्ट). कृष्णाष्टमीला गाईची पूजा करण्यात आली, आणि हा सर्व लढा गायींच्या संरक्षणासाठी आहे अशी शेतकऱ्यांची धारणा होती. नंतर हजारो शेतकऱ्यांनी रानात गुरे घातली, गवत कापले आणि घोषणा दिल्या, ' जंगल का कायदा तोड दिया. '

## (२) बिळाशी

बिळाशी हे पूर्वीच्या सातारा जिल्ह्यातील (आताच्या सांगली) डोंगराच्या पायथ्याशी वसलेले गाव. तेथील काँग्रेस कार्यकर्ते मारुती विष्णू कुलकर्णी तथा बाबूराव चरणकर यांनी त्या गावच्या राजाराम सोनाराने केलेल्या चांदीच्या कोयत्याने जंगलात जाऊन गवत कापून जंगलचा कायदा तोडला. त्या सत्याग्रहात १,०००/१,५०० शेतकऱ्यांनी भाग घेतला. सुमारे चाळीस फूट उंचीचा एक सागवानी सोट कापून काढण्यात आला, आणि जुलै १८ (१९३०) ला महादेवाच्या देवळाच्या परिसरात तो पुरून त्यावर तिरंगा झेंडा लावण्यात आला. त्या झेंड्याकडे जाणाऱ्या रस्त्यावर अडथळे उभारण्यात आले. त्यामुळे पोलिसांच्या मोटारी तिकडे जाऊ शकल्या नाहीत, आणि पोलिसांच्या हालचाली थंडावल्या.

गावात जेव्हा पोलीस आले, तेव्हा लोकांनी त्यांच्याशी असहकार केला; त्यांना भाकरी आणि पाणीही मिळू शकले नाही. कलेक्टरला त्या गावाला यायला एखादे वाहनही मिळाले नाही. त्या गावच्या महारांना कलेक्टरला स्वतःच्या खांद्यावरून उचलून आणावे लागले. या कामासाठी पोलीस-पाटील व महारांना इनामी जमिनी देण्यात आल्या. मारुती पाटील, गावचे पोलीस-पाटील, यांच्यावर गावकऱ्यांनी बहिष्कार घातला.

ज्या महादेवाच्या देवळात सागवानी सोटावर तिरंगा फडकत होता. त्या देवळाला सप्टेंबर ५ ला ६००/७०० पोलिसांनी वेढा घातला. त्या झेंड्याच्या सागवानी सोटाला पहिला वेढा (कडे)

स्त्रियांचा होता. राजू कदम, मुक्ता साठे (मांग या अस्पृश्य जातीची तरुणी) यांनी झेंड्याला मिठी मारली. दुसरे कडे पुरुष स्वयंसेवकांचे होते : पोलीस अधिकाऱ्यांनी प्रथम लाठीहल्ला केला, आणि देवळात प्रवेश मिळविला. झेंड्याचे रक्षण करणाऱ्या स्त्रियांना त्यांनी बडविले, आणि त्या मूर्च्छित पडल्यावरच मग पोलीस झेंड्याला स्पर्श करू शकले. पोलिसांनी झेंड्याचे तुकडे केले. झेंड्याचे तुकडे गावाबाहेर घेऊन जाणाऱ्या मोटारीवर लोकांनी दगडफेक केली. पोलिसांनी गोळीबार केला. शंकर भाऊ चांभार आणि धोंडी संतू कुंभार हे गोळीबारात ठार झाले, आणि पोलिसांनी त्यांची प्रेते कुत्र्याच्या प्रेताप्रमाणे ओढत मोटारीकडे नेली!

पकडलेल्या सत्याग्रह्यांना सोडविण्यासाठी २००/३०० लोकांचा जमाव लाठ्या आणि कुऱ्हाडी घेऊन तालुक्याच्या मुख्यालयावर (शिराळ्याला) गेला. लोकांचा हा रूद्रावतार पाहताच अधिकाऱ्यांनी सत्याग्रह्यांची मुक्तता केली. सातारच्या कलेक्टरने किचनेर पोलीस दलाची तुकडी पाठवावी अशी सरकारकडे मागणी केली.अहमदनगर जिल्ह्यातील धरणगावची अशीच स्थिती होती. शिराळे येथील पोलीस सब-इन्सपेक्टरच्या घोड्याला पूर्वीप्रमाणे फुकट गवत मिळाले नाही. बिळाशीचे लोक बंड करून उठले आहेत, आणि सरकारची प्रतिष्ठा त्या भागात राहिली नाही असा त्याने सरकारकडे अहवाल पाठविला.

बिळाशीच्या या सत्याग्रहाचे ' दक्षिणी शेतकऱ्यांचे सशस्त्र बंड ' असे वर्णन करण्यात आले. पेठ, बोरगाव, रेठरे आणि बिळाशीच्या आसपासच्या गावातून झालेल्या सत्याग्रहाच्या वेळी लोकांना जबर सरकारी दडपशाहीला तोंड द्यावे लागले. या भागातील लोकांनी एक सत्याग्रह शिबीर उघडले होते, आणि ते मध्यवर्ती कायदेमंडळाच्या नेतृत्वाखाली काम करीत होते. नंतर ते मंडळही क्रिमिनल लॉ ॲमेंडमेंट ॲक्टखाली बेकायदेशीर ठरविण्यात आले.

या सत्याग्रहाला जनतेचा पाठिंबा इतका मोठा होता की, सरकारी अधिकाऱ्यांनी सत्याग्रह निधीला देणग्या दिल्या आणि इतर मदत केली. साताऱ्यात सुमारे ५०० जणांनी सत्याग्रह केला व त्यांना तुरुंगात टाकण्यात आले. ५० हजारांनी सत्याग्रहात भाग घेतला असावा [२९] बिळाशीला निदान हजार लोक जखमी झाले.[३०]

कराडला एका जाहीर सभेत ग. स. तथा दादा आळतेकर यांनी बिळाशीच्या गोळीबाराची चौकशी करण्यासाठी न. चिं. केळकर, रा. रा. काळे, ना. रा. गुंजाळ, रामराव शिंदे आणि सरदार मुतालिक यांची समिती नेमावी अशी सूचना केली. सातारच्या पुढाऱ्यांनी डॉ. पां. के. कोल्हटकर यांच्या नेतृत्वाखाली वैद्यकीय विद्यार्थ्यांचे एक पथक बिळाशीला पाठविले. हा जरी बुरखा असला, तरी त्याचा खरा हेतु लोकांना धीर देणे, त्यांच्यात आत्मविश्वास निर्माण करणे हा होता. देहाच्या जखमांवर त्यांनी औषधोपचार केलेच, पण मनेही तयार केली!

### (३) चिरनेर

चिरनेर हे पनवेल तालुक्यातील (जि. कुलाबा, आता रायगड जिल्ह्यातील)एक गाव. डोंगराच्या उतरणीवर वसलेले. पनवेल तालुका कॉंग्रेस कमिटीने जंगल सत्याग्रहासाठी एक सप्ताह संघटित केला. त्या सप्ताहामध्ये निवडक ठिकाणी सत्याग्रह व्हायचा होता. पोलीस दल विभागले जावे, आणि त्यांनी एकाच केंद्रावर एकत्रित येऊ नये यासाठी सत्याग्रह करायची ठिकाणे गुप्त ठेवण्यात आली. हा डावपेचांचा एक भाग होता.

सप्टेंबर २५ ला सुमारे पाच-सहा हजार स्त्री–पुरुषांचा जमाव चिरनेरजवळील जंगल भागाजवळ जमला. त्यांनी अक्कादेवीच्या डोंगरावरील गवत राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या आणि 'महात्मा गांधी की जय' या घोषात कापण्यास सुरुवात केली. सुमारे वीस जणांना पोलिसांनी पकडले, आणि त्यांना बेड्या ठोकल्या. लोकांनी त्या बेड्या काढण्याचा आग्रह धरला, पोलीस सब-इन्स्पेक्टर पाटील याने त्याला नकार दिला; मॅजिस्ट्रेट जोशी यांनी त्या लोकांच्या बेड्या काढण्यास सांगितले. पकडलेल्या लोकांना मुक्त करण्यात आले. डोंगरावरून खाली येताना मारामारी वा झोंबाझोंबी झाली, आणि गोळीबाराचे आवाज ऐकू आले. चिरनेर प्रकरणानंतर मुंबईच्या 'फ्री प्रेस जर्नल' मध्ये खालील वृत आले होते : 'गोळीबाराचे प्रतिध्वनी सर्व जंगलात ऐकू येत होते.' जमाव भयभीत झाला होता. मॅजिस्ट्रेट जोशी, फॉरेस्ट गार्ड शेवडे, २ कॉन्स्टेबल, १ हेड कॉन्स्टेबल असे बारा लोक गोळ्या लागून मृत झाले होते, पन्नास लोकांना गंभीर जखमा झाल्या होत्या, आणि ४७ जणांना पकडण्यात आले होते. या सत्याग्रहाचे नेते दादाभाई गुप्ते यांनी मामलेदार जोशी यांना मृतावस्थेत पाहिले, आणि कोयते व कुऱ्हाडी घेतलेला खवळलेला जमाव पोलीस सब–इन्स्पेक्टर पाटील यांच्याकडे येताना पाहिले. तेव्हा फार मोठा अत्याचार होईल, कदाचित् सोलापूरच्या लष्करी कायद्याची पुनरावृत्ती होईल असे त्यांना वाटले, आणि त्यांनी पाटलांना संरक्षण द्यायचे ठरविले. कुऱ्हाडी घेतलेले लोक पोलिसांवर हल्ला करण्याचा प्रयत्न करू लागले, पण दादाभाई गुप्ते आणि इतर कार्यकर्त्यांनी लोकांना यापासून परावृत केले. चिरनेरच्या शेतकऱ्यांवर झालेला बेछूट गोळीबार हा जालियनवाला बागेची छोटी पुनरावृत्तीच होती. पो. स.इन्स्पेक्टर पाटील लोकांच्या क्षोभामुळे भयभीत झाला होता. गुप्ते आणि इतर कार्यकर्त्यांनी नेहरू शर्ट आणि गांधी टोपी घालून त्याला जमावाबाहेर सुखरूप काढले. ही हकीगत स्वतः पाटील यांनीच पुढे कार्टात सांगितली. मॅजिस्ट्रेट जोशी जखमी झाले, तेव्हा विमल गुप्ते यांनी त्यांचे डोके मांडीवर घेऊन त्यांना पाणी पाजले, आणि जोशी तेथेच गतप्राण झाले. मुंबईच्या फिरत्या कॉंग्रेस हॉस्पिटलमध्ये काही जखमी लोकांना मुंबईला हलविण्यात आले.

या पाशवी गोळीबाराचा सर्वच राष्ट्रवादी जनतेने निषेध केला. या गोळीबाराची सार्वजनिक चौकशी करावी ही मागणी सरकारने धुडकावली; पण पुण्याच्या सार्वजनिक सभेने बॅ. जमनादास मेहता यांच्या अध्यक्षतेखाली चौकशी समिती नियुक्त केली. त्या समितीचे सदस्य असे : हुसेन तय्यबजी, एम्. सी. छागला, नारायण रामजी गुंजाळ, एम्. एल्. सी., ल. र. गोखले, एम्. बी. वेलकर, नारायण नागू पाटील व कार्यवाह होते माधवराव गोडबोले. सरकारने या समितीला जिल्ह्यात यायला परवानगीच नाकारली, त्यामुळे सत्याग्रहभूमीवर जाऊन लोकांच्या साक्षी नोंदता आल्या नाहीत, सरकारनेही साक्षीदारांना समितीपुढे जाण्यात अडथळे आणले. अखेर मुंबईला समितीचे काम चालू झाले. काही सत्याग्रह्यांनी मुंबईला जाऊन गुप्तपणाने साक्षी दिल्या. विमल गुप्ते ही गोळीबाराची खरी साक्षीदार होती. पो. स. इन्स्पेक्टर पाटील यानेच जोशी मामलेदाराला गोळी घातली असे तिने साक्षीत सांगितले. धनाजी म्हात्रे याने ' मामलेदार जोशी आणि फॉरेस्ट गार्ड शेवडे हे गोळीबारात मृत झाले ' असे सांगितले. ' पो. स. इ. पाटलाने स्वतःच्या पिस्तुलाने गोळी घालून मामलेदार जोशी आणि एक-दोघांना मारले ' असे मदन मानकामे आणि शंकर पांडव यांनी सांगितले. या समितीचा अहवाल प्रसिद्ध करण्यात आला नाही; कारण चिरनेर सत्याग्रहाच्या संदर्भात ४७ लोकांना पकडून त्यांच्यावर खटला चालू होता व त्यातील लोकांवर या अहवालाचा परिणाम होऊ नये म्हणून ही दक्षता घेण्यात आली होती.

लोकक्षोभ वाढविण्याची प्रत्येक संधी पोलीस घेत होते. त्यांनी अक्कादेवीच्या माळावरील जमावावर अत्याचार केलेच, पण एका पोलिसाने बावीस वर्षांच्या एका तरुणाला गोळ्या घालून ठार केले. हे पाहताच एक तरुणी काठी घेऊन पोलिसाकडे धावली, तिने दंडुक्याचे मानेवर दोन घाव बसविले, आणि तो पोलीस जमिनीवर कोसळला. त्या शूर स्त्रीचे नाव रमीबेन ठाकूर. (तिचा हा पराक्रम लोकाना कळलाच नाही. पनवेल सत्याग्रहाचे संघटक प्रभाकर गुप्ते यांनी सप्टेंबर २५, १९७८ ला हा वृत्तांत जाहीर सभेत सांगितला. हे व असेच प्रसंग प्रभाकर गुप्ते यांनी लेखकाला मुलाखतीत सांगितले आहेत.) गेल्या सुमारे साठ वर्षांत चिरनेर सत्याग्रहाबाबत काही गोष्टी अनाकलनीय ठेवण्यात आल्या, आणि त्यावर कधीच शोध-ज्योत टाकली गेली नाही; यामागे चिरनेर सत्याग्रह हा संपूर्णपणे अहिंसात्मक होता, अशी भावना लोकांत टिकविण्याची वृत्ती होती. पण घटना जर निःपक्षपातीपणाने पाहिल्या, तर सत्य निराळेच दिसून येईल.ज्यावेळी लढा मोठ्या प्रमाणावर व जनतेचा होतो, त्या अवस्थेप्रत जातो, अशा वेळी जनताही चिथावली जाते, व तो लढाही चिथावणी देणारा ठरतो. यात असंभवनीय वा अशक्य असे नाही. स्वतः लेखक सप्टेंबर २५, १९७७ ला चिरनेरला सत्याग्रहाच्या स्मृतिदिनादिवशी उपस्थित होता. त्या सत्याग्रहात प्रत्यक्ष भाग घेतलेले धनाजी म्हात्रे यांनी मला त्या सत्याग्रहाच्या सर्व महत्त्वाच्या मोक्याच्या जागा

दाखविल्या. तीन मृतदेह गोळ्यांनी मृत झाले नव्हते. मुंबईच्या एका (अज्ञात) जाणकाराने 'त्या प्रेतावर गोळ्या मारा, नाहीतर तो तुमच्या विरोधी मोठा पुरावा होईल' असे सांगितल्याने आम्ही त्या प्रेतावर गोळ्या मारल्या असे धनाजीने मला सांगितले. त्यामुळेच इं. पि. कोडाचे ३०२ कलम ४७ आरोपींच्या खटल्यात लागू शकले नाही.

या सत्याग्रह्यांवरील गोळीबारात ७ कार्यकर्ते, १ मामलेदार, १ राऊंड गार्ड, १ हेडकॉन्स्टेबल, २ कॉन्स्टेबल्स असे १२ लोक मृत झाले. दोघांचे हात कापून काढावे लागले म्हणून ते जन्माचे निकामी झाले. मामलेदाराची पनवेलला अंत्ययात्रा काढण्यात आली. बराच जनसमुदाय उपस्थित होता. त्यांच्या शवाला काँग्रेसतर्फे व इतर लोकांनीही हार घातले. (गोळीबाराचा हुकूम मामलेदारांनी दिला नव्हता पाटलाच्या गोळीचा तो बळी ठरला.) सरकारी अधिकारी या प्रेतयात्रेला हजर राहिले नव्हते!

४७ आरोपींवरील खटला तीन महिने चालला. ज्यूरी व असेसर्सनी निर्दोष असा निकाल दिला. सेशन्स जज्जांनी १८ इसमांना निर्दोष सोडले; २० लोकांना जंगल कायदा मोडल्याबद्दल दंड केला, व ९ जणांना ६ महिने ते ३ वर्षे स. म. च्या शिक्षा दिल्या, आणि चार जणांचा खुनाचा आरोप शाबीत मानून निकालाकरिता हायकोर्टाकडे पाठवला. हायकोर्टाने खुनाचा आरोप सिद्ध होत नाही असा निकाल देऊन त्यास त्यापासून मुक्त केले, इतरांच्या शिक्षा कायम केल्या. बाळासाहेब खेर, के. एम्. मुन्शी, ह. मो. जोशी यांनी या प्रकरणात उत्तम काम केले. दादासाहेब करंदीकर, धारप, दामले, रेगे व डॉ. आंबेडकर यांनी आरोपींच्या बचावाचे काम केले.

ऑक्टोबर ७, १९३० ला उरण पेट्यासह पनवेल तालुका व खालापूर पेट्यासह कर्जत तालुका यातील काँ. कमिट्या, सत्याग्रह मंडळे, युवकसंघ वगैरे संस्था बेकायदेशीर ठरविण्यात आल्या. पनवेल काँ. कमिट्या बेकायदेशीर झाल्यावर एकामागून एक सर्वाधिकारी नेमून काँग्रेसचे लोक पोलिसांच्या गोळीबाराच्या धमकीला भीक घालीत नाहीत हे यामुळे सिद्ध झाले.

### (४) बागलाण

नाशिक जिल्ह्यातील बागलाण तालुक्यातील आदिवासी '.जंगल का कायदा तोड दिया' अशा पद्धतीने वागू लागले. त्या आदिवासींनी जंगल सत्याग्रहात हजारोंनी भाग घेतला. करबंदीची चळवळ करण्याचाही प्रयत्न झाला. मिठाच्या सत्याग्रह चळवळीमुळे जागृत झालेली जनता आता नवीन हल्ला करण्याला तयार झाली. नामपूर भागातील सुमारे २५० पाटलांपैकी २०० पाटलांनी आपल्या पदांचे राजीनामे दिले, आणि ते शेतकरी संघटनेच्या कामाला लागले. जवळजवळ एक लाख लोकांनी सत्याग्रहात भाग घेतला. त्यात मालेगावचे हजारो मुसलमान सहभागी झाले होते. त्यात सुमारे दोन हजार स्त्रिया

होत्या. कळवण तालुक्यातील आदिवासीही लढले आणि त्यांनी प्राणही दिले. १८ ऑक्टोबर १९३० ला जंगलाचे कायदे तोडायचे आहेत म्हणून ढोल वाजवून जाहीर करण्यात आले. दहा ते बारा हजार लोक चणकापूरच्या जवळील तळ्याच्या टेकडीच्या बाजूला जमले. त्यांच्याजवळ त्यांची कुऱ्हाड, बाण इ. पारंपरिक हत्यारे होती. लष्कारातील जवान आणि पोलिसांनी ती टेकडी वेढली. लोकांच्या मनात एकच महत्त्वाकांक्षा होती : गोऱ्यांचे राज्य उधळून लावायचे आणि गांधी राज्याची स्थापना करायची. लष्कराच्या गोळ्यांना पारंपरिक बाणांनी उत्तर देण्यात येत होते. अशा प्रकारची विषम लढाई सुमारे दीड दिवस चालू होती. शेकडो मृत देहांना त्या तळ्यात जलसमाधी मिळाली, आणि सहा पुढाऱ्यांना दीर्घ मुदतीच्या शिक्षा झाल्या. दावल देवजी बागुल हा आपल्या बांधवांची क्रूर कत्तल पाहून वेडा झाला[३१] मृतांची प्रेते त्या तलावात फेकण्यात आली. एकही पोलीस जखमी झाला नाही. सरकारने ही वस्तुस्थिती एका पत्रकात मान्य केली. पोलिसांनी दुकाने फोडली व लुटली !

टेंभा गावच्या सुमारे १०० स्त्रियांनी पोलिसांना वेढा दिला, आणि पकडलेल्या सत्याग्रह्यांना सोडण्यास त्यांना भाग पाडले.

चणकापूरच्या कोळ्यांनी, ' ब्रिटिश राज्य आता गेले आहे व गांधी राज्य आले आहे ' अशा भावनेने २ ऑक्टोबर १९३० ला समारंभपूर्वक काँग्रेसच्या घोषणा देण्यास सुरुवात केली, आणि पोलिसांच्या गोळीबाराला दगडधोंड्यांनी उत्तर दिले.

**(५) इतर ठिकाणचे सत्याग्रह**

चिरनेरनंतर मोठ्या प्रमाणावरील सत्याग्रह टाळण्याचे धोरण स्वीकारण्यात आले, पण स्थानिक पातळीवर पूर्वीच्याच उत्साहाने आणि गतीने सत्याग्रह चालू होता. हजारो महादेव कोळ्यांनी शिवनेरी किल्ल्याचा ताबा घेतला, आणि जंगलाचा कर देण्याचे नाकारले.

खानदेशातील (आताच्या धुळे व जळगाव जिल्ह्यातील) शहाडे, नंदुरबार, साक्री, शिंदखेड आदि ठिकाणी मोठ्या प्रमाणावर जंगल सत्याग्रह झाले. अब्दुल मजिद उस्मान हकीम याने ' बंड ' (' रिव्होल्ट ') हे चक्रमुद्रित पत्र प्रसिद्ध केले. शहाडे येथील सत्याग्रहात पाटीदार व गुजर प्रभावी होते. १५ ते २० हजार शेतकऱ्यांनी त्यात भाग घेतला, त्यात ३ ते ४ हजार स्त्रिया होत्या.

अकोला (नगर) तालुक्यातील २३ पाटलांनी राजीनामे दिले होते. स्थानिक पातळीवर अशा तऱ्हेचे शेकडो लढे झाले, आणि त्यात हजारोंनी भाग घेतला.

हा सत्याग्रह गरीब शेतकऱ्यांनी उचलून धरला. ज्या ठिकाणची जंगले बंद करण्यात आली होती, आणि जेथे वनचराई व लाकडे आणल्याबद्दल कर वसूल केले जात होते, आणि जेथे खरेखुरे आर्थिक गाऱ्हाणे होते–त्या ठिकाणी सत्याग्रहाचा जोर होता.

**स्वदेशी आणि बहिष्कार**

स्वदेशीचा पुरस्कार आणि विदेशी मालावरील बहिष्कार– हे राष्ट्रीय लढ्यातील महत्त्वाचे कार्यक्रम होते. परदेशी मालावरील–विशेषतः कापडावरील बहिष्कारामुळे– व्यापाऱ्यांनी परदेशी कापड सीलबंद केले आणि त्याची विक्री थांबविली.

परदेशी कापडावरील बहिष्काराच्या चळवळीत बाबू गेनूचा त्याग विशेष स्वरूपाचा होता. अनेकांना गोळ्यांनी मृत्यू आला, असाच त्याग अनेकांनी केला पण परदेशी कापड वाहून नेणाऱ्या लॉरीपुढे आपल्या शेकडो सहकाऱ्यांदेखत आपले प्राण देणारा बाबू गेनू हा निराळाच. हा प्रकार डिसेंबर १२, १९३० ला मुंबईला घडला. त्याच्या त्यागाने परदेशी, विशेषतः ब्रिटिश मालावरील बहिष्काराच्या चळवळीला जोर चढला. मुंबईला बाबू गेनू दिन पाळण्यात आला. बहिष्काराच्या इतिहासात त्याचे नाव सुवर्णाक्षरानी नोंदले जाईल या बहिष्काराच्या चळवळीत महत्त्वाच्या व्यापारी संघटना उतरल्या.[३२] कॉंग्रेसच्या कट्टर पाठीराख्यात व्यापारीवर्ग मोठ्या प्रमाणावर होता. परदेशी मालावरील बहिष्काराने त्यांचा फायदाच झाला.[३३] गांधी-आयर्विन करारानंतर ब्रिटिश मालावरील बहिष्कार हे राजकीय हत्यार म्हणून निकामी झाले आणि स्वदेशीची मोहीम ही निव्वळ प्रचाराची व जाहिरातीसाठी राहिली.[३४]

या चळवळीत एका वर्षात साठ हजारांच्यावर लोकांना तुरुंगवास घडला, असा सरकारी आकडा आहे. " हा आकडा कमीच धरण्यात आला आहे; कारण राजकीय कैदी म्हणून सरकारी नोंदीतील आकडाच येथे धरला आहे. "[३५] लक्षावधी लोकांनी कायदा मोडला होता, आणि या राज्याचा पाया जो कायदा, तोच खिळखिळा केला होता.

**दारूबंदी**

चळवळीतील दारूबंदी हा एक महत्त्वाचा कार्यक्रम. दारू व ताडी यांच्या लिलावावर निरोधन वा सत्याग्रह करून भावी खरेदीदारांना रोखण्यासाठी प्रयत्न करण्यात येत होते. पश्चिम खानदेश (आता धुळे) भिल्ल या आदिवासी जमातीतील लोकांना दारूबंदीच्या शपथा घ्यावयास लावल्या, आणि त्या मोडल्या तर बहिष्कार घालण्याच्या धमक्या देण्यात आल्या. याचा चांगला परिणाम झाला. यामुळे अबकारी खात्याचा महसूल मुंबई प्रांतात घटला.[३६]

ताडीची झाडे तोडणे, दारूबंदीची मोहीम चालविणे, कायदे मोडणे यावर गांधीजींनी आपली चळवळ केंद्रित केली होती. सरकारी मिठागरावरील कामगारांनी आपले काम थांबवावे याकडे त्यांनी लक्ष वळविले असल्याचे नंतर दिसून येते.

**संस्थानी प्रजेचा लढा**

अ. भा. संस्थान लोकपरिषद ही संस्था म्हणजे संस्थांनी प्रजेची कॉंग्रेसच. या परिषदेची कल्पना दक्षिण महाराष्ट्रातील संस्थांनी चळवळीचे तिघे प्रवर्तक न. चिं. केळकर,

ग. र. अभ्यंकर, वामनराव पटवर्धन यांनी काढली, आणि या परिषदेची पहिली प्रास्ताविक सभा दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेचे चिटणीस वामनराव पटवर्धन, न. चिं. केळकर यांनी मुंबईस ५ मार्च १९२२ रोजी सर्व्हंट्स ऑफ इंडियाच्या दिवाणखान्यात राजकोटचे बॅ. शुक्ल यांच्या अध्यक्षतेखाली भरविली होती.या सभेस अनेक संस्थानांचे चाळीस प्रतिनिधी उपस्थित होते. प्रारंभी न. चिं. केळकर यानी प्रास्ताविक केले. शुक्ल यांनी प्रजेची दुरवस्था सांगून अशा परिषदेची आवश्यकता प्रतिपादन केली. अधिवेशन भरविण्याच्या दृष्टीने एक समिती नेमण्यात आली, त्यात केळकर, पटवर्धन, मेथा, चुडगर आणि ज. र. घारपुरे हे लोक होते. पुढे चार वर्षे काम झालेच नाही.

परिषदेचे पहिले अधिवेशन १७ व १८ डिसेंबर १९२७ रोजी मुंबईस एलोरचे प्रागतिक पुढारी एम्. रामचंद्र राव यांच्या अध्यक्षतेखाली झाले. खूप प्रचार केल्याने १५०० कार्यकर्ते प्रतिनिधी म्हणून आले होते. स्वागताध्यक्ष गोविंदलाल शिवलाल मोतीलाल होते. बेफाम करवाढ, अन्यायी न्याय-निवाडे, खाजगीचा भयंकर खर्च, भाषणस्वातंत्र्य बंदी, मुद्रण स्वातंत्र्यास बंदी वगैरे अनेक गोष्टींमुळे संस्थांनी प्रजा म्हणजे केवळ गुलामगिरीत काळ कंठणारी मानवी जनावरे अशी त्यांची केविलवाणी स्थिती झाली . स्वागताध्यक्षांनी यासाठी संस्थानात जबाबदारीच्या तत्त्वांचा पुरस्कार केला : (१) खाजगी खर्च निश्चित करणे; (२) संस्थानातील गाऱ्हाण्यांसाठी चौकशी आयोग नेमणे; (३) छोट्या संस्थानांचे एकीकरण करून एक मोठे संस्थान निर्माण करणे; (४) स्वतंत्र हायकोर्ट अस्तित्वात आणणे या गोष्टींची मागणी केली. या अधिवेशनात ' संस्थानिकांच्या आधिपत्याखाली जबाबदार राज्यपद्धती स्थापन करणे हे परिषदेचे ध्येय असल्याचे निश्चित झाले.

या पहिल्या प्रजापरिषदेने अ. भा. चळवळीची मुहूर्तमेढ रोवली गेली. या परिषदेने मणीलाल कोठारी व बी. एस्. पथिक यांचे शिष्टमंडळ कॉंग्रेसच्या मद्रास अधिवेशनास (१९२७) पाठविण्यात आले व कॉंग्रेसने संस्थानी प्रजेच्या लढ्यात मदत करणे किती आवश्यक आहे ते समजावून सांगण्यात आले. त्यामुळेच संस्थानातून जबाबदार राज्यपद्धती स्थापन करण्याच्या मागणीस कॉंग्रेसने प्रथमच कॉंग्रेसच्या मद्रासच्या अधिवेशनात एका ठरावाने पाठिंबा दिला.

नेहरू अहवाल १९२८ साली प्रसिद्ध झाला. संस्थानिकांची कबुली असेल तर, संस्थानी आणि खालसा भूभागाचे फेडरेशन करावे अशी योजना नेहरू कमिटीने केली होती. संस्थानिकांशी वाटाघाटी करण्याची तयारी कमिटीने दाखवली होती, पण प्रजापुढाऱ्यांबरोबर एकाच मेजाभोवती बसून त्यांना बरोबरीचा दर्जा देण्यास संस्थानिक तयार नसल्यामुळे संस्थानिकांच्या दुराग्रही खडकावर हा अहवाल आदळून निकालात निघाला.

परिषदेचे दुसरे अधिवेशन २५–२६ मे १९२९ रोजी 'लीडर' पत्राचे संस्थापक सी. वाय्. चिंतामणी यांच्या अध्यक्षतेखाली मुंबई येथे झाले. प्रो. ग. र. अभ्यंकरांनी स्वागताध्यक्ष म्हणून केलेल्या भाषणात बटलर कमिटीच्या रिपोर्टावर टीका केली. दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या अगोदर व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन व महात्मा गांधी यांच्यामध्ये वाटाघाटी चालल्या असताना संस्थानी प्रजेचे म्हणणे गांधीजींच्या कानावर घालण्यासाठी प्रा. अभ्यंकर, काकलभाई कोठारी व रंगीलदास कापडिया यांचे शिष्टमंडळ दिल्लीला पाठविण्यात आले. महात्माजींनी संस्थानी प्रजेकडे दुर्लक्ष होणार नाही असे आश्वासन दिले.

या परिषदेचे तिसरे अधिवेशन ९ जून १९३१ रोजी रामानंद चतर्जी यांच्या अध्यक्षतेखाली झाले. चौथे अधिवेशन २२ जुलै १९३३ ला न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली झाले. फेडरेशनला विरोध करण्यात आला. २ फेब्रुवारी १९३४ ला दिल्ली येथे जादा अधिवेशन झाले. अध्यक्ष पत्रपंडित नटराजन होते.

या १९३०–३४ च्या काळात परिषदेच्या कामात शैथिल्य आले; कारण १९३० व ३२ च्या कायदेभंगाच्या चळवळीत शेकडो कार्यकर्त्यांनी भाग घेऊन तुरुंगवास पत्करला. १९३०–३२ च्या आंदोलनाचा परिणाम संस्थानी लढ्यावर झालाच. औंध, फलटण, सावंतवाडी, सांगली या संस्थानिकांच्या अधिपतींनी त्यांच्या संस्थानात फार दडपशाही केली नाही.

## दक्षिणी संस्थान हितवर्धक सभा

दक्षिणी संस्थानातील मुलुखात प्रजापक्षीय चळवळ करण्यासाठी पहिली दक्षिणी संस्थान परिषद २४ व २५ मे १९२१ रोजी होऊन त्यात दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेची स्थापना करण्यात आली. दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेमार्फत निरनिराळ्या प्रसंगी ज्या सूचना संस्थानी प्रजा परिषदांच्या चालकांना दिल्या जात त्याची कसोशीने अंमलबजावणी होई. ही अ. भा. संस्थान लोकपरिषदेची शाखा नव्हती, तरी त्या मध्यवर्ती संस्थांच्या आज्ञा पाळीत.

दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचे पहिले अधिवेशन भरविण्याबद्दल जाहीर विनंतीपत्रक न. चिं. केळकर व वामनराव पटवर्धन यांच्या सह्यांनी निघाले. या विनंतीप्रमाणे पहिली परिषद २४ व २५ मे १९२१ रोजी पुणे येथे सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यात रा. ब. शंकर भालचंद्र बापट यांच्या अध्यक्षतेखाली झाली. स्वागताध्यक्ष न. चिं. केळकर होते. सुमारे २५० प्रतिनिधी आले होते. परिषदेचे काम कायम चालविण्याकरता 'दक्षिणी संस्थान हितवर्धक सभा' नावाची संस्था स्थापन करण्यात आली. यात दोन ठराव महत्त्वाचे होते : (१) 'फेडरेशन' च्या तत्त्वावर कारभार करण्याचा सरकारचा हेतू दिसतो. तथापि हा हेतू अमलात येण्यास संस्थानिकांची एक आणि संस्थानिक प्रजेच्या प्रतिनिधींची एक अशा

दोन सभा निर्माण करण्यात याव्यात.(२) निरनिराळ्या संस्थानांनी गट करून समाईक खर्चाने सुशिक्षित व स्वतंत्र अधिकारी नेमून त्यांजकडून असल्या अधिकाराची कामे, विशेषतः न्यायमनसुबीची कामे करवावीत. १९२१ ते १९३३ या काळात बारा अधिवेशने झाली त्यात प्रा. ग. र. अभ्यंकर, बॅ. जयकर, दा. वि. गोखले, श्री. ग. वझे, अ. बा. लठ्ठे असे अध्यक्ष लाभले. न. चिं. केळकर व वामनराव पटवर्धन सेक्रेटरी म्हणून काम करीत होते. १९३१ मध्ये बा. वि. शिखरे तिसरे चिटणीस झाले. १९२६ पासून 'संस्थानी स्वराज्य' हे पत्र वामनराव पटवर्धन चालवीत. ग. र. अभ्यंकर हे इंग्रजी लेख लिहीत.

## सारावाढविरोधी सत्याग्रह

टिळक-आगरकरांचा पहिला कारावास हा संस्थानी प्रश्नाबद्दलच झाला.

टिळकांचे संस्थानी राजकारणाकडे लक्ष असे 'स्वराज्य आल्यावर या संस्थानिकांना ताळ्यावर आणणे कठीण नाही' असे ते म्हणत.

बारडोली (१९२८) च्या लढ्यापासून मिरज सारावाढीविरुद्धच्या सत्याग्रहाला स्फूर्ती मिळाली. 'मिरज संस्थान सारावाढ आणि रयतेचा सत्याग्रह' हे 'स्पष्टवक्ता' नावाने लिहिलेले पुस्तक सरदार वल्लभभाईंना अर्पण केले आहे. मिरज संस्थानातील सत्याग्रहाला महात्माजींनी 'सुंदर सत्याग्रह' हे नाव देऊन त्याचा गौरव केला.

मिरज संस्थानातील सर्व खेड्यांची संख्या जरी ६५ असली तरी (मिरज तालुक्यातील २९ पैकी) १७ खेड्यांतील रयतेने सत्याग्रहात भाग घेतला होता. 'सत्याग्रहाचे पुढारी साबरमतीस तयार झाले आहेत' असे सांगण्यात आले. पुंडलीकजी कातगडे व बा. वि. शिखरे यांनी सत्याग्रहाचे नेतृत्व केले. 'मिरजेचे नरेश आपल्या रयतांना मिरजेची बारडोली करण्यास भागच पाडणार असे दिसत आहे.' ('स्वराज्य' २२ नोव्हेंबर १९२८) अशी टीका सर्वत्र होत होती.

रयतेला किती टक्के सूट मिळाली हाच त्यांच्या दृष्टीने महत्त्वाचा प्रश्न होता. त्या बाबतीतील विजय संशयास्पदच म्हणता येईल. रयत धीट झाली, रयतेमध्ये आत्मविश्वास निर्माण झाला; आपसातील तंटे मोडल्याने भ्याडपणा सोडल्याने आणि दीर्घोद्योग केल्याने लोकांमध्ये प्रचंड तेज कसे निर्माण होते याचा स्वाद रयतेला चाखावयास मिळाला.

मिरजेप्रमाणेच आजरे तालुक्यात (कोल्हापूर संस्थान) सारावाढीविरुद्ध रयतेचा सत्याग्रह झाला. पुंडलीकजी कातगडे यांनी त्याचा इतिहास लिहिला आहे. जागृत जनतेला सारावाढीविरुद्ध पद्धतशीर चळवळ करता यावी म्हणून पुणे येथे 'मुंबई इलाखा शेती संघ, २३ जुलै १९२९ ला स्थापन करण्यात आला.

या सारावाढीविरुद्ध अर्जाचा मसुदा तयार करणारे पुढारी म्हणजे रामचंद्र सखाराम जोशी. ' मुंबई इलाखा शेतकरी संघाने जरी आज संस्थानी चळवळीत प्रत्यक्ष भाग न घेण्याचे ठरविले असले तरी अशी भरमसाट सारावाढ होऊ लागल्यास संस्थानी प्रजेला स्वतंत्र रीतीने याच संघाची तत्त्वे स्वीकारून चळवळ करणे भाग आहे ' असे ' केसरी ' ने (३ डिसेंबर १९२९) लिहिले. सर्व प्रयत्न झाले. सत्याग्रह झाले. अखेर श्रीमंतांनी २१ टक्क्यांची सारावाढ १० १/२ टक्के केली हा चळवळीचा विजय आहेच. मूळचाच सारा डोईजड असल्यामुळे ही वाढ असह्य होणे साहजिकच होते.शिवाय धान्याचे दर सारखे उतरत होते. जागतिक मंदीचा तडाखा सर्वांबरोबर शेतकऱ्यांला बसत होता.

भोर संस्थानात जंगलाबाबत सत्याग्रह झाला. तेरदळला १९३२ मध्ये पहिले अधिवेशन झाले. अध्यक्ष वि. रा. शिंदे होते. ' भांडवलवाल्यांच्या यांत्रिक सामर्थ्याने खरी उन्नती होणार नाही. काबाडकष्ट करणारा शेतकरीवर्ग सुधारण्याने ती प्राप्त होणार आहे,' असे शिंदे आपल्या भाषणात म्हणाले. खालील ठरावांवरून विचारांची दिशा कळेल : (१) शेतसाऱ्यावर १/३ सूट, (२) जमिनीच्या मालकांनी कुळांना खंडात १/३ सूट, (३) हातरहाट व हातमाग ह्यांचा प्रसार, (४) पाटबंधारे वाढ, (५) आणेवारी–रयतानी निवडलेले दोन पंच व सरकारी एक पंच या तिघांनी करावी, (६) गायराने मोफत असावीत, (७) प्राथमिक शिक्षणाबरोबर शेतीचे शिक्षण, (८) सभांना परवानगी, (९) नऊ टक्क्यांपेक्षा जास्त व्याज आकारू नये (केसरी सारसंग्रह १२ जानेवारी १९३२).

## संदर्भ

(१) एस्. गोपाळ, उक्त ग्रंथ, पृ. ६०.
(२) कंटक प्रेमा, ' सत्याग्रही महाराष्ट्र ', पृ. २८४.
(३) एस्. गोपाळ, उक्त ग्रंथ, पृ. ८०.
(४) File G-1/1931, G/2647,15th October 1931.
(५) एस्. गोपाळ, उक्त ग्रंथ, पृ. ७९.
(६) नगरकर वसंत, ' भारतीय रणसंग्राम ', पृ. २७१.
(७) A Short History of The World, p. 221.
(८) डॉ.पट्टाभि, उक्त ग्रंथ, पृ. ३८९.
(९) झा. डॉ. मनोरंजन, उक्त ग्रंथ, पृ. ७४–७९.
(१०) झा. डॉ.. मनोरंजन, उक्त ग्रंथ, पृ. ६७.

(११) तेंडुलकर, डी. जी., 'महात्मा', तिसरा खंड, पृ. २३.
(१२) केळकर, न. चिं. L. A.Debates, Vol. II, Session IV, 1929, p. 1669.
(१३) देव शंकरराव, 'दैव देते आणि कर्म नेते,' पृ. ६६.
(१४) कंटक प्रेमा, 'सत्याग्रही महाराष्ट्र'.
(१५) File No. 247/IV of 1930
(१६) देवगिरीकर, त्र्यं. र. 'आठवणी', पृ. ३७.
(१७) देवगिरीकर, त्र्यं. र. 'आठवणी', पृ. ३८.
(१८) File No. 40-5/19th May 1930
(१९) मंगळवेढेकर, राजा 'साने गुरुजी,' पृ. १७२.
(२०) Mitra, 'Annual Register,' p. 117.
(२१) 'India' in 1930-31, pp. 660-661.
(२२) 'India' in 1930-31, pp. 660-661.
(२३) 'यंग इंडिया' १० एप्रिल १९३०.
(२४) एस्. गोपाळ, उक्त ग्रंथ, पृ. ६४.
(२५) 'टाइम्स ऑफ इंडिया', ६ एप्रिल १९३०.
(२६) रजनी पाम दत्त, उक्त ग्रंथ, पृ. ३०३.
(२७) डॉ.पट्टाभि, उक्त ग्रंथ, पृ. ५१०.
(२८) लेखकाला मुलाखत (कॉ. सरदेसाई यांनी दिलेली).
(२९) गोखले, पु. पां., जागृत सातारा, पृ. १३८.
(३०) गोखले, पु. पां., जागृत सातारा, पृ. १४३.
(३१) डॉ. सुधीर फडके, 'महाराष्ट्रातील आंदिवासी आणि त्यांचे प्रश्न,' पृ. १२४–१२६.
(३२) झा, डॉ. मनोरंजन, उक्त ग्रंथ, पृ. ७६.
(३३) एस्. गोपाळ, उक्त ग्रंथ, पृ. ६२.
(३४) एस्. गोपाळ, उक्त ग्रंथ, पृ. ११९.

(३५) रजनी पाम दत्त, उक्त ग्रंथ, पृ. ३७०.

(३६) File 247/IV of 1930.

## अधिक संदर्भ

(१) अण्णा दाते–चिरनेरचा जंगल सत्याग्रह.

(२) ' व्याध ' नानासाहेब पंडित विशेषांक, ५ नोव्हेंबर १९७६.

(३) ' माझा देश ' धुळे जिल्हा स्वातंत्र्य सैनिक विशेषांक, १५ ऑगस्ट १९६८.

(४) डॉ. वा. वि. आठल्ये, ' आत्मवृत्त ' सातारा.

[मिठाच्या सत्याग्रहाकरिता १९३० साली ज्यांनी हिंदुस्थानी सेवादलाच्या महाराष्ट्रीय कचेरीकडे राष्ट्रभक्तीने प्रेरित होऊन स्वार्थत्यागपूर्वक आपली नावे पहिल्या यादीत दिली त्यांची जिल्हावार यादी परिशिष्ट ' आ ' मध्ये दिली आहे. सर्वांत जास्त नावे–४३-सातारा जिल्ह्यातील आहेत.]

# ११. सोलापूर : आघात की अपघात ?

पहिल्या महायुद्धानंतरच्या परिस्थितीने सर्वच देशातील जनता जर्जर झाली होती. देशभर साम्राज्यशाहीविरोधी वातावरण तयार झाले होते. जालियनवाला बाग येथील जाहीर सभेवर जनरल डायरने अमानुष गोळीबार करून शेकडो निरपराध भारतीयांचे मुडदे पाडले. अशासारख्या घटनांनी देशातील वातावरण खूपच तापत होते.

अशा वेळी कामगारांची चळवळ होती, पण तिला संघटित स्वरूप आले नव्हते. कामगार हा जागृत करून देशाच्या स्वातंत्र्यासाठी त्याची शक्ती लावली पाहिजे या दृष्टीने आपले राष्ट्रीय पुढारी विचार करीत होते.

१९२० च्या सुरुवातीचा तो काळ, त्या काळी सोलापूरात लालबावटा आला नव्हता. युनियनही आली नव्हती. संप, हरताळ इत्यादी शब्द कोणाला माहीतही नव्हते. संपाला ते ' अड्डा ' म्हणत. आपल्या तक्रारी दूर करण्याकरता त्यांनी कामगारांतीलच पुढारी निवडले. त्यांचे नाव भीमराव आणि त्यांच्याच पुढारीपणाखाली २६ जानेवारी १९२० रोजी संप झाला. हाच तो प्रसिद्ध **भीमरावाचा** संप. कामगार चळवळीतील जाणते लोक अजूनही या संपाची व त्यांचा पुढारी **भीमराव** यांची आठवण काढतात.

भीमराव यांचे सहकारी **चांद आप्पाभाई,** विठ्ठल अप्पा कवडे (यांना कामगार विभागातून कामगारांनी म्युनिसिपालिटीवर निवडून दिले होते) आणि कादर ही मंडळी वरचेवर एकत्र बसत, चर्चा करीत. यातूनच मुंबई गिरणी कामगारांच्या बरोबरीने महागाई मिळाली पाहिजे, डबल खाड्याची पद्धत बंद झाली पाहिजे अशा स्वरूपाच्या कामगारांच्या मागण्या त्यांनी तयार केल्या, आणि त्याच्या प्रचारासाठी होमकट्ट्यावर रोज सभा होऊ लागल्या. वक्ते अर्थातच होते भीमराव. भीमराव एकच गोष्ट पुनः पुन्हा सांगत–" झाडपाला खा, पण संप टिकवा. " लालबावटा, कामगार चळवळ यांचे काही ज्ञान नसतानाही उत्स्फूर्तपणे कामगार बोलत होता.

अड्डा पुकारल्यावर गावात खूपच तारांबळ झाली. शेठ माणिकचंदांनी तडजोडीच्या दृष्टीने कामगारांशी बोलणी केली; पण कामगारांनी ती मानली नाहीत. मॅनेजर आपल्या मागण्या मान्य करीत नाही तर मग मुंबईच्या मालकालाच भेटायचे अशी कल्पना निघाली, आणि त्या कामावर चांदसाबची योजना झाली. पण त्यांच्या अंगावर कपडा तर नीट पाहिजे ना? एकाने कोट दिला, दुसऱ्याने पटका दिला, तिसऱ्याने धोतर; एका बाईने अंगावरचे डाग गहाण टाकून भाड्याचे पैसे उभे केले.

मुंबईला बॅप्टिस्टा काकांच्याकडे चांदसाब गेले. तेथे त्यांना अचानक लोकमान्य भेटले. त्यांनीही संपाला पाठिंबा दिला. चांदसाबना हुरूप आला. त्यांनी मालकाची भेट घेतली. उपयोग

झाला नाही. ' तुम्हाला कामावरून काढले आहे ' हेच चांदसाबना ऐकावे लागले. ' त्यांनी भाकरी मागितली, पण त्यांना धोंडा मिळाला! ' पगाराच्या दिवशी संतापाने लाल झालेले कामगार पगार घेऊ लागले. जमावातून दगड आले, आणि ' शांत राहा ' या विनंतीलाच अखेर शांत व्हावे लागले. गोळीबार झाला, आणि पाखरासारखे सात कामगार जागच्या जागी मरून पडले. दुसऱ्या दिवशी गिरण्या बेमुदत बंद झाल्या. काही दिवसांनी सुरू झाल्या, पण तेरा कामगारांना कामावरून काढले. कामगारांची युनियन उभी राहिली नाही.

देशभर कामगार लढे उभे राहू लागले. यासाठी मध्यवर्ती संघटना, ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस संघटित होऊ लागली. पहिले अध्यक्ष होते लाला लजपतराय. सोलापूरचे कामगार पुढारी चांदसाहेब हे त्या (आयटकच्या) पहिल्या अधिवेशनाला सोलापूरचे प्रतिनिधी म्हणून हजर होते. कॉ. सिद्रामप्पा फलमारी यांनी ' सोलापूरचा कामगार ' या पुस्तिकेत दिलेली पार्श्वभूमी वाचनीय आहे.

## पार्श्वभूमी

१९२० नंतर सोलापूरातील कामगार चळवळ अधिक संघटित होऊ लागली. १९२८ च्या सुमारास जागतिक मंदीची पावले दिसू लागली. अशी मंदी आली की धंद्यावर अरिष्ट येते. या अरिष्टाचा बोजा कामगार व शेतकरी यांच्या अंगावर ढकलून देण्यात येतो. अशा वेळी पगारवाढ, रॅशनलायझेशन (निरनिराळ्या मार्गांनी कामगारांवर कामवाढ लादणे), कामगारांना कमी करणे असे उपाय अंमलात आणण्यात येतात. याचा प्रतिकार करण्यासाठी मुंबईसारख्या औद्योगिक शहरात प्रचंड संप झाले, रेल्वे संप झाले, मुंबई कापड कामगारांचा संप तर सहा महिने चालला होता. याची लाट सोलापूरातही आली. आता नव्या दमाचे कामगारांचे पुढारीपण आले होते. यूथ लीगचे कार्यकर्ते डॉ. कृ. भी. अंत्रोळीकर हे कामगारांत काम करू लागले होते. त्यांना काही दिवसांत यूथ लीगचे जगन्नाथ शिंदे, ए. कुरबान हुसेन, कवि कुंजविहारी असे कार्यकर्ते मिळाले. राष्ट्रीय चळवळीत झुंजारपणाने लढणारे तसेच कामगारांच्या चळवळीतही अग्रभागी राहणारे असे हे तरुणांचे पुढारी (यूथ लीगचे) सोलापूरात अग्रभागी होते आणि त्यांना त्यांच्या विचारांना साथ देणारी तरुण पिढी तयार होऊ लागली.

आपल्या लढाऊ धोरणाच्या जोरावर कामगार, सुधारणावाद्यांना चळवळीतून हद्दपार करीत होते, तर दुसऱ्या बाजूने राष्ट्रीय चळवळीतील जहाल मतांच्या लोकांना ते आपल्याकडे खेचीत होते. सायमन कमिशनला विरोध करण्यासाठी कामगार सर्वत्रच आघाडीवर होता. सोलापूरातही तेच दृश्य दिसले. राष्ट्रीय लढ्याचा अग्रेसर पुढारी म्हणून राष्ट्रप्रेमी जनतेचे लक्ष कामगारांनी आपल्याकडे खेचून घेतले. राजकीय आणि आर्थिक अशा दोन्ही आघाड्यांवर अशी निकराची लढाई देण्यास कामगार सज्ज झाला होता. कामगार चळवळ आणि राष्ट्रीय चळवळ ही एकत्र येत होती.

सोलापूरावर १९३० साली जो लष्करी कायदा लादला, त्याचे मागील उदाहरण म्हणजे पंजाबातील जालियनवाला बाग.[१] या ठिकाणी नागरिकांची अक्षरशः कत्तल झाली होती.

सोलापूरसंबंधी लिहायचे तर ' काँग्रेसच्या १९३०-३१ मधील अधिवेशनात एकही ठराव संमत झाला नाही. डॉ. पट्टाभि, ताराचंद, मुजुमदार किंवा स्वातंत्र्यसैनिकांच्या राष्ट्रीय चरित्रग्रंथात याचा उल्लेखही आढळत नाही. '[२]

महाराष्ट्र, कर्नाटक आणि तेलंगण या तीन विभागांना एकत्र जोडणारे असे हे सोलापूर शहर. कर्नाटकातून आलेले लिंगायत हे मुख्यतः व्यापारी पेशाचे. मारवाडीही व्यापारी म्हणून इथे स्थायिक झालेले. उत्कृष्ट विणकर असलेले तेलंगणातील पद्मशाली हे पेशव्यांच्या आग्रही निमंत्रणामुळे सोलापूरात आले. ब्रिटिशांच्या अमदानीत देशांतर्गत व्यापारही वाढला. सोलापूरचे सिद्धेश्वर, पंढरपूरचे विठ्ठल मंदिर आणि तुळजापूरचे देवीचे मंदिर–ही या भागातील धार्मिक केंद्रे होत.

सोलापूरच्या आसपासचा भाग नेहमीच दुष्काळपीडित. त्यामुळे अल्पशा पगारावर काम करणारा कामगार तेथे दिसून येई. हैदराबादहून कच्चा माल आणला जात होता, त्यामुळे कापड गिरण्यांचा धंदा विकसित होण्याची शक्यता होती. मुंबईच्या मुरारजी गोकुळदास शेटनी १८७४ मध्ये पहिली कापड गिरणी स्थापन केली. लक्ष्मी आणि नरसिंग गिरजी १८९८ मध्ये स्थापन झाल्या, आणि विष्णु आणि जाम या विसाव्या शतकाच्या दुसऱ्या दशकात स्थापन झाल्या. या पाचही गिरण्यांतील एकूण कामगार ३१ हजार होते.

कापड गिरण्या वा विणकर धंद्याशिवाय डाळी तयार करणे, रंगकाम, छपाई, चामडे तयार करणे अशा प्रकारचे धंदे भरभराटीला आले होते. पहिल्या महायुद्धानंतर या वरील धंद्यांनी १९२७ पर्यंत भरपूर नफे मिळविले.

## पुढारीपण

१९३० च्या सुमारास सोलापुरात सामान्यतः तीन गट राजकीय दृष्ट्या प्रभावी होते.

**पहिला गट :** रामभाऊ राजवाडे, शेट गुलाबचंद, भाऊसाहेब खडकीकर यांचा. सामान्यतः प्रतिसहकारपक्षासारखे त्यांचे धोरण. त्या वेळचा ' केसरी ', तात्यासाहेब केळकर यांचे पुढारीपण मानणारे रामभाऊ राजवाडे हे ' कर्मयोगी ' हे साप्ताहिक काढीत. त्या भागात ' समाचार ', ' कल्पतरु ' नंतर प्रभावी असे तेच पत्र होते. हा गट काँग्रेसवर टीका करी, पण सरकारविरोधी होता.

**दुसरा गट :** रामकृष्णजी जाजू, तुळशीदास जाधव, परशराम राठी यांचा. सामान्यतः गांधीवादी किंवा काँग्रेसच्या धोरणाशी सुसंगत धोरण ठेवणारा. विधायक कामे, खादीप्रचार, अस्पृश्यतानिवारण अशा स्वरूपाची कामे सतत करणारा. त्यांची निष्ठा संशयातीत होती.

जनतेत त्यांच्याविषयी आदराची भावना होती. लोकमान्य टिळक यांच्या उत्तर आयुष्यातील चळवळी पाहिलेले आणि महात्माजी आल्यावर त्यांच्या चळवळीत तळमळीने भाग घेणारे असे जाजूंचे व्यक्तिमत्त्व.

**तिसरा गट :** तरुणांचा–नवीनच स्थापन झालेल्या यूथलीगचा-युवक संघाचा. त्यात डॉ. कृ. भी. अंत्रोळीकर, कुर्बान हुसेन, जगन्नाथ शिंदे, मल्लाप्पा धनशेट्टी ही मंडळी अग्रभागी होती. डॉ. अंत्रोळीकर हे व्यवसायाने डॉक्टर. ते लहान असताना लोकमान्य टिळक सोलापुरात आले असताना त्यांच्या मिरवणुकीची गाडी विद्यार्थ्यांनी ओढली, त्यात अंत्रोळीकर प्रमुख होते. पुढील उत्तर आयुष्यात ते ही गोष्ट अभिमानाने सांगत. मल्लाप्पा धनशेट्टी हे एका पेढीवर मुनीम होते. पैलवानी शरीर आणि सतत काम करण्यामुळे त्यांचे तरुणांवर वजन होते. जगन्नाथ शिंदे व कुरबान हुसेन ही विशीतील तरुण मंडळी गिरणी कामगारांत काम करू लागली होती. कुरबान हुसेन हा ' गझनफर ' (' सिंह '–केसरी) हे पत्र चालवीत असे. त्या वेळच्या जातीय पुढाऱ्यांपासून ते अत्यंत अलिप्त, प्रखर राष्ट्रवादी.

अखिल भारतीय पातळीवर जवाहरलाल नेहरू व सुभाषचंद्र बोस यांच्या नेतृत्वाने तरुणवर्ग संघटित होऊ लागला. जवाहरलाल व सुभाषबाबू यांचे महाराष्ट्रात युवक परिषद व प्रांतिक परिषद या निमित्ताने नरीमन, मेहरअल्ली मुंबई भागात काम करीत. महाराष्ट्रात त्यांचे दौरे होऊ लागले. मद्रास काँग्रेस (१९२७) मध्ये नेहरू-सुभाष व त्यावेळी कामगार शेतकरी पक्षाच्या नावाने काँग्रेसमध्ये समाजवादी शक्ती संघटित करणारे के. एन. जोगळेकर, डांगे, निमकर इत्यादींच्या पुरस्काराने संपूर्ण स्वातंत्र्य हे काँग्रेसचे ध्येय पुकारण्यात आले. त्यानंतर नेहरू रिपोर्ट कलकत्ता काँग्रेस (१९२८) त्या अधिवेशनात सरकारला दिलेली एक वर्षाची नोटीस, काँग्रेसमधील तरुणांची समाजवादी ताकद खच्ची करण्यासाठी मध्यवर्ती असेंब्लीत आलेली पब्लिक सेफ्टी बिल आणि ट्रेड डिस्प्यूट्स बिल, त्याला काँग्रेस व अन्य लोकप्रतिनिधींनी केलेला प्रखर विरोध, सरकारने २० मार्च १९२९ रोजी ३१ कामगार व कम्युनिस्टांना अटक करून मीरत येथे त्यांच्यावर भरलेला राजद्रोही कटाचा खटला, काँग्रेस पुढाऱ्यांनी फंड उभारून व वकिली मदत देऊन बचावासाठी केलेला प्रयत्न–या घटना कोणत्याही तरुणाला राष्ट्रीय लढ्यात उडी घेण्याला स्फूर्ती देतील अशाच होत्या. सोलापूरला अंत्रोळीकर–शिंदे–हुसेन यांच्या भोवतीच तरुण संघटित होऊ लागला.

कुर्बान हुसेन हे पुरोगामी विचाराचे होते. त्यांनी कामगारांचे अनेक संप लढे लढविले होते. १९२८ साली जाम मिलने बेकायदा संप घडवून गिरणीचे नुकसान केले म्हणून त्यांच्यावर नुकसान-भरपाईचा खटला दाखल केला होता. कामगारांच्या प्रश्नावर ते ' गझनफर ' या आपल्या पत्रात लिहीत. ता. ८ मार्च १९२९ च्या ' शेरे आणि ताशेरे ' या सदरात ते लिहितात–'' .......पोटाला घड्या घालून गरीब कंगालांनी चाकरी केलीच पाहिजे अशी निर्दय

कृती भांडवलशाहीची आहे. म्हणूनच मजुरांच्या हाती संपाचे हत्यार दिले आहे.'' स्वदेशी व जातीय ऐक्याचा त्यांनी सतत पुरस्कार केला. '' ब्रिटिशांनी जात-धर्मात भांडणे लावून अफगणिस्तानात बेदिली आणि भांडणे लावली आहेत. हे जातीयतेचे विषारी बीज हिंदुस्थानात येण्याची भीती आहे. ते आताच निपटून काढले पाहिजे. ''

या तरुण गटामधील आणखी एक प्रभावी कामगार व्यक्ती म्हणजे कवि कुंजविहारी (१८-११-१८९६). त्यांचे संपूर्ण नाव हरीहर गुरुनाथ सलगरकर कुलकर्णी, एका गिरणीत नोकरी पण प्रभावी राष्ट्रीय गीते करणारे. त्यांचा ' मुळशीचा पाळणा ' त्या काळात घराघरात म्हटला जायचा. ' ही परवशता करते भयंकर करणी ' ' मातृभूमी उद्धरण्याला, स्वातंत्र्यरणी लढण्याला ' अशी त्यांची प्रभावी गीते. ' गिरण्यांना दवाखाने पाहिजेत ' हा त्यांचा पहिला लेख. १९२७ साली स्थापन झालेल्या अशा या युवकांच्या संघाचे अध्यक्ष होते डॉ. अंत्रोळीकर.

पहिल्या दोन गटांचे जनमानसावर वर्चस्व होते. तिसरा गट कायदेभंगाच्या चळवळीपासून अलिप्त होता; पण जेव्हा त्यांनी पाहिले की परकी सरकार निरपराध लोकांवर हल्ले करीत आहे आणि गोळीबार करीत आहे, तेव्हा सरकारविरोधी पवित्रा घेऊन ते जनतेबरोबर राहिले. राजवाडे हे ' कर्मयोगी ' या साप्ताहिकाचे संपादक होते. ८ मे १९३० रोजी पोलिसांनी निदर्शकांवर जो बेछूट गोळीबार केला, तसेच जनतेच्या असंतोषाचा जो उद्रेक झाला त्याचा संपूर्ण अहवाल प्रामाणिकपणे ' कर्मयोगी ' पत्रात दिला होता.

महात्मा गांधी हे प्रथम सोलापूरला मे २६, १९२१ ला आले. नंतर त्यांनी फेब्रुवारी २०, १९२७ ला दुसऱ्यांदा भेट दिली. म्युनिसिपालिटीने केलेल्या नागरी सत्काराला उत्तर देताना ते म्हणाले होते : ' दारूबंदी करण्यासाठी तुम्ही लोकांना उत्कृष्ट साधने दाखविली आहेत. ' सोलापूरची कायदेभंगाची चळवळ ही दारूबंदीपासून सुरू झाली हे नैसर्गिकच होय.

एप्रिल ६, १९३० ला म्युनिसिपालिटीच्या इमारतीवर राष्ट्रीय ध्वज लावण्यात आला. एप्रिल २७ ला स्वदेशी आणि बहिष्काराच्या समित्या स्थापन करण्यात आल्या. एका सभेत परदेशी कापडाची खरेदी व विक्री करणार नाही असा परदेशी कापडाच्या व्यापाऱ्यांनी आपला निर्धार जाहीर केला. ६ एप्रिलला महाराष्ट्र कायदेभंग मंडळाने प्रसिद्ध केलेल्या पहिल्या पत्रकात परशुराम राठी यांना सोलापूरचे अधिकारी आणि ' डिक्टेटर ' नेमले असल्याचे जाहीर केले. राठी यांना अटक झाली आणि एप्रिल २२ ला त्यांना दोन वर्षे सश्रम कारावासाची शिक्षा झाली. शिवलाल बोरामणीकर यांनाही २ वर्षे सक्तमजुरीची शिक्षा झाली.

### गांधीजींना अटक

गांधीजींनी मार्च १२ ला साबरमतीचा सत्याग्रहाश्रम सोडला आणि दांडीयात्रा चालू केली. त्यांनी २४ दिवसांत २४१ मैलांची चाल करून दांडीला एप्रिल ६ ला मिठाचा कायदा मोडला. गांधीजींनी बंडाचे निशाण उभारले तेव्हा एकही पोलीस तेथे नव्हता.

एप्रिल ६ ते एप्रिल १३ हा राष्ट्रीय आठवडा साजरा करावा, मिठाचा कायदा तोडावा, दारूच्या व अफूच्या दुकानांवर तसेच परदेशी कापडाच्या दुकानांवर निरोधन करावे असे गांधीजींनी जनतेला आवाहन केले. या कार्यक्रमाने सर्व देश जणू बंड करूनच उठत होता.

सरकारनेही या सर्व हालचालींना जोराने प्रत्युत्तर दिले. हजारोंना अटक करण्यात आली व त्यांना तुरुंगात टाकले. सुभाषबाबू आणि जवाहरलाल यांना अटक झालीच होती. पोलिसांचे लाठीहल्ले, गोळीबार आणि सत्याग्रह्यांची धरपकड हा नित्याचाच मामला झाला. ' डायरशाहीसुद्धा यापुढे फिकी पडेल '[३] असे गांधीजी म्हणाले.

गांधीजींच्या या मोर्चामुळे लोकांत त्यांची फजिती होईल असे व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांना वाटत होते. म्हणून गांधीजींची उपेक्षा करून त्यांना मोठेपणा देण्याच्या ऐवजी त्यांचा उपहास करून त्यांना हुतात्मा न करण्याचे धोरण त्यांनी अवलंबिले.[४] गांधीजी दांडीला पोहचण्यापूर्वीच त्यांना अटक करावी असे मुंबई सरकारला वाटत होते; पण परिस्थितीत काही बदल झाला आहे हे मान्य करण्यास भारत सरकार तयार नव्हते.[५] गुजरातच्या बाहेर या मोर्च्याला अपेक्षेपेक्षा कमी प्रतिसाद मिळेल अशी आयर्विनची अपेक्षा होती.[६]

मे ४, रात्री १२-१५ ला गांधीजींना अटक झाली हे कळताच सर्व देशभर उत्स्फूर्त अशी निदर्शने झाली. मुंबईत संपूर्ण हरताळ (आजच्या भाषेत बंद) होता आणि ऐंशीपैकी चाळीस गिरण्यांतील कामगारांनी अटकेच्या निषेधार्थ गिरण्या बंद करून निदर्शनात भाग घेतला. अटकेबद्दल नापसंती व्यक्त करण्यासाठी कापड व्यापाऱ्यांनी सहा दिवसांचा हरताळ पाळण्याचा निर्णय जाहीर केला.

## ठिणगी पडली

बारा मार्च १९३० ला गांधीजींची दांडीयात्रा चालू झाली. भारताच्या इतिहासातील हा एक मोठा ऐतिहासिक क्षण होता. एका बलाढ्य साम्राज्याशी लढण्याकरिता एक सामान्य माणूस ७९ स्वयंसेवकांसह निघाला होता ! शेकडो मैलांचे अंतर पायी तोडून, गावोगावी प्रचार करून ६ एप्रिलला मिठाचा कायदा तोडण्यात येणार होता. हे क्रांतीचे प्रस्थान होते ! याने देशभर विद्युत्संचार केला ! इतर जिल्ह्यांप्रमाणे सोलापूर जिल्हा कायदेभंगाच्या प्रचाराने ढवळून निघाला. तालुक्याच्या व मोठ्या गावांतून शिबिरे स्थापन करण्यात आली. स्वयंसेवकांची नोंद करून महाराष्ट्र कायदेभंग मंडळाकडून आलेल्या हुकुमाप्रमाणे विर्लेपार्ले येथे मिठाच्या सत्याग्रहासाठी स्वयंसेवक पाठविण्यात येऊ लागले. गावातील कोनाकोपरा प्रचाराने ढवळून निघाला. मिठाचा कायदा तोडण्याप्रमाणेच बेकायदा मिठाची विक्री करणे हाही कार्यक्रमाचा एक महत्त्वाचा भाग होता. हा कार्यक्रमही या जिल्ह्यात सर्वत्र करण्यात आला. कायदेभंगाच्या करताच हरताळ, सभा, मिरवणुकी यांचा धडाका सारखा चालला होता. खादीप्रचार, अस्पृश्यतानिवारण याबरोबरच दारूबंदी हा एक महत्त्वाचा कार्यक्रम होता आणि त्याचा सतत प्रचार चालूच होता.

गुजरातेतील एका गावात महात्माजींनी-दारूबंदीचा प्रचार म्हणून शिंदीचे झाडच तोडले व सर्वांना तसे करण्यास सांगितले. ही वार्ताही वर्तमानपत्रात आली.

तारीख ५ रोजी महात्माजींना पकडण्यात आले. हरताळ, सभा, व्याख्याने यांची गर्दी आढळली. ही बातमी सोलापूरात रात्री १०-२१ च्या सुमारास पोचली. त्याबरोबर स्वयंसेवकांनी मिरवणूक काढून ही वार्ता सर्वत्र पसरविली. मिरवणुकीच्या अग्रभागी होते सत्तर वर्षांचे श्रीनिवास काडगांवकर. त्यांच्या ' पकडे गये गांधीजी अब तो यह नींद छोडो ' या गीताच्या पल्लेदार ललकारीने त्यांनी शहर जागे केले. टिळक पुतळ्याजवळून फलटण गल्ली, अशी ही मिरवणूक निघाली. ' नहीं रखनी, सरकार जालिम नहीं रखनी ' या गीताचा नारा चालू होताच. रेवणसिद्धच्या बसवंती त्यांना स्फूर्ती देत होते. मीठ गल्ली, सराफबाजार, भुसारबाजार अशा मार्गाने ही मिरवणूक कुंभारवेशीच्याही पुढे गेली. गांधीजी व वंदे मातरमच्या घोषणा सतत होत होत्याच. भुसार गल्ली, अडतबाजार, बोरामणी रस्ता, सिव्हिल हॉस्पिटल, सदरबाजार, मोदी या भागांतून जाईपर्यंत मिरवणुकीला नवीनच स्वरूप प्राप्त झाले. एका बगीत गांधींचा फोटो ठेवण्यात आला. अशी ही मिरवणूक वारद गिरणीच्या कोपऱ्यावर आली तेव्हा उजाडले होते.

उजाडताच सर्वांच्या तोंडी एकच विषय महात्माजींची अटक. लोकांनी स्वयंस्फूर्तीने हरताळ पाळला. दुकाने बंद झाली. बालगोपालांच्या मिरवणुकी निघू लागल्या. कामगारांनी गिरण्या बंद पाडल्या. अग्रभागी कुरबान हुसेन, शिंदे हे कामगार पुढारी होते. अटकेच्या निषेधार्थ महात्माजींच्या फोटोची प्रचंड मिरवणूक काढण्यात आली.

दुपारी कलेक्टर एच्. एफ्. नाईट यांनी शहरातील प्रतिष्ठित व्यापारी व पुढारी यांची एक बैठक आपल्या बंगल्यावर बोलावली, आणि त्या बैठकीत शहरात शांतता ठेवण्याविषयी आवाहन केले. सर्वांनी तसे आश्वासनही दिले. गिरण्या बाजार सुरू झाले म्हणजे लोक आपापल्या व्यवसायात गुंततील म्हणून त्या दृष्टीने प्रयत्न करण्याचे ठरले.

दुपारी महिलांची एक मिरवणूक निघाली. दुपारी श्रद्धानन्द मंडळाच्या २०/२५ कार्यकर्त्यांनी एकत्र जमून नवीनच कल्पना मांडली. दारूमुळे गरिबांच्या संसाराचा नाश होतो म्हणून ज्यापासून दारू तयार करतात ती शिंदीची झाडेच तोडण्याचा सत्याग्रह करावा ही कल्पना तरुणांनी उचलून धरली आणि चौदा कमानीजवळील ६०/७० शिंदीची झाडे तोडण्यात आली. एका जमावाने मद्रास मेल अडवली.

सायंकाळी ६ वाजता साखरपेठेत व रात्री टिळक चौकात झालेल्या सभेत रामकृष्णजी जाजू हे अध्यक्ष होते. टिळक चौकातील सभेत कुरबान हुसेन, जगन्नाथ शिंदे, डॉ. अंत्रोळीकर, महाजन वकील, सिद्रामप्पा फुलारी, रामभाऊ राजवाडे, शेठ गुलाबचंद, नगराध्यक्ष शेठ माणिकचंद, कवि कुंजविहारी इत्यादींची प्रभावी भाषणे झाली. या सभेत चौदाकमानीजवळ शिंदीची झाडे तोडण्याचा सत्याग्रह करण्यात आल्याचे जाहीर झाले. शेठ गुलाबचंदांनी महात्माजींच्या अटकेपूर्वी दारू आणि शस्त्रे विकणाऱ्यांकडून परवाने काढून घेण्यात आले याबद्दल काँग्रेस

कमिटीतर्फे आश्चर्य व्यक्त केले. '' स्वराज्याची चळवळ ही पोटापाण्याची चळवळ आहे '' असे माणिकचंद म्हणाले. जाजूंनी कॉंग्रेस कमिटीतर्फे आता कार्यक्रम होणार नाही असे जाहीर केले.

त्याच ठिकाणी युवक संघातर्फे डॉ. अंत्रोळीकरांच्या अध्यक्षतेखाली सभा भरविण्यात आली. जगन्नाथ शिंदे यांचे भाषण झाले. गांधीजींच्या अटकेनिमित्त सर्वांनी, गिरणी कामगारांनीसुद्धा, तो दिवस हरताळ पाळावा असा आदेश देण्यात आला.

विष्णु-लक्ष्मी गिरणीपासून वारद गिरणीपर्यंत जमलेला तो कामगारांचा उत्साही जमाव, समोर पोलिस असे दृश्य तारीख ७ रोजी सकाळी दिसले. काही वेळाने कामगार-पोलिस झटापटही झाली. कलेक्टर व डी. एस्. पी. हेही दगडफेकीतून सुटले नाहीत. महात्माजींचा जयजयकार सर्वत्र चालूच होता. चौत्रा नाक्याला आग लागली. पोलिस परकीय सरकारचे प्रतीक म्हणून त्यांच्यावर लोकांचा राग. त्यांची हुर्यो करण्यात आली. त्यांच्या डोक्यावर गांधी टोप्या घालण्यात आल्या. थोड्या वेळाने हा जमाव पांगला तरी गावात छोट्या छोट्या मिरवणुका निघतच होत्या. ' नहीं रखनी ' चा नारा चालूच होता. रात्री गांधी व नेहरू चौकात जाहीर सभा झाल्या. गांधी चौकातील सभेचे अध्यक्ष ' गझनफर ' चे कार्यकारी संपादक एम. बी. पठाण होते. युवक संघाच्या नेत्याबरोबर जाजू व जाधव यांचीही भाषणे झाली. त्यांनी संयम पाळा असे आवाहन केले. ' .... पं. नेहरू ज्या दिवशी पंतप्रधान म्हणून प्रिन्स ऑफ वेल्सच्या बरोबरीने हस्तांदोलन करतील तोपर्यंत चळवळीचा डोंब असाच पेटत राहील ' असे सांगण्यात आले. जगन्नाथ शिंदे यांनी कामगारांनी कामावर जावे, हुल्लडबाजी करू नये असे आवाहन केले.

गांधीजींच्या अटकेची वार्ता सोलापुरात धडकली, आणि मिरवणुका, सभा आणि कामगारांचे संप यांना उधाणच आले. सोलापूरचे प्रसिद्ध कॉंग्रेस कार्यकर्ते जाजू म्हणाले, ' गांधींना जर इंग्रज अटक करतील तर ते राज्य गमावतील ' या बाबतीत सरकारी पत्रक म्हणते, '' ....गांधी जरी हिंसात्मक उद्रेकांबाबत दुःख व्यक्त करीत असतात, तरी त्यांच्या बेलगाम अशा अनुयायांच्या कृत्यांबाबतचा त्यांच्या निषेधाचा परिणाम कमीकमीच झाला आहे, आणि ते त्यांना काबूत ठेवू शकत नाहीत हे आता उघड झाले आहे. ''[७]

सोलापूरच्या यूथ लीगचे कार्यकर्ते डॉ. अंत्रोळीकर, कुरबान हुसेन, जगन्नाथ शिंदे, कवि कुंजविहारी इत्यादींनी सोलापुरात प्रचंड मिरवणूक संघटित करायला सुरुवात केली. इतर पुढारी त्यांना येऊन मिळाले. सोलापूरच्या इतिहासात ही घटना अपूर्व होती. ही मिरवणूक रूपा भवानी देवळाच्या बाजूला गेली. उत्स्फूर्तपणे ताडीची झाडे तोडण्याचा कार्यक्रम वेगात चालू झाला. हा कार्यक्रम कॉंग्रेस कमिटीने हाती घेतला नव्हता.[८] सशस्त्र पोलिस, काही पोलिस अधिकारी आणि सार्जंट हॉल घटनास्थळी पोचले. सात-आठ लोकांना पकडण्यात आले. जिल्हाधिकारी नाईट स्वतः त्या जागी आला. त्याच्या रोखाने दगडफेक झाली. वादळी आणि अमर्याद वा बेफाम अशांच्या गराड्यात डी. एस. पी. व कलेक्टर सापडले होते. टेलिफोनच्या तारा तोडण्यात आल्या. लोक ' गांधी की जय ' च्या घोषणा देत होते. दगडफेक थांबवण्याच्या कलेक्टरच्या आवाहनाला लोकांनी दाद दिली नाही. पकडलेल्या लोकांना सोडा

हीच लोकांची मागणी होती. अशा वेळी शंकर शिवदारे हा एक विशीतला तरुण काँग्रेसचे निशाण घेऊन घोषणा देत कलेक्टरपुढे उभा ठाकला, पण एका सार्जंटने त्याला गोळीने टिपले. सरकारी मोटारीवर दगडांचा मारा चालू झाला. अशा वेळी प्रसंग पाहून मल्लाप्पा धनशेट्टी जमावात घुसले आणि त्यांनी सरकारी ऑफिसरांना संरक्षण दिले. अशा वेळी कलेक्टरने तो भाग सोडला. त्याने पोलिसांना गोळीबाराचा हुकूम दिला. तीन लोक तत्काळ गतप्राण झाले.[९] मे ९ च्या मुंबईच्या ' टाइम्स ऑफ इंडिया ' पत्रात ' दंगेखोरांनी कित्येक दुकाने लुटली ' अशी वार्ता आली, पण पोलिसांच्या अहवालात अशी घटना घडल्याची नोंद नव्हती. हा गोळीबार सरकारी अधिकाऱ्यांनी भीतीपोटी केला असाच पोलिसांचा अहवाल आहे.

शिवदारे यांच्या मृत्यूनंतर जमावात सूडाची भावना बळावली. मंगळवार पेठ पोलीस चौकीवर चार पोलिसांचा पहारा होता. खवळलेला जमाव पोलिस चौकीकडे येत आहे हे पाहताच दोन पोलीस पळून गेले, आणि राहिलेल्या दोनही पोलिसांना जमावाने जाळून मारले. तेथील फर्निचर जाळले. पोलिसांना जमावाने ' महात्मा गांधी की जय ' म्हणावयास लावले. वामन झांबरे या पोलिसाने बादशहा पंचम जॉर्जचा फोटो पायाखाली तुडवला, म्हणूनच तो वाचला. दोन पोलिसांना जाळून मारले, ही वार्ता गावातील पोलिसांना कळताच ते पोलीस चौक्या सोडून पळून गेले. काही सोलापूर शहरच सोडून गेले. एका निवृत्त पोलीस इन्स्पेक्टरने (जो १९३० मध्ये सोलापूरला साधा कॉन्स्टेबल होता) लेखकाला सांगितले की (१९७८) ' आपले प्राण वाचवा, वाटल्यास गाव सोडा ' अशा तोंडी आज्ञा पोलिसांना दिल्या होत्या. सर्व अधिकारी ब्रिटिश होते. त्यांनी आपल्या कुटुंबियांना खास गाडीने सुरक्षित ठिकाणी पाठविण्याची व्यवस्था केली.

' न्यूयॉर्क टाइम्स ' ने सोलापुरातील घटनांची वार्ता खालीलप्रमाणे पहिल्या पानावर दिली: ' लढाईच्या धुमश्चक्रीनंतर गांधींच्या लढाऊ अनुयायांनी शहराचा ताबा घेतला आहे. २५ जणांना मृत्यू आला. ब्रिटिशांनी अधिक सैन्य आणले आहे. दंगेखोर जमावाने सरकारी प्रतिकार मोडून त्यांना रेल्वे स्टेशनाकडे रेटले आहे. ब्रिटिशांची कुटुंबे पळून गेली ' (९-५-१९३०).

कोर्टाची इमारतही आगीच्या भक्ष्यस्थानी पडली. दुपारी बारा वाजल्यानंतर (ता. ८ मे) सर्वत्र शांतता झाली. गोळीबार चालूच होता. दुपारी १ ते ७, ९ जण मृत्यूमुखी पडले, आणि २३ जण जखमी झाले. काही मुलकी आणि पोलीस अधिकारी संरक्षणाखाली रेल्वे स्टेशनात गेले होते. कलेक्टर आणि डी. एस. पी. यांनी सोलापूर सोडले, आणि ते रजेवर गेले.[१०] सिटी मॅजिस्ट्रेट खान आणि पुष्कळसे पोलिस शहरातून पळून गेले. (' केसरी ' ता. १३-५-१९३० आणि ' बॉंबे क्रॉनिकल ' ता. ९-५-१९३०) पोलिसांच्या दप्तरातील अहवालात, जमावात दोन हजार लोक होते, हे सांगितलेले नाही. जमाव हा जर इतका मोठा असेल, तर पोलिसांनी त्याचा उल्लेख त्यांच्या अहवालात केला असता.

मे ८ च्या दुपारनंतर लोकांनी काही अत्याचार केले नाहीत हे पाहून डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटने ता. ९ मे ला शहरातील प्रमुख नागरिकांची सभा बोलावली. शांतता समित्या स्थापन करण्यात आल्या. रावबहादूर मुळे, म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष माणेक शहा, विष्णु गिरणीचे मॅनेजर अब्दुल लतीफ अशा नागरिकांना स्पेशल मॅजिस्ट्रेट (खास न्यायदंडाधिकारी) नेमण्यात आले. माणेक शहांनी राजीनामा दिला, इंडियन पीनल कोडच्या १४४ कलमाखाली (जमावबंदी) काढलेल्या प्रतिबंधात्मक हुकुमाला धाब्यावर बसवून शहरातून एक हजार लोकांनी काढलेल्या मिरवणुकीबाबत धोरण काय ठेवायचे याबाबत त्यांचा मतभेद झाला होता. वालचंद हिराचंद आणि लालजी नारायण या उद्योगपतींनी पुण्यात हॉटसन (गृहमंत्री) यांची भेट घेऊन सोलापुरातील परिस्थिती आता पूर्ववत् झाली आहे असे त्यांना सांगितले. सोलापुरात शांतता आणि सुव्यवस्था एकाच मार्गाने साध्य होईल आणि ती म्हणजे लष्करी कायदा असे हॉटसनने त्यांना सांगितले![११] यावर ' पॉलिटिक्स ' ने ' बाँबे क्रॉनिकल ' मध्ये टीका केली. ' लष्करी कायदा म्हणजे बेकायदेशीरपणा नव्हे; त्याने लोकांचे रक्षण झाले पाहिजे, आणि समाजाची विस्कटलेली घडी पूर्ववत बसवली पाहिजे. '

काही लोक ' चांद कमानी ' भागाकडे गेले आणि त्यांनी रेल्वेच्या रुळांवरच बैठक मारली. त्यामुळे मद्रास मेल थांबवावी लागली. लोकांकडून दगडांचा मारा चाललाच होता. मद्रास मेलच्या अँग्लो-इंडियन ड्रायव्हरने लोकांची क्षमा मागितली मगच त्या गाडीला पुढच्या प्रवासाला जाता आले. तेथे जमलेल्या लोकांनी आसपासची ताडीची झाडे तोडण्यास सुरुवात केली. सुमारे सत्तर झाडे तोडण्यात आली. ताडीची झाडे तोडणे हा दारूबंदी करण्याचा प्रभावी मार्ग असल्याचे त्यांना वाटत होते.

### बेदरकार गोळीबार

९ मे ला सशस्त्र पोलिस असलेल्या दोन लॉऱ्या (त्यात अनेक सार्जंटही होते) ताशी ४० ते ५० मैल वेगाने शहरातून भरधाव नेण्यात आल्या. त्यातील पोलिसांनी दुपारी १-३० ते ७-३० या वेळेत बेदरकार गोळीबार करून २५ जणांचे मुडदे पाडले आणि पन्नासजणांना जखमी केले.[१२]

' कर्मयोगी ' या स्थानिक पत्राने गोळीबारात मृत्यू पावलेल्यांची नावे प्रसिद्ध केली. या गोळीबारावरून दिसले की गांधी टोपी घालणाऱ्यांवर टिपून गोळ्या झाडल्या होत्या. कुत्र्याला गोळी घालणे व माणसाला गोळी घालणे यात काही फरक केला जात नव्हता ! डोक्यावरील गांधी टोपी फेकून द्यायला पोलिसांनी भाग पाडले. मृत्यू पावलेल्या व्यक्तींचा पंचनामा करण्याची काळजीसुद्धा त्यांनी केली नाही. पोलिस हे भेकड होते. शेकडोंनी प्राण वाचवण्यासाठी गाव सोडला. कोर्टाची इमारत चार तास जळत होती, पण एकही पोलिस वा मुलकी नोकर ती आग विझवण्यासाठी धावला नाही. निरपराध वा निष्पाप अशा निःशस्त्र लोकांवर गोळ्या झाडण्यातच त्यांना पुरुषार्थ वाटत होता![१३]

तारीख मे १० ला डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटने इंडियन पीनल कोडचे १४४ (जमावबंदीचे) कलम शहराला लागू केले.

या सगळ्या घटनांची मुंबईच्या ' टाइम्स ऑफ इंडिया ' ने चुकीची आणि प्रक्षोभक अशी बातमी दिली. सहा पोलिसांना जाळून मारण्यात आले आणि कित्येक चौक्या जाळण्यात आल्या, अशी बातमी ' टाइम्स ' ने छापली (वस्तुतः दोन पोलीस व एक चौकी जाळण्यात आली).

जातीय सलोखा बिघडेल अशा बातम्या देण्याबद्दल स्थानिक ' कल्पतरु ' (तारीख ११ मे १९३०) पत्राने ' टाइम्स ' चा निषेध केला. या संदर्भात अब्दुल रसूल कुरबान हुसेन यांनी त्यांच्या ' गझनफर ' (सिंह) या पत्रात ' काफर ' याचे विवेचन केले. महंमद पैगंबरांनी ' काफर ' म्हणून ज्यू आणि युरोपियन यांचा उल्लेख केला होता, हिंदूसाठी तो नव्हता. नवीन धर्माची स्थापना केली तेव्हा त्यांच्या नजरेपुढे ज्यू आणि इंग्रज होते.

तारीख १२ मे शांततामय दिवस होता असे ' टाइम्स ' ने १३ मे च्या अंकात वृत्त दिले. ८ मे नंतरच्या चार दिवसांच्या प्रक्षोभक घडामोडीनंतर तो दिवस शांततेत गेला. युद्ध, बंड किंवा प्रस्थापितांविरुद्ध बंड अशा प्रकारची लष्करी कायदा पुकारण्याचे समर्थन करण्यासारखी परिस्थिती सोलापुरात नव्हती.[१४]

सोलापुरातील सरकारी अधिकारी आणि युरोपियनांची बायकामुले खास आगगाडीने पुण्यास वा इतरत्र पाठविली, तेव्हा डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनी त्यांचा ' निर्वासित ' असा उल्लेख केला.[१५] सरकार किती भयभीत झाले होते हेच यावरून दिसते.

कोर्टाची इमारत जाळणे, दोन पोलिसांचा मृत्यू या ८ मे च्या घटनांमुळे अधिकारी भडकले. शहरातील पोलिस, शहर पोलीस चौकीवरच केंद्रित करण्यात आले ते आणि सशस्त्र पोलीस लॉऱ्यांतून गस्त घालण्याचे काम करीत होते. ' पोलिसांना आत्मरक्षणार्थ गोळीबार करावा लागला ' असे डायरेक्टर ऑफ इन्फर्मेशनने आपल्या अहवालात म्हटले आहे. तारीख ११ च्या रात्री ११ वाजता पुण्याहून सैनिकांच्या तुकड्या आल्या आणि सैन्य आणि पोलीस यांची गस्त गावभर चालू झाली. चौदा वर्षांचा रानडे नावाचा एक शाळकरी मुलगा त्याच्या घराच्या गच्चीत उभा राहिला असता गोळीने त्याच्या डोक्याची कवटीच उडविण्यात आली. पोलीस चौक्या ओस पडल्या होत्या, त्यात पोलीसच नव्हते; कारण एक तर पोलीस जीव वाचविण्यासाठी पळाले किंवा त्यांना टाळा लावून तरी गेले. मुले व बायका यांना मारण्यातच ते रमले. जाळून मारलेले दोन्हीही पोलिस मुसलमान होते, म्हणून या प्रकरणाला जातीय रंग देण्याचा ' टाइम्स ' आदि पत्रांनी प्रयत्न केला; पण परकी सत्तेचे प्रतिनिधी म्हणूनच त्यांची आहुती पडली. ' कर्मयोगी ' पत्राचे संपादक राजवाडे हे प्रतियोगी, सहकारवादी व हिंदुसभावादी होते आणि ते जनतेमागे ठाम उभे होते. ' टाइम्स ' च्या खोडसाळ बातमीचा त्यांनी निषेध केला.

डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट एच. एफ. नाईट यांनी '' मेकॉनकी थिएटरजवळ लॉरीत असलेले काही पोलिस बेछूटपणे गोळीबार करीत होते आणि त्यामुळे आरोपी क्रमांक ४, १७, १८, १९, २०, २५, २३ व २४ या मृत्यू पावलेल्या आठजणांना गोळ्यांनी मृत्यू आला याबद्दल मला शंका नाही, याची मला भीती वाटते '' असे काढलेले उद्‌गार सूचक आहेत. कोर्टापुढे झालेल्या प्रतिज्ञालेखात (ॲफिडेव्हिट) त्यांनी आणखी म्हटले, '' ....नेहमीच्या रिव्हॉल्व्हरशिवाय सार्जंटनी ३०३ रायफल शॉट गन, चार स्मूथ बोअर्स आणि तीन चापाच्या बंदुका यांचा उपयोग केला असावा....मेकॉनकी थिएटरजवळील गोळीबार हा पुष्कळसा कॉन्स्टेबलनी केला असावा असे मला वाटते.'' शेवटी नाईट यांनी '' गोळीबार बेछूट होता अशी कबुलीच यामुळे घेतली जाईल; पण काँग्रेसच्या चौकशी कमिशनपुढे जुलूमजबरदस्तीचा ' पुरावा ' नाहीसा केल्यासारखेच ते होणार आहे. '' त्यांच्या प्रतिज्ञालेखात नाईट आणखी म्हणाले, '' ......... ८ मे ला पोलिसांवर झालेल्या हल्ल्यानंतर त्या दिवशीच्या सायंकाळी गावातून पोलीस माघारी घ्यावेत, नाहीतर मालेगाव आणि चौरीचौरा येथील घटनांची पुनरावृत्ती होईल असे मला वाटले. तारीख ८ मे ला रूपाभवानीजवळ मी बंदुकीच्या दोन फैरी झाडण्याचा हुकूम दिला; दुपारी १२-१५ वाजता आणखी दोन फैरी झाडण्याचा हुकूम दिला. '' पण त्याच परिच्छेदात त्यांनी म्हटले, '' किती फैरी झाडल्या हे मला निश्चित माहीत नाही; पण जमाव जेव्हा पांगला तेव्हा गोळीबार थांबविण्यात आला. '' भुसार गल्लीत ' धान्याच्या पोत्यांनी रस्ता रोखला होता. ' ' पोलीस इन्स्पेक्टरने तीन फैरी झाडण्याचा हुकूम दिला, पण त्यापेक्षा अधिक फैरी झाडण्यात आल्या आहेत. ' रिव्हाल्व्हरच्या गोळीबाराबाबत नाईट पुढे म्हणाले, ' किती गोळ्या झाडल्या हे नक्की सांगता येत नाही, कारण अधिकाऱ्याजवळ काही प्रमाणात खाजगी दारूगोळा असतो. ' ' त्यांच्या अंदाजाप्रमाणे ७७ ते ८७ फैरी झाडल्या असाव्यात; ' पण ' ... प्रत्येक ठिकाणी कितीजणांचा मृत्यू झाला हे मी सांगू शकत नाही ' असेही शेवटी म्हटले.[१६] डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट नाईट आणखी म्हणाले, '' ... मेकॉनकी थिएटरजवळील एका प्रसंगी ८ मे च्या दंगलीच्या सायंकाळी काही पोलिसांनी वरिष्ठांच्या आज्ञेविना गोळीबार केला आणि दुसऱ्या ठिकाणी त्यांनी तसाच गोळीबार केला असण्याची शक्यता असल्याची माझी खात्री आहे. ''[१७]

## लष्करी कायदा पुकारला

तारीख १२ मे ला सोलापुरात लष्करी कायदा पुकारण्यात आला. त्यासंबंधीचे प्रकटन वृत्तपत्रात प्रसिद्ध करण्यात आले. त्याबाबतचा व्हाइसरॉयचा वटहुकूम खालीलप्रमाणे होता : '' लष्कराच्या साह्याने मुलकी अधिकारी शांतता प्रस्थापित करणे आणि शहराचा पुन: ताबा मिळवणे ही कामे करण्यास असमर्थ आहेत. त्यामुळे मुलकी अधिकाऱ्यांच्या विनंतीवरून कायदा आणि सुव्यवस्था प्रस्थापित करण्याचे कार्य लष्कराने स्वीकारले आहे. मुंबई सरकारने या कृतीला मान्यता दिली आहे, कारण ती आवश्यक आहे आणि लष्करी कायद्याचे प्रशासन नियमित

करण्यासाठी अशा प्रकारचा वटहुकूम काढण्यासाठी माझ्या सरकारला प्रवृत्त केले. सोलापुरात काही काळापुरता लष्करी कायदा चालू करणे अवश्य आहे याबाबत समाधान झाल्याने, भारत सरकार कायदा कलम ७२ अन्वये मला जे अधिकार प्राप्त झाले आहेत त्यानुसार मी हा वटहुकूम पुकारीत आहे. यायोगे लष्करी कायद्याच्या प्रशासनासाठी नियम तयार करण्याचे तसेच त्यासंबंधी आणखी आवश्यक तरतुदी करण्याचे अधिकार लष्करी अधिकाऱ्यांना देण्यात येत आहेत. ''[१८]

सोलापूर लष्करी कायदा वटहुकूम, १९३० (१९३० चा iv) (17th ऑर्डर नंबर S. D. 9666-A) गव्हर्नर-जनरलने प्रसिद्ध केला. सोलापुरात काही विशिष्ट ठिकाणीच लष्करी कायदा लागू करावा असे स्थानिक अधिकाऱ्यांचे मत होते. १८ मे १९३० ला दुपारी ३-४५ वाजता सोलापुरात लष्करी कायदा लागू झाला.

तारीख १३ ते १८ मे १९३० च्या दरम्यान लष्करी अधिकाऱ्यांनी लष्करी कायदा न मानणाऱ्यांविरुद्ध काही खटले चालविले आणि आरोपींना शिक्षाही ठोठावल्या; पण १८ मे, ३-४५ वाजता कायदा लागू करण्यापूर्वी लष्करी अधिकाऱ्यांनी खटले चालवण्याचे काम थांबवले. नवीन खटले चालवले नाहीत वा शिक्षा दिल्या नाहीत.

सोलापुरातील लष्करी कायद्याचे प्रशासन करण्यासाठी ले. क. सी. पी. पेज यांची नियुक्ती करण्यात आली होती. जागेवर जो अधिकारी असेल त्याच्या निर्णयशक्तीवर सर्व सोपवण्यात आले. बातम्यांवर प्रसिद्धिपूर्व नियंत्रण होते. बातम्यांच्या विश्वासार्हतेविषयी लोकांत जी अस्वस्थता वा घबराट निर्माण होई ती घालविण्यासाठी मुंबई सरकारने काही पावले उचलली आहेत की नाही असा योग्य सवाल ' बॉंबे क्रॉनिकल ' ने विचारला. पुण्याच्या ' केसरी ' आणि ' ज्ञानप्रकाश ' या पत्रांनी त्यांच्या अग्रलेखातून (तारीख १३ मे १९३०) हिंसात्मक घटनांचा निषेध केला. लालजी नारायणजी हे कौन्सिलचे सदस्य व उद्योगपती. ते काही ' बेजबाबदार ' नव्हेत; पण तेही ' लष्करी कायदा असमर्थनीय होता ' असे म्हणाले (' बॉंबे क्रॉनिकल ' १४ मे १९३०). शेट वालचंद हिराचंद यांनीही वरील विधानाला दुजोराच दिला. मुलकी अधिकाऱ्यांनी जबाबदारी टाळणे आणि क्षुल्लक गोष्टींनी हतबल होणे यामुळेच हा लष्करी कायदा पुकारावा लागला असे लालजी पुढे म्हणाले.

गांधी टोपी आणि खादी कपड्यांवर बंदी आली. इंडियन मर्चंट्स चेंबरच्या कमिटीने व्हाइसरॉयला पाठविलेल्या तारेत म्हटले, '' गांधी टोपी व खादी कपड्यावरील बंदीने राष्ट्रीय भावना दुखावली जात आहे.....लष्करी कायदा प्रशासनात लोकांवर अमानुष जुलूम होत आहे व अत्याचार वाढत आहेत ' (बॉंबे क्रॉनिकल). लष्करी कायदा प्रशासनात झालेल्या दुष्कृत्यांविरुद्ध याचिका दाखल करण्यासाठी एखादे खास कोर्ट (ट्रायब्यूनल) नव्हते. लष्करी कायदा एकूण सहा आठवडे जारी होता. ' केसरी ' (तारीख २ जून १९३०) आणि

' ज्ञानप्रकाश ' (१५ मे १९३० व २१ जून १९३०) यांनी हा लष्करी कायदा उठवावा म्हणून अग्रलेख लिहिले. एखादी निःपक्षपाती चौकशी समिती नेमावी असे ' बाँबे क्रॉनिकल ' ने म्हटले(तारीख २० मे १९३०). महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स, मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटी, कर्नाटक प्रांतिक काँग्रेस कमिटी यांनी सरकारने हा लष्करी कायदा मागे घ्यावा म्हणून सरकारला आग्रहाने सांगितले; कारण त्यायोगे सर्व व्यापार थंडावलाच आहे (मुंबई, तारीख २ व ३ जून १९३०).

काँग्रेसच्या हंगामी अध्यक्षांनी वर्तमानपत्रासंबंधीच्या वटहुकुमाचा निषेध केला; कारण हा संस्कृतीवर अत्याचारच होता आणि त्या वटहुकुमाच्या कायदाविरोधी तरतुदीपुढे मान तुकविण्यास ज्यांनी नकार दिला अशा वर्तमानपत्रांच्या कृती सरकारपुढे मोठ्या स्वरूपात (दडपशाहीसाठी) येऊ लागल्या. यामुळे वर्तमानपत्रे बंद पडू लागली आणि जी पुनः सुरू झाली, तीही बंद झाली. अँग्लो-इंडियन पत्रांवर बहिष्कार घालण्यास त्यांनी सांगितले (तारीख ३० मे १९३०).[१९]

काँग्रेस वर्किंग कमिटीच्या (तारीख १२ ते २५ मे १९३०) कामकाजासंबंधी अखिल भारतीय काँग्रेस कमिटीने खालीलप्रमाणे ठराव केला :–" सोलापुरातील क्लेशदायी घटनांबाबत ही कमिटी दुःख व्यक्त करीत आहे आणि त्या शहरात लष्करी कायदा पुकारला गेला यामुळे भीती आणि त्वेष जनतेत निर्माण झाला आहे. या अत्याचाराला ज्यांना तोंड द्यावे लागत आहे त्यांच्याबद्दल सहानुभूती व्यक्त करतो. शहराचे नागरिक अहिंसात्मक मार्गापासून ढळणार नाहीत, तसेच लष्करी कायदा वा इतर अत्याचारी मार्गांमुळे भयभीत होणार नाहीत असा आम्हांला विश्वास वाटतो. महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटी या सर्व प्रकरणाची चौकशी करील आणि नागरिकांचे दुःख हलके करण्याचा प्रयत्न करील अशी या कमिटीला आशा वाटते. "

सोलापूर प्रकरणासंबंधीचा ठराव (नंबर ११) खालीलप्रमाणे आहे :–(अलाहाबाद, १७ जून १९३०) " ...सोलापूरपासून ४५ मैल दूर असलेल्या पंढरपुरातील एकादशीचा सोहळा संपेपर्यंत लष्करी कायदा चालू ठेवावा अशी मुंबई सरकारला काही प्रमुख नागरिकांनी विनंती केली आहे हे वाचून कमिटीला आश्चर्य वाटते. लष्करी कायदा कोणत्याही रीतीने समर्थनीय नाही, असे सोलापूरवासियांना वाटते आणि तसेच तो चालू ठेवण्यास त्यांचा विरोध आहे. यासंबंधी कमिटीजवळ विश्वसनीय माहिती आहे. मुंबई सरकारच्या म्हणण्याप्रमाणे लष्करी कायदा इतका दीर्घकाळ चालू ठेवणे समर्थनीय नाही आणि तो यापुढे चालू ठेवणे हे ढोंगीपणाचे आहे असे विचार करून आपले मत झाले असल्याचे कमिटीने नमूद केले आहे. दीर्घकाळ आपत्ती सहन केलेल्या लोकांची हिंमत खच्ची करणे हेच हा कायदा चालू ठेवण्याचे एकमेव उद्दिष्ट आहे याबाबत कमिटीची खात्री झाली आहे. "

भारत सरकारने ११ मे १९३० रोजी लंडनला पाठविलेल्या तारेत ' क्षीण होत जाणाऱ्या ' मिठाच्या मोहिमेचा आढावा घेतला व गांधींच्या अटकेनंतर कलकत्ता, दिल्ली आणि सोलापूर येथे उत्स्फूर्तपणे झालेले दंगे गंभीर स्वरूपाचे होते असे म्हटले आहे. नंतर ' ही चळवळ अहिंसात्मक होती असा दावा करणाऱ्यांच्या विधानातील पोकळपणा वाढत्या प्रमाणावर उघड होत आहे. ''

पोलीस आणि लष्कर यांच्या हस्तक्षेपामुळे परिस्थिती अधिक गुंतागुंतीची झाली असे अमेरिकन कॉन्सल-जनरलने म्हटले आहे. '' ......अलीकडेच मुंबईत झालेल्या दंगलीत काँग्रेसच्या स्वयंसेवकांनी शांतता प्रस्थापित केली; इतकेच नव्हे तर काँग्रेसचे स्वयंसेवक नसलेल्या जखमी मुसलमानांना मदत करण्यात उत्कृष्ट बंधुभावना दाखवली '' (तारीख ३० मे १९३०).

मार्च १९३० मंध्ये भारतीय राष्ट्रीय काँग्रेसची शाखा अमेरिकेत नसल्याचे जाहीर झाल्यानंतर, शैलेंद्रनाथ घोष यांनी अमेरिकेत पत्रके काढणे व जाहीर सभा संघटित करणे चालूच ठेवले. भारतीय राष्ट्रीय काँग्रेसची अमेरिकन शाखा असे न म्हणता तो अमेरिकेची भारतीय राष्ट्रीय काँग्रेस असे म्हणे व त्यामार्फत कार्यक्रम करी. ८ मे १९३० ला सोलापुरात ज्या हिंसात्मक घटना घडल्या, तेव्हा लगेच या घोष महाशयांनी न्यूयॉर्कमध्ये पत्रक काढले. सोलापूर ' हस्तगत ' केले गेले याला फार मोठे महत्त्व आहे; कारण त्यामुळे ब्रिटिश लष्करापासून भारतीय जवान अलग पडले आणि त्यासाठी भारतीय बंडखोरांनी हाक दिली होती. स्वातंत्र्यासाठी भारतीय राष्ट्रवाद्यांना एक नवे केंद्र मिळाले; मुंबई हे असे केंद्र प्रथमपासून होतेच.[२०]

### लष्करी कायद्याचा वरवंटा

ज्यावेळी मुलकी सत्ता कारभार करू शकत नाही ती शरण येते, अशा वेळी प्रथम लष्कराची थोडी मदत घेऊन कारभार करण्याचा प्रयत्न होतो; परंतु तेही अशक्य झाले तर मग अखेरचा उपाय म्हणून सर्व प्रदेश लष्कराच्या ताब्यात देणे भाग असते. लष्करी अंमल पुकारण्याच्या अशा काही प्रथा असतात; पण सोलापूरला काहीच प्रथा पाळल्या गेल्या नाहीत. तारीख ८ रोजी जनतेच्या क्षोभाचा उद्रेक झाला, तेव्हा एकादेवेळी लष्कर आणणे कदाचित् योग्य म्हणता आले असते. तारीख ८ च्या लोकक्षोभानंतर वास्तविक सोलापूर शांतच होते. इतकेच नव्हे तर सामाजिक व राजकीय कार्यकर्त्यांनी लोकांना शांत करण्याचा प्रयत्न करून प्रशासनाला मदत करण्याचाच पवित्रा घेतला होता; पण कलेक्टर नाईटला हे कळले नाही. त्याने गृहमंत्री हॉटसनला लष्करी कायदा पुकारण्याचा सल्ला दिला, त्यामागील हेतू उघड दिसत होता. सरकारला लोकांवर सूड उगवायचा होता. (या ठिकाणी ' राज्य करणे म्हणजे सूड उगवणे नव्हे ' या लोकमान्यांच्या ' केसरी ' तील अग्रलेखाची आठवण होईल). शहरात जमावबंदीचे

(१४४) कलम लावलेलेच होते आणि काँग्रेसचे स्वयंसेवक वाहतुकीला मदत करीत असल्याचे सरकारी पत्रकात मान्यही केले होते.

तारीख १२ मे ची सायंकाळ. एक खास गाडी ४००/५०० गोरे सैनिक घेऊन सोलापुरात आली आणि त्या दिवशी रात्री ८-३० वाजता सोलापुरात लष्करी कायदा पुकारण्यात आला. शहर लष्कराच्या ताब्यात देण्यात आले. लष्करी कायद्याचा प्रशासक कर्नल पेज यांनी चौदा-कलमी जाहीरनामा प्रसिद्ध केला. तो सरकारी गॅझेटमध्ये प्रसिद्ध झाला पण तो कोणत्या भागाला लागू केला, (सोलापूरचा त्यात उल्लेख नव्हता) याचा निर्देश नसल्याने त्या लष्करी कायद्याचा अंमल बेकायदेशीरच होता. लष्करी कायदाच कायदेशीरपणे न पुकारला गेल्यामुळे त्याच्या अंमलाखालील सर्व कृत्ये बेकायदेशीरच होती, असा महत्त्वाचा मुद्दा रंगनाथ विष्णु लळित या कायदेपंडिताने उपस्थित केला. पुण्याचे बॅ. अ. ह. खाजगीवाले यांनी ६ सप्टेंबरच्या ' केसरी 'त ' सोलापूर येथील लष्करी कोर्टाच्या शिक्षा बेकायदेशीरच आहेत ' या शीर्षकाखाली लेख लिहिला. त्यायोगे सोलापूरच्या परिस्थितीकडे लक्ष वेधले गेले. कॉमन्स सभेतही याबाबत विचारणा झाली होती.

सोलापूरच्या लष्करी कायद्याच्या संदर्भात व्हाइसरॉय आयर्विन यांनी जादा ऑर्डिनन्स तारीख १५ रोजी काढला व तो तारीख १८ च्या गॅझेटात प्रसिद्ध झाला. या दहा-कलमी वटहुकुमाला लष्करी अधिकाऱ्यांनी आणखी आठ कलमे जोडली. अशा रीतीने लष्करी कायद्याचा अंमल अधिक कटाक्षाने कसा करता येईल याबाबत यंत्रणा सज्ज करण्यात आली. या सर्वांमुळे सामान्य नागरिक जीवन धोक्यात आले. जीवित किंवा वित्त याची शाश्वती राहिली नाही. अनेक ठिकाणच्या जागा सक्तीने ताब्यात घेण्यात आल्या. कायदेशीर विरोध ही बाब संपलीच होती. लष्करी शिपाई म्हणतील तोच कायदा असा भीषण प्रसंग आला. स्टेशनसमोरील भवानीराम धर्मशाळा, बुबणे यांचा बंगला, मेकॉनकी थिएटर, म्युनिसिपल मुलांची शाळा नंबर १, बाळी वेस, जैन बोर्डिंग, इंपीरियल बँक इत्यादी ठिकाणे ताब्यात घेण्यात आली व तेथे लष्करी शिपायांची ठाणी बसविण्यांत आली. मुख्य ठाणे स्टेशनसमोरील भवानीराम धर्मशाळेत ठेवण्यात आले आणि याच ठिकाणी कर्नल पेज हा बहुतांश वेळ राहत होता. चौका-चौकातून वाळूच्या थप्प्या लावून त्याआड मशिनगन्स ठेवत आणि त्यासभोवती लष्करी शिपायांचा सशस्त्र पहारा होता. रस्त्यारस्त्यातून सहा-सात शिपायांचा फिरता पहारा बसविण्यात आला होता यामुळे शहराला रणांगणाचेच स्वरूप प्राप्त झाले आणि सोलापूर ही समरभूमी करण्यात आली.

या सर्व शिपायांचा गांधी टोपीवर कटाक्ष असे. एखादा टोपी घालणारा दिसला की त्याच्यावर हल्ला करून टोपी ताब्यात घेत, हवेत भिरकावीत पायाखाली तुडवीत. याला भिऊन कोणी पळू लागला तर त्याला मारहाण करीत, त्याला सिगारेटचे चटके देत. त्यामुळे दहशतीचे वातावरण अधिकच वाढले. गांधी टोपीला मनाई केल्याचे जाहीर झाले नव्हते. त्यामुळे नागरिकांना अनन्वित हाल सहन करावे लागले. अशी घबराट निर्माण केल्यामुळे व्यापारी दुकानेही उघडीत नव्हते.

त्यामुळे नागरिकांच्या हालात भरच पडली. फलटण गल्लीतील वालचंद मोतीचंद या व्यापाऱ्याच्या घरावरील राष्ट्रीय निशाण पाहून त्यांना धक्के मारीत लष्करी कोर्टापुढे उभे करण्यात आले. प्रथम १० वर्षे शिक्षा सांगण्यात आली, पण अखेर २ हजार रुपये दंडावर निभावले ! लष्करी कोर्टापुढील हीच पहिली शिक्षा. नगराध्यक्ष माणिकचंद वीरचंद शहा यांना म्युनिसिपालिटीवरील राष्ट्रीय निशाण उतरायला सांगितले. त्यांनी नकार दिला. त्यांना कोर्टात प्रथम १० वर्षे शिक्षा व लाख रुपये दंड अशी अमानुष शिक्षा सांगण्यात आली, पण अखेर ६ महिने सक्तमजुरी व १० हजार रुपये दंडावर निभावले. कॉँग्रेस कमेटीचे अध्यक्ष रामकृष्ण जाजू आणि इतर कार्यकर्ते यांनाही लष्करी कोर्टापुढे उभे करण्यात आले. तुळशीदास जाधवांनी गांधी टोपी काढावी म्हणून छातीवर पिस्तुल रोखण्यात आले, त्यांनी नाकारताच मारहाण करीत लष्करी अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले. मारहाण व धक्काबुक्कीतून ते वाचले हे विशेष. किसन सारडा या प्रतिष्ठित व्यापाऱ्याला दोरखंडाने बांधून बेड्या घालून नेण्यात आले. जगन्नाथ शिंदे हेही लवकरच पकडले गेले. ' मल्लाप्पांनी गाव सोडावे ' असा सल्ला त्यांच्या स्नेह्यांनी दिला, पण त्या बहाद्दराने ' चामडी बचावून पळ काढणार नाही ' असे बाणेदार उत्तर दिले. तारीख १४ ला त्यांनाही गिरफदार करण्यात आले. ए. कुरबान हुसेन हे बाहेर कसे राहतील? त्यांच्यावरही घाला पडला व पकडलेल्या सर्वांना सिगारेटचे चटके, मारहाण सतत चालू होतीच.

पकडलेल्या सर्वांना लष्करी अधिकाऱ्यापुढे उभे करण्यात आले. ' तोंड पाहून शिक्षा ' देण्याचा धडाका चालू झाला. जाजू ५ व., तुळशीदास जाधव ७ व., व्यंकटेश देशपांडे ५ व., मल्लाप्पा धनशेट्टी २ व., किसन सारडा २ व., जगन्नाथ शिंदे १ व., कुरबान हुसेन १ व., सामंत १ व. अशा शिक्षा पुकारण्यात आल्या आणि हजारों रुपयांचा दंडही करण्यात आला. लष्करी अधिकारी इतके बेगुमानपणे वागले की मल्लाप्पांना १ दिवस अन्नपाणीही दिले नाही; त्यांच्या नातेवाइकांना त्यांची खुशालीही समजली नाही. पकडलेल्यांच्या नातेवाइकांनी त्यांना भेटण्याचा प्रयत्न केला, तर त्यांनाही मारहाण करण्यात आली. रामभाऊ राजवाडे, कवि कुंजविहारी हेही १ वर्ष शिक्षेचे मानकरी झाले. सर्वांना विजापुरास नेण्यात आले, पण राजवाडे यांना सोलापुरात ठेवून त्यांना दुसऱ्या दिवशी ७ वर्षे सक्तमजुरीची शिक्षा ठोठावण्यात आली. अपराध काय तर तारीख १२ चा ' कर्मयोगी ' या पत्राचा अंक प्रसिद्ध करणे! तारीख १३ ते १८ मे या काळात शिक्षा झालेल्या ६९ लोकांची यादी मुंबई कौन्सिलात सादर झाली, त्यात ३४ जणांना ७ वर्षे ते १ वर्ष अशा शिक्षा लष्करी अधिकाऱ्यांनी दिल्याचे नमूद होते. याशिवाय बंडू कृष्णाथ (वय १५) लष्करी कायदा कलम ८ अन्वये १० फटके, विश्वनाथ बाळकृष्ण (वय १६) कलम ६ व ११ अन्वये १५ फटके, राम वनाप्पा (कॉँग्रेस कमेटीतील कारकून, वय १५) कलम १३ अन्वये १५ फटके अशाही अमानुष शिक्षा देण्यात आल्या.

पंढरपूर, वळसंग या गावातही लष्करी शिपायांनी सामानाची नासधूस, माल लांबवणे असे प्रकार केले. नागरिकांना मारहाण करून दहशत बसवणे हा तर नित्याचाच प्रकार होता. गिरमल्लप्पा, सिद्रामप्पा, शिवप्पा वीरप्पा, गुरुबसप्पा, मलकप्पा, रूपसिंग गुरुसिद्धप्पा यांना प्रत्येकी १५ फटक्यांची शिक्षा देण्यात आली.

जे दोन शिपाई मारले गेले त्यांच्याबद्दल मुंबईच्या गव्हर्नरांनी सहानुभूती दर्शविणारा संदेश डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे पाठवला; पण सोलापूरची परिस्थिती शांत करण्यासाठी ' अवर्णनीय बहादुरी ' केलेल्या लष्करी शिपायांचे अभिनंदन करायला मात्र ते विसरले नाहीत! जनतेवर अत्याचार करणारांना ही शाबासकी !

मारवाडी कपाळावर लावीत असलेल्या तिलकाचा उच्चार करताच शिपायांना ' टिळक ' दिसत, अणि ' गंध ' सांगताच गांधींचा साक्षात्कार होई ! मोगलांच्या सैन्याला पाणी पितांनाही संताजी दिसे या गोष्टीची आठवण व्हावी ! तारीख ८ ते १३ मे या काळात पोलिस जिवाच्या भयाने गांव सोडून गेले होते. त्यांना त्यांच्या अधिकाऱ्यांनी तशा सूचनाच दिल्या होत्या, असे या सोलापूर प्रकरणाचा अभ्यास करीत असताना मला एका निवृत्त पोलिस अधिकाऱ्यांनीच सांगितले होते; पण लष्करी अंमल सुरू झाल्यावर हे दिवाभीत पोलिस गावात आले आणि लोकांना दमदाटी देऊन पकडण्याच्या यादीत नाव आहे असे खरेखोटे सांगून लोकांकडून अमानुषपणे पैसे उकळू लागले ! यात हिंदू-मुसलमानांचे ऐक्य होते ! पण या तक्रारी आपणाकडे आल्याच नाहीत असे कलेक्टर नाईट म्हणू लागले ! लोकांना छळायचा व लुटायचा हा जाहीर परवानाच होता!

१९ मे १९३० ला व्हाइसरॉयनी मुंबईच्या गव्हर्नरास तार पाठवली–' शक्य तर......लष्करी कायद्याच्या उर्वरित काळात गांधी टोपी विरोधी मोहीम काढावी. '[२१] जरी ' लष्कराच्या संरक्षणाखाली पोलीस हे नित्याचे काम करू लागले ' तरी मिलिटरी कोर्ट काम करीत होतेच.

फटके शिक्षा कोणासही दिली गेली हे सत्य नाकारण्यात येते. ' सोलापुरात अलीकडे जी दंगल झाली त्यावेळी फटके मारण्याची शिक्षा देण्यात आली नव्हती अशी भारत सरकारची माहिती आहे. '[२२] पण हे खोटे आहे. फटक्यांची शिक्षा देण्यात आली होती हे सिद्ध करणारा दुसरा पुरावा उपलब्ध आहे. ' लष्करी कोर्ट आज सकाळी भरले. बेकायदेशीर अशा संस्थेचे सभासद असलेल्या चार बालवयाच्या मुलांना दिलेली फटक्यांची शिक्षा त्याने अंमलात आणली. '[२३] ते बालवयीन पंधरा वर्षांखालचे होते. त्यांची नावे : जी. एस्. कुर्ले, आर्. जी. शिवगौडा, जी. एम्. तडलगे आणि शिवप्पा वीरप्पा.

पोलीस हे नित्याचे काम करू शकत नव्हते. १९ मे पर्यंत शहरात गस्त घातली जात नव्हती. लष्करी कायद्याच्या अहवालात (१९ मे १९३०) म्हटले आहे : '' ' गणवेश ' घालून पोलिस गस्त घालतील. जरी १४४ कलम ९ मे १९३० पासून अंमलात होते, तरी ' ते कोणी पाळत नव्हते. ' (प्रतिज्ञालेखात) पोलिसांच्या चाळी आणि त्यांचे मुख्यालय यांचेच संरक्षण करायचे होते. ''

लष्करी कायदा पुकारावा की नाही याबाबत सरकारी अधिकारी साशंक होते. लष्करी कायदा रोगाच्या मानाने हा फार मोठा औषधाचा घुटका होईल याची त्यांना जाणीव होती. सोलापूरच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या म्हणण्याप्रमाणे, '' .....सुपारी फोडायला वाफेचा हातोडा वापरण्यासारखे हे होत आहे..... शहरात रक्तपात किंवा शहराचा ताबा हातातून जाण्यापेक्षा लष्करी कायदा पुकारणे अधिक बरे. ''[२४]

गांधी टोपीविषयी म्हटले आहे–'' जमावात मुख्यतः लिंगायत होते; पण सर्वच जण गांधी टोपी घालत होते, म्हणून त्यावरून त्यांची जात ओळखणे कठीण होते. ''[२५]

मोठ्या व्यापाऱ्यांच्या घरांवर धाडी घालण्यात आल्या. पुष्कळांना पकडण्यात आले, कारण हे व्यापारी दंगेखोरांना पैशाचा पुरवठा करीत असल्याचा संशय लष्करी प्रशासकांना होता. रात्रीच्या काळी संपूर्ण अंधकार करण्याच्या आज्ञा देण्यात आल्या. जगन्नाथ शिंदे आणि श्रीकृष्ण सारडा यांना पकडण्यात आले व त्यांना शहरातून मिरवत नेण्यात आले. अनेकांना फटके मारण्यात आले. कुरबान हुसेनचे गाव वळसंग, ते लुटण्याचे काम चार तास चालू होते. पंढरपूर नगरपालिकेच्या इमारतीवरील झेंडा काढण्यात आला. हॉटसनने आमदार ना. रा. गुंजाळ यांना सांगितले की लष्करी कोर्टाने शंभरावर खटले चालविले आहेत. ॲडिशनल डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट कोठावाला, ले. क. पेज व एक लष्करी अधिकारी हे लष्करी कोर्टाचे सदस्य होते. गव्हर्नरने लष्करी प्रशासकांचे अभिनंदन केले आणि दोघा पोलिसांच्या मृत्यूबद्दल दुःख प्रकट केले; पण त्याच काळात जनतेला ज्या यमयातना भोगाव्या लागल्या त्याबद्दल सहानुभूतीदाखल एक शब्दही त्याने उच्चारला नाही. दुकाने दिवसाढवळ्या लुटण्यात येत होती; पण लष्करी कायदा पुकारल्यापासून काहीही गडबड-गोंधळ झाला नाही आणि दुकाने उघडण्याबाबत उत्तेजनच देण्यात येत होते, असे (डायरेक्टर ऑफ इन्फर्मेशन) प्रसिध्दी अधिकाऱ्यांनी म्हटले आहे.

सोलापूर येथील लष्कराच्या अत्याचारांची चौकशी करावी असा प्रश्न अनेक आमदारांनी उपस्थित करण्याचा प्रयत्न केला पण सरकारने त्याला विरोध केला. हॉटसनने असेंब्लीत त्याला विरोध केला. कौन्सिलमध्ये मतदान झाले असता चौकशी कमिटी नेमण्याची सूचना फेटाळण्यात आली.

### लोकांच्या उठावणीचे स्वरूप

सोलापूरच्या नागरिकांना सरकारचे सैतानी स्वरूप पूर्णपणे समजून आले. कामगारवर्गीय विचारसरणी आणि लढाऊ युवक चळवळ काँग्रेसच्या नेतृत्वाखाली एकत्र आली, आणि त्यामुळे चळवळीच्या कक्षा रुंदावल्या. लोकांनी आपले राज्य प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. जनता जेव्हा आपल्या निद्रेतून जागी होते, अशा वेळी हिंसा की अहिंसा असा प्रश्न निर्माण होत नसतो. या सर्व उठावामागे एक सुसूत्र अशी संघटना काम करीत आहे याची सरकारला पूर्ण जाणीव होती. भारत सरकारच्या गृहमंत्र्याने जे. डब्ल्यू. भोर (कायदा खाते) यांना २१ मे रोजी लिहिले :

" सोलापूरचा सर्व उद्रेक अत्यंत काळजीपूर्वक संघटित करण्यात आला होता. ही केवळ जमावाची सहजगत्या घडून आलेली हिंसा नव्हती. "[२६] " हा साधा दंगेखोर जमाव नव्हता. पण त्याच्या हालचाली संपूर्णपणे नियंत्रित करून त्याला दिशा देण्याचे काम मागे राहून काही लोक करीत होते. "[२७]

११ मे ला अहमदनगरहून एक शीख पलटण आणण्यात आली. निःशस्त्र लोकांवर गोळ्या घालण्याचे त्या पलटणीने नाकारले. ती लगेच परत पाठविण्यात आली.[२८] या ठिकाणी आपणाला शूर गढवाली सैनिकांची आठवण होते.

सरकार भयभीत झाले होते. लष्करी कोर्टाने लोकांना दिलेल्या शिक्षा प्रमाणाबाहेर कडक होत्या; पण ' सोलापूरची पुनरावृत्ती इतरत्र होणार नाही याविषयी खात्री नाही ' असे अधिकाऱ्यांना वाटत होते. ' इंडियन डेली मेल ' ने १९ मे १९३० च्या अंकात लिहिले, ' जमावाने अमानुष अत्याचार केले ही वार्ता सर्वत्र फैलावण्यात आली, पण ती निराधार होती. '

काही वेळा पोलिसांना गोळ्या झाडण्याचे हुकूम देण्यात आले नव्हते; पण त्यांनी कायदा हातात घेतला. एच्. एफ्. नाईट यांनी कौन्सिलमधील भाषणात हे मान्य केले; ' ..... काही पोलिसांनी ८ मे ला हुकूम नसताना गोळ्या झाडल्या आणि दुसऱ्या स्थळी आणि दुसऱ्या प्रसंगी त्यांनी तसे केल्याची (गोळ्या झाडल्या असण्याची) शक्यता आहे. ' ' तारीख ८ मे ला शहर पोलीस चौकीतून सर्व पोलीस काढून घेण्यात आले, कारण चौरीचौरा किंवा मालेगावसारख्या घटना घडण्याची शक्यता आम्हास वाटत होती. '[२९] ' काँग्रेसच्या स्वयंसेवकांनी मी व डी. एस्. पी. वर हल्ले केले, म्हणून क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्टखाली हा जमाव बेकायदेशीर आहे असे जाहीर करावे ' असे अहवाल पाठविण्यात आले.[३०] शहरातील निःशस्त्र पोलिसांना रेल्वे स्टेशनवर पाठविण्यात आले; कारण दोन पोलिसांचे खून करण्यात आले होते असे डी. एस. पी. प्लेफेअरने कोर्टात सांगितले.

## पोलिसांची रानटी कृत्ये

सोलापुरात लष्करी कायदा असलेल्या काळात काय घडले यासंबंधीची बारकाईने चौकशी करून हिंदुस्थानी सेवा दलाचे प्रमुख डॉ. एन. एस. हर्डीकर यांनी प्रसिद्ध केलेल्या अहवालात म्हटले आहे : " या चळवळीतील ज्या प्रमुख लोकांनी जमावाला शांत करण्याचा प्रयत्न केला व कलेक्टर आणि त्यांच्याबरोबर असलेल्या लोकांना खवळलेल्या जमावापासून सोडविण्याचा प्रयत्न केला, त्यांच्यावरच खटले भरून त्यांना अमानुष शिक्षा ठोठावण्यात आल्या असे प्रसंगोपात्त म्हणता येईल. .... कलेक्टर त्यांच्या मोटारीतून पळून गेला. " त्या पत्रकात गलिच्छ बलात्कार, लुटालूट आणि बेपर्वाईने, बेछूट अशा गोळीबाराची कृत्ये नमूद करण्यात आली आहेत. " एका गवळ्याची पोर बलात्कारात मृत्यूमुखी पडली..... वीर स्त्रिया जबर जखमी झाल्या, कारण त्यांच्यावर बलात्कार झाले होते,......सैनिकांनी स्त्रियांना दिवसा पाहिले आणि रात्री त्यांच्यावर

अत्याचार केले..... पोलिसांनी सुंदर स्त्रियांची माहिती पुरवली.... नवरा आणि नातेवाइकांच्या देखत स्त्रियांवर बलात्कार करण्यात आले. हॉस्पिटलमध्ये त्यांची काही नोंदही ठेवण्यात आली नाही. '' डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट नाईट याने सरकारला चौकशीची जरूर वाटत नाही असा शेरा मारून हे प्रकरण झटकून टाकले.[३१]

इमाम इस्माईलसाहेब मुचाले हा राजवाडे यांच्या ' कर्मयोगी ' मुद्रणालयात जुळारी म्हणून काम करीत होता. तो कुर्बान हुसेनच्या ' गझनफर ' पत्राचे काम रात्रपाळीत करीत असे. या रक्ताने (हुसेन चाकूने बोटाचे रक्त काढून दाखवी) वीरच निर्माण होतील आणि ब्रिटिशांचे सैतानी सरकार नाहीसे करतील असे कुर्बान हुसेन म्हणत असल्याचे इमामने त्याच्या निवेदनात म्हटले आहे.[३२] या इमामाने शिंदीची झाडे तोडण्यात भाग घेतला. त्याच्या उजव्या पायाला बंदुकीची गोळी लागून जखम झाली होती. मंगळवार पेठ पोलीस चौकीजवळील टेलिफोनच्या तारा पोलिसांनीच तोडल्या होत्या. या इमामाने शांतता प्रस्थापनेच्या कामात काँग्रेसच्या लोकांना मदत केली. काँग्रेसची पत्रके वाटून तो काँग्रेसचा प्रचार करीत असे. पोलीस त्याचा पाठलाग करू लागले म्हणून तो सोलापूर सोडून गेला आणि थोडे स्थिरस्थावर झाल्यावर १९३२ मध्ये परत आला.

१२ मे ते ३० जून १९३० या काळात जिल्हाधिकाऱ्याने सोलापुरात काही शांतताभंग नाही असे प्रत्येक अहवालात म्हटले आहे. सोलापुराच्या बाहेरून राष्ट्रीय ध्वज फडकविण्यासाठी स्वयंसेवक येतात. काही वेळा ते मोहोळ किंवा पाकणी किंवा पंढरपूर या स्टेशनावर उतरतात. अशा स्वयंसेवकांना ते गावात शिरण्यापूर्वीच पकडण्यात येते. विलेपार्ले शिबिरातून सोलापूर भागाचे जे सत्याग्रही परत आले, त्यांचे कार्यक्षेत्र पंढरपूर झाले. सरकारने ताडीची व देशी दारूची दुकाने उघडण्यास लोकांना उत्तेजन दिले. पोलीस सार्जंटच्या बंगल्याला आग लावण्यात आली आणि त्यातील चीजवस्तूंचे ढीग करून ते जाळण्यात आले. ' जमाव हा कायदा मोडण्याकरताच करण्यात आला होता ' असे सरकारी अहवालात म्हटले आहे. '' बिनहत्यारी पोलीस हे असंघटित (विखुरलेले) होते आणि त्यातील कित्येकजण कामावर हजर झालेच नाहीत. १५ मे ला चाळीसजण गैरहजर राहिले. नित्याचे मुलकी प्रशासन चालवणे अशक्य झाले होते. ''[३३]

वळसंगला दुसऱ्याच दिवशी (९ मे) पोलिसांच्या बराकी जाळण्यात आल्या, पण त्या अर्धवट जळाल्या. बार्शीला पोलीस आणि मॅजिस्ट्रेटनी मामलेदाराच्या कार्यालयात आश्रय घेतला. लोकांनी धमक्या दिल्याने वैरागच्या पोलिसांनी बराकी सोडल्या आणि ते बार्शीला आश्रयाला गेले.

### काँग्रेस राज्य–जनतेचा कारभार

६ मे ते १२ मे १९३० या काळात सोलापूर काँग्रेस कार्यकर्त्यांच्या अधिपत्याखाली होते. जिल्हाधिकारी व डी. एस. पी. रजेवर गेले, पोलिस आणि मुलकी अधिकारी गाव सोडून गेले

आणि मुलकी प्रशासन साफ कोलमडले. कलेक्टर नाइटने मुलकी अधिकारी हे परिस्थिती नियंत्रणाखाली ठेवू शकत नाहीत असे आमदार आर. आर. काळे यांना सांगितले. काँग्रेसचे प्रमुख कार्यकर्ते रामकृष्ण जाजू हे ' मार्शल जाजू ' या नावाने ओळखले जात, कारण सर्व मुलकी प्रशासनावर त्यांचे नियंत्रण होते. जिल्हाधिकारी नाइटने मुलकी प्रशासनाची जबाबदारी घेतलीच नाही, व जनतेला वाऱ्यावर सोडून दिले !

लोकात आत्मविश्वास भरपूर होता आणि ते वाहतुकीचे नियंत्रण करीत होते, ' ब्रिटिश राज्य लयाला गेले, आता गांधी राज्य आले आहे ' अशी त्यांची धारणा होती.[३४] काँग्रेस राज्याच्या प्रशासनाचे ध्येय असे होते : (१) नागरी प्रशासन चालवणे; (२) पोलीस हे लोकांच्या दृष्टीने निरुपयोगी आहेत, असे त्यांच्या मनावर ठसविणे आणि जनतेच्या उठावाबद्दल (उद्रेकाबद्दल) त्यांच्या मनात भीती निर्माण करणे; (३) आणि लोकांची अधिसत्ता प्रस्थापित करणे.

पोलीस शहरातून पळून गेले अणि जनतेने प्रशासन आपल्या हाती घेतले, लोकांत आत्मविश्वास निर्माण करण्याचा त्यांनी प्रयत्न केला, त्यांच्याच बरोबर ' स्वयंसेवक रस्त्यावरील वाहतूक नियंत्रित करीत होते, डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट ते खालपर्यंत अधिकाऱ्यांची नियुक्ती करून परंपरा तयार करण्यात आली होती असे मला सांगण्यात आले आहे. ' डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या गोपनीय पत्रातील हा अहवाल स्वतःच बोलका आहे;[३५] पण डायरेक्टर ऑफ इन्फर्मेशन हा ३० जून १९३० च्या अहवालात म्हणतो, '' सोलापुरात ज्यांनी दंगल, खून आणि जाळपोळ केली, सरकारी अधिकारी आणि सरकारी मालमत्ता यांच्यावर हिंसात्मक आणि संघटित हल्ले केले, अशांचे प्रतीक म्हणून काँग्रेस झेंडा ओळखला जात होता; हे स्पष्ट आहे. ....... सोलापूरच्या सर्व शांतताप्रेमी नागरिकांना काँग्रेस झेंडा म्हणजे धाकदपटशाच होता. ''

तारीख ८ च्या गोळीबाराने भेदरलेल्या जनतेला आपले जीवित व वित्त सुरक्षित राहील याची खात्री वाटेना. म्हणून शेकडो लोक गाव सोडून जाऊ लागले. अत्यंत हालअपेष्टात असे २०/२५ हजार लोक बाहेर गेले असा अंदाज आहे, गोळीबारात जखमी झालेले काही परगावी जाऊ लागले, पण ते तेथेच मुत्यू पावले. स्थानिक कार्यकर्त्यांपैकी रामकृष्ण जाजूजी यांनी जमावबंदी आदेशाविरुद्ध आवाज उठवावा असा प्रयत्न चालवला होता. पण सरकारी दडपशाही व बेछूट गोळीबार यांमुळे त्यांना त्यांच्या सहकाऱ्यांनी यापासून परावृत्त केले. गावात निराधार अफवा उठतच होत्या. अशा स्थितीत सावध होऊन काँग्रेस कमिटीतील सर्व कागदपत्र दुसऱ्या सुरक्षित ठिकाणी हलविण्यात आले.

तीन दिवसांच्या अवधीत सोलापुरात काँग्रेसचे राज्य चालू झाले होते असाच देखावा लोकांना दिसत होता. रहदारी नियंत्रणावर देखरेख ठेवण्यासाठी वि. रा. पाटील, कटकम, कायगांवकर,

तुळशीदास जाधव प्रभृती शेकडो मंडळी झटत होती. लोकात विश्वास निर्माण व्हावा म्हणून त्यांनी पत्रके काढली, काँग्रेस कमिटीच्या कार्यालयावर लोकांच्या तक्रारी घेतल्या; इतकेच काय एका मृत्युप्रकरणी पंचनामा करून त्यावर सह्याही केल्या.

कलेक्टरने बोलावलेल्या नागरिकांच्या शांतता कमिटीत रा. ब. मुळे, जसावाला, अब्दुल लतीफ, लक्ष्मी-विष्णु मिलचे मॅनेजर ग्रेअर, नगराध्यक्ष माणिकचंद शहा यांना तात्पुरते अधिकार देऊन स्पेशल मॅजिस्ट्रेट नेमले; पण माणिकचंद शहांनी त्या पदाचा तेथेच राजीनामा दिला.

तारीख १० च्या ईदच्या सणानिमित्त जमावबंदी काही काळ शिथिल करण्यात आली. तारीख २१ ला नगरहून आणलेल्या शीख पलटणीने निःशस्त्रांवर गोळीबार करण्याचे नाकारले. विचारविनिमयासाठी कलेक्टर हॉटसनला भेटण्यासाठी पुण्यास रवाना झाले.

तारीख २१ ला शेठ वालचंद हिराचंद व लालजी नारायण हे मुंबईहून परिस्थिती पाहण्यासाठी आले. त्यांनी शहरभर फेरफटका मारला. सर्वत्र शांतता. गिरण्या सुरू झाल्याशिवाय व दुकाने उघडल्याशिवाय या परिस्थितीत फरक पडणार नाही हा त्यांचा अभिप्राय त्यांनी शहरातील काँग्रेससह अनेक प्रतिष्ठित लोकांपुढे मांडला. काँग्रेस कमिटी व कलेक्टर यांचे शांततेसाठी संयुक्त पत्रक निघावे अशीही कल्पना पुढे आली, पण त्याला कलेक्टर तयार होईना. नंतर काँग्रेस कमिटीने तसे पत्रक तयार करून वाटले. शेठ वालचंद प्रभृतींनी गृहमंत्री हॉटसन, कमिशनर यांच्याही भेटी घेऊन सोलापुरात शांतता असल्याची कल्पना दिली, पण हॉटसनने परिस्थिती स्फोटक असल्याने दक्षता घेण्याची आवश्यकता आहे असे सांगितले.

### जातीयता नव्हती

जे दोन पोलीस जमावाने जाळून मारले, ते मुसलमान होते. सरकारविरोधी भावना इतकी तीव्र होती की, ' नहीं रखनी, नहीं रखनी सरकार जालिम नहीं रखनीं ' अशा घोषणा देणारा खवळलेला जमाव निदर्शने करून सरकारविरोधी भावना चेतवीत होता आणि सर्व लोकांनी काही कृत्ये करावीत असा प्रयत्न करीत होता, शंकर शिवदारे याला पोलिसांनी गोळी घालून मारले, तसेच दारूबंदीचा कार्यक्रम यशस्वी रीतीने पार पडला. (सोलापुरातील ताडीची आणि दारूची दुकाने फोडून टाकण्यात आली होती.) नंतर लोकांना नवीन कार्यक्रम सापडला, जमावातील काहींना **चौरी-चौरा** आठवला असेल. तेथे पोलिसांचे झालेले हत्याकांड सरकारविरोधी होते, जातीय नव्हते. जे दोन पोलीस जाळण्यात आले, ते मुसलमान होते, हा निव्वळ योगायोग होता. सरकारने मात्र हा सर्व प्रकार जातीय स्वरूपाचाच होता असे सतत म्हटले आहे. ' जमाव हा मुख्यतः लिंगायतांचा होता, पण सर्वचजण गांधी टोप्या वापरतात, मग त्यांची जात ओळखणे अवघड आहे. ' असे लिहूनही जातीय भावना चेतविण्याचे सरकारी उपद्‌व्याप चालूच होते. सरकारी पत्रक खालीलप्रमाणे होते : '' ..... बहुसंख्य नागरिक कायदा पाळणारे आहेत आणि त्यापैकी मुसलमान नागरिक मोठ्या चिकाटीने चळवळीपासून दूर राहिले आहेत; परंतु जोपर्यंत श्रीमंत लोक चळवळीसाठी पैसा पुरवतात, तोपर्यंत त्यांचे अस्तित्व आणि त्यांचा आवाज, गुंडांच्या टोळक्यातून दिसून येतो, तो टाळता येत नाही, अशी मला भीती वाटते. ''[३६]

सोलापूरच्या बाहेरील हजारो नागरिकांनी सोलापुरात ज्यांचा छळ झाला, ज्यांना सोलापूर सोडावे लागले त्यांना आश्रय दिला. जातीय वृत्तीच्या लोकांनी परकी सरकारशी हातमिळवणी केली आणि स्वार्थ साधण्यासाठी आपल्याच देशबांधवांवर सूड उगविला. सोलापूर हे छोटेसे लष्करी केंद्र व्हावे असे हजरतखान यांनी प्रतिपादन केले. जेव्हा अब्दुल रसूल कुरबान हुसेन याला फाशीची शिक्षा झाली, तेव्हा सोलापुरातील एकाही मुसलमानाने किंवा मुसलमानी संघटनेने त्यांची शिक्षा रद्द व्हावी किंवा त्याचा फेरविचार व्हावा म्हणून प्रयत्न केला नाही. अल्पसंख्याकांचे रक्षणकर्ते आपणच आहोत अशी आपली प्रतिमा कायम ठेवण्याचा सरकारने प्रयत्न केला.

## सोलापूर झेंडा सत्याग्रह

गो. आ. तथा तात्या देशपांडे हे सोलापूर झेंडा सत्याग्रहाचे प्रमुख होते. तात्या देशपांडे हे महाराष्ट्रातील एक निःस्वार्थी काँग्रेस कार्यकर्ते. नंतर ते महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे सेक्रेटरी झाले व ते त्या पदावर सोळा वर्षे होते. दहा दिवसांत ऐंशी स्वयंसेवक सत्याग्रहासाठी सोलापुरात पाठविण्यात आले. देशपांडे म्हणाले, '' मध्यवर्ती सरकारचे गृहमंत्री हडसन आणि मुंबईचे गृहमंत्री हॉटसन यांनी टाटामार्फत पुण्यात माझी भेट घेतली; आणि सोलापूर झेंडा सत्याग्रह मागे घेण्याची मला विनंती केली. त्याबाबत अर्धा तास चर्चा झाली. मी म्हणालो, ' राष्ट्रीय झेंड्याला बंदी करणारे कलम रद्द करा.' तुम्ही ते कलम परत घेत असाल तर मी हा सत्याग्रह थांबवीन आणि तुम्ही माझ्या सत्याग्रह्यांची सुटका करा, यावर ते म्हणाले, ' तुम्ही प्रथम सत्याग्रह मागे घ्या, मग आम्ही कैद्यांना सोडू व मग ते कलम रद्द करू. ' मी म्हणालो, ' मी तुमच्याशी सहमत होऊ शकत नाही. ' नंतर सत्याग्रह चालूच राहिला.[३७]

सोलापूर लष्करी कायद्याच्या अंमलात राष्ट्रीय झेंडा फडकविणे वा नेणे हा शिक्षापात्र गुन्हा समजला जात असे आणि त्याला दहा वर्षे सक्तमजुरीची शिक्षा ही नित्याची बाब झाली होती. जे सोलापूरचे नव्हते अशांनी ही कोंडी फोडण्यासाठी सत्याग्रह लढा संघटित केला. महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीने ' सोलापूर राष्ट्रीय झेंडा संरक्षण कमिटी ' संघटित केली आणि ब्यं. व. हरोलीकर हे कार्यवाह म्हणून काम करू लागले. सोलापुरात तीन सत्याग्रह्यांची तुकडी पाठविण्याचे ठरले. त्या तुकडीला पुण्यात २२ मे ला निरोप देण्यात आला. ती तुकडी सोलापुरात जाताच तिघांना अटक करण्यात आली व विजापूर तुरुंगात पाठविण्यात आले. २८ मे नंतर पुणे, मुंबई, सातारा, नाशिक, खानदेश (आताचे धुळे व जळगाव जिल्हे) आणि कर्नाटकाच्या काही भागांतून ' झेंडा ' सत्याग्रहासाठी अनेक तुकड्या आल्या. लष्करी कायदा धुडकावून लावणे हा अखिल भारतीय स्वरूपाचा प्रश्न करावा, कारण भारताच्या झेंड्याचा मान त्यात गुंतलेला आहे असा सोलापूर सत्याग्रह कमिटीने नेट लावला. राष्ट्रीय झेंड्याचा मान राखण्यासाठी अखिल भारतीय सत्याग्रह करावा, असे मोतीलाल नेहरूंनी सुचवले, यासाठी पाच हजार सत्याग्रही लढ्याला सिद्ध करावेत असेही त्यांनी सांगितले.[३८] अशा प्रकारचा सत्याग्रह ३० जूनपर्यंत

चालू होता. सरकारी पत्रकाप्रमाणे १८१ स्वयंसेवकांना पकडण्यात आले, १५२ लोकांना हद्दपार करण्यात आले आणि २५ लोकांना जबर शिक्षा झाल्या. प्रेमाबाई कंटक यांनी ' सत्याग्रही महाराष्ट्र ' या आपल्या पुस्तकात १७५ सत्याग्रह्यांनी या लढ्यात भाग घेतला असा उल्लेख केला आहे.

फेनर ब्रॉकवे हे ब्रिटिश पार्लमेंटचे सभासद. त्यांनी गांधी टोपीविषयी एक प्रश्न विचारला. भारतमंत्री बेन यांनी त्यांना उत्तर दिले की, लष्करी अंमल असताना सोलापुरात राष्ट्रीय झेंडा फडकविण्यावर बंदी होती. नंतर ब्रॉकवे यांनी डोक्यावर गांधी टोपी घातली त्याबरोबर पार्लमेंटात टाळ्यांचा प्रचंड गजर झाला. ' हा लष्करी कायदा स्थानिक परिस्थितीमुळे आला नव्हता, ' असे पुण्याच्या ' ज्ञानप्रकाश ' ने लिहिले. अनेक वर्तमानपत्रांनी तसेच विचार प्रकट केले. ' .... लष्करी कायदा मागे घ्या, स्वतंत्र निःपक्षपाती चौकशी समितीची स्थापना करा. ' अखेरीस ' ज्ञानप्रकाश ' ने म्हटले, ' ....आयर्विनने आतापर्यंत सर्वांत मोठी अशी गंभीर घोडचूक केली आहे. '[३९]

## असमर्थनीय लष्करी कायदा

मुंबईचे मुख्य न्यायमूर्ती बोमंट यांना सोलापूरला लष्करी कायदा लावणे समर्थनीय वाटत नव्हते. गुन्हा अर्ज १९३० चा २४० बाबत ते म्हणतात, '' मुलकी अधिकाऱ्यांनी, मुलकी प्रशासनासाठी, लष्कराची मदत घेऊन परिस्थिती नियंत्रणाखाली ठेवता आली नसती याबाबत माझे समाधान होत नाही. '' सोलापुरात लष्करी कायदा पुकारण्याची आवश्यकता नव्हती, असे मत न्यायमूर्ती माडगांवकर यांनीही व्यक्त केले आहे. ' टाइम्स ऑफ इंडिया ' ने तारीख १३ मे १९३० च्या अंकात ८ तारखेच्या प्रकारानंतर चार दिवस शांततेने पार पडले असे म्हटले आहे. बंड, उठाव वा युद्धसदृश परिस्थिती नव्हती.

लष्करी कायद्याच्या जाहीरनाम्यात कॉंग्रेस राष्ट्रीय झेंड्याबाबत पाचवे पोटकलम आहे. सर्व भारतभर मुलकी कायदेच होते, पण ' फक्त दोनच ठिकाणी लष्करी कायदे अंमलात होते : एक सोलापूरला व दुसरा खान अब्दुल गफारखानांच्या नेतृत्वाखालील वायव्य सरहद्द प्रांतात '.

तारीख १०, ११, १२ मे १९३० ला रेल्वे स्टेशनच्या पलीकडे मुलकी प्रशासनाची कार्यकक्षा नव्हती असे सदर्न कमांडच्या प्रमुख लष्करी अधिकाऱ्याने म्हटले आहे. कॉंग्रेसने स्थानिक सरकार प्रस्थापित केले होते, ब्रिटिश राज्य कार्य करू शकत नव्हते आणि सोलापूरच्या बाहेर हे सर्व लोण पसरत होते. एका भारतीय अधिकाऱ्याने नागरी अधिकाऱ्याकडून सैन्याचा गैरवापर होत असल्याची तक्रार केली होती.

सचिवालयाने वरील विधानावर टीका केली. त्यात म्हटले आहे, '..... खास वकिली आणि असमर्थनीय असा युक्तिवाद यांचे हे चांगले उदाहरण आहे.... आवश्यक ते सहकार्य लष्कराकडून न मिळाल्यामुळे जिल्हाधिकाऱ्यांची अखेर दमछाक झाली..... पेशावरातील अलीकडच्या घडामोडींमुळे लष्करप्रमुख बैचैन झाले होते; आणि त्यामुळे प्रथमपासूनच सोलापूरला लष्करी कायदा आणला पाहिजे असे त्यानी मनाशी ठरविले होते. ' अखेरीस जिल्हाधिकाऱ्यांनी लष्कराच्या मदतीवर भर दिला, लष्करी नियंत्रणावर नव्हे.[४०]

' मुलकी अधिकार क्षेत्रातील कर्तव्ये ' यावर लिहिताना सदर्न कमांडच्या मुख्यालयाने हायकोर्टाच्या न्यायमूर्तींचाच उतारा दिला. ' प्रस्थापित सरकारविरुद्ध ते बंडच होते, आणि त्यात सहभागी होणारांचा हेतू मुलकी प्रशासन हे पौरुषहीन करण्याचा असतो....... माझ्या दृष्टीने याचा हेतू सरकारविरोधी युद्ध असाच असतो. ' त्यात त्यांनी खालीलप्रमाणे टीका केली : ' सोलापुरात सरकारचे कोणतेही सैन्याला सर्व शहर शत्रूच समजत होते..... शहरातून पोलीसदल पूर्णपणे काढून घेण्यात आले होते आणि सर्व शहर जमावाच्या म्हणजेच सामान्यजनांच्या हाती देण्यात आले आणि त्यांनीच स्वराज्याची घटना तयार केली,.......बिनहत्यारी पोलीस कामावर हजर झालेच नाहीत.....जिल्हाधिकारी व जिल्हा पोलीस अधिकारी हे तर मानसिक आणि शारीरिकदृष्ट्या कोसळण्याच्या काठावरच होते. ' प्रथम लष्करी कायदा प्रस्थापित केला पाहिजे, कारण लष्कराला निव्वळ गस्त घालण्याचे काम देणे शक्य नव्हते.

गृहखात्याच्या खास पत्राने खालीलप्रमाणे टीका केली : ' लष्करी कायद्याची जरुरी नव्हती असे मुलकी अधिकाऱ्यांचे म्हणणे बरोबर होते. आजच्या वर्तमानपत्रात सिमला कायदा (Regulation) प्रसिद्ध झाला याचा अर्थ लष्करी अधिकाऱ्याला लष्करी न्यायालय स्थापन करण्याचा अधिकारच नाही आणि त्यामुळे त्या कोर्टाने दिलेल्या शिक्षा नियमबाह्य आहेत असा काहींनी लावला. येथील परिस्थितीसंबंधी माहिती घेण्यासाठी पुण्याहून ब्रिगेडियर मेजर आले होते '[४१] (तारीख १७ मे १९३०).

व्हाइसरॉयचा वटहुकूम प्रसिद्ध झाल्यानंतर लष्करी न्यायालयाचे कामकाज थांबलेच. एच्. डब्ल्यू. इमर्सन म्हणाले (तारीख १५ सप्टेंबर १९३०) : " १०३ गोळ्या मारण्यात आल्या..... लष्करी न्यायालयाने कित्येकांना दिलेल्या शिक्षा निःसंशय जबर होत्या; पण मला वाटते, परिस्थिती पूर्ववत्, शांत , नित्याची होईपर्यंत थांबावे...... इतर ठिकाणी सोलापूरचीच पुनरुक्ती होणार नाही याबाबत खात्री देता येत नाही. "

सैन्यदलाचा वापर ज्या तऱ्हेने करण्यात येत होता त्यावर सरसेनापती समाधानी नव्हते. सैन्यदलाला धोक्याच्या जागी आधीच पाठवण्यात आले व ते धोक्यात आले हे दाखवण्यासंबंधी भरपूर पुरावा उपलब्ध आहे. एका भारतीय अधिकाऱ्याने खाजगी पत्रात मुलकी अधिकाऱ्यांनी सैन्यदलाचा गैरवापर केला अशी तक्रार केली आहे. यावर सेक्रटरीएटने खालीलप्रमाणे टीका केली आहे : " खास विनंती किंवा आर्जव करणे आणि असमर्थनीय अशी विधाने करणे याचे हे उत्कृष्ट उदाहरण आहे..... जिल्हाधिकाऱ्याची दमछाक झाली, पण त्याला वेळेवर सैन्यदलाची आवश्यक मदत मिळाली नाही. " जिल्हाधिकारी आणि जिल्हा पोलीस अधिकारी हे कोसळले, पण गृहखात्याच्या खास वृत्ताप्रमाणे '........ ते कोसळले, पण अतिश्रमाने! '[४२]

ही चळवळ सोलापूरपुरतीच मर्यादित होती, असे गृहीत धरण्यात येत होते, पण परिस्थिती मात्र त्याविरुद्ध होती. मे १८, १९३० ला वळसंगला (कुरबान हुसेनचे गाव) ' पोलिसांच्या चाळींची

मोडतोड करण्यात आली होती, ताडीची दुकाने फोडण्यात आली होती आणि स्वराज्याची घोषणा करून राष्ट्रध्वज उभारण्यात आला होता, जिल्हाधिकाऱ्यांनी पोलिसांच्या कुटुंबियांना रात्रीतून हलविले; कारण सरकारविरोधी दंगल उसळली होती, आणि पोलिसांच्या चाळीवर हल्ला होण्याची शक्यता होती. दुसऱ्या दिवशी पोलिसांच्या चाळींना आगी लावण्यात आल्याने त्या अर्धवट अवस्थेत जळत होत्या, सांगोला म्युनिसिपालिटीनेही राष्ट्रीय झेंडा फडकविला होता.

**प्रतिक्रिया**

या सोलापूर प्रकरणावर अनेक प्रकारची टीका-प्रतिटीका झाली, त्यातील हायकोर्टाच्या न्यायमूर्तींच्या टीकेचा परामर्श संक्षेपाने घेण्यात येत आहे.

**न्यायमूर्ती बोमंट :** '' मुलकी अधिकाऱ्यांच्या मदतीला लष्कर बोलावून मुलकी अधिकाऱ्यांना परिस्थिती काबूत ठेवता आली नसती याबाबत माझे समाधान होत नाही. ''

**न्या. माडगावकर :** '' .......... क्रिमिनल प्रोसिजर कोडच्या कलम १४अ खाली डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनी काढलेला आदेश हा पाळला जात नाही ह्या आरोपाचा अर्थ माझ्या मते तो प्रस्थापित करण्याची आवश्यकता होती. निःशस्त्र पोलीस हे असंघटित होते, आणि अधिकाऱ्यांच्या मदतीला सशस्त्र दलाची आवश्यकता होती, याबाबत माझे समाधान झाले आहे. एका मुद्याबाबत मात्र माझे समाधान झाले नाही. अशा प्रकारचे उद्रेक १९२१ मध्ये अहमदाबाद येथे उद्भवले असताना सैन्यदलाने काम भागले नाही, मुलकी अधिकाऱ्यांनी आपले अधिकार सेनाधिकाऱ्यांना सुपूर्त केले नाहीत. कायद्याच्या दृष्टीने मतभेद निर्माण झाले. ''

**न्या. ब्लॅकबेल :** '' ........ जिल्हाधिकारी नाईट यांनी सांगितलेली वस्तुस्थिती म्हणजे सोलापुरातील घटना या केवळ तुरळक स्वरूपाचे उद्रेक वा शांतताभंग करणारी दंगल या स्वरूपाच्या नव्हेत, कारण मुलकी अधिकाऱ्यांना सैन्यदलाच्या सहाय्याने त्यांच्याशी मुकाबला करता आला असता. पण हा उद्रेक म्हणजे प्रस्थापित सरकारविरुद्ध संघटित बंडच होते; आणि त्या बंडात सहभागी होणाऱ्यांचा निर्धार, त्या सरकारचे व्यवहारात षंढत्व प्रस्थापित करणे हा होता. याचा अर्थ प्रस्थापित सरकारविरुद्ध बंड पुकारणेच होय, असे मी माझ्या निवाड्यात म्हटले आहे...... माझ्या मते मुलकी अधिकाऱ्यांनी अशा प्रकारचा धोका पत्करू नये; पण लढ्याला लढ्यानेच उत्तर दिले पाहिजे आणि सैन्यदलाकडे सर्व ताबा दिला पाहिजे. ''[४३]

**कविश्रेष्ठ रवींद्रनाथ टागोर** यांनी ' लंडन टाइम्स ' मध्ये लेख लिहून सरकारवर कडक टीका केली. सोलापूरच्या कैद्यांना लष्करी कायद्याखाली ज्या अमानुष शिक्षा देण्यात आल्या त्याबाबत गांधीजीनी, त्या विसंगत असल्याचे सांगितले. तसेच लोकांनीही त्याबाबत विनंती केली असताही त्यांची अंमलबजावणी करण्यात आली. गांधीजी पुढे म्हणाले,' आरोपितांपैकी बहुसंख्य, सर्व नव्हे, हिंसेबाबत मी जितका निर्दोष आहे, तितके ते निर्दोष आहेत. '

' मॉडर्न रिव्ह्यू ' ने लिहिले, '' जेव्हा व ज्या जागी लष्करी कायदा जारी करण्यात येतो, त्यामुळे काही काळ लोकांच्या मनात दहशत निर्माण होते यात शंका नाही; पण त्यातील भय लवकरच नाहीसे होते, आणि वंशाच्या जाणिवेच्या कटु आठवणी मात्र मागे राहतात. '' (जून १९३०, पृष्ठ ७८०).

फाशीची शिक्षा झालेल्या त्या चार आरोपींचे प्राण वाचवण्यासाठी डॉ. मुंजे, जयकर, सप्रू, बिकानेरचे महाराज, आगाखान इत्यादी पुढारी भारतमंत्री बेन यांना लंडनमध्ये भेटले. इंग्लंडचे प्रख्यात बॅरिस्टर विल्सन यांनी एक हजार सह्यांचा अर्ज इंग्लंडच्या राजाला सादर करून त्या चार आरोपींची मृत्युदंडाची शिक्षा रद्द करण्याची विनंती केली. हुसेनभाई लालजी या मुंबईच्या उद्योगपतींच्या अध्यक्षतेखाली एका शिष्टमंडळाने व्हाइसरॉयची मुलाखत घेण्याचा प्रयत्न केला, पण व्हाइसरॉयने शिष्टमंडळाला मुलाखत देण्याचे नाकारले. बॅ. एम. सी. छगला यांनी दोन लाख सह्यांचा अर्ज सादर केला. लेडी टाटा आणि लेडी सेटलवाड यांनी मुंबईतील एक लाख स्त्रियांचा अर्ज मुंबईच्या गव्हर्नरांना सादर केला. सरकारने मान्य केलेल्या सर्व संस्थांनी त्या चारांचे बहुमोल प्राण वाचवण्याची व्हाइसरॉय यांना विनंती केली. महाराष्ट्राच्या प्रत्येक खेड्यात आणि महाराष्ट्राबाहेरील अनेक शहरांत त्या चार पुढाऱ्यांचे प्राण वाचवावेत यासाठी सभा भरवून मागणी करण्यात आली.

न. चिं. केळकर यांनी ' केसरी ' त अग्रलेख लिहून (तारीख १३ डिसेंबर १९३०) त्या चौघांना संशयाचा फायदा द्यावा, कारण त्यांच्याविरुद्ध पुरेसा पुरावा नव्हता, म्हणून सोडावे अशी आग्रहाने मागणी केली आणि त्यांच्यावर दया दाखवावी, कारण त्याचा दुरुपयोग होणार नाही. केळकरांनी लंडनमध्ये चालू असलेल्या गोलमेज परिषदेच्या सदस्यांना तारा पाठवल्या आणि त्या चार देशभक्तांचे बहुमोल प्राण वाचविण्याची विनंती केली. प्रमुख उद्योगपती वालचंद हिराचंद व केळकर यांनी ११ जानेवारी १९३१ ला चौघांची येरवडा तुरुंगात भेट घेतली, व लगेच ते गव्हर्नर हॉटसनला भेटले; पण त्याचा काही उपयोग झाला नाही. त्या चार देशभक्तांना १२ जानेवारीला सकाळी फासावर चढविण्यात आले ! ' वंदे मातरम् ' आणि ' महात्मा गांधी की जय ' या जयजयकारात त्यांनी धैर्याने मृत्यूला आलिंगन दिले ! त्यांचे मृतदेह त्यांच्या नातेवाइकांच्या हाती दिले नाहीत, आणि सरकारनेच त्यांची विल्हेवाट लावली. विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे खटला चालू असण्याच्या काळात जगन्नाथ शिंदे याचे वजन दहा पौंडानी वाढले !

फाशी देण्यापूर्वी एकवार महात्मा गांधीची भेट मिळावी अशी शिंदे यांनी इच्छा व्यक्त केली; पण हॉटसनने ही विनंती फेटाळली आणि चौघांचे मृतदेह त्यांच्या नातेवाइकांच्या स्वाधीन करण्यात येणार नाहीत असे सांगितले.

त्या चौघांना तारीख १२ जानेवारी १९३१ ला सकाळी फासावर लटकविण्यात आले ही वार्ता सर्वत्र वणव्यासारखी पसरली. देशाच्या कानाकोपऱ्यात निषेध-सभा, हरताळ, निदर्शने झाली. ' सोलापूरच्या चौघांच्या फाशीने भारतीयातील भीती आणि ब्रिटिशांच्या राज्यातील न्याय मृत

झाला ' अशा भावना सर्वत्र व्यक्त झाल्या. या कृत्याच्या निषेधार्थ पुण्यात सुमारे ३ हजार लोकांचा मोर्चा येरवड्याकडे ' आमच्या पुढाऱ्यांचे मृतदेह आम्हाला द्या ' अशा घोषणा देत निघाला, पोलिसांनी लाठीहल्ला करून त्यांना पांगविण्याचा प्रयत्न केला.

१६ जानेवारीला सर्वत्र ' सोलापूर हुतात्मा दिन ' पाळण्यात आला. सोलापूरचे आमदार डॉ. वैशंपायन (एम. एल. सी.) यांनी हॉटसनचे अभिनंदन करणारा ठराव कौन्सिलात आला असताना त्याला जोरदार विरोध केला.

कराची येथे १ एप्रिल १९३१ ला भरलेल्या राजकीय कार्यकर्त्यांच्या परिषदेत अध्यक्षपदावरून बोलताना बाबू सुभाषचंद्र यांनी पेशावर, सोलापूर इत्यादी ठिकाणच्या ज्ञात आणि अज्ञात हुतात्म्यांचे अभिनंदन केले, आणि देशभक्तांना तुरुंगात डांबण्याच्या सरकारी धोरणाचा धिक्कार केला.

## सोलापूरची आपत्ती

सोलापूरवर कोसळलेल्या या आपत्तीमुळे किती नुकसान झाले याचा अंदाज घेण्यात आला, तो असा : तेरा कोटी रुपयांची मालमत्ता नाहीशी झाली; चार देशभक्तांना फासावर जावे लागले; बारा निरपराध व्यक्तींना गोळ्या घालण्यात आल्या; शेकडो नागरिकांना दीर्घ मुदतीच्या शिक्षा भोगण्यासाठी तुरुंगाचे खडतर आयुष्य भोगण्यासाठी पाठविण्यात आले; शेकडो शांतताप्रिय नागरिकांना आणि काँग्रेस कार्यकर्त्यांना भूमिगत जीवन जगावे लागले (अर्थात् त्यांना सोलापूर सोडावे लागले); आयुष्यभर मिळविलेल्या जिंदगीला शेकडो लोकांना मुकावे लागले; शेकडो लोक आयुष्यातून कायमचे फेकले गेले आणि मूकपणे मृत्यू पावले, हे कोणाला कळलेही नाही. सोलापूरवर कोसळलेले अरिष्ट अशा प्रकारचे होते.

सोलापूरच्या व्यापारी संघटनेने (चेंबर ऑफ कॉमर्स) तारीख १२ फेब्रुवारी १९३१ ला गांधीजींना पत्र पाठवले. त्यात म्हटले आहे : " वालचंद हिराचंद खालील गोष्टींचा खुलासा करतील– (१) तारीख ६ व ७ मे ला सोलापुरात काय परिस्थिती होती; (२) ८ मे ला सरकारी अधिकारी कसे वागले, आणि त्यांनी बेदरकार गोळीबार करून घरातच असलेल्या अनेक निरपराध लोकांना व लहान मुलांना यमसदनास कसे पाठविले; (३) लष्करी कायदा पुकारण्याची खरोखरीच आवश्यकता होती का नाही; (४) लष्करी कायद्याचा अंमल असताना कित्येक निरपराध लोकांना कसा जाच सहन करावा लागला, व त्या अधिकाऱ्यांनी अतिरेक कसा केला; (५) या सर्व प्रकारांची अधिकृत चौकशी करावी हा आमदार आर्. आर्. काळे यांचा ठराव मुंबई कायदे कौन्सिलाच्या अखेरच्या अधिवेशनात कसा निकालात काढण्यात आला आणि मुसलमानेतर नागरिकांवर दंड म्हणून किती व कशा जबर रकमा लादण्यात आल्या.

त्याचबरोबर गांधीजींना खालीलप्रमाणे तारही पाठविण्यात आली : " जर समझोता झाला (त्यावेळी गांधी-आयर्विन करार झाला नव्हता, चर्चा चालू होती) तर लष्करी कायद्याखाली शिक्षा झालेल्या सोलापूरच्या कैद्यांची मुक्तता व्हावी; ८ मे ला केलेल्या बेछूट गोळीबाराची तसेच

अधिकाऱ्यांनी केलेल्या अतिरेकाची चौकशी व्हावी, तसेच पोलिसांनी दंड म्हणून जो कर बसविला व वसूल केला तो माफ करण्यात यावा, अशी सोलापूरच्या नागरिकांतर्फे विनंती करण्यात येत आहे. ''

चेंबर ऑफ कॉमर्सचे अध्यक्ष शेठ गुलाबचंद यासंदर्भात म्हणाले, '' गेल्या वर्षी सोलापुरातील घटना दुर्दैवी आणि अनपेक्षित होत्या, राजबंद्यांवरील आरोप हिंसात्मक असले तरी त्याचे स्वरूप राजकीय होते, आणि ज्याअर्थी राष्ट्रीय लढ्याचा शेवट परस्पर सामंजस्यात झाला आहे, गांधी-आयर्विन करार म्हणून सर्व कैद्यांची सुटका करावी त्यायोगे सरकार आणि जनता यातील सामंजस्य आणि सदिच्छा वाढीस लागेल. ''[४४]

## सोलापूरचे हुतात्मे :

पोलीस खुनाच्या खटल्यात मल्लाप्पा धनशेट्टी, सारडा, जगन्नाथ शिंदे आणि कुरबान हुसेन यांना मृत्यूदंडाची शिक्षा ठोठावण्यात आली होती. त्यानी कोर्टाचा निकाल ऐकताच ' वंदे मातरम् ' आणि ' महात्मा गांधी की जय ' अशा घोषणांनी कोर्टाचे आवार दणाणून सोडले. मुख्य हायकोर्ट जज्ज बोमंट यांनी मृत्यूदंडाच्या शिक्षा कायम केल्या. न्या. माडगावकरांच्या मते फक्त धनशेट्टीना फाशी द्यावे, आणि इतर तिघाना संशयाचा फायदा द्यावा, पण बेकरनी सर्वांनाच फाशीच्या शिक्षा दिल्या.

**जगन्नाथ शिंदे :** हा सोलापूरच्या युवक संघाचा कार्यवाह व कामगार-पुढारी होता, तसेच काँग्रेसचे तडफदार एकनिष्ठ कार्यकर्ते आणि प्रसिद्ध वक्ते डॉ. अंत्रोळीकर यांचा उजवा हात तसेच विश्वासू सहकारी होता. गांधीजींच्या अटकेनंतर टिळक चौकात झालेल्या जाहीर सभेत त्याने चाकूने आपले बोट कापले, आणि देशाच्या स्वातंत्र्यासाठी आपण सर्वस्वाचा होम करावयास तयार आहोत असे माझ्या रक्ताने लिहा असे त्याने जमावाला आवाहन केले.

**अब्दुल रसूल कुरबान हुसेन :** (जन्म १९०९) हा युवक संघाचा सक्रिय कार्यकर्ता होता. तारीख ६ व ७ मे च्या सभात याने भाषणे केली. गांधीजींच्या अटकेनंतर निघालेल्या पहिल्या निषेध-मिरवणुकीचे पुढारीपण सोलापूरच्या कामगारांनी केले. हुसेन यांनी आपल्या ' गझनफर ' (सिंह) या पत्रात देशापुढील भांडवलशाही मार्गावर टीका केली, आणि भांडवलशाहीच्या हल्ल्याला तोंड देण्यासाठी संघटित होण्याची कामगारांना हाक दिली. स्वदेशी, परदेशी मालावरील बहिष्कार आणि जातीय ऐक्याचा त्याने प्रचार केला.[४५] इस्लामने स्वातंत्र्याचा पुरस्कार केला, गुलामगिरीचा नाही, अन्यायापुढे मान तुकविण्याचा नाही असे तो मुसलमानांना सांगे. तो निर्भय पत्रकार होता. तो ' गझनफर ' (सिंह) चा संपादक होता. एकाही मुस्लिम संघटनेने त्याची फाशी रद्द व्हावी म्हणून प्रयत्न केला नाही. एस्. ए. ब्रेल्वीच्या काँग्रेस मुस्लिम पक्षाचा, बारडोली सत्याग्रह आणि कामगारक्षेत्रात कम्युनिस्टांचा तो प्रचार करी.

कोर्टापुढील निवेदनात त्याने आपण कधीही हिंदु-विरोधी नव्हतो; जातीय मुस्लिम पुढाऱ्यांनी परकीय सरकारशी कट करून जातीय खटल्यात गोवण्याचा प्रयत्न केल्याचे त्याने सांगितले. १९२७ च्या गिरणी कामगारांच्या संपात त्याला तीन आठवड्यांची शिक्षा झाली होती. तो निष्ठावंत कार्यकर्ता आणि परिणामकारक वक्ता होता. सर्व राष्ट्रवाद्यांनी (मुस्लिम संघटना सोडून) त्याची शिक्षा रद्द व्हावी म्हणून प्रयत्न केले.

शिंदे आणि हुसेन यांच्यात संघटना करण्याची जबरदस्त ताकद होती. समाजातील निरनिराळ्या गटांना एकाच राष्ट्रीय भावनेच्या धाग्यात गोवण्याचे मोठे कार्य त्यांनी केले.

**श्रीकृष्ण सारडा :** हा लक्ष्मीपुत्र सक्रिय कार्यकर्ता वा संघटक नव्हता. अतिशय प्रामाणिक आणि राष्ट्रवादी म्हणून जनमानसावर त्यांचा प्रभाव होता. त्यांनी चळवळीला पैसा पुरवला. ते मृत्यूच्या छायेतही अत्यंत निश्चल राहिले आणि धीरोदात्तपणे फासावर गेले.

**मल्लाप्पा धनशेट्टी :** सक्रिय सामाजिक कार्यकर्ता. लोकमानसावर त्यांचे असामान्य प्रभुत्व होते. त्यांच्यामुळेच कलेक्टर एच्. एफ्. नाईट हा लोकक्षोभातून बचावला.

वरील चौघांनी मृत्यूला धैर्याने कवटाळले ही अभिमानाची गोष्ट आहे. ते जरी मृत्यू पावले तरी त्यांनी चालू केलेली चळवळ अधिक जोमाने चालूच राहिली.

(या चार हुतात्म्यांचे पुतळे सोलापूर शहराच्या मध्यवर्ती चौकात बसविण्यात आले. त्याचा अनावरण समारंभ भारत सरकारचे त्या वेळचे दळणवळणमंत्री बाबू जगजीवन राम यांच्या हस्ते ऑगस्ट ७, १९५३ रोजी संपन्न झाला.)

## सोलापूर प्रकरणाचा सूड

फर्ग्युसन कॉलेजच्या वाडिया ग्रंथालयात मुंबईचे हंगामी गव्हर्नर हॉटसन हे २२ जुलै १९३१ ला येणार असल्याचे कळल्यावरून त्या कॉलेजचा विद्यार्थी वासुदेव बळवंत गोगटे याने त्यांच्यावर गोळ्या झाडल्या. हॉटसन या हल्ल्यातून आश्चर्यकारकरीत्या जिवंत राहिले. ' तू माझ्यावर का गोळ्या झाडल्यास? ' या हॉटसनच्या प्रश्नाला गोगटे यांनी उत्तर दिले, ' सोलापुरातील तुमच्या जुलमी राजवटीचा निषेध म्हणून. ' गोगट्यांना पकडल्यावर त्यांना तुरुंगात नेत असता त्यांनी तेथे जमलेल्या हजारो विद्यार्थ्यांना सोलापूरच्या अत्याचारांचा सूड घ्या असे सांगितले.

या प्रकरणावर कॉंग्रेस वर्तुळात खूपच गरमागरम वादावादी झाली. ' आपण अशा कृत्याचा निषेध करतो. पण त्यामागे असलेल्या हेतूची आपण स्तुती करतो ' असे सुभाषबाबू म्हणाले. ' जर तुम्ही भगतसिंग, राजगुरु इत्यादी तरुणांचे अभिनंदन करता, मग गोगटे यांचे अभिनंदन का करीत नाही? ' या तरुणांच्या प्रश्नाला उत्तर देताना गांधीजींनी म्हटले, ' त्यावेळी मी चूक केली. '[४६]

" मी स्वतः हॉटसनवर गोळी झाडली नसून माझ्याजवळ बसलेल्या एका स्नेह्याने ती गोळी झाडली. त्याच्या हातातून मी पिस्तुल हिसकावून घेतले. हॉटसन साहेबांना चुकीने वाटले की मीच पिस्तुल झाडीत आहे, म्हणून त्यांनी माझ्यावर हल्ला केला. वैयक्तिक झटापटीत माझ्या हातातील पिस्तुलातून दुसरी गोळी चुकून निसटली. तेव्हा मी खरा गुन्हेगार नाही. मी निर्दोष आहे. मला चुकून पकडले आहे. ' असा माझ्या सेशन्स कोर्टातील जबाबाचा–रिटन स्टेटमेंटचा–सारांश होता. "[४७]

वरील जबाब वाचून सेनापती पां. म. बापट अस्वस्थ झाले. गोगटे यांना पाठविलेल्या पत्रात ते म्हणाले : " ...... एखाद्या गव्हर्नरला गोळीने मारण्यास योग्य पुरावा असेल तर मारणे आध्यात्मिकदृष्ट्या चुकीचे नाही. ....... तू हे केले आहेस याबद्दल माझी खात्री आहे...... पण तुझ्या कोर्टातल्या जबाबात तू हे नाकारले आहेस. पण सत्य टिकावे तसेच तुझ्या आत्म्याच्या समाधानासाठी तू जेव्हा कोर्टात पाय ठेवशील, तेव्हा ' मीच गोळी झाडली ' असा तू जबाब दे. " (या अशा उघड प्रचारासाठी सेनापतींना सात वर्षे सक्तमजुरीची शिक्षा झाली.).

सप्टेंबर १०, १९३१ ला गोगटे यांना आठ वर्षांची सश्रम कारावासाची शिक्षा झाली.

सोलापूर प्रकरण आणि गोगटे यांच्या स्मृती एकमेकात अशा मिसळल्या आहेत. त्या तशाच चिरकाल लोकांच्या स्मरणात राहतील व त्यांना स्फूर्ती देतील.

**निष्कर्ष**

हॉटसन हा दंगा आणि अव्यवस्था वा गोंधळ यामुळे इतका भयभीत होत असे की फाशी गेलेल्यांचे मृतदेह त्यांच्या नातेवाइकांच्या हाती देण्याची मागणीही त्यांनी फेटाळून लावली. इतकेच नव्हे तर फाशी गेलेल्यांच्या शेवटच्या इच्छाही त्यांनी पायदळी तुडविल्या.

सोलापूरची चळवळ सर्वस्वी औद्योगिक कामगारांच्या वर्चस्वाखाली होती. प्रत्येक सरकारी अहवालात ' जमाव मुख्यतः औद्योगिक कामगारांचा होता ' (तारीख ८ मे १९३०) यावरच भर देण्यात आला होता.

१ लाख ४० हजार लोकसंख्येपैकी ५० हजार कामगार होते. त्यांनी एक आठवडाभर शहर पोलिसांची हकालपट्टी करून शहराचा ताबा घेतला व स्वतःची प्रशासनयंत्रणा निर्माण केली. १२ मे ला लष्करी कायदा चालू होईपर्यंत हे टिकले. ' काँग्रेस पुढाऱ्यांचा जमावावरील ताबा नाहीसा झाला होता, पण तो (जमाव) आपली राजवट आणण्याचा प्रयत्न करीत होता ' असे **टाइम्स ऑफ इंडियाच्या** मे १४ च्या अंकातील वार्तेत म्हटले आहे. ' त्यांनी प्रशासनाचा ताबा घेतला ' असे **पूना स्टारने** म्हटले, ' आणि आपले कायदे प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला.

सोलापुरात झालेल्या दंगलीची जबाबदारी काँग्रेस कार्यकर्त्यांवर टाकण्याचा सरकारचा हेतू होता, असे महाराष्ट्र प्रांत काँग्रेस कमिटीच्या अहवालात म्हटले आहे. " लष्करी कायद्याचा अंमल

हा आमच्या इतिहासातील काळाकुट्ट काळ होता. सरकारच्या सूडबुद्धीच्या धोरणामुळे लोकांवर घोर अन्याय झाला, कायदा व न्याय याची जपमाळ मात्र ओढली जात होती. दुष्टपणाचा तो नरकच होता. '' राज्य करण्याच्या घटनात्मक अधिकारालाच, नैतिक हक्कालाच, ते आव्हान होते.[४८]

सोलापूरच्या हुतात्म्यांच्या त्यागाने भारतीय युवकांना उत्तेजन मिळाले. सोलापूरची मुक्तता हा जनतेच्या चळवळीचा मानबिंदू मानला जात होता. '' सोलापूरच्या जनतेचे उदाहरण जर भारतभरच्या सर्व औद्योगिक केंद्रांनी गिरवले असते, तर ब्रिटिश राज्याची मृत्युघंटा वाजली असती. '' [४९]

शंकर शिवदारे याच्या मृत्यूने तर १९३० च्या सोलापूरच्या चळवळीने माघार घेतली नाही, आणि घडणाऱ्या घटनांची गती थोपवून धरणे अशक्य झाले. लोकांना कलेक्टर नाईटलाच मारायचे होते, आणि शिवदारे याच्या मृत्यूचा सूड घ्यायचा होता. धनशेट्टीच्या मध्यस्थीमुळेच कलेक्टर व डी. एस्. पी. यांचे प्राण वाचले. सी. आय्. डी. ने शंकर शिवदारे याच्या मृत्यूची नोंदही केलेली नाही ! कलेक्टर नाईटने दोन घोडचुका केल्या असे दिसते :(१) शिवदारे याला मारण्याला त्याने परवानगी दिली; (२) त्याने गोळीबार करण्याचा पोलिसांना हुकूम दिला. मारले गेलेल्या पोलिसांच्या कुटुंबियांचे तसेच पोलिसांचे जीवित आणि सुरक्षितता यांचा कोणी विचारही केला नाही. सरकार भयग्रस्त अवस्थेत काम करीत होते. बिनहत्यारी पोलीस वरिष्ठ अधिकारी यांनी सोलापूर सोडले व शहराला निराधार अवस्थेत दैवाच्या आधीन केले.

कर्नल पेज हा नागरी प्रशासन तंत्रात वाकबगार नव्हता. त्यांने खालील चुका केल्या : (१) लोकांच्या मालमत्तेचे संरक्षण केले नाही, (२) लष्करी कायद्याच्या प्रशासनावर अपील करण्याच्या ट्रायब्यूनलची नेमणूक त्याने केली नाही, (३) शहर नित्याचे व्यवहार करू लागले व पूर्ववत् झाले तरी शहरात लष्करी कायद्याचा अंमल चालूच ठेवला, (४) कर्नल पेजच्या मनाचा जसा कल असेल तशा शिक्षा तो देत असे. देशातील स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या इतिहासातील तेजस्वी क्षण असाच पेज व माणेक शहा यांचा झालेला झगडा होता, (५) निरपराध लोकांना शिक्षा दिल्या, (६) सरकारने पोलीसांना सहानुभूती दाखवली व त्यांच्यासाठी शोक व्यक्त केला, पण शिवदारे यांच्यासाठी काही केले नाही, (७) लष्करातील जवानांनी लुटालूट व बलात्कार केले; पण या घटनांबद्दल डायरेक्टर ऑफ इन्फर्मेशन मूग गिळून बसला, (८) कायदेशीर बाबींची पूर्तता न झाल्याने लोकांना न्याय मिळाला नाही.

सोलापूर शहराच्या वार्षिक इतिवृत्तात नव्हे तर राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याच्या इतिहासात या चार हुतात्म्यांची नावे धैर्य, स्वार्थत्याग आणि दुर्दम्य देशाभिमान यांची प्रतीके म्हणूनच ओळखली जातील. राष्ट्रीय लढ्याला त्यांनी सतत स्फूर्तीच दिली.

## पॅरिस कम्यून ?

सोलापुरातील १९३० मधील घटनांचा मागोवा घेतला असता अभ्यासकाला सहजच १८७१ मधील ' पॅरिस कम्युन ' ची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. फ्रेंच इतिहासातील ती नेत्र[illegible]क घटना म्हणून

तिची आज आठवण होत नाही, पण काही झाले तरी ते कम्यून फक्त ७२ दिवस टिकले म्हणून होते. सामान्य जनतेने सत्ता संपादन केल्याचे ते प्रात्यक्षिकच होते; धनवानवर्गांना सत्तेच्या खुर्चीवरून खाली खेचल्याचे ते निदर्शक होते म्हणून त्याची स्मृती आवर्जून होते. मार्क्सने त्या कम्यून स्थापण्याच्या लढ्यात भाग घेतला होता. त्याने लगेच ' नवीन समाजाचा अग्रदूत ' असे मोठ्या उत्साहाने त्याचे स्वागत केले. त्याने पुढे म्हटले, ' कामगारवर्गाने त्या हुतात्म्यांची स्मृती आपल्या हृदयात जतन करून ठेवली आहे. ' पॅरिस कम्यून अपयशी झाले, पण त्यांनी रस्ता दाखवला आणि त्यापासून मिळालेले धडे १९१७ च्या रशियन क्रांतीत यशस्वीपणे गिरविण्यात आले.

सोलापुरात जी चळवळ झाली, तिच्यावर सोलापूरच्या औद्योगिक कामगारांचे वर्चस्व होते. चळवळीबाबतच्या सरकारी अहवालात–' जमाव मुख्यतः गिरणी कामगारांचा होता, आणि तो कालपासूनच कार्यासाठी बाहेर पडला आहे. ' (तारीख ८ मे १९३०) असे म्हटले आहे.

कामगारांनी एक आठवडा शहराचा ताबा घेतला, पोलिसांना नामोहरम केले, स्वतःचे शासन तयार केले, पण हे सर्व १२ तारखेला लष्करी कायदा लागू होईपर्यंतच. कामगार आणि कष्टकरी जनतेने झुंजारपणे लढा उभा केला, इंग्रजांना व स्थानिक पोलिसांना गावाबाहेर हाकलले, स्वराज्यासाठी क्रांतिकारक यंत्रणा उभारली आणि पोलिसांशी व सैन्यदलाशी कित्येक दिवस रक्तपाती लढा दिला.[५०]

सोलापूरच्या जनतेचा उठाव म्हणजे १९४२ च्या ' छोडो भारत ' ची रंगीत तालीमच होती. जेव्हा जनता जागी होते, सरकारी यंत्रणा काबीज करण्याचा प्रयत्न करते, समांतर सरकार प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करते, अशा वेळी हिंसा-अहिंसेचा प्रश्न निर्माण होत नाही. सोलापूरच्या घटना हे त्याचे ढळढळीत उदाहरण आहे. सोलापूर हा राष्ट्रीय चळवळीचा मानदंड ठरला, स्फूर्तीचा झरा ठरला.

## संदर्भ

(१) Tendulkar, D. G. ' Mahatma ', VI, 113, 186, 312.

(२) S. Gopal, Lord Irwin, p. 73.

(३) Dr. Tarachand, Vol. IV, p. 126.

(४) S. Gopal, *Op cit*, p. 58.

(५) H. D. Telegram to Bombay, Special No. 783, dated 11th March 1930.

(६) H. D. No. S. D. 540, 1930.

(७) R. P. Dutt, ' India Today ', p. 304.

(८) अंदूरकर, ' सोलापूरचे चार हुतात्मे ', p. 21.

(९) 'कर्मयोगी', १० मे १९३०.

(१०) तत्रैव.

(११) अंदूरकर, पूर्वोक्त, पृ. ६९.

(१२) 'कर्मयोगी', १० मे १९३०.

(१३) पूर्वोक्त.

(१४) File No. 512/II of 1930.

(१५) File 750/14 B 1930 (H. D. Special).

(१६) *Ibid.*

(१७) Bombay Council Speech, p. 425, Vol. XXIII, 14-7-1930.

(१८) The Times of India, 17-5-1930. The Bombay Govt. Gazette, May 12, Part VIII, pp. 298-299.

(१९) File G-136 (KW), i.c. 1930, N.M.L. New Delhi.

(२०) Jha Manoranjan, *Op cit*, pp. 84-90.

(२१) File MAG/387, 9-5-1930, National Archives, New Delhi.

(२२) Telegram to the Secretary of State Nos. 1640-1641-5.

(२३) File No. 512/I & KW 20 of 1930.

(२४) *Ibid.*

(२५) MAG/387 of 9-5-1930.

(२६) File No. 512/II of 1930.

(२७) 512/I & KW of 1930.

(२८) अंदूरकर, पूर्वोक्त

(२९) File 512/I & WK/of 1930.

(३०) File 512/I & WK 20 of 1930.

(३१) File 750(14) B(J) H. D. Special 18-8-1931.

(३२) Personal Statement given to the author on 3-1-77.

(३३) Hotson's affidavit.

(३४) The Times of India, 15-5-1930.

(३५) File 512/I & KW of 1930—D. M.'s letter MAG/387, 13-5-1930, National Archives, New Delhi.

(३६) File No. 512/I & KW 20 of 1930.

(३७) Interview with author.

(३८) The Bombay Chronicle, 29-5-1930.

(३९) The Bombay Chronicle, 20-5-1930.

(४०) D. O. No. S. D. 1695, H. D. Special 18-4-1931.

(४१) No. 512/I & K 20 of 1930.

(४२) D. O. No. S. D. 1695, H. D. Special 18-4-1931.

(४३) All India Reporter, Bom. 1931, pp. 59-68.

(४४) File G-43/1931 Nehru M. & L. New Delhi.

(४५) ' केसरी ', १२-१-१९३१.

(४६) हॉटसन गोगटे (आत्मवृत्त) पृ. २८-३०.

(४७) तत्रैव

(४८) A.I.C.C. File 24-1-1930, N. M. L.

(४९) Chari, p. 33.

(५०) R. P. Dutt, *Op cit*, P. 304.

# १२. सविनय कायदेभंग स्थगित

जानेवारी २५, १९३१ ला गांधीजींची विनाअट सुटका झाली आणि काँग्रेस वर्किंग कमिटी ही बेकायदा ठरविण्याचे प्रकटन मागे घेण्यात आले. गांधीजी तुरुंगाबाहेर आले ते मोकळ्या मनानेच. ' वैर नाहीसे करून आणि वादविवादात विशिष्ट दिशेने मनाचा कल न झुकविताना कायदेभंगाचा लढा ताबडतोब थांबवायचा नाही,' असा निर्णय काँग्रेस पुढाऱ्यांनी केला होता.गांधीजी म्हणाले, ' मला शांततेची भूक लागली आहे, पण ती शांतता सन्मानाने मिळाली पाहिजे. '

**गांधी-आयर्विन करार**

सर्वसाधारणपणे काँग्रेसचे मत विचारात घेतले तर ते आयर्विनच्या तडजोडीसाठी केलेल्या सूचनांच्या विरोधी होते. सरकारच्या समर्थनाकडून जनतेवर जे अत्याचार झाले त्याची सर्वसाधारण चौकशी करण्यास तसेच गांधीजींनी सुचविल्याप्रमाणे चौकशी समिती नेमण्यास आयर्विनने नाकारले. भूतकाळ विसरून भविष्याचा विचार करा अशी त्याने गांधीजींना विनंती केली. गांधी व आयर्विन यांची भेट फेब्रुवारी १६, १९३१ ला झाली. या भेटीत गांधीजींनी राजबंद्यांच्या सुटकेचा प्रश्न उपस्थित केला. विशेषत्वाने मीरत कट खटल्यातील, सोलापूरच्या लष्करी कायद्याखाली शिक्षा झालेले आणि बंगालमधील चौकशीविना तुरुंगात खितपत पडलेल्या राजबंद्यांचा त्यांनी उल्लेख केला. मीरत खटल्यातील आरोपींबाबत काही करण्यास असमर्थ असल्याचे व्हाइसरॉयने सांगितले, फक्त खटला गतीने चालवून कोर्टाचा निकाल आणणे शक्य होईल. सोलापूरच्या कैद्यांबाबत ज्यांना कठोर शिक्षा झाल्या आहेत असे वाटते, अशांच्या शिक्षांची मुंबई सरकारने पुनः तपासणी करावी असे त्यांनी सुचविले.

तडजोडीची अशी बोलणी चालू असता लाहोर कटातील भगतसिंग, राजगुरू आणि सुखदेव यांच्या फाशीच्या शिक्षा रूपांतरित करण्याच्या प्रश्नावर गांधीजी आणि व्हाइसरॉय यांच्यात पुनःपुन्हा दीर्घ चर्चा झाली. या तिघा वीरांच्या फाशीच्या शिक्षेबाबत देशात खूप चळवळ चालू होती. कराची काँग्रेस होईपर्यंत या फाशीच्या शिक्षा लांबणीवर टाकण्याचे व्हाइसरॉयने ठरविले; पण या तरुणांना जर तुम्ही फाशी देणारच असाल तर त्यांना कराची काँग्रेसनंतर फाशी देण्यापेक्षा काँग्रेसपूर्वीच फाशी द्यावे असे गांधीजींनी व्हाइसरॉयला स्पष्टपणे सांगितले.[१] त्या तिघा तरुणांना मार्च २३, १९३१ ला फाशी देण्यात आले. त्या काळात भगतसिंगाचे नाव सर्व भारतभर दुमदुमत होते आणि गांधीजींइतके ते लोकप्रिय होते असे म्हणण्यात काहीही अतिशयोक्ती नाही.[२] गांधीजींनी खूपच शरणागती पत्करली आहे आणि काँग्रेसचे उद्दिष्ट दुर्बल केले आहे, असे काँग्रेस वर्किंग कमिटीचे सदस्य बोलू लागले. कायदेभंगाच्या चळवळीत जप्त केलेल्या जमिनीच्या तरतुदीबाबत विठ्ठलभाई पटेलांनी नापसंती व्यक्त केली, घटनात्मक प्रश्नांवर गांधीजींनी जे वचन दिले, वा जबाबदारी पत्करली त्याबाबत नेहरूंनी नापसंती व्यक्त केली आणि राजबंद्यांना

सोडण्याबाबतचे धोरण अनुदार असल्याचे सर्वांनी सांगितले. नेहरूंनी सर्व लोकांसमक्ष उघडपणे या कराराचे स्वागत केले, त्यांची गांधीजींवरील निष्ठा उघड झाली.[३] भगतसिंगादिकांच्या हेतूंचे उदात्तीकरण करून, त्यांच्या कृत्याचा निषेध करून फाशीबद्दल अश्रू ढाळून, दु:ख व्यक्त करून, ३० मार्चला काँग्रेसने व गांधी-आयर्विन कराराबाबतचा प्रस्ताव एकमताने संमत केला. विद्यार्थी आणि युवकांना तो मान्य झाला नाही. भगतसिंग आणि त्यांच्या सहकाऱ्यांना फाशी देऊन सरकारने त्यांना भडकावले. संयुक्त प्रांतातील नवजवान भारतसभेच्या मथुरा येथील अधिवेशनात बोलताना सुभाषबाबूंनी या कराराचा धिक्कार केला.

अखिल भारतीय युवक काँग्रेसचे अधिवेशन कराचीला काँग्रेस अधिवेशनाच्या वेळीच भरले. अध्यक्षस्थानी सुभाषबाबू होते. परिषदेने गांधी-आयर्विन कराराचा निषेध केला. विद्यार्थ्यांनी राजकीय वादविवादात भाग घेण्याची ही पहिलीच वेळ होती. काँग्रेसच्या ध्येय-धोरणाशी विद्यार्थीवर्ग समरस झाला होता, राष्ट्रीय लढ्याशिवाय त्यांना इतर राजकारण नव्हते.

कराची अधिवेशनाच्या वेळी नेहरू व सरदारजी एकाच खोलीत राहिले होते. एखाद्या लहान मुलाप्रमाणे नेहरू मुसमुसत आहेत हे सरदारांनी ऐकले. गांधीजींना पंडितजींच्या अस्वस्थतेचे कारण समजले नाही. पोलिसांच्या अत्याचाराची चौकशी करण्याचे कलम करारात घातले नाही याबाबत गांधीजींनी शहाणपणा दाखवला नाही असे नेहरूंना वाटत होते. या कराराबाबत नेहरू जर असमाधानी असतील तर तो करार रद्द करण्यास मी व्हाइसरॉयना सांगेन असे गांधींनी म्हटले. गांधी-आयर्विन करार हा झाला आहे व तो आता अपरिवर्तनीय आहे म्हणून नेहरूंनी त्याला मान्यता दिली.[४]

त्या करारात पुढीलप्रमाणे तरतुदी होत्या : (१) गांधीजींनी सविनय कायदेभंगाची चळवळ तहकूब करण्यास मान्यता दिली; आणि त्याबद्दल हिंसेचा आरोप नसलेल्या राजबंद्यांची सरकारने मुक्तता करण्याचे मान्य केले; (२) स्वत:ला खाण्यासाठी मीठ तयार करण्यास, तसेच परदेशी कापडाच्या दुकानांवर व दारूच्या गुत्त्यावर शांततेने निरोधन करण्यास परवानगी देण्यात आली; (३) दुसऱ्या गोलमेज परिषदेत काँग्रेसने भाग घेण्यास गांधीजींनी मान्यता दिली.[५]

'गांधीजी व आयर्विन यांच्यातील उदात्त गुणांचा हा परिपाक होता.' सामान्य व्यवहारज्ञान आणि तडजोड या तत्त्वांचा हा विजय असल्याचे मानण्यात येत होते. हा विजय दोन्ही बाजूंचा आहे, असे गांधीजींनी स्पष्ट केले, आणि यामुळे फार चढून जाऊ नये वा निराश होऊ नये असा अनुयायांना इशारा दिला. त्यांनी म्हटले, '' काँग्रेसने जर आपली भूमिका दुसऱ्या गोलमेज परिषदेला स्वीकारावयास लावली तर या सर्व श्रमाचे फळ म्हणजे संपूर्ण स्वातंत्र्य असा मी दावा करतो.''[६]

'' गांधी-आयर्विन करारानंतर कॉ. देशपांडे यांजबरोबर कराची काँग्रेस अधिवेशनाला हजर राहण्यासाठी गेलो होतो. कम्युनिस्टांचा व सुभाष बोस यांचा या कराराला विरोध होता.....

कराचीला एक युवक परिषदही झाली. विषयनियामक समितीत कॉ. देशपांडे यांचे प्रभावी भाषण झाले. कम्युनिस्टांपैकी मी एकटाच काँग्रेस सभासद असल्याने मुख्य ठरावाला विरोध करण्याचे काम माझ्याकडे होते. अध्यक्ष वल्लभभाई यांनी ' ही मते मी व्यक्ती म्हणून मांडीत नसून कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या वतीने मांडीत आहे ' असे मी म्हणताच माइकचे कनेक्शन तोडून लाऊड स्पीकर्स बंद केले. तरी तशाही स्थितीत १० मिनिटे भाषण करून घोषणा देत सरदेसाई यांनी ठरल्याप्रमाणे मंडपातून सभात्याग केला.

सायमन अहवालाने अमेरिकेतील राजनीतिज्ञांचे लक्ष वेधले; आणि गोलमेज परिषदेत अधिक रस घेण्याचा त्यांचा मार्ग सुलभ झाला. भारताच्या घटनात्मक सुधारणांकडे इंग्लंडमधील कट्टर ढोंगी लोकांनी घेतलेल्या भूमिकेवर अमेरिकेत टीका होत होती. गांधी-आयर्विन कराराच्या संदर्भात बोलताना ' युद्धबंदी ' किंवा ' युद्धतहकुबी ' असा नेहमी उल्लेख अमेरिकन करीत; ' करार ' किंवा ' समझोता ' असा करीत नसत.[७]

गांधी-आयर्विन करारानंतर राजबंद्यांच्या सुटकेचा प्रश्न निर्माण झाला. काँग्रेस वर्किंग कमिटीचे सदस्य के. एफ. नरिमन यांनी याबाबत सर्व माहिती गोळा करून ती काँग्रेस वर्किंग कमिटीला सादर केली. त्यांच्या अहवालाप्रमाणे (मे १२) मुंबईत १०, आणि महाराष्ट्राच्या इतर भागात १२४ राजबंदी असल्याचे आढळून आले. मीरत कटाच्या खटल्यातील तीस बंद्यांचा या यादीत समावेश होता ही विशेष बाब होय. चिरनेर जंगल सत्त्याग्रह प्रकरणातील चालू असलेल्या खटल्यातील, तसेच सोलापूर लष्करी अंमलात ज्यांना शिक्षा झाल्या त्यांचीही नावे सुटका करण्याच्या यादीत नव्हती.[८] या लोकांना हिंसात्मक आरोपाखाली शिक्षा झाल्याने त्यांच्या सुटकेसाठी प्रयत्न करण्याचे नाकारण्यात आले. अहिंसात्मक आरोपाखाली ज्यांना शिक्षा झाल्या असतील त्यांच्या सुटकेसाठी प्रयत्न करण्याचे त्यांनी मान्य केले. सोलापूरचे रामभाऊ राजवाडे यांची मुक्तता झाल्याशिवाय गांधी-आयर्विन करारावर सही करण्यास त्यांनी नकार दिला.

गांधी-आयर्विन कराराच्या वेळी गढवाली वीरांच्या सुटकेबाबतचे कलम ठामपणे गाळण्यात आले. डॉ. पट्टाभींनी लिहिलेल्या काँग्रेसच्या अधिकृत इतिहासात किरकोळ गोष्टींची नोंद केलेली दिसेल, पण गढवाली सैनिकांनी स्वबांधवांवर गोळ्या झाडण्याचे नाकारून इतिहास घडविला, त्याची मात्र त्यात नोंद नाही. गढवाली प्रकरणाबाबत गांधीजींनी नापसंतीच व्यक्त केली होती.

### चळवळीने काय साधले ?

या लढ्याने एकही ध्येय साध्य झाले नाही असेच दिसून येईल. मिठाचा कायदाही दुरुस्त झाला नाही. कायदेभंगाची चळवळ मागे घेण्यात आली, अणि ज्या गोलमेज परिषदेवर बहिष्कार घालण्याची प्रतिज्ञा केली होती, तिलाच काँग्रेसने उपस्थित राहायचे होते. स्वराज्याच्या दृष्टीने कोणतेही निश्चित पाऊल पुढे पडले नव्हते. परदेशी मालावरील बहिष्काराचा हक्क मान्य झाला होता. संपूर्ण स्वातंत्र्य व साम्राज्यशाहीशी तडजोड न करणे ही लाहोर अधिवेशनात उच्च रवाने

घोषित केलेली ध्येये ही हवेत विरून गेली होती. गांधीजींची अकरा कलमे नाहीशी झाली होती. मोठ्या प्रमाणावर बारडोलीचा अनुभव (चळवळ परत घेण्याचा) पुनः आला. गांधीजी म्हणाले होते, ' चळवळ मंद वा निस्तेज होण्याची चिन्हे दिसत नाहीत. '

असहकार चळवळ अयशस्वी झाली. गांधीजींना सहा वर्षांचा कारावास भोगण्याची शिक्षा झाली. स्वराज्य पक्षाचा प्रयोग झाला. त्यातील यशापयश हा चर्चेचा विषय झाला. १९२५ मध्ये चित्तरंजन दास वारले. स्वराज्य पक्षाचा आधार गेला. गांधीवाद्यांचे विधायक कार्य चालू होतेच.

१९२० ते १९३० या काळात जातीयता व धार्मिक तेढ शिगेला पोचली. ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादात ' देशाचे दुष्मन ' सारखे पुस्तक वादाचा विषय झाले. हिंदु-मुसलमान वाद वाढीला लागला. ब्रिटिशांच्या गोळ्यांपुढे छाती उघडी करणारे स्वामी श्रद्धानंद यांचा खून झाला.

अशा या वातावरणातच सायमन कमिशनची नेमणूक झाली. सायमन कमिशन ज्या ज्या ठिकाणी गेले, त्या गावात काळ्या निशाणांनी त्यांचे स्वागत जनतेने केले. लजपतराय यांचा बळी पडला. लाहोर व मीरत कटाचे खटले लोकांचे लक्ष वेधून घेऊ लागले.

गांधीवाद ही विचारसरणी प्रस्थापित होत असतानाच ' समाजवाद ' हा विचार लोकांपुढे आला. कानपूर कट व मीरत कट यांमुळे व पंडित नेहरूंच्या प्रचारामुळे तरुणवर्ग त्याकडे आकर्षित होऊ लागला. ' नेहरू ' रिपोर्टात स्वीकारलेले ' वसाहतीचे स्वराज्य ' हे ध्येय जाऊन ' संपूर्ण स्वातंत्र्य ' हे भारताचे ध्येय घोषित झाले. गांधीजींचा ' दांडी मार्च ' साऱ्या भारताला चेतावणी देऊ लागला. '' नहीं रखनी सरकार जालीम नहीं रखनी '' ही जनतेची घोषणा झाली. ५ एप्रिल १९३० ला गांधीजींनी मिठाचा कायदा तोडला, आणि विजेचे बटण दाबल्यावर जसा सर्वत्र प्रकाश पडतो, तसा देशभर '' गनीम का कायदा तोड दिया '' चा नारा चालू झाला. मोठा वणवा पेटला. झंझावात आला. परदेशी कापडाच्या बहिष्काराच्या लढ्यात धारातीर्थी पडलेला बाबू गेनू लोकमानसात स्थिर झाला. सोलापूरच्या चार वीरांनी हौतात्म्य पत्करले. भगतसिंग, राजगुरू, सुखदेव यांनी देशासाठी हसत हसत फाशी जाण्याचा आदर्श लोकांपुढे ठेवला. सरहद्द प्रांतातील अब्दुल गफारखानांच्या लाखो अहिंसक अनुयायांवर गढवाल सैनिकांनी गोळ्या झाडण्याचे नाकारले, आणि इतिहास घडविला. चित्तगावच्या शस्त्रागारावर क्रांतिकारकांनी हल्ला चढवून शस्त्रागार लुटले. सूत्रधार होता सूर्य सेन. कल्पना दत्त सारख्या अनेक तरुण-तरुणी जन्मठेपेवर गेल्या आणि सूर्य सेन फासावर गेले.

असा हा उज्ज्वल इतिहास या कायदेभंगाच्या लढ्यात घडला आहे. गांधींनी काही हिंसक प्रकाराबाबत विरोधी मतप्रदर्शन केले तरी ते जनतेने स्वीकारले नाही. गांधीजींच्या सर्वच कृती व वक्तव्ये यांच्याशी जनताच नव्हे, नेहरू-सुभाष सारखे काँग्रेसमधीलच डावे सहमत नव्हते. कराची काँग्रेसच्या वेळी तर गांधींना काळी निशाणे दाखवण्यात आली, तरी पण गांधींचा शब्द अखेरचा होता.

काँग्रेसच्या या यशाला गालबोट लागले ते कानपूरच्या हिंदु-मुसलमान दंग्याने. पंडित गणेश शंकर विद्यार्थी सारखा तरुण कार्यकर्ता त्यात बळी पडला. नदीच्या पुरात जसे काटेकुटे येतात, तसे या लढ्यातही आले. तरीपण एक लाख तीस हजार लोक हसत हसत तुरुंगांत गेले ही मोठी जमेची बाजू आहे. लढ्यात हार-जीत असतेच. या लढ्यात संपूर्ण विजय झाला असे कोणी म्हणणार नाही, पण एकूण देशाचे पाऊल पुढेच पडले. यातील चुका कशा टाळाव्यात याचा विचार चालू झाला; आणि नवीन परिस्थितीला तोंड देण्यास लोक तयार झाले. पुढारीपण हे भांडवलदारी आहे का तडजोडवादी आहे याचा विचार जनतेच्या लढ्यात जनता करीत नाही हेच या लढ्याने दाखवले.

१९३० चा लढा हा १९४२ च्या '' चले जाव '' चळवळीची जणू रंगीत तालीमच होती.

## शंकरराव देव हेच महाराष्ट्र काँग्रेस कमिटीचे नेते

गांधीयुगाच्या प्रारंभी महाराष्ट्रात राजकीय क्षेत्रात टिळक पक्षाचे प्राबल्य होते. गांधीजींच्या असहकार युगात पंचविध बहिष्काराचा प्रामुख्याने समावेश होता. त्यांतील कौन्सिल बहिष्कारावरून तीव्र मतभेद निर्माण झाले, आणि तात्यासाहेब केळकरांच्या पुढारीपणाखाली गांधीजींच्या पुढारीपणाला विरोध संघटित होऊ लागला. टिळक पक्षातच फूट पडून शिवरामपंत परांजपे, कृष्णाजीपंत खाडिलकर, वासुकाका जोशी या पुण्यातील मंडळींनी महात्माजींच्या पुढारीपणाचा उत्साहाने स्वीकार केल्यामुळे तरुण पिढीला आश्वासन मिळाले. कर्नाटकसिंह गंगाधरराव देशपांडे, नागपूरकडील बॅ. अभ्यंकर, वीर वामनराव जोशी इत्यादी मंडळींनीदेखील गांधीजींच्या कार्याला व पुढारीपणाला जोरदार पाठिंबा दिल्यामुळे गांधींचे पुढारीपण महाराष्ट्रात स्थिरावण्याला पुष्कळच साहाय्य झाले. असहकार-युगात महाराष्ट्रात अनेक ठिकाणी राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्था उदयास आल्या आणि त्यांतील शिक्षकांनी गांधीजींच्या शिकवणीचा महाराष्ट्रातल्या तरुण पिढीला लाभ करून दिला. या नव्या पिढीतील कार्यकर्त्यांचे संघटन व मार्गदर्शन करण्याचे काम शंकरराव देवांनी केल्यामुळे गांधीयुगातील नव्या महाराष्ट्राचे पुढारीपण स्वाभाविकच शंकररावांकडे चालत आले.

ग. वि. केतकर महाराष्ट्र प्रांत काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. शंकरराव देवांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र सत्याग्रह मंडळ सत्याग्रहाची मोहीम चालवीत होते. सत्याग्रह मंडळ चालू ठेवावे असा त्यांनी आग्रह धरला. महाराष्ट्र प्रांत काँग्रेस कमिटी ही गांधीवाद्यांच्या हातात असावी (आतापर्यंत ती प्रतिसहकारवाद्यांच्या हातात होती.) याबाबत सर्वांचे एकमत होते. देव अध्यक्ष व गो आ. तथा तात्या देशपांडे हे सेक्रेटरी अशी एक तात्पुरती कमिटी बनविण्यात आली.

महाराष्ट्र प्रांत काँग्रेस कमिटीच्या बैठकीत गांधीवादी गटाने शंकरराव देवांचे नाव अध्यक्ष पदासाठी सुचविले. ग. वि. केतकरांनी स्वतःचीच उमेदवारी जाहीर केली, आणि गांधीजींच्या नावाने देवांवर दबाव आणण्याचा प्रयत्न केला, कारण गांधीजींनी त्यांना तसे पत्र पाठवले होते; पण

निवडणुका एकमताने व्हाव्यात यावर देव खंबीर होते. न. वि. गाडगीळ केतकरांना विरोध करण्यासाठी उभे राहिले. याच वेळी सेनापती पां. म. बापट सात वर्षांच्या कारावासानंतर मुक्त होऊन आले, आणि महाराष्ट्र प्रांत काँग्रेस कमिटीच्या अध्यक्षपदासाठी त्यांचे नाव तडजोडीचा उमेदवार म्हणून सुचविण्यात आले. केतकर आणि गाडगीळ यांनी निवडणुकीतून माघार घेतली, आणि सेनापती बापट महाराष्ट्र प्रांत काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष म्हणून एकमताने निवडून आले. मुंबईचे हंगामी गव्हर्नर हॉटसन यांच्यावर पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजात वा. ब. गोगटे यांनी गोळ्या झाडल्या. त्याबाबत बापट यांनी काढलेल्या निवेदनावर त्यांना सात वर्षांची शिक्षा झाली. त्यामुळे अध्यक्षपदाची जागा रिकामी झाली. पनवेल येथे भरलेल्या प्रांतिक काँग्रेस कमिटीच्या बैठकीत शंकरराव देव महाराष्ट्र प्रांत काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष म्हणून एकमताने निवडून आले.

## कराची काँग्रेस (१९३१)

६ मार्च १९३१ ला गांधी-आयर्विन करार झाला. सुभाषचंद्र बोस आणि इतरांच्या नेतृत्वाखाली काम करणाऱ्या डाव्या विचारसरणीच्या लोकांनी या कराराला निकराने विरोध केला. कराची काँग्रेसच्या प्रकट अधिवेशनात एस्. जी. सरदेसाई यांनी कराराला विरोध केला. त्यांच्या आठ मिनिटांच्या भाषणात त्यांनी लढ्यात जनता भयभीत झाली नसल्याचे सांगितले. काँग्रेसचे पुढारीपण साम्राज्यशाहीबरोबर तडजोड करणारे असल्याचा आरोप त्यांनी केला, आणि जनतेने केलेल्या लढ्यांचा त्यांनी गौरव केला. जनतेची दमछाक झाली नसून १९२२ मधील चौरीचौरा व सोलापूर (१९३०) येथील जनतेच्या उठावामुळे पुढारी भयभीत झाले असल्याचे त्यांनी सांगितले. कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या डावपेचात्मक धोरणाचा उल्लेख त्यांनी करताच अध्यक्ष वल्लभभाई पटेल यांनी ध्वनिक्षेपकच बंद केला; कारण सरदेसाई यांचे भाषण म्हणजे काँग्रेस पुढारीपण अपराधी असल्याचे ध्वनित करण्यासारखे आहे असे त्यांना वाटले.

अखिल भारतीय कामगार शेतकरी पक्ष व अखिल भारतीय यूथ लीगची अधिवेशने कराचीत भरली. मूलभूत हक्कासंबंधी आर्थिक धोरणासंबंधीच्या काँग्रेसच्या ठरावापेक्षा कामगार शेतकरी पक्षाचा ठराव अधिक मूलगामी आणि पुरोगामी होता. लढा चालू राहावा असे यूथ लीगचे मत होते. दोन्हींच्या अधिवेशनात गांधी-आयर्विन कराराचा तसेच गोलमेज परिषदेत भाग घेण्याच्या काँग्रेसच्या निर्णयाचा धिक्कार करण्यात आला.

काँग्रेसमधील एक मोठा गट जरी गांधींच्या मागे होता, तरी यूथ लीग आणि दहशतवादी गट यांच्याकडे झुकणाऱ्या तरुणांचा विरोध त्यांना जाणवत होता. भगतसिंग, राजगुरू आणि सुखदेव यांच्या फाशीमुळे गांधीजींच्या पुढील अडचणीत भरच पडली. ' गांधी परत जा ' या घोषणेनेच क्रुद्ध झालेले गट त्यांचे स्वागत करी, पण गांधींनी शांतपणे या प्रसंगाला तोंड दिले. त्यांचा प्रभाव वाढला आणि जवळजवळ एकमतानेच गांधी-आयर्विन कराराला काँग्रेस अधिवेशनात मान्यता मिळाली. गांधीजींचा हा विजय अंशतः काँग्रेस यंत्रणेवर त्यांच्या अनुयायांची

असलेली पकड आणि काही प्रमाणात प्रस्थापित पुढारीपणाविरुद्ध जहाल (डाव्या) गटांना एकत्र आणण्यात जवाहरलालजींना आलेले अपयश यांच्यामुळेच आहे असे गांधींचा एक विरोधक म्हणाला. तरुणांच्या निष्ठेपायी गांधींनी मोठी किंमत मोजली असे सप्रूंना वाटले. मूलभूत हक्काबाबतच्या कराची अधिवेशनात संमत झालेल्या ठरावाचाच त्यांच्या मते तो अर्थ होता. गांधी-आयर्विन करार, भगतसिंग आणि सहकारी यांची फाशी आणि मूलभूत हक्कासंबंधीचा ठराव यांच्यामुळेच कराची अधिवेशन सतत लक्षात राहील.

भारताचे परकी सरकार व राष्ट्रीय कॉंग्रेस यांच्यातील पहिली निकराची लढाई गांधी-आयर्विन युद्धबंदीमुळे तात्पुरती समाप्त झाली. कॉंग्रेसचे कराची अधिवेशन हे शांततेचा पाया होऊ शकेल की नाही याचा निर्णय देणारे वस्तुतः युद्धमंडळच होते. सत्याग्रह या हत्याराचा उपयोग करण्यात आला, ते शस्त्र इतक्या मोठ्या प्रमाणावर प्रथमच पारखले गेले, आणि राष्ट्रात नवी आशा निर्माण झाली, कारण त्यामुळे निर्विवाद यश मिळाले होते. यूथ लीगचे पुढारी मेहरअल्ली यांनी ही युद्धबंदी म्हणजे ब्रिटिशांच्या व्यवहारचातुर्याचा विजय आहे असे म्हटले. ते आणखी म्हणाले, ' जनतेत शक्ती किंवा हिंमत एकदा निर्माण केल्यावर ती मिळत आहे तोपर्यंत तिला दिशा दाखवली पाहिजे, आणि तिचा उपयोग करून घेतला पाहिजे. या लढ्यात जर कोणाची दमछाक झाली असेल तर सामान्य माणसाची वा कॉंग्रेसच्या सामान्य सैनिकाची नाही, तर ब्रिटिश सरकारची; कारण त्याची आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठा धुळीला मिळाली. यासाठी, इतर कारणे आहेतच. ही युद्धबंदी राष्ट्रीयदृष्ट्या चूकच आहे. आमचा आक्षेप तत्त्वाचा आहे. तडजोडीच्या राजकारणाविरुद्ध तो आहे. शेवटी ते म्हणाले, '' संपूर्ण स्वातंत्र्य म्हणजे माणसाने माणसाची हृदयभग्न करणारी अखंड पिळणूक नाहीशी करणे. मग तीच पिळणूक वरिष्ठ वर्गाने कनिष्ठ वर्गाची केलेली, तथाकथित वरिष्ठ जातींनी दाबून ठेवलेल्या जातीची केलेली, राज्यकर्त्यांनी प्रजेची केलेली, मग ते कृष्णवर्णीय असोत वा अन्यवर्णीय असोत, त्याचे अत्यंत हिडीस रूप म्हणजे भारतातील ब्रिटिश साम्राज्यशाही. '' बिर्ला, टाटा आणि ठाकुरदास आता बाद झाले आहेत, आणि दुसऱ्यांनी भोगलेल्या व्यथा, वा त्यांचा त्याग यांची फळे मिळविण्यासाठी ते आता प्रयत्नशील आहेत '', असे त्यांनी शेवटी सांगितले. ' समाजवाद आयात करण्याचा हा मार्ग नव्हता ' असे जवाहरलालजी म्हणाले. या ठरावात प्रतिपादिलेल्या बाबी भांडवलदारी इंग्लंडने प्रत्यक्षात आणल्या होत्या (मुंबई ' क्रॉनिकल '–१ एप्रिल १९३१). ' गिरणी कामगारांना कमीत कमी पगार आणि ते करीत असलेल्या कामावर नियंत्रण याची गिरणी मालकांनी खात्री द्यावी, असा जमनादास मेहता यांनी केलेला प्रयत्न विधिमंडळाने फेटाळून लावला.

गांधीजी दुसऱ्या गोलमेज परिषदेसाठी लंडनला जाणार होते. कम्युनिस्ट आणि इतर डाव्या विचारसरणीच्या संघटनांनी त्यांच्याविरुद्ध निदर्शने केली. त्याच वेळेला गिरणी मालकांनी गांधीजींना पाठिंबा देण्यासाठी कामगारांची निदर्शने घडवून आणली. त्यावेळी विरोधी

निदर्शकांमध्ये झालेल्या मारामारीमुळे कॉ. देशपांडे व बुखारी यांना मारहाण झाल्याने त्यांना हॉस्पिटलमध्ये दाखल करावे लागले. लाल झेंडा व पताका जाळण्यात आल्या. काँग्रेसचे शिष्टमंडळ जेव्हा लंडनला गेले तेव्हा मुंबईच्या ४६ गिरण्या बंद होत्या (ऑक्टोबर, ५).

## मूलभूत हक्क

काँग्रेसच्या कराची अधिवेशनात स्वराज्यासंबंधीचा ठराव गांधीजींनी मांडला. त्याचे पहिले वाक्य असे होते–' जनतेची पिळवणूक नाहीशी करण्यासाठी उपासमार होत असलेल्या लक्षावधी जनतेला, खरे आर्थिक स्वातंत्र्य असलेले राजकीय स्वातंत्र्य मिळाले पाहिजे असे काँग्रेसचे मत आहे. ' त्या ठरावाचे पहिले पोटकलम मूलभूत हक्कांसंबंधी आहे. या ठरावाच्याद्वारे काँग्रेसने ' जनतेची पिळवणूक नष्ट करण्यासाठी ' प्रथमच विचार मांडले. प्रौढ मताधिकाराबरोबरच, जात, लिंग आणि संप्रदाय यांचा विचार न करता, भाषणस्वातंत्र्य, संघटनस्वातंत्र्य व संचारस्वातंत्र्य या राजकीय हक्कांबरोबरच काही आर्थिक आणि सामाजिक हक्क जनतेला दिले पाहिजेत, अशी निश्चित प्रतिज्ञा त्यात होती. आर्थिक हक्क म्हणजे : कामगार संघटना बळकट करण्यावर भर, जीवनवेतन, वृद्धांसाठी आजारीपण वा बेकार अवस्थेसाठी तरतूद, स्त्री-कामगारांना तसेच बालकामगारांना संरक्षण, योग्य शासन-यंत्रणेमार्फत कामगारांच्या तंट्यांची सोडवणूक, अधिक उत्पन्न असणारांना चढत्या श्रेणीने मिळकत कर, वारसा कर बसविण्याची योजना, शेतीवरील खंडात कपात, सावकारी नियंत्रण, सामाजिक हक्क म्हणजे : मोफत प्राथमिक शिक्ष ण, धार्मिक तटस्थता, मादक पदार्थांवर नियंत्रण (दारूबंदी वगैरे) यांवर भर. पण वरील सर्वांमुळे पुरोगामी तरुणांचे समाधान झाले नाही; कारण गांधीजींच्या ठरावात जमीनदारांच्या हितसंबंधांना हात लावला नव्हता, आणि शेतकऱ्याला त्याच्या जमिनीवर निर्वाह करता येईल याची शाश्वती देण्यात आली नव्हती. यासाठी वर्गीय संघटनांवर भर देण्यात आला होता. आताच्या संदर्भात मूलभूत हक्कासंबंधीचे खालील पोटकलम महत्त्वाचे आहे. ' मूलभूत उद्योगधंदे, खाणी, रेल्वे, नौकानयन, जलमार्ग आणि इतर सार्वजनिक वाहतुकीच्या साधनांवर नियंत्रण वा त्यांची मालकी शासनसंस्था आपल्या हाती घेईल.'

कराची काँग्रेसवर दुःखाची छाया पसरली त्याचे आणखी एक कारण होते. अधिवेशन चालू असण्याच्या काळात कानपूरला गंभीर स्वरूपाचे हिंदू-मुस्लिम दंगे झाले. मुसलमानांना हिंदूंच्या संतापापासून वाचवताना, तसेच दोन जमातींत शांतता आणि सद्भाव प्रस्थापित करीत असताना कानपूरचे काँग्रेस कार्यकर्ते गणेश शंकर विद्यार्थी यांचा खून झाला. सरकारी अंदाजानुसार या जातीय दंग्यात १६६ जण मृत्यू पावले आणि ४८० जखमी झाले.

कराचीपासून बारा मैलांवर गांधी आणि वल्लभभाई आगगाडीतून उतरणार हे कळताच तरुणांनी त्यांच्या विरोधी काळे झेंडे दाखवून निदर्शने केली. गांधीजींनी त्या संतप्त तरुणांना विनोद करून जिंकले. तरुणांचे पुढारी सुभाषबाबू म्हणाले, '' मला भारतात समाजवादी

प्रजासत्ताक राज्य पाहिजे. कॉंग्रेसच्या कार्यक्रमामुळे स्वातंत्र्यप्राप्ती होणार नाही. '' ते पुढे म्हणाले, '' जागतिक साम्राज्यशाही इमारतीची भारत ही कोनशिला आहे. स्वतंत्र भारत म्हणजे जगातील साम्राज्यशाहीचा विनाश होय. म्हणून आपण या प्रसंगी उठाव करू या, भारताला स्वतंत्र करू या म्हणजे मानवसमाजही मुक्त होईल. ''

कराची कॉंग्रेस अधिवेशनात गांधीजींच्या तत्त्वांचा राजकीय विजय झाला; पण कॉंग्रेसच्या कार्यक्रमामध्ये पुरोगामी आणि समाजवादी विचारप्रवाह येण्याचा प्रारंभही झाला. कराची कार्यक्रमामध्ये निश्चितपणे त्या दृष्टीने पावले पडलेली दिसली.

भारतात १९२० ते ३० या दशकात समाजवादी विचारांचा प्रसार वेगाने होत होता. कानपूर कटाचा खटला (१९२४), कामगार शेतकरी पक्ष (१९२७ व २८), मीरत कटाचा खटला (१९२९-३३), कॉंग्रेस साम्राज्यशाहीविरोधी संघाला (लीग अगेन्स्ट इंपीरिॲलिझम) जोडणे, पब्लिक सेफ्टी बिल आणि ट्रेड डिस्प्यूट्स बिल यांना कॉंग्रेस पुढाऱ्यांनी आणि तरुणांनी केलेला विरोध, कापड गिरण्या व रेल्वेतील कामगारांच्या संघटना बांधणे आणि देशभर संपाची उसळलेली लाट–या सर्वांमुळे समाजवाद हा अपरिहार्य असल्याचे कॉंग्रेसला वाटू लागले. १९२७ साली रशियाला भेट देऊन आल्यापासून जवाहरलालजींनी स्वतंत्रपणे वा कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून समाजवादाचा प्रचार केला. कराची कॉंग्रेसचा मूलभूत हक्कांचा ठराव म्हणजे कम्युनिस्ट, यूथ लीग यानी एक दशकभर केलेल्या प्रचाराचे हे फळ होते.

कराची अधिवेशनात गांधी-आयर्विन कराराबाबतचा ठराव जवाहरलालजींनी ' मानसिक तणाव आणि शारीरिक यातना ' सहन करून मांडला. ' याचसाठी गेले वर्षभर आम्ही शूरपणाने लढलो? आमचे शब्द आणि आमची कृती यांचा शेवट असा होणार काय? ' असा ते विचार करीत होते. ताठर कॉंग्रेस यंत्रणा आणि देशभर पसरलेली व्यापक चळवळ यांच्यात एकप्रकारे प्राणघातक भगदाड पडले होते. ' या कराराला निवडून आलेल्या प्रतिनिधींकडून पाठिंबा मिळाला. नसता ' असे सुभाषबाबू म्हणाले.

ज्या महिन्यात करार झाला त्याच महिन्यात घाईघाईने कॉंग्रेसचे अधिवेशन भरविण्यात आले आणि त्यात या कराराला एकमुखी मान्यता मिळाली. या ठरावाला अधिवेशनात उघड विरोध करणे शक्य नव्हते, कारण ते राष्ट्रीय ऐक्याच्या विरोधी झाले असते, असे सुभाषबाबूंना वाटत होते. या कराराबद्दल जनतेत प्रेम नव्हते असे नेहरू म्हणाले, कॉंग्रेसच्या प्रतिनिधींमध्ये कराराच्या विरोधकांना पाठिंबा नव्हता. कराची अधिवेशनाच्या वेळी हा करार होत असताना डावा राष्ट्रवाद कोलमडला आणि गांधीजींचे पुढारीपण बलिष्ठ झाले. मूलभूत हक्काच्या ठरावात पुरोगामी सामाजिक आणि आर्थिक कार्यक्रम अंतर्भूत करून डाव्या राष्ट्रवादाला सवलत दिल्यासारखेच हे होते.[१]

गांधीवादी राजकारण जणू कसोटीलाच लागले होते. '' अशा रीतीने जरी गांधीजींनी जनतेला उठविले, तरी त्यांनी तडजोड स्वीकारली आणि जनतेच्या प्रहार करण्याच्या ताकदीचा

कमाल उपयोग करून घेतला नाही. त्यांनी १९२२ साली (चौरीचौराच्या वेळी) आणि आता १९३१ साली ही संधी घालवली.[१०]

महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीची बैठक मसूर (जिल्हा सातारा) येथे मा. श्री. अणे यांच्या अध्यक्षतेखाली भरली आणि गांधी-आयर्विन कराराला मान्यता देण्यात आली.

## संदर्भ

(१) डॉ. पट्टाभि, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. ७४५.

(२) डॉ. पट्टाभि, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. ७६७.

(३) डॉ. एस. गोपाळ, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. ११४.

(४) व्ही. शंकर, 'My experiences with Sardar'.

(५) वैदेही, पृ. १८४.

(६) सी. व्ही. एच्. राव, पृ. ४०.

(७) मनोरंजन झा, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. १८७-१८८.

(८) File G-43/1931. नेहरू म्युझियम, दिल्ली.

(९) रजनी पाम दत्त, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. १०८-१०९.

(१०) एस. जी. सरदेसाई, ' दि. महात्मा : ए मार्क्सिस्ट सिंपोसिअम ', पृ. ३३.

# १३. बचावात्मक लढा

१९३२ च्या जानेवारीत सरकारने काँग्रेसबाबत आक्रमक पवित्रा घेतला आणि काँग्रेस पुढाऱ्यांना बुचकळ्यात टाकले. गोलमेज परिषदेच्या सलोख्याच्या वातावरणात हा एकदम बदल झाला होता. १९३० मध्ये काँग्रेसने आक्रमक पवित्रा घेतला होता; आता काँग्रेसला बचावात्मक धोरण स्वीकारणे भाग पडले. सरकारशी सहकाराचा पवित्रा घेण्याबद्दल गांधीजी आग्रही होते, पण सरकारला सहकार्य नको होते. नोव्हेंबर १९३१ मध्येच दडपशाहीच्या योजना तयार झाल्या होत्या, याची काँग्रेसच्या पुढाऱ्यांना माहिती होती; त्यावेळी गांधीजी लंडनमध्ये दुसऱ्या गोलमेज परिषदेत भाग घेत होते.

गांधीजींच्या अनुपस्थितीत भावी लढ्यासाठी दबाव वाढतच होता. जवाहरलाल आणि अब्दुल गफारखान यांच्या हालचालीमुळे नवीन वटहुकूम निघतच होते आणि नवीन अटका होतच होत्या. गांधीजी गोलमेज परिषदेहून परत आल्यावर लढ्याला तोंड द्यावे लागेल, अशी नरिमन व वल्लभभाई यांची भाषणे चालूच होती.

तारीख २ व ३ जानेवारी १९३२ ला पनवेल (जिल्हा रायगड) येथे भरलेल्या महाराष्ट्र प्रांतिक परिषदेत एक ठराव संमत झाला, आणि लढ्याची जबाबदारी सरकारवर टाकण्यात आली आणि लढ्यात भाग घेण्यासाठी जनतेला आवाहन करण्यात आले.

**दडपशाही**

अखिल भारतात ४७४ आणि मुंबई इलाख्यात ७४ संस्था बेकायदेशीर ठरविण्यात आल्या. या सरकारी दडपशाहीचा भारत सेवक समाजाने (सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी) तीव्र निषेध केला आणि १८१८ आणि १८२७ चा क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट लागू करण्याला विरोध केला.मद्रासच्या ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनीही या कायद्याचा दुरुपयोग होत असल्याची टीका केली. या वटहुकुमाचा अँग्लो-इंडियन पुढाऱ्यांनीही निषेध केला.

सरकारच्या दडपशाहीचा निषेध म्हणून सविनय कायदेभंगाची चळवळ पुन्हा चालू करावी असा काँग्रेस वर्किंग कमिटीने ठराव संमत केला; पण हा ठराव अंमलात आणण्यापूर्वी गांधीजींनी व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डनशी संपर्क साधला आणि कायदेभंगाची चळवळ प्रत्यक्ष सुरू होण्यापूर्वी सरकारचा त्याबाबत काय दृष्टिकोन आहे हे जाणून घेण्यासाठी त्यांची मुलाखत मागितली; पण ती नाकारण्यात आली. ' कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याच्या धमकीखाली ही मुलाखत मागितली, असे त्याचे नेहमीचे कारण देण्यात आले.[१] चळवळ चालू करण्यापूर्वी व्हाइसरॉयनी मुलाखत न दिल्याबद्दल गांधीजींनी खेद व्यक्त केला आणि '' हा लढा द्वेषबुद्धीने न लढता संपूर्ण-पणे अहिंसात्मक मार्गांनी लढला जाईल यासाठी काँग्रेस प्रयत्नशील राहील '' अशी ग्वाही दिली.

तारीख ४ जानेवारी १९३२ ला गांधीजींना अटक झाली आणि तेव्हाच लढा चालू झाला. काँग्रेस बेकायदेशीर संस्था म्हणून जाहीर करण्यात आली. तेव्हाच गांधी-आयर्विन करार मृतावस्थेत गेला हे सर्वांनी ओळखले. तारीख ४ जानेवारीलाच चार नवे वटहुकूम जारी करण्यात आले; इमर्जन्सी पॉवर्स ऑर्डिनन्स (आणीबाणीचे अधिकार देणारा, अन्‌लॉफुल असोसिएशन, प्रिव्हेन्शन ऑफ मॉलेस्टेशन अँड बॉयकॉट, अन्‌लॉफुल इन्स्टिगेशन बेकायदेशीर चिथावणी देणे). त्यावेळचे भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांनी कॉमन्स सभेत हे वटहुकूम जुलमी वा दडपशाहीचे असल्याचे मान्य केले, पण ' भारतात अराजक माजू नये म्हणून ते आवश्यक आहेत ' असे त्यांनी त्याचे समर्थन केले. काँग्रेसची कार्यालये, साधनसंपत्ती, निधी, घरे आणि फर्निचर इत्यादी जप्त करण्यात आली.

काँग्रेसच्या अध्यक्षांची एकामागून एक असे काम करू शकतील अशांची यादी करण्यात आली. तशीच व्यवस्था निरनिराळ्या प्रांतांत करण्यात आली. प्रांतापासून खेडेगावापर्यंत ' डिक्टेटरां ' ची निवड करण्यात आली व पुढील कार्यक्रम आखण्यात आला : (१) दारू दुकानांवर निरोधन; (२) परदेशी कापडावर निरोधन; (३) ब्रिटिश मालावर निरोधन; (४) शेतकऱ्यांनी जमीनदारांना खंड न देणे (संयुक्त प्रांतात); (५) गांधी दिन, मोतीलाल दिन, ध्वज दिन, हुतात्मा दिन, सरहद्द दिन—असे दिन पाळून जनतेत उत्साह निर्माण करणे; (६) मिठाचे आणि जंगलाचे कायदे मोडणे; (७) जप्त केलेल्या काँग्रेसच्या कार्यालयांचा ताबा मिळविणे; (८) ब्रिटिश मालावरील बहिष्काराचा कार्यक्रम व्यापक करणे.[२]

जमावावर लाठीहल्ले, लोकांवर वा गावांवर जबर दंड हा नित्याचा क्रमच झाला होता. जरी अमानुष दडपशाहीचा नंगानाच चालला होता, तरी हिंसेचा उद्रेक झाला नाही.

४ जानेवारीला काँग्रेस पुढाऱ्याना अटक झाली आणि काँग्रेस कार्यकर्त्यांचीही धरपकड करण्यात आली. धरपकड मोठ्या प्रमाणावर झाली तरी बेकायदा ठरविलेल्या काँग्रेसचे अधिवेशन कलकत्त्याला एप्रिल १९३३ मध्ये भरले आणि त्याला हजारो काँग्रेस कार्यकर्ते हजर राहिले. जनतेने शूरपणाने लढा दिला. रजनी पाम दत्त म्हणतात : ' ही शूर शिपायांची लढाई होती, फक्त व्यूहरचना केलेले पुढारीपण मात्र त्यांना नव्हते. '

चळवळीची ज्योत तेवत ठेवण्याचे काम ' डिक्टेटर ' करीत असत. त्यांची साखळी कधीच खंडित झाली नाही. लोक हिरिरीने पुढे येत असत. प्रत्येक जिल्ह्यात असे लोक पुढे आले. सातारा जिल्ह्यात तर ४८ डिक्टेटरांना पकडण्यात आले व त्यांना शिक्षाही झाल्या.

१९३०-३१ पेक्षा १९३२-३३ या वर्षात दडपशाहीचे प्रमाण जबर होते. १९३२ च्या पहिल्या चार महिन्यांत ८० हजार लोकांना पकडण्यात आले असा अहवाल मे १९३२ ला पं. मालवीय यांनी दिला. चळवळ सुरू झाल्यावर पंधरा महिन्यांनी, म्हणजे मार्च २, १९३३ ला पकडलेल्यांचा आकडा एक लक्ष वीस हजारावर गेला असे (बेकायदा) कलकत्ता अधिवेशनात सांगण्यात आले. ' भारतातील सद्यःस्थिती ' हा अहवाल ' इंडिया लीग डेलेगेशन ' ने १९३३ मध्ये प्रसिद्ध केला.

सरकारने मोठ्या प्रमाणावर केलेली हिंसा, शारीरिक जुलूम, लाठीमार, मारहाण, गोळीबार, खेड्यातील जमीन आणि मालमत्ता ताब्यात घेणे–अशा गोष्टींचा त्यात उल्लेख आहे.[३]

गांधीजींच्या नेतृत्वाखाली कॉंग्रेसने सुरू केलेली सविनय कायदेभंगाची चळवळ ऐनभरात असताना रवींद्रनाथ टागोर यांनी, भारतातील जनतेच्या मूलभूत मागणीला मान्यता मिळावी आणि भारताला स्वातंत्र्याचे सार असे ताबडतोब मिळावे असेही प्रयत्न केले. भारत अणि ब्रिटन यांच्यातील सहकार्य वाढावे याचा अर्थ म्हणजे भारतीय जनतेचा समानतेचा अणि स्वयंनिर्णयाचा हक्क मान्य करणे, असे त्यांनी प्रतिपादन केले.

## पुणे करार

१९३२ ते ३४ या लढ्याच्या काळात भारताच्या राजकारणावर कायमचा परिणाम करणाऱ्या दोन महत्त्वाच्या घटनांनी लोकांचे लक्ष वेधून घेतले. एक म्हणजे जातीय निवाड्याच्या विरुद्ध गांधीजींनी केलेले प्राणांतिक उपोषण आणि त्यापाठोपाठ झालेला येरवडा किंवा पुणे करार.

ब्रिटिश पंतप्रधानांनी जातीय प्रश्नांबाबत ऑगस्ट १४, १९३२ ला निवाडा दिला. या निवाड्याप्रमाणे दलित जातींना (वर्गीयांना) प्रांतिक विधिमंडळात निराळ्या जागा देण्यात आल्या होत्या. तसेच त्यांना दुबार मतदानाचा हक्क मिळाला होता. त्यायोगे ते आपल्या वर्गाचे प्रतिनिधी निवडू शकत आणि सर्वसाधारण निवडणुकीतही मतदानाचा हक्क ते बजावू शकत. जातीय निवाड्यामुळे मुसलमान, शीख, युरोपियन, ख्रिश्चन अणि अँग्लो-इंडियन यांना स्वतंत्र मतदारसंघ देण्यात आले होते.[४]

ज्यावेळी हा निवाडा प्रकट झाला त्यावेळी गांधीजी तुरुंगात होते. दलित वर्गीयांना राजकीय विभक्त ठेवण्याने आर्थिक आणि सामाजिक क्षेत्रात ते इतरांपासून विभक्त होतील आणि यामुळे देशाचे तुकडे पडतील आणि फाटाफूट होईल असे गांधींनी सर सॅम्युएल होअर यांना पत्र पाठवले. पूर्वी सूचित केल्याप्रमाणे गांधींचे बेमुदत उपोषण चालू झाले. गांधीजींचे प्राण वाचवायचे असतील तर ब्रिटिश पंतप्रधानांनी दिलेला निवाडा बदलला पाहिजे व दुरुस्त केला पाहिजे व त्यासाठी माझी मान्यता पाहिजे असे डॉ. आंबेडकरांनी म्हटले. दलितांना १४८ जागा विधिमंडळात दिल्या होत्या, आंबेडकरांनी १९७ जागा मागितल्या. सेंट्रल असेंब्लीत ब्रिटिश मुलुखातून जे हिंदू निवडून येतील त्यांच्या दहा टक्के जागा दलितांना देण्यात याव्या. एकमेकांशी करार करून सार्वमताचा काळ नंतर ठरवावा.

२४ सप्टेंबरला सायंकाळी ५ वाजता वरील करारावर सह्या झाल्या आणि तो इतिहासात पुणे करार म्हणून मान्यता पावला. विभक्त मतदारसंघाचे दुष्परिणाम टाळण्यासाठीच हा करार करण्यात आला. ' या घटनेमुळे राष्ट्रीय लढ्यावरील लोकांचे लक्ष दुसरीकडे लागले. गांधीजी या लढ्याचे पुढारी होते. '

या करारावर सह्या झाल्यावर व ब्रिटिश पंतप्रधानांनी तो स्वीकारल्यावर आणि गांधीजींनी उपवास सोडल्यावर मुंबईत पुढाऱ्यांची परिषद भरली. त्यात एक ठराव संमत झाला व अस्पृश्यतानिवारणाच्या कामाला लागलो आहोत असे समाजाला वचन दिले. यातूनच हरिजन

सेवक संघाची निर्मिती झाली. घनश्यामदास बिर्ला हे अध्यक्ष व अमृतलाल ठक्कर हे कार्यवाह म्हणून काम करू लागले. या अस्पृश्यता-निवारणाच्या कार्याला देशभर पाठिंबा मिळाला. कायदेभंगाच्या चळवळीत जे तुरुंगात गेले नाहीत, त्यांना हे कार्यक्षेत्र मिळाल्याचे समाधान मिळाले.

## कायदेभंगाचा लढा स्थगित

सप्टेंबर ३ ते १२, १९३२ ला अलाहाबादला ' एकता ' परिषद भरविण्यात आली त्यात निरनिराळ्या समित्या नेमण्यात आल्या. सय्यद महमूद अणि गोविंद मालवीय हे कार्यवाह म्हणून निवडून आले. वरील काळात कमिटीच्या २३ बैठका झाल्या अणि एकूण १३६ तास काम झाले.

संरक्षण, परराष्ट्रीय संबंध व अर्थ ही खाती भारतीय जनतेच्या हाती सोपवण्यात यावीत अशी मागणी करावी याबाबत एकमत झाले. भारतीय जनतेच्या हितसंबंधांना पोषक होतील अशीच संरक्षक बंधने विधिमंडळात संमत झालेल्या कायद्याप्रमाणे थोड्या काळापुरती घालता येतील.[५]

१९३० पेक्षा १९३२ साली लोकांचा उत्साह कमी झाल्याने चळवळीचा जोर कमी झाला, सविनय कायदेभंगाची चळवळ निरुपयोगी आहे अशी तक्रार काँग्रेसजन १९३२ पासूनच करू लागले आणि काहीनी काँग्रेसच्या धोरणात बदल करावा याबाबत पुढाऱ्यावर दडपण आणण्यास सुरुवात केली. चळवळ कमकुवत करण्याच्या या प्रयत्नांना जवाहरलालजी अणि वल्लभभाई पटेल यांनी विरोध केला. चळवळ आस्ते आस्ते कमी होईल अशा स्वरूपाची प्रकटने गांधीजींनी काढली. गांधीजी कायदेभंगाला चिकटून आहेत व तेच लढ्याचे पुढारी असल्याने त्यांच्या प्रकटनामुळे कार्यकर्त्यांना भडकवल्यासारखे झाले व त्यांचा गोंधळ उडाला. चळवळ मधूनमधून परत घेतली आणि जुलै १९३३ मध्ये पुण्याच्या दीडशे कार्यकर्त्यांकडून ही बहुजनसमाजाची चळवळ म्हणून चालवू नये याबद्दल त्यांनी अनुकूल असे मतही घेतले.

कायदेभंगाची चळवळ सहा आठवडे स्थगित करावी असे काँग्रेसचे हंगामी अध्यक्ष बापूजी अणे यांनी मे १९३३ मध्येच घोषित केले, कारण चळवळीबाबत गांधीजींची सूचक विधाने होती. काँग्रेसचे प्रतिनिधी म्हणून व्हाइसरॉयना भेटण्याचे अधिकार गांधीजींना देण्यात आले. ती खेळी जेव्हा अयशस्वी झाली, तेव्हा अणे यांनी २२ जुलै १९३३ ला ही बहुजनसमाजाची चळवळ राहणार नसल्याचे व ती बिनशर्त परत घेतल्याचे घोषित केले. पुण्याच्या कार्यकर्त्यांशी झालेली चर्चा व गांधीजींचा सल्ला यामागे होता.

गांधीजी जरी चळवळीच्या नियोजनाचे पुढारी होते, तरी कार्यवाहीवरील त्यांचे नियंत्रण मर्यादितच होते. गांधींना अनुयायी मिळत होते. कारण त्यांनी ब्रिटिशविरोधी भावना साकार केल्या; पण पुष्कळ बाबतीत त्यांचे पुढारीपण लोक मानीत नव्हते किंवा ते कुशलतेने त्यांचे अनुयायी हाताळत होते, असे जयकरांनी म्हटले आहे.

## चळवळीची माघार

१९३० पेक्षा १९३२ च्या लढ्यात जनतेने मोठा प्रतिकार केला; पण जसजसा काळ जात चालला तसतशी त्याची गती कमी होऊ लागली. अस्पृश्यताविरोधी मोहिमेमुळे राष्ट्राचे लक्ष तिकडे वेधले गेले, आणि कायदेभंगाची चळवळ झपाट्याने निस्तेज झाली. मे ९, १९३३ पर्यंत चळवळ चालू राहिली. अस्पृश्यताविरोधी कामांचा भाग म्हणून गांधीजींनी २१ दिवसांचा उपवास केला, व त्यांची तुरुंगातून सुटका करण्यात आली आणि चळवळ तात्पुरती स्थगित करण्यात आली. अखेरीस १२ जुलै १९३३ ला पुण्यास कार्यकर्त्यांची बैठक झाली व त्यातील निर्णयानुसार १ ऑगस्ट १९३३ पासून वैयक्तिक कायदेभंगाला मान्यता मिळाली अणि पुढे आठ महिने तो कार्यक्रम चालू राहिला. तरी लोकांचा उत्साह आस्ते आस्ते कमी होऊ लागला आणि अखेर एप्रिल ७, १९३४ ला गांधीजींनी चळवळ अनिश्चित काळपर्यंत स्थगित केली. गांधीजींनी वैयक्तिक सत्त्याग्रह स्वत:पुरताच मर्यादित केला. वैयक्तिक सत्याग्रह म्हणजे शिस्तबद्ध माघारच होय अशी त्यावर टीका करण्यात आली. बहुजन समाजाने केलेली सविनय कायदेभंगाची चळवळ, वैयक्तिक सत्याग्रह, अखेर महात्माजीपुरताच सत्याग्रह--या तीन अवस्थेत हा लढा विकसित झाला आणि शेवटी तो संपुष्टात आला.

गांधीजींनी साबरमतीचा आश्रम मोडून टाकला आणि आश्रमाची मालमत्ता हरिजन कार्यासाठी दिली आणि ऑगस्ट १, १९३३ ला खेडेगावांकडे मोर्चा नेण्याचा निर्णय केला. ही मोहीम मार्च १९३४ पर्यंत टिकली. जर कायदेभंगाची चळवळ करायची असेल तर ती फक्त त्यांच्यापुरतीच (महात्माजी) मर्यादित असेल असेही त्यांनी घोषित केले.

गांधीजींनी कायदेभंगाची चळवळ एप्रिलमध्ये स्थगित केली, आणि ह्या निर्णयावर अखिल भारतीय काँग्रेस कमिटीने १८ व १९ मे १९३४ ला पाटणा येथे भरलेल्या अधिवेशनात शिक्कामोर्तब केले. गांधीजींनी खालीलप्रमाणे एक पत्रक प्रसिद्ध केले : ' संसदीय मनोवृत्ती स्थिर व्हावयास लागली आहे. ' काँग्रेसने विधिमंडळाच्या निवडणुका लढवाव्यात यासाठी संसदीय मंडळ नेमावे याला अखिल भारतीय काँग्रेस कमिटीने एका ठरावाने मान्यता दिली. ' कायदेभंगाची चळवळ सांधा बदलून विधिमंडळात प्रवेशाच्या रुळावर नेण्यात आली. "[६]

कायदेभंगाच्या चळवळीबाबत सरकारी अहवालात म्हटले आहे : " चळवळीच्या काळात ६०,४९८ लोकांना तुरुंगवासाच्या शिक्षा झाल्या आणि दिल्ली येथे झालेल्या समझोत्याच्या वेळी सुमारे दहा हजार लोक तुरुंगात होते. चळवळीच्या दुसऱ्या कालखंडात सुमारे ७० हजारांना शिक्षा झाल्या होत्या. सर्वजण एकाच वेळी तुरुंगात नव्हते. जे लोक पुनः कायदेभंगाची चळवळ हाती घेणार नसतील, अशा लोकांना तुरुंगातून सोडण्याबद्दल प्रांतिक सरकारची मते मागविण्यात आली आहेत. " ज्यावेळी चळवळ अखेरला बंद झाली त्यावेळी कैद्यांना सार्वत्रिक माफी देण्यात येणार नव्हती. त्या अहवालात पुढे म्हटले आहे : ' कायदेभंगाच्या चळवळीत भाग

घेणारे बहुसंख्य समाजाच्या खालच्या थरातील होते, आणि त्यात गुंड आणि बाजारातील कनिष्ठ वर्गातील होते. "[७]

लढा स्थगित केल्याबद्दल सुभाषबाबू आणि विठ्ठलभाई पटेल यांनी काँग्रेस पुढारीपणावर टीका केली. ते एका पत्रकात म्हणतात, ' लढा थांबवल्याची गांधीजींची कृती म्हणजे अपयशाची कबुलीच होय..... नवीन तत्त्वावर व नवीन कार्यपद्धतीवर काँग्रेसची पुरोगामी पुनर्रचना करण्याची वेळ आली आहे, पण त्यासाठी नवीन पुढारी पाहिजे. "[८]

१९२०-२१ च्या असहकाराच्या चळवळीपेक्षा या दुसऱ्या (१९३०-३४) कायदेभंगाच्या चळवळीला जनतेचा व्यापक पाया लाभला. जनतेत त्यामुळे वाढती जागृती झाली. या राष्ट्रीय लढ्यात शेतकऱ्यांनी मोठ्या प्रमाणावर भाग घेतला; पण त्या लढ्याचे पुढारीपण मात्र भांडवलदारी स्वरूपाचे होते. वर्गीय पुढारीपणाखाली कामगार शेतकऱ्यांचे स्वतंत्र लढे त्यांना मान्य नव्हते. जरी भारतीय राष्ट्रवाद गांधीजींच्या रूपाने अत्युच्च पदाला पोचला तरी त्यांनी त्या चळवळीत भांडवलदारी विचारसरणीच्या व कार्याच्या मर्यादा ओलांडल्या नाहीत.

गांधीवादी विचारसरणीचे पुढारीपण असलेली व त्यानेच आकाराला आणलेली राष्ट्रीय चळवळ म्हणजे धीटपणाने हाती घेतलेला पुरोगामी कार्यक्रम आणि त्याच्या पाठोपाठ आलेला एकदम छांदिष्ट किंवा अस्थिर असा विराम, आव्हानांच्या पाठोपाठ खात्री किंवा हमी नसलेल्या तडजोडी यांचा मिलाफ होता. त्याचा परिणाम म्हणजे अनिश्चितता आणि जनतेच्या लढ्याच्या दृष्टिकोनाबाबत गोंधळ झाला.[९]

जून १९३४ मध्ये सरकारने काँग्रेसवरील बंदी उठविली, पण वायव्य सरहद्द प्रांतातील लाल डगलेवाले आणि शेतकरी संघ अशा काँग्रेसच्या संस्थांवरील बंदी उठवली नाही. जुलै १९३४ मध्ये भारतीय कम्युनिस्ट पक्षाला बेकायदा ठरविण्यात आले. राजकारणात एक नवी अवस्था आली.

१९३४ च्या पावसाळ्यात गांधीजींनी काँग्रेसचे सदस्यत्व सोडले. एका पत्रकात त्यांनी म्हटले, " मी आणि पुष्कळ काँग्रेसचे अनुयायी यांच्यातील मतभेद जिव्हाळ्याचे असून ते वाढतच आहेत. अहिंसा हे ध्येय वा धर्म न मानणारे काँग्रेसचे अनुयायी बहुमतात असून ते धोरण म्हणून त्यांनी स्वीकारले होते. काँग्रेसमध्ये समाजवादी गट प्रबल होत आहे. त्यांचे जर काँग्रेसमध्ये वर्चस्व वाढले, तर मी काँग्रेसमध्ये राहू शकत नाही. "

### संसदीय राजकारण

चळवळीला ओहोटी लागल्यावर आगामी घटनेनुसार विधिमंडळाच्या निवडणुका काँग्रेसने लढवाव्यात असा विचार सुरू झाला. या संदर्भात गांधीजींनी खालीलप्रमाणे एक पत्रक प्रसिद्ध केले : " बुद्धिजीवी वर्गात आलेली हतबलता नाहीशी केली पाहिजे, असे माझे ठाम मत आहे. विधिमंडळातील कामाबाबत माझे कितीही मतभेद असले तरी काही काम करता न आल्याने

काँग्रेसजनात चिडखोरपणा आला आहे व असमाधानी वृत्ती वाढत आहे. त्यापेक्षा विधिमंडळातील कामाचे मी स्वागतच करीन. मर्यादित वैयक्तिक सत्याग्रह करण्याचा अधिकार देणारा पुणे ठराव काँग्रेसने रद्द करणे म्हणजे आत्महत्या करण्यासारखेच आहे असा माझा अजूनही विचार आहे. काँग्रेसमधील बहुमताला जर असे वाटत नसेल तर अखिल भारतीय काँग्रेस कमिटीची बैठक बोलवावी. मी त्याचे आनंदाने स्वागतच करीन. त्या बैठकीत लोकांचे मत व्यक्त होईल आणि पुणे ठराव मागे घेणे, कायदेभंग स्थगित करणे वा कायमचा बंद करणे याबाबत निर्णय केला जाईल. त्यांच्या धीटपणाच्या निर्णयाने देशाचा फायदाच होईल. ''

न. चिं. केळकर, मा. श्री. अणे यांना लिहिलेल्या पत्रात म्हणतात, '' नवीन स्वराज्य पक्ष, जुना स्वराज्य पक्ष आणि डेमोक्रॅटिक स्वराज्य पक्ष यांच्यात लक्षात घेण्यासारखा स्पष्ट फरक नाही. मी माझ्या अध्यक्षपदाचा राजीनामा देण्यास किंवा नवा पक्ष बरखास्त करून स्वराज्य पक्षाला मिळण्यास तयार आहे, पण मी महात्माजींच्या मोठेपणावर विसंबून राहायला तयार नाही. त्याचे परिणाम काय होतील याची मला पर्वा नाही. मी त्यापायी लोकप्रियता गमावली आहे. प्रसिद्धीपेक्षा मी माझ्या मतस्वातंत्र्याला अधिक महत्त्व देतो. सुदैवाने तुम्ही दोन्ही पक्षांचे हितसंबंध पाहू शकाल. माझी अशी खात्री आहे की तुम्ही मला योग्य तो सल्ला द्याल. ''[१०] केळकरांनी त्यांच्या आत्मचरित्रात (' गतगोष्टी ') अणे यांचा ' गांधींचा अंतेवासी शागीर्द ' असा उल्लेख केला आहे !

अखिल भारतीय काँग्रेस कमिटी किंवा काँग्रेस वर्किंग कमिटी यांना न विचारता गांधीजींनी एप्रिल ७, १९३४ ला कायदेभंगाची चळवळ थांबवली त्या संदर्भात प्रसिद्ध केलेल्या पत्रकात ते म्हणतात : ' काँग्रेसजनांनी कायदेभंगाची चळवळ फक्त माझ्यावरच सोपवावी. सत्याग्रहाचे शास्त्र आपल्याला अवगत झाले आहे असा दावा करणाऱ्या इतरांनी माझ्या आयुष्यात माझ्याच मार्गदर्शनाखाली चळवळीचा अवलंब करावा. '

काँग्रेसवरील बंदीहुकूम मागे घेण्यात आला. १८ मे १९३४ ला काँग्रेस वर्किंग कमिटीने गांधीजींच्या २ एप्रिलच्या पत्राला मान्यता दिली. १९ मेच्या अखिल भारतीय काँग्रेस कमिटीच्या बैठकीत गांधीजींनी एक ठराव मांडला. डॉ. अन्सारी यांच्या अध्यक्षतेखाली एक संसदीय मंडळ नेमण्यात यावे अशी त्यात शिफारस करण्यात आली. अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचा पाटण्याचा ठराव म्हणजे काँग्रेस आणि उदारमतवादी पक्ष यांच्यातील अंतर दूर करणाराच होता हे उघड होते. काँग्रेसने अखेरीस विधिमंडळावर बहिष्कार घालण्याचा निष्फळ मार्ग सोडला असून ' निवडणुकीसाठी उमेदवार रिंगणात घालण्याचा ' निर्णय केला हे पाहून चिमणलाल सेटलवाड आणि कावसजी जहांगीर (ज्यु.) यांनी समाधान व्यक्त केले.

जातीय निवाड्याच्या प्रश्नावरून मालवीय आणि अणे यांनी काँग्रेस सोडली व त्यांनी ' काँग्रेस नॅशनॅलिस्ट पक्ष ' स्थापन केला. ब्रिटिश सरकारची सुधारणाविषयक श्वेतपत्रिका प्रसिद्ध झाली. ' निराशा करणारा दस्तऐवज ' अशी सप्रूंनी त्याची संभावना केली. मुस्लिम लीग आणि हिंदुसभा यांनी त्या श्वेतपत्रिकेचा धिक्कार केला. ही श्वेतपत्रिका व जातीय निवाडा फेटाळावा असे काँग्रेसनेही आवाहन केले. सोशॅलिस्ट आणि डाव्या विचारसरणीच्या पुढाऱ्यांनी अधिकार- स्वीकाराला विरोध केला. नेहरूंनी प्रत्यक्ष कृतीवर भर दिला, पण ते राष्ट्रीय हत्यार म्हणून नव्हे. १९३५ च्या या घटनेचे ' गुलामगिरीची सनद ' असे त्यांनी वर्णन केले. त्याबाबतीत सरकारचा गुप्त अहवाल असा : ' मोठ्या प्रमाणावर चळवळ करण्यासाठी लागणारी संघटना आपल्याजवळ नाही हे काँग्रेसला माहीत आहे '[११] जातीय प्रश्न म्हणून काही आहे, हे काँग्रेस पुढारी मानायलाच तयार नव्हते. सर्व राष्ट्राकरिता बोलण्याचा आपणालाच हक्क आहे, आणि काँग्रेस आपलीच सार्वभौम अशी ताकद आहे, अशा थाटाने काँग्रेस पक्ष वागू लागला.

१९३४ च्या काँग्रेसच्या मुंबई अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून बाबू राजेंद्रप्रसाद निवडून आले. सरकारने सुधारणांसंबंधी काढलेल्या श्वेतपत्रिकेतील योजनांना काँग्रेसने विरोध केला आणि भारतीय जनतेचे प्रतिनिधित्व करणाऱ्या घटना-समितीने भारताची घटना तयार करावी अशी मागणी केली. ' भारत कोठे आहे? (' व्हिदर इंडिया ') या नव्या पुस्तिकेत जवाहरलालजींनी लिहिले, '' अहिंसा हे माझ्या दृष्टीने खात्रीचे तत्त्व नाही, आणि मी हिंसेपेक्षा अहिंसा पसंत करतो, तरी अहिंसा स्वीकारून गुलामगिरी वा स्वातंत्र्य स्वीकारण्यापेक्षा, हिंसेने स्वातंत्र्य मिळविणे मी पसंत करीन. ''

मालमत्ता जप्त करणे अशासारखे मार्ग चोखाळणे आणि अहिंसा हे काँग्रेसचे ध्येय असल्याने त्यात वर्गयुद्धाला स्थान नाही असे काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी घोषित केले. आर्थिक बाबतीत काँग्रेस मूलगामी उपाय योजण्याला अनुकूल नाही, असा याचा अर्थ होतो.

मध्यवर्ती विधिमंडळाच्या (सेंट्रल असेंब्ली) निवडणुका नोव्हेंबर १९३४ मध्ये व्हावयाच्या होत्या. स्वराज्य पक्षाचे पुनरुज्जीवन करावे याला काँग्रेसजन अनुकूल होते. डॉ. अन्सारींच्या निवासस्थानी झालेल्या बैठकीत वरीलप्रमाणे निर्णय झाला. अन्सारी यांनी एस्. ए. ब्रेल्वी (संपादक, ' बॉंबे क्रॉनिकल ') यांना लिहिले : स्वराज्य पक्षाचे पुनरुज्जीवन करण्याची कल्पना ज्यांनी माझ्या मनात बिंबवली, त्यांनी माझ्या मेंदूत मोठा तरंग वा लाट उठवली. स्वराज्य पक्षाच्या पुनरुज्जीवनाच्या कल्पनेचे त्यांनी स्वागत केले.

काँग्रेस वर्किंग कमिटीने व अखिल भारतीय काँग्रेस कमिटीच्या पाटणा येथे भरलेल्या बैठकीत कायदेभंग थांबवण्याचा गांधींचा सल्ला मानण्यात आला. डॉ. अन्सारींच्या अध्यक्षतेखाली संसदीय मंडळ नेमण्यात आले. अणे व मालवीय यांनी काँग्रेसच्या संसदीय मंडळाची त्यागपत्रे दिली. नंतर संसदीय मंडळाचे अध्यक्ष म्हणून मौलाना आझाद निवडून आले.

## संदर्भ

(१) सी. व्ही. एच्. राव, पूर्वोक्त, पृ. ४८.

(२) तत्रैव, पूर्वोक्त, पृ. ५०.

(३) रजनी पाम दत्त, पूर्वोक्त, पृ. ३१०-११

(४) रजनी पाम दत्त, तत्रैव, पूर्वोक्त, पृ. ३११.

(५) अणे पेपर्स, राष्ट्रीय अभिलेखागार, नवी दिल्ली.

(६) सी. व्ही. एच्. राव, पूर्वोक्त, पृ. ६० ते ६६.

(७) ' दी सी. डी. मूव्हमेंट १९३०-३४ ', पृ. ४४-४६. (राष्ट्रीय अभिलेखागार, नवी दिल्ली)

(८) रजनी पाम दत्त, पूर्वोक्त, पृ. ३४२.

(९) ए. आर्. देसाई, पूर्वोक्त, पृ. ३४३-४४.

(१०) अणे पेपर्स, पूर्वोक्त.

(११) B. B. Misra, *Op cit*, p. 328.

# १४. समारोप

आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या इतिहासातील युगप्रवर्तक घटनांचा काळजीपूर्वक विचार होणे जरूर आहे. १९३०-३४ या काळातील कायदेभंगाच्या चळवळीचे मूल्यमापन करण्याचा हा एक नम्र प्रयत्न. यात खालील विषय येतील. काँग्रेस आणि गांधी लढ्याबाबत स्त्रियांची भूमिका, मुसलमानांचा सहभाग, सरकारने केलेले मूल्यमापन, अमेरिकन दृष्टिकोन, मार्क्सवादी दृष्टिकोनातून टीका, समाजवादी विचारसरणी, भारतीय भांडवलदारी पुढारीपण इत्यादी.

**काँग्रेस आणि गांधी**

सत्याग्रहाचे प्रणेते गांधी होत. त्याला तीन पैलू आहेत : (१) अहिंसेवर विश्वास, (२) जनतेचा सहभाग, (३) दुःख सहन करणे आणि त्याग. यांच्यायोगे त्यानी परकीय सरकारच्या नैतिक अधिकाराला आणि प्रजेवरील त्यांच्या हुकुमतीला आव्हान दिले.

गांधीजी कोणत्याही अधिकाराच्या जागी नव्हते, किंवा काँग्रेसवर बाहेरून दडपण येईल अशा शक्तीशी त्यांचे लागेबांधे नव्हते. त्यांचे खाजगी व सार्वजनिक जीवन एकच होते, कारण त्यांच्या मते धर्म आणि राजकारण एकमेकात गुंतलेले आहेत. कलकत्ता काँग्रेसच्या वेळी (१९२८) त्यांनी तडजोडीची भूमिका केली. मद्रास काँग्रेस (१९२७) चा संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव आणि नेहरू अहवालही काँग्रेसपुढे होता. १९२९ च्या अखेरपर्यंत ब्रिटिश सरकारने जर नेहरू अहवाल स्वीकारला नाही, तर काँग्रेसने सविनय कायदेभंगाचा मार्ग स्वीकारावा, हा गांधीजीनी कलकत्ता काँग्रेसमध्ये (१९२८) मांडलेला ठराव १,३५० विरुद्ध ९७३ असा संमत झाला होता.

गांधीजींचे पुढारीपण जनतेत दृढ पाय रोवून होते. त्यासंबंधी त्यांच्या शिष्या मीराबेन लिहितात : ' भारताचे राजकीय पुढारीपण तरुण पिढीच्या हाती गेले, पण बहुजनसमाजाचे पुढारीपण बापूजींच्याच हाती होते. '[१] त्या काळात जनतेपुढे दोनच पर्याय होते. उदारमतवाद आणि क्रांतिकारकांची विचारसरणी. आपण जर पुढारीपण स्वीकारले नसते, तर क्रांतिकारकांनी प्राप्त परिस्थितीवर ताबा मिळवला असता, याची गांधीजींना जाणीव होती. गांधीजींचा मध्यम मार्ग होता. त्यानी जनतेला कार्यप्रवण केले, त्याचवेळी क्रांतिकारक उठाव काबूत ठेवण्याचा प्रयत्न केला. जनता हिंसात्मक मार्ग स्वीकारील का नाही याची त्यांनी पर्वा केली नाही. जर जनतेने हिंसात्मक मार्गाचा अवलंब केला, तर ते चळवळ माघारी घेतील अशी काँग्रेसचे अनुयायी यांना नेहमी भीती वाटे. जर आपणाला स्वातंत्र्य पाहिजे असेल, तर आपण हिंसेची भीती बाळगता कामा नये असे गांधीजींनी एका लेखात ठामपणे मांडले आहे.[२]

कायदेभंगाची चळवळ ही नेहमीच हिंसेच्या काठावर उभी राहिलेली होती. गांधीजी १९२१ च्या मानाने अधिक टणक, आणि वास्तववादी झाले होते, आता मागे फिरायचे नाही असे त्यांनी

निक्षून सांगितले. अगदी जवळच्या घटनांवर ते ताबा मिळवू शकणार नाहीत, तरी पण चळवळ थांबवल्याने हिंसेच्या ज्वाला विझण्याऐवजी अधिकच भडकतील अशी त्यांची धारणा होती.[३] या संदर्भात डॉ. एस्. गोपाळ म्हणतात, '' निद्रिस्त समाजाला संघटित करणे, मोठा जमाव पण शांतपणे शिक्षा भोगण्याची मार्गप्रतीक्षा करीत आहे, (पोलिसांचा) हल्ला झाला तरी न पांगणाऱ्या शिस्तबद्ध मिरवणुका यामुळे कायदा आणि सुव्यवस्था राखणारे सरकार बुचकळ्यात पडले. ''[४] लाठीमार केला तरच पोलीस जमाव पांगवू शकत असत.

गांधीजींच्या कायदेभंगाच्या चळवळीबरोबरच बहुजनसमाजाच्या चळवळीचा कालखंड चालू झाला असे म्हटले जाते. या संदर्भात डॉ. मिस्रा यांचा अभिप्राय लक्षात घ्यायला हवा. '' बहुजनसमाजाचे (जनतेचे) राजकारण असहकाराच्या उदयानंतर सुरू झाले. सुधारणावाद आणि पाश्चात्यांचा मानवतावाद त्यांचे त्यांनी एकत्रीकरण केले. धर्माच्या पायावर राजकीय किंवा अधिकृत सौदेबाजी करण्यासाठी जनतेला चळवळीत गुंतवण्याचा आरंभ हा भारतीय राजकारणातील उदारमतवादाचा अस्त दिसून येतो. ''[५]

एप्रिल ते जुलै १९३० मध्ये ५० हजार लोकांना कोर्टात शिक्षा झाल्या, गोळीबारात १०१ मृत्यू पावले, आणि ४९७ जखमी झाले, असे सरकारतर्फे मध्यवर्ती विधिमंडळात सांगण्यात आले. चळवळीच्या दुसऱ्या अवस्थेत (१९३२) एक लाख लोकांना शिक्षा झाली, गोळीबारात ८० मृत्यू पावले, आणि ३१९ गंभीर रीत्या जखमी झाले.[६]

चितगाव, पेशावर आणि सोलापूर या तीन क्षेत्रात चळवळीने जे रूप धारण केले ते पुढाऱ्यांनी प्रतिपादिलेल्या तत्त्वांच्या फार पुढे गेले होते. पेशावर आणि सोलापूर येथे झालेला जनतेचा उठाव जवळजवळ उत्स्फूर्तच होता, त्याला जनतेचा पाठिंबाच होता, इतकेच नव्हे तर जनता त्यात सहभागी होती, सोलापूरच्या बाबतीत तर तेथील कामगारवर्गाने यात मोठाच भाग घेतला होता. जळगाव जिल्ह्यात (त्या वेळचा पूर्व खानदेश) तर १८ मुलांना फटके मारण्यात आले होते;[७] पण पोलीस असल्या अमानुष अत्याचाराने जनतेच्या मनातील स्वातंत्र्याची ज्योत विझवू शकले नाहीत.

महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या कार्यासंबंधी ' केसरी ' चे वार्ताहर पी. व्ही. महाजन यांनी लिहिले की, महाराष्ट्र कॉंग्रेस कमिटीशी सहकार्य न करणाऱ्यांनी ' महाराष्ट्र कॉंग्रेस पक्ष ' काढला. पूर्वीच्या महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनेच केळकर आणि देव यांना युद्धमंडळावर नेमले होते. मिठाचा व जंगलचा कायदा तोडणे, बागलाण तालुक्यातील करबंदीची चळवळ अशी प्रतिकाराची भावना वाढीस लावली.

वरील विवेचनावरून पुढील निष्कर्ष काढता येतील : (१) चार लाखांपेक्षा अधिक लोकानी प्रत्यक्ष मिठाचा कायदा मोडला, त्यातील काहींनी समुद्रकिनाऱ्यावरील मीठ उचलले असेल वा

समुद्राचे पाणी उकळून मीठ तयार केले असेल वा विकले असेल, किंवा ते कायदेशीर मीठ विकत घेतले असेल, (२) मिठाच्या सत्याग्रहात जवळजवळ एक लाख लोकांनी तुरुंगवास भोगला. लढा संपला तेव्हा महाराष्ट्र युद्धमंडळ तुरुंगातच होते. इंडियन पीनल कोडच्या १३७ कलमाखाली व मिठाचा कायदा ४७ खाली सत्याग्रह्यांवर खटले भरले गेले, (३) महाराष्ट्रात सोलापूरशिवाय कोठेही हिंसेचा फारसा उद्रेक झाला नाही. तोही पोलिसांचे अतिरेकी अत्याचार आणि जनतेने त्यांचा बदला घेण्याचा केलेला प्रयत्न यामुळेच झाला, (४) पोलिसांनी काही ठिकाणी संयम पाळलेला दिसतो; पण शिरोड्यास त्यानी अमानुषता दाखवली, मुंबईला आझाद मैदानावर मिरवणुकीवर धोंडे घालून मारझोड केली, तोच प्रकार धारासना मिठागरावर स्वयंसेवकांनी हल्ला केला तेव्हा झाला. बिळाशी आणि चिरनेर येथे गोळीबार करून रक्त सांडले, (५) प्रत्येक ठिकाणी सरकारी नोकरांवरील बहिष्कार परिणामकारक होता. त्यामुळे पोलिसी अत्याचार वाढले. महाड, शिरोडा व इतर ठिकाणी झालेल्या मारझोडीवरून हे दिसून येईल. महाराष्ट्र कायदेभंगाचा इतिहास; या पुस्तकाच्या समारोपात म्हटले आहे—'' कायदेभंगाचे युद्ध चालवण्याकरिता महाराष्ट्राने मनुष्यबळ व द्रव्यबळ पुरविले. पुण्याच्या शिबिरात एका वेळी २५ स्वयंसेवक होते. मागणी येईल त्याप्रमाणे अनेक ठिकाणी त्यांना सत्याग्रहासाठी पाठविण्यात आले, व त्यानी चांगली कामगिरी बजावली. या कामी (मुंबई) उपनगर कॉंग्रेस कमिटीने आपली शिल्लक खर्ची घालण्याचे ठरविल्यामुळे महाराष्ट्रात कायदेभंगाचे युद्ध सुरू करणे बरेच सुलभ गेले. विलेपार्ले येथील छावणीचा प्रचंड खर्च उपनगर कॉंग्रेस कमिटीचे अधिकारी व तेथील धनिक पुढारी यांनीच चालविण्याचे पत्करले होते. पण महाराष्ट्रातील सर्व जिल्ह्यांतील कार्यकर्त्यांनी व जनतेनेही उत्साहाने द्रव्यसाह्य करून मिठाच्या कायदेभंगाची चळवळ चालविली; त्यापुढेही जंगल सत्याग्रहाची मोहीम यशस्वी रीतीने पार पाडण्यास महाराष्ट्र कायदेभंग मंडळास मदत केली. महाराष्ट्र कायदेभंग मंडळाने छोटा इतिहास प्रसिद्ध केला आहे. महाराष्ट्राने हे सत्याग्रहयुद्ध चालविण्याकरिता किती उत्साहाने मदत केली याची कल्पना जमाखर्चावरून येण्यासारखी आहे.—फंड, देणगी, ग्रँट, मीठविक्री अशा स्वरूपातील जमा ...... रु. २२,५४७-३-३ पै.—जंगल सत्याग्रह, छावण्यांचा खर्च, स्वयंसेवकांचा प्रवास इत्यादी बाबींवर खर्च—रु. २२,५४७-३-३. या चळवळीत व्यक्तिशः पुष्कळांनी भाग घेतलाच, पण राष्ट्रीय शाळा, यूथलीग, संभाजी पथक वगैरेनी अभिनंदनीय कामगिरी केली. टिळक विद्यापीठाच्या कक्षेत येणाऱ्या राष्ट्रीय संस्थांनी या चळवळीत आरंभापासूनच भाग घेऊन लोकांच्या आश्रयाचे चीज केले. या विद्यापीठामार्फत ४५ पदवीधर, ८५ अध्यापक, १९२ माजी व १०८ विद्यमान विद्यार्थी अशा ४३० जणांनी या चळवळीत सर्व प्रकारे भाग घेतला. यापैकी २६४ जण कैद झाले. '' (पृ. १५४-१५८). या पुस्तकाला शंकरराव देवांची प्रस्तावना आहे, (६) महाराष्ट्रात जवळजवळ १,५०० स्वयंसेवकांना कॉंग्रेसने शिक्षण व शिस्तपालनाचे धडे दिले होते आणि त्यानी या लढ्यात

मोठे काम केले. आज्ञा होताच ६०० स्वयंसेवक क्षणाचाही विलंब न करता शिरोडा येथे धावले, आणि त्यांनी सर्व पोलिसी दंडुकेशाहीला धैर्याने तोंड दिले, (७) विद्यार्थी म्हणून चळवळीत थोडाच भाग दिसेल; पण प्रभातफेऱ्यांत त्यांचा भाग होता. वानरसेनेने केलेली कामगिरी नेत्रदीपक होती. खरे तर गरीब मध्यम वर्गातील मुलांमुलींची ती चळवळ; पण तिच्यामुळे जनतेत जागृती झाली. कायदे मोडण्याच्या मोहिमा प्रस्थापित कायद्याच्या नैतिकतेला तसेच सार्वभौम सरकारच्या अधिकाराला आव्हान देण्यासाठी, व जनतेच्या खांद्यावरील कराचे ओझे कमी करण्यासाठी होत्या, (८) स्थानिक पातळीवर निधी जमवून स्थानिक कार्यक्रम पार पाडीत असत. या चळवळीला निधी कधीच अपुरा पडला नाही.[८]

मुंबईत परदेशी कापडावरील बहिष्काराची चळवळ जोरात झाली. व्यापारी समाजावर काँग्रेसचा मोठा प्रभाव होता. कापडाच्या गुदामांना मोहर (सील) करण्यात आली. पुनः परदेशी कापड आयात न करण्याचे व्यापाऱ्यांनी मान्य केले, आणि परदेशी कापडाचा सर्व व्यापार ठप्प झाला. गिरणीचे सूत हातमाग विणकरांना स्वस्त दराने विकण्यासाठी गिरणीमालकांचे मन वळविण्यात यश आले.[९] जमीनदार, मुसलमान आणि इतर अल्पसंख्यांना त्यांच्याकडे वळविण्याचा प्रयत्न सरकारने केला. ते सरकारशी एकनिष्ठ राहिले, पण त्यांनी चळवळ कमकुवत केली नाही. काँग्रेसच्या मोहिमामुळे सरकारचा वसूल कमी झाला, आणि ब्रिटिशांचा व्यापारही कमी झाला.[१०]

गांधीजींना लिहिलेल्या एका पत्रात, काँग्रेसने सविनय कायदेभंगाची चळवळ थांबविली ' हा फार मोठा धक्का ' असल्याचे जवाहरलालजींनी म्हटले आहे. चळवळीच्या काळात क्रांतिविरोधी घटकास प्राधान्य मिळाले, याचेच नेहरूंना अतीव दुःख झाले.[११] काँग्रेस हा एक सूत्रधारी गट निर्माण झाला आहे. त्यात ' संधिसाधुपणा वाढीला लागतो, आणि विजयी होतो ' असे त्यानी म्हटले. काँग्रेस वर्किंग कमिटीने समाजवाद आता संपला आहे असे म्हटल्याबद्दल त्यांनी खेद प्रकट केला. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीच्या विरोधी एक संरक्षक फळीच सोशॅलिस्ट आणि रॉयिस्टांनी काँग्रेसमध्ये उभी केली.[१२]

राजकीय सुधारणा मिळविण्यासाठी घटनात्मक मार्गानी चळवळ करणारी संस्था हे काँग्रेसचे रूप या चळवळीने पालटले, आणि स्वराज्यप्राप्तीसाठी प्रत्यक्ष कृतीचा कार्यक्रम हाती घेणाऱ्या संस्थेत तिचे रूपांतर केले. बहुजनसमाजाच्या पाठिंब्यावर आणि ताकदीवर ती संस्था उभी केली. कायदेभंगाची चळवळ आणि काँग्रेसचा विधायक कार्यक्रम यामुळे जनतेत व्यापक प्रमाणात जागृती व राष्ट्रीय अस्मिता निर्माण झाली.

गांधीजींना अटक झाली, कारण ' बेलगाम किंवा ताब्यात न राहिलेल्या अनुयायांच्या त्यांनी केलेल्या निषेधाची धार बोथट झाली होती, आणि त्याना काबूत ठेवणे त्याना शक्य नव्हते.'

काँग्रेसचा हा दावा खोटा असल्याचे गांधी-आयर्विन कराराने दाखविले. रजनी पाम दत्त म्हणतात; '' संपूर्ण स्वातंत्र्य आणि साम्राज्यशाहीशी तडजोड न करणे ही उच्चरवाने लाहोरला घोषित केलेली तत्त्वे वाऱ्यावर उडून गेलेली आहेत. ...... पूर्वी न स्वीकारलेली गोलमेज परिषदेची योजना स्वीकारण्याइतका काँग्रेसचा अधःपात झाला; कारण लढा न करता ही योजना स्वीकारता आली असती. अशा रीतीने या कराराने विस्तृत प्रमाणावर बारडोलीचा अनुभव पुनः प्राप्त झाला.'' (चौरीचौराच्या दंगलीनंतर गांधीजींनी बारडोलीचा सत्याग्रहलढा मागे घेतला होता, ही आठवण येथे दिली आहे--लेखक).

प्रा. एन्. जी. रंगा (किसान चळवळीचे प्रणेते) यांनी टीका केली : '' जमीनदारांचे खंड कमी न करणे व शेतकऱ्यांचा कर्जबाजारीपणा नाहीसा करण्यासाठी महात्माजींना खात्रीने प्रयत्न करता आले असते. कामगारांना योग्य वेतन, व मूलभूत उद्योगधंद्याचे राष्ट्रीयीकरणही करता आले असते; परंतु ते करू शकले नाहीत कारण वर्गसमन्वयांबद्दल त्यांच्या निष्ठा आणि आर्थिक हितसंबंधावर आधारलेल्या दोन राजकीय गटात त्यांची विभागणी होऊ नये यासाठी त्यांना असलेली तळमळ.[१३]

वर्ग म्हणून शेतकऱ्यांच्या स्वतंत्र संघटना उभारण्याला कायदेभंगाच्या चळवळीच्या समाप्तीनंतरच वेग आला, भांडवलदार आणि जमीनदार यांच्या हितसंबंधाना काँग्रेसचे पुढारीपण जपते अशा प्रकारचा समज, किसान चळवळीतील आघाडीचे आणि राष्ट्रीय चळवळीतील अत्यंत पुरोगामी कार्यकर्ते यांच्यात वाढीस लागला.

मे १९३३ मध्ये गांधीजींनी प्राणांतिक उपोषण केले त्यावरून गांधीजींना कायदेभंगाच्या चळवळीशी असलेले संबंध तोडायचे आहेत हे सरकारने जाणले. ' गांधीजींची ही कृती म्हणजे चांगले राजकारणही नाही व चांगला धर्मही नाही, ' असे जमनादास मेहता म्हणाले.

मे ८, १९३३ ला गांधीजींची सुटका झाल्यावर काँग्रेसचे अध्यक्ष मा. श्री. अणे यांनी कायदेभंगाची चळवळ काही काळाकरिता तहकूब केली. अ. भा. काँ. कमेटी बरखास्त करण्याच्या जुलै १९ ला आज्ञा काढून अणे यांनी राष्ट्रीय चळवळ विस्कळीत करण्याचे काम चालू ठेवले. व्हाइसरॉयनी गांधीजींना मुलाखत द्यावी यासाठीच त्यांनी हे केले. गांधीजींना चळवळीपासून अलग काढण्यात आले, कारण त्यांनी हरिजनांचे काम हाती घेतले होते. एका अर्थाने भांडवलदारी विचारसरणीचा डाव यशस्वी झाला.

पुरुषोत्तमदास ठाकुरदास गांधी आणि काँग्रेस यांच्यात फरक करतात. त्यांनी कायदेभंगाच्या चळवळीला पैसा पुरवला नव्हता. भारतातील डाव्या चळवळीला काबूत ठेवण्याला गांधीच फक्त जबाबदार आहेत असे बिर्ला यानी सर सॅम्युअल होअर यांना पत्रात लिहिले.

## गांधीजींनी काँग्रेस सोडली

कांही जरी उणिवा असल्या तरी १९३०-३४ मधील राष्ट्रीय चळवळ अभिमान बाळगण्यासारखीच होती. त्या काळात सामाज्यशाहीने आधुनिक पद्धतीची दडपशाहीची सर्व अस्त्रे शस्त्रागारातून

काढली, भारतातील जनतेला त्यांच्या इच्छेपुढे नमायला लावण्याचा, तसेच राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा चिरडण्याचा प्रयत्न केला; पण त्यात ती अयशस्वी झाली.

गांधीजींचा दृष्टिकोन घेऊन आलेल्या शेतकरी चळवळीचा आवाका पाहिला तर अंशतः श्रीमंत आणि मध्यम शेतकऱ्यांनी ग्रामीण भागात आपली अधिकारपरंपरा टिकविण्यासाठी वापरलेले हत्यार म्हणून ती चळवळ होती. राष्ट्रीय चळवळीला नेतृत्व देणाऱ्या शहरी भांडवलदारवर्ग आणि मध्यमवर्गीय बुद्धिवादी यांच्याशी त्यांचा सांधा जुळला होता. गांधीजींच्या राजकीय चळवळीमध्ये शेतकरी समाजात मिसळण्यासाठी त्यांना हा मार्ग सापडला, पण वरिष्ठवर्गाचे आर्थिक वर्चस्व मात्र त्यांना सोडावे लागले नाही. या शेतकरी चळवळी राजकीय दृष्टींनी यशस्वी झाल्या; या अर्थाने की, त्यांनी जनतेत राजकीय जागृती केली; परंतु त्यानी गरीब शेतकऱ्याला कर्जेच मागण्यासाठी कळून येण्याइतपत उठवले नाही; किंवा त्यांनी शेतकरी वर्गाचे हितसंबंधही बदलले नाहीत, त्यामुळे ते संबंध भरीवपणे सरंजामी पद्धतीचेच राहिले.

## मुसलमानांचा सहभाग

डॉ. अन्सारी आणि मौलाना आझाद यांनी त्यांच्या धर्मबांधवांना ' काँग्रेसच्या ऐतिहासिक हाकेला प्रतिसाद देऊन राष्ट्रीय लढ्यात आनंदाने उतरावे ' असे आवाहन केले. नबाब इस्माईल खान, शफी दाऊदी आणि अल्ली बंधूनी, काँग्रेसने चालू केलेल्या लढ्यात मुसलमानांनी भाग घेऊ नये असे आवर्जून सांगितले.

८ जून १९३१ ला अलाहाबादला काँग्रेस वर्किंग कमिटीची बैठक होऊन सत्याग्रह मोहिमांच्या प्रगतीचा आढावा घेण्यात आला, मुसलमानांना ह्या लढ्यापासून दूर ठेवण्याचा सरकारी अधिकारी आणि प्रतिगामी यानी आटोकाट प्रयत्न केला तरी काँग्रेसच्या या लढ्यात पंजाब, मुंबई, वायव्य सरहद्द प्रांतातील मुसलमानानी जो शूरपणा दाखवला त्याची बैठकीत वाखाणणी करण्यात आली. '' काँग्रेस मुस्लिम पक्ष व इतर अनेक संघटनांच्या नेतृत्वाखाली मुंबईत एक विशाल मिरवणूक संघटित करण्यात आली, ती हिंदू व मुसलमान मोहल्ल्यात हिंडून नंतर तिचे एस्प्लनेड (आताचे आझाद) मैदानावरील प्रचंड सभेत रूपांतर झाले हे निदर्शन काँग्रेसच्या पाठिंब्यासाठी संघटित करण्यात आले होते. त्याचे प्रचंड उत्साहाने स्वागत झाले, व शहरातून मिरवणूक जात असताना लोकांनी दुतर्फा गर्दी केली होती. काँग्रेस व तिच्या प्रगतीशी मुसलमान समाज किती एकरूप झाला आहे, हेच त्याने दाखवून दिले. '' [१४] मुस्लिम व्यापारीवर्गाने या लढ्याला संपूर्ण पाठिंबा दिला होता. विशेषतः परदेशी कापड, ब्रिटिश मालावर बहिष्कार, आणि दारूबंदी यात भाग घेतला. त्या सभेत '' काँग्रेसने जर तसे ठरविले तर खरा मुसलमान गोलमेज परिषदेला उपस्थित राहणार नाही; विधिमंडळाच्या मुसलमान सभासदांनी सदस्यत्वाचे राजीनामे द्यावेत असा ठराव झाला. मध्यवर्ती खिलाफत समितीने माजी अध्यक्ष व जमीयत-उल-उलेमा-ई हिंदचे कार्यवाह शेठ मियां हाजी जानमहंमद चोलानी यांचेही त्या सभेत

भाषण झाले. एक मैल लांबीच्या त्या मिरवणुकीच्या अग्रभागी ' क्रॉनिकल ' चे संपादक सय्यद अ. ब्रेल्वी होते. हिंदूंनी त्या मिरवणुकीवर हार आणि फुलांचा वर्षाव केला.

हिंदूंची बहुसंख्या आहे याबद्दल भीती बाळगणाऱ्यांबद्दल मौलाना अहमद सईद यांनी खेद व्यक्त केला. हिंदूंच्या राज्याबाबत मुस्लिम पुढारी खोटी भीती व्यक्त करीत आहेत, भारताला स्वातंत्र्य मिळावे असेच मुसलमानांना वाटते असेही ते पुढे म्हणाले. [१५] मुसलमानांनी चळवळीत भाग घेऊ नये असे हजरतखान म्हणाले.[१६]

या प्रसंगी मुसलमानांनी विरोध दर्शविला नाही असे मुंबईतील अमेरिकन कॉन्सलनी नमूद केले आहे. मुंबईत अनेक प्रसंगी चळवळीला सहानुभूती म्हणून झालेल्या हरताळात त्यानी मोठ्या संख्येने भाग घेतला. गांधीजींना ५ मे ला अटक झाली. त्यानंतर झालेल्या बकरी ईद या मुसलमानांच्या मोठ्या सणाच्या वेळी जातीय तणाव न वाढता शांतता होती.[१७] सोलापूरच्या लष्करी कायदा प्रशासनात कामगार पुढारी व यूथ लीगचे कार्यकर्ते अब्दुल रसूल कुरबान हुसेन यांना फाशीची शिक्षा झाली. जवळजवळ १२ हजार मुसलमानांनी या चळवळीत तुरुंगवास स्वीकारला.[१८]

## स्त्रियांचे कार्य

या स्वातंत्र्यलढ्यात स्त्रियांनी धडाडीने भाग घेतला. असहकार चळवळीत काही स्त्रियांनी झोकून दिले. मुळशीच्या जनतेचा लढा सेनापती बापटांच्या नेतृत्वाखाली मुळशी येथे झाला. त्यात शेकडो शेतकरी स्त्रिया लढ्यात उतरल्या. महाराष्ट्रातील जनतेचा हा पहिला लढा. त्यानंतर मुंबईत कामगार चळवळीत, व नंतर झालेल्या संपातही हातात लाल झेंडे घेऊन स्त्रिया भांडवलशाहीविरुद्ध लढल्या व नोकरशाहीच्या दडपशाहीला तोंड दिले. त्यानंतर स्त्रिया शूरपणाने व धिटाईने कायदेभंगाच्या चळवळीत आल्या. गांधीजी म्हणाले, '' जेव्हा गेल्या दशकाचा इतिहास लिहिला जाईल, तेव्हा त्यातील यशाचा मोठा वाटा भारतीय स्त्रीला द्यावा लागेल असे माझे मत आहे. त्यांनी स्वराज्य जवळ आणले. त्यांनी आपली व राष्ट्राची मान उंचावली.[१९] २१ जून १९३० ला मोतीलाल नेहरू मुंबईत आले असताना प्रचंड निदर्शन झाले. ब्रिटिशांचे सैन्य, पोलीस सज्ज होतेच, कृष्णा सरदेसाई, विमल गुप्ते, कमला सोहनी (' सेविका दला ' च्या संघटक), दिलशाद सय्यद, हंसा मेहता, कमलादेवी चट्टोपाध्याय, पेरिन कॅप्टन, लीलावती मुन्शी या आणि इतर शेकडो स्त्रिया पोलिसांच्या छडीमाराला व मारझोडीला धैर्याने तोंड देत होत्या. स्त्रियांची मुक्ती ही स्त्रियांनी सामाजिक लढ्यात आणि राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यात (कायदेभंगाच्या चळवळीत) भाग घेण्यानेच प्राप्त होईल असा या लढवय्या स्त्रियांचा दृष्टिकोन होता.

शैक्षणिक संस्थांवर व परदेशी कापडाच्या दुकानावर बहिष्कार घालणे हा त्यांचा महत्त्वाचा कार्यक्रम होता. दारू दुकानांवरील निरोधनात त्यांचा मोठा वाटा होता. मुंबईत पुष्कळ स्त्रिया

युद्धमंडळाच्या सदस्य म्हणून काम करीत होत्या व त्यांनी तुरुंगावासही भोगला. समुद्राजवळील स्त्रियांनी मिठाच्या सत्याग्रहात भाग घेतला. ग्रामीण भागातील स्त्रिया जंगल सत्याग्रहात सहभागी झाल्या. बिळाशीची भीमाबाई साठे त्यांनी आणि त्यांच्या सहकारी स्त्रियांनी झेंड्याच्या रक्षणासाठी जिवाची बाजी लावली. **लक्ष्मी अम्मल** ही भारतातील पहिली स्त्री-स्वयंसेविका, मिसेस डिकिन्सन यांनी मुंबई विधिमंडळाचा राजीनामा दिला, आणि नॅशनल ख्रिश्चन पक्षाची स्थापना केली. धारासना येथील मिठागारावर हल्ला करण्यापूर्वी सरोजिनी नायडू भाषणात म्हणाल्या, ' स्त्री म्हणून आपणाला संरक्षण पाहिजे असे स्त्रियांनी यापुढे म्हणता कामा नये असे माझ्या मते म्हणण्याची वेळ आली आहे; पण मातृभूमीच्या मुक्ततेसाठी पुरुष बांधवांबरोबर सर्व संकटे आणि त्याग करण्यास सिद्ध झाले पाहिजे '.[२०] ऑगस्ट १३, १९२९ ला प्राग येथे भरलेल्या ' शांतता व स्वातंत्र्यासाठी स्त्रियांचा संघ ' (वुइमेन्स लीग फॉर पीस अँड फ्रीडम) च्या आंतरराष्ट्रीय परिषदेला कमलादेवी चट्टोपाध्याय भारताच्या प्रतिनिधी म्हणून उपस्थित होत्या, बेकायदेशीर मीठ तयार करणे व विकणे यासाठी अटक झाली असता त्या म्हणाल्या, ' भारताच्या स्वातंत्र्याने जगाच्या स्वातंत्र्याचे दरवाजे उघडले जातील.' १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीत जवळजवळ १७ हजार स्त्रियांना तुरुंगवासाची शिक्षा झाली होती.

मुंबईत कमलादेवी व अवंतिकाबाई गोखले या मिठाचा कायदेभंग करणाऱ्या पहिल्या स्त्रिया. अवंतिकाबाई गोखले यानी गांधीजींचे चरित्र लिहिले होते व त्याला लोकमान्य टिळकांची प्रस्तावना मिळविण्याचे औचित्य त्यांनी दाखवले. कमलादेवी आपल्या आठवणीत लिहितात, " एप्रिल ६, १९३० ला हजारो स्त्रिया स्वाभिमानी योद्ध्यांप्रमाणे लांब टांगा टाकीत समुद्रावर गेल्या. हत्यारांच्या ऐवजी त्यांच्या हातात मातीची व तांब्या पितळेची भांडी होती. त्यांना गणवेश नव्हता, ग्रामीण भारताचे प्रतीक अशी सुताची साडी त्यांच्या अंगावर होती, सामाजिक अलिप्ततेचे कवच त्यांनी कसे फोडले असेल आणि उघड चाललेल्या भीषण प्रकाशात त्या कशा आल्या असतील? स्त्रियांनी या चळवळीचे सुंदर महाकाव्यात रूपांतर केले आहे यात शंका नाही. "[२१]

हंसा मेहता यानी ' देशसेविका संघ ' संघटित केला, परदेशी मालावरील बहिष्कार प्रभावी करण्यात त्यांचा मोठा वाटा होता, मुंबईत त्यांनी केलेली निरोधनाची चळवळ इतकी प्रभावी झाली की सरकारने ती संस्था बेकायदा असल्याचे जाहीर केले. " ...... दारू व परदेशी कापडाच्या दुकानापुढे स्त्रिया बसलेल्या आढळत. टकळीवर सूत काढीत, आणि त्या दुकानातून माल खरेदी करू नये अशी प्रत्येक भारतीयाला ताकीद देत."[२२]

' डेली हेरल्ड ' चे प्रतिनिधी जॉर्ज स्लोकोंब लिहितात, " ...... वडाळ्याला मिठागरावर हल्ला करणाऱ्यात एक स्त्री होती, तिने आपले कार्य उत्साहाने व प्रतिष्ठेने केले याची माझ्या मनावर छाप पडली, जमावातून येऊन एका स्त्रीने काटेरी तारांच्या कुंपणावर चढून मिठागारातील मीठ आपल्या साडीत घेऊन ती पसार झाली, जणू ते अप्रसिद्ध असे कर्मकांडच होते. " स्त्रियांनी

मिठाचा कायदा मोडण्याशिवाय मिठाच्या पुड्या विकल्या व लिलाव करून चळवळीसाठी निधी जमविला.[२३]

येवल्याच्या (नाशिक जिल्हा) राधाबाई आपटे यानी २ ते ३ हजारांच्या लाठीधारी जमावाला शांत करून घरी पाठविले. हा जमाव पोलिसांवर हल्ला करण्यासाठी चालला होता. अहिंसात्मक वातावरण टिकविण्यात त्यानी मोठे यश मिळविले. पुणे येथे ' सूतकताई समिती ' होती. त्यातील १००-१२५ स्त्रियांना तुरुगवासाच्या शिक्षा झाल्या. पनवेलच्या विमल गुप्ते यानी स्त्रियांचे एक पथक चिरनेरच्या जंगल सत्याग्रहासाठी नेले होते, व त्याने मोठे काम केले. अण्णासाहेब कर्वे दुर्गा भागवतांच्या आजोबांना म्हणाले, ' बायकांच्या शिक्षणासाठी मी धडपडलो, त्यांच्यासाठी संस्था काढल्या पण गांधींनी जी खेड्यापाड्यातील बायकांना स्फूर्ती दिली तशी मला शहरातल्या माझ्या संस्थेतील मुलींना देता आली नाही. गांधींनी भारतातल्या स्त्रियांना जागवले,'' [२३अ]

## सरकारचा दृष्टिकोन

या चळवळीबाबतचा सरकारी अहवाल पाहता चळवळीचे कार्यक्षेत्र खालीलप्रमाणे चित्रित करण्यात आले आहे :–(१) सार्वत्रिक कायदेभंग, (२) जमीनमहसूल व इतर करबंदी, (३) सरकारी नोकरांवर बहिष्कार, (४) ब्रिटिश मालावर बहिष्कार, (५) दारू दुकानावर बहिष्कार, (६) सैन्य व पोलीस यांच्यात सरकारविषयी अप्रीती निर्माण करून त्यांची सरकारशी असलेली निष्ठा कमी करणे, (७) राज्य उलथून पाडण्यासाठी विध्वंसक प्रचार करणे.[२४] चालू कायद्यात असलेल्या तरतुदींचा उपयोग चळवळ मोडून काढण्यासाठी सरकारने केलाच पण जेथे चालू कायदा कमी पडला तेथे खास अधिकार घेतले.[२५] स्थानिक पुढाऱ्यांशी वागताना स्थानिक अधिकारी स्वतःच्या मताप्रमाणे कायदा हाती घेत; पण अखिल भारतीय पुढाऱ्यांबाबत (गांधी, नेहरूंसारखे) मात्र सरकारशी विचारविनिमय करावा लागे.

' घटनात्मक अधिकाराला हिंसक प्रतिकार करणारी ' असे चळवळीचे रूपांतर झाले. सरकारी अहवालात पुढे म्हटले आहे; '' कलकत्ता आणि कराची येथे झालेले दंगे, चितगाव येथील सशस्त्र उठाव, पेशावर येथील गंभीर दंगल व शांतताभंग हा क्रांतीच्या प्रवृतीचा परिणाम आहे, हे कायदेभंगाच्या चळवळीने निर्माण केले आहे. हिंसक आणि क्रांतिकारक कृती करायला प्रवृत करणारे वृत्तपत्रीय लिखाण याला जबाबदार आहे. '' [२६]

ह्या परिस्थितीशी मुकाबला करण्यासाठी सरकारने खालील उपाय योजले : —(१) ऑक्टोबर ३०, १९३० चा बेकायदा जमावबाबतचा वटहुकूम. हा वटहुकूम उपयुक्त ठरला. त्यातील तरतुदी १९३२ च्या क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्टमध्ये समाविष्ट करण्यात आल्या, (२) १९३० चा दुसरा वर्तमानपत्रासंबंधीचा वटहुकूम (एप्रिल २७, १९३० चा), (३) अनधिकृत बातमीपत्रे (बुलेटिन्स) व वर्तमानपत्रासंबंधीचा जुलै २, १९३० चा वटहुकूम, (४) वर्तमानपत्रासंबंधीचा डिसेंबर २३ चा वटहुकूम, (५) दारू दुकानावर व

परदेशी कापडाच्या दुकानावरील निरोधन-धाकदपटशा नाहीसा करण्यासाठी वटहुकूम, मे ३०, १९३०, (६) बेकायदेशीर चिथावणीविरोधी मे ३०, १९३०, (७) बेकायदेशीर चिथावणीविरोधी दुसरा वटहुकूम, डिसेंबर २३, १९३०.[२७] स्थानिक अधिकाऱ्यांना सर्व अधिकार दिले होतेच, पण भारतीय दंडविधान संहितेच्या १२४-अ बाबतच्या खटल्याबाबत भारत सरकारचे मार्गदर्शन घ्यावे लागे.[२८]

काँग्रेस सविनय कायदेभंग पुनः सुरू करील तर काय करावे याबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करावी असे आदेश देण्यात आले होते :—(१) गांधींसह काँग्रेस पुढाऱ्यांना अटक, (२) काँग्रेस ही संस्था म्हणून बेकायदेशीर न ठरविता स्थानिक संघटना असोसिएशन्स (युवक संघटना), कीर्ति किसान सभा अशा विध्वंसक संघटना बेकायदा ठरविणे, (३) आणीबाणीतील अधिकार देणारा, वृत्तपत्रविषयक इत्यादी वटहुकूम, (४) पुढाऱ्यांच्या अटकेनंतर चळवळीला येणारी गती रोखण्यासाठी वटहुकूम.[२९]

अहवालात पुढे म्हटले आहे : '' १९३२ च्या वसंत ऋतूमध्ये चळवळीचे कंबरडे मोडलेलेच दिसले. आवश्यक आपत्ती म्हणून अमलात आणलेले दडपशाहीचे उपाय योग्यच होते, व लांबणीवर पडलेल्या घटनात्मक सुधारणा प्रत्यक्ष प्राप्त करण्यासाठी भूमिका तयार करणे आवश्यकच होते असे उदारमतवादी, नेमस्ताना वाटत होते.[३०]

मध्यवर्ती सरकारने जारी केलेल्या वटहुकूमांना पूरक म्हणून मुंबई खास (आणीबाणी) अधिकार कायदा, १९३२ हा प्रसार करण्यात आला. दि प्रॉव्हिन्शियल क्रिमिनल लॉ सप्लीमेंटिंग ॲक्ट १९३२ मध्यवर्ती सरकारने संमत केला. त्यात उच्च न्यायालयात याचिका (अपील) दाखल करण्याची तरतूद होती. इतर बाबतीत मात्र हायकोर्टाकडे दाद मागता येत नसे. [३१]

जरी सरकारने दडपशाहीचे उपाय योजले, तरी लॉर्ड आयर्विन यांनी ब्रिटिश सरकारकडे जो अहवाल पाठविला तो विचार करण्यासारखा आहे. '' कायदेभंगाची चळवळ भीतीदायक आहे, आणि ती हिंदू समाजातील निरनिराळ्या थरांत झिरपून गेली आहे. तिने त्यांच्या कल्पनाशक्तीवर– विवेकावर ताबा मिळविला आहे, आणि तो प्रवाह अखंड चालू आहे. म्हणून त्यात भीतीदायक अशा सुप्त शक्ती आहेत. दडपशाही उपाय अखेरचे नव्हेत, त्यामुळे प्रश्न सुटणार नाहीत; कारण अर्थशून्य बडबड आणि वस्तुस्थितीचा विपर्यास केला तरी ती राष्ट्रीय चळवळ आहे.'' [३२] अहवालात पुढे म्हटले आहे :— '' ...... काँग्रेसच्या कलकत्ता अधिवेशनाला विरोध करण्यासाठी पावले उचलण्यात आली. भारतमंत्र्याची याला संमती होती. कलकत्ता (१९३३) अधिवेशन भरण्यापूर्वीच नेली सेनगुप्ता यांना व त्यांच्याबरोबर ३५० लोकांना अटक करण्यात आली.[३३] ...... कायदेभंगाच्या चळवळीस मिळालेला जनतेचा पाठिंबा सरकारच्याच नव्हे, तर पुष्कळ पुढाऱ्यांच्या कल्पनेबाहेरचा होता.''[३४]

## अमेरिकेचा दृष्टिकोन

१९३० ची कायदेभंगाची चळवळ आणि गांधीजींच्या हालचाली याबाबत अमेरिकेत मोठ्या प्रमाणावर कुतूहल निर्माण झाले होते. भारताच्या भूमिकेला पाठिंबा देणाऱ्यांचे अमेरिकेत जे स्वागत झाले त्यामुळे ब्रिटिश सरकार काळजीत पडले होते. अमेरिकेने हा (कायदेभंगाचा) प्रश्न अधिकच सुलभ केला, आणि १७७६ च्या अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धाशी त्याची आणि बोस्टन चहा प्रकरणाशी मिठाच्या सत्याग्रहाची तुलना केली.[३५] [बोस्टन बंदरात अमेरिकनांनी युरोपातून आलेला चहा समुद्रात बुडविला या घटनेचा यात उल्लेख आहे–लेखक]

अमेरिकेच्या भारतातील कॉन्सल-जनरलने या चळवळीचे समर्थन केले. जरी अमेरिकेतील एक गट भारतीय स्वातंत्र्यलढ्याला वाचिक पाठिंबा पुनः पुनः देत होता, तरी भारताच्या बाबतीत निश्चित व अनुकूल धोरण ठेवण्याला त्या सरकारला भाग पाडण्याइतपत तो प्रभावी नव्हता. ते सरकार कुंपणावर बसले व भारतीय क्षितिजावर येणारे ढग आणि सूर्यप्रकाश ते उत्कंठेने पाहत बसले.[३६]

मुंबई कॉंग्रेस बुलेटिन (४ जुलै १९३०) ने अमेरिकनांचा '' समुद्रापलीकडील भाई '' असा उल्लेख केला. ४ जुलै १७७६ च्या त्यांच्या स्वातंत्र्याच्या घोषणेची त्यांना आठवण करून देण्यात आली, आणि त्यांच्या या स्वातंत्र्यदिनी त्यांना ' मित्र आणि बंधु ' असे संबोधून अभिवादन करण्यात आले आहे. '' त्यात पुढे म्हटले आहे. '' बंधू ये, स्वातंत्र्याच्या नावाने हस्तांदोलन कर. ब्रिटन हा इतर राष्ट्रांपासून कायदेबाह्य झाला आहे, लुटारू आहे, आणि भारतातील त्याचा अंमल हा मानवता आणि सुधारणा यावर अत्याचार आहे हे आमच्याबरोबर जाहीर कर. ''[३७]

अमेरिकेतील मिशनऱ्यांच्या एका गटाने भारत सरकारला पत्र लिहून अहिंसात्मक युद्ध करणाऱ्या गांधीजींच्या बरोबर वाटाघाटी करण्याची, आणि शांततामय जमावावर होणारे अत्याचार थांबवण्याची विनंती केली.

अमेरिकन वार्ताहर वेल मिलर, व ब्रिटिश वार्ताहर जॉर्ज स्लोकंब हे पोलिसांनी सत्याग्रह्यांना केलेल्या मारझोडीचे, तसेच त्यांनी अनावश्यक वापरलेली ताकद व सत्याग्रह्यांचे अनुकरणीय वर्तन, यांचे साक्षीदार आहेत. त्यांनी वर्तमानपत्रांना पाठविलेल्या वार्तांनी परदेशातील लोकमतात बदल झाला.

कलकत्त्यातील अमेरिकन कॉन्सल-जनरल फ्रेझर यांनी पाठविलेल्या अहवालात म्हटले आहे, '' १८५७ च्या बंडानंतर अधिक गंभीर व अधिक धोकादायक अशी परिस्थिती भारतात निर्माण झाली आहे, आणि तिला ग्रेट ब्रिटनला तोंड द्यावे लागत आहे. ''[३८]

अमेरिकन सरकारने ब्रिटन आणि भारत यांच्यात या ना त्या प्रकाराने मध्यस्थी करावी अशा सूचना अमेरिकेच्या सीनेटमध्ये, आणि राज्यसरकारात करण्यात येत होत्या. भारतात अशी

परिस्थिती निर्माण झाली आहे व त्याबाबत काही कृती करणे जरूर आहे याची स्टेट डिपार्टमेंटला जाणीव नाही, असे याबद्दल नमूद करण्यात आले.[३९]

## कम्युनिस्ट आणि त्यांचे धोरण

भारतात १९२५ ते १९३० या काळात मार्क्सवादी विचारांचा प्रचार आणि कामगार व शेतकरी आघाड्यांवर आचार करणारा एकमेव पक्ष म्हणजे भारतीय कम्युनिस्ट पक्ष. त्या पक्षाने सविनय कायदेभंगाच्या लढ्याबाबत घेतलेल्या भूमिकेची चर्चा मार्क्सवादी आणि राष्ट्रीय वर्तुळात जोरात चालू होती व आहेही. या संदर्भात जे वादविषय झाले त्यांची चर्चा करणे आवश्यक आहे.

गांधीजींच्या नेतृत्वाखाली राष्ट्रीय पुढारीपणाने कॉंग्रेसची चळवळ ही जनतेची चळवळ म्हणून विकसित केली. ग्रामीण व शहरी भागातील मोठ्या प्रमाणावरील मध्यम वर्गीयांत राजकीय जाणिवा निर्माण केल्या. केवळ ठराव संमत करून साम्राज्यवाद आणि क्रांती यांच्यामध्ये राहण्याची भूमिका कॉंग्रेसने घेतली आहे अशी कितीही बढाई मारली तरी कॉंग्रेस पुढारीपण ती टिकवू शकत नव्हती. कॉंग्रेसजवळ खास आर्थिक कार्यक्रम नव्हता आणि शेतकऱ्यांच्या वर्गीय मागण्याही कॉंग्रेसने मांडल्या नाहीत.

कायद्याचा तांत्रिक भंग करून ' जेल भरो ' आंदोलन उभारणे, आणि शेतकऱ्यांच्या आर्थिक दुरवस्थेविरुद्ध गंभीरपणे लढा उभारण्यासाठी जनतेची ताकद वापरण्याकडे दुर्लक्ष करणे हेच कायदेभंगाच्या लढ्याचे मोठे सार्वत्रिक वैशिष्ट्य होते. गांधीजींनी म्हटले आहे, " सरकारला अडचणीत वा पेचात टाकण्याची माझी कधीच इच्छा नव्हती, मी मिठावरील कराविरुद्ध माझी शक्ती केंद्रित केली होती, याचा अर्थ असा की ज्यामध्ये नैतिकता नाही अशा कराविरुद्ध सरकारवर हल्ला केला. "[४०]

प्रत्यक्षात भारतीय जनता भांडवलशाहीची गुलामच होती; कारण सामाज्यशाही ही भांडवलशाहीची अंतिम अवस्था असल्याने सामाज्यशाहीचे अंग म्हणूनच भारतातील अर्ध-सरंजामशाही पद्धती टिकविण्यात आली होती. जमीनमहसूल किंवा कर यांच्याविरुद्ध शेतकरी किंवा आपली दुरवस्था नाहीशी करण्यासाठी कामगार जेव्हा लढा उभारतो, संस्थानिकांच्या बेबंद कारभाराविरुद्ध त्याची प्रजा जेव्हा झगडा सुरू करते, अशा वेळी साम्राज्यशाही ताकद पिळवणूक करणारांना संरक्षण देण्यासाठीच वापरलेली दिसेल.

वासाहतिक देशात वर्गलढा अपरिहार्यपणे राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याशी एकरूप होताना दिसतो, कारण साम्राज्यविरोधी चळवळ ही भांडवलशाही व जमीनदारशाही यांच्याविरुद्ध चळवळ असते. जोपर्यंत परकीय भांडवलशाही हितसंबंध विरोधात असतील, तोपर्यंतच भारतीय भांडवलदार वर्ग स्वातंत्र्यलढ्याला पाठिंबा देत राहतो.

कायदेभंगाच्या चळवळीत असलेल्या शक्तींचा विचार केला तर असे दिसते की, भांडवलदारी राष्ट्रवाद साम्राज्यविरोधी लढ्यात गरीब शेतकऱ्यांचा कैवारी म्हणून काम करताना दिसतो.

साम्राज्यशाहीकडून अधिक सवलती मिळविण्यासाठी शेतकऱ्यांवरील वजन वा प्रभुत्वाचा तो उपयोग करताना दिसतो.

भारताच्या स्वातंत्र्यलढ्याबाबत लेनिन यांनी काय म्हटले आहे हे नमूद करणे महत्त्वाचे आहे. चार महत्त्वाचे मुद्दे लक्षात घ्यावयास हवेत :—(१) भांडवलदारी लोकशाही चळवळीशी एकत्रित विचार करता लढा करण्याची आवश्यकता नसते, (२) भांडवलदारी लोकशाही चळवळीशी ऐक्य आणि लढा यांचा त्यांनी पुरस्कार केला आहे, (३) वासाहतिक देशातील भांडवलदारी लोकशाहीचे शेतकरी आणि इतर विभाग यातील भेद त्यांनी पुनः पुनः सांगितला आहे. राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ ही भांडवलदार-कामगार यांच्यासारखी विरुद्ध टोकाची आहे, असे लेनिन यांनी कधीच मानले नाही, (४) राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ साम्राज्यशाही व सरंजामशाहीतील उत्पादनसंबंध, आणि समाजवादातील उत्पादनसंबंध यांच्यातील संक्रमणावस्था असते.[४१]

१९२९-३४ या काळातील वैशिष्ट्ये कॉ. डांगे खालीलप्रमाणे सांगतात :—(१) शेतकऱ्यांनी त्या लढ्यात भाग घेतला, (२) कापड कामगार, रेल्वे आणि इतर कामगारांचे मोठ्या प्रमाणावरील संप, (३) पेशावर, चितगाव आणि सोलापूर या ठिकाणी जनतेने केलेले उठाव, (४) जनतेने जरी हिंसात्मक मार्ग अनुसरला, तरी गांधीजींनी लढा स्थगित केला नाही, (५) काँग्रेसने संपूर्ण स्वातंत्र्य हे ध्येय घोषित केले, आणि कराची काँग्रेसमध्ये (१९३१) पुरोगामी कार्यक्रम तयार केला. कम्युनिस्ट आणि डाव्या विचारसरणीच्या इतर कार्यकर्त्यांनी काँग्रेसला वर्गीय दृष्टिकोन दिला, पण राष्ट्रीय आघाडी उभारण्यात त्यांना अपयश आले.[४२] कम्युनिस्ट आणि काँग्रेस यांच्यातील दुफळी उघड झाली.

या संदर्भात कॉ. मोहित सेन यांना स्वातंत्र्यलढ्याचे स्वरूप आणि त्याबाबतचा दृष्टिकोन यांचे मार्क्सवादी विश्लेषण करताना तीन महत्त्वाचे घटक दिसतात : (१) समाज परिवर्तनाचे नवीन घटक जनतेने स्वीकारल्यावरच राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा उभा राहतो व त्याला पुढे नेतो. याचाच अर्थ असा की, आधुनिकतेकडे नेण्यासाठी तो मार्ग मोकळा करतो, (२) ब्रिटनने अजाणतेपणाने केलेल्या क्रांतिकारक कार्याची फळे प्राप्त होण्यासाठी भारताची ब्रिटनपासून मुक्तता होणे जरूर आहे, (३) ब्रिटनमधील किंवा भारतातील समाजवादी क्रांतीचा हे स्वातंत्र्य हा परिणाम असेल. भारताच्या स्वातंत्र्यलढ्याचे आंतरराष्ट्रीय स्वरूप दाखविण्यावर या तिसऱ्या घटकानी भर दिला आहे.''[४३]

भारतातील कम्युनिस्ट चळवळीने खालील चुका केल्या :—(१) भारतीय भांडवलदार वर्गाचे दुहेरी स्वरूप त्यांना समजले नाही, (२) भांडवलदार व कामगारवर्ग यावरच जोर दिला; समाजातील इतर मध्यम वर्ग आणि थर यांचे साम्राज्यविरोधी लढ्यातील स्वरूप समजून घेण्यात अपयश आले. भांडवलदार वर्गाला साम्राज्यवादी शक्ती म्हणून संबोधण्यात आले, (३) साम्राज्यशाही व सरंजामशाहीविरोधी लढ्यात कामगारवर्गाचे वर्चस्व या विचाराची चुकीची

समजूत, (४) लढ्याच्या प्रकाराबाबतीतही चुकीचा दृष्टीकोन.[४४] वासाहतिक क्रांतीबाबत लेनिन यांनी काय म्हटले आहे हे पाहणे उद्‌बोधक ठरेल. '' ...... भांडवलदारी लोकशाही स्वातंत्र्याच्या चळवळीला त्या त्या देशातील कम्युनिस्टांनी मदत केली पाहिजे. म्हणजे त्या त्या देशातील कामगारांनी ही मदत केली पाहिजे. मागास राष्ट्रे या कामगारवर्गावरच आर्थिक व वासाहतिकदृष्ट्या अवलंबून असतात. ''[४५]

गांधीजींच्या पुढारीपणाचे वर्गीय स्वरूप काय होते याविषयी नित्य चर्चा चालू असते. याबाबत लेनिन यानी दूरदर्शीपणाने आपले मत नोंदवले आहे. '' १९२० मध्ये मॉस्कोत राहणाऱ्या एका भारतीयाला, गांधीजी हे भारताच्या स्वातंत्र्यलढ्याचे स्फूर्तिदाते व नेते आहेत असे लेनिन यानी सांगितले. ''[४६] या संदर्भात डॉ. अधिकारी म्हणतात, '' ...... स्वातंत्र्यपूर्व काळात ज्यामुळे राष्ट्रीय स्वातंत्र्याची क्रांती या आमच्या पुढच्या आव्हानाबाबत निश्चित आणि मुख्य कर्तव्य कोणते याविषयी आमची अपुरी समजूत झाली त्यामुळे आमच्या पक्षाचे मोठे नुकसान झाले. राष्ट्रीय चळवळ, आणि तिचे हत्यार म्हणजे महात्माजींच्या पुढारीपणाखाली विकसित झालेली कॉंग्रेस याविषयी आमचे आकलन चुकीचे होते. भारतीय क्रांतीत भांडवलदार वर्गाची भूमिका काय असावी याबाबत आमची चुकीची समजूत झाली आणि आमचा अभ्यास अपुरा होता आणि तोही सत्यसृष्टीतला नव्हता. ''[४७]

गांधीजी मीरत कटातील आरोपींना भेटण्यास मीरत तुरुगांत गेले. इतर राजकीय विषयावरील चर्चा चालू असता कॉ. डांगे यांनी त्यांना प्रश्न विचारला : ' आगामी लढ्यात पोलिसांच्या दडपशाहीमुळे वा चिथावणीमुळे जनतेने प्रतिकार केला, त्यात काही पोलीस जखमी झाले वा मारले गेले, तर १९२२ मध्ये बारडोली ठरावाप्रमाणे चळवळ मागे घेण्यात आली तशी चळवळ मागे घ्याल का? ' गांधीजी थोडा वेळ विचारक्रांत झाले, आणि ठामपणे म्हणाले, ' नाही, चळवळ परत घेणार नाही.'[४८] आणि गांधीजींनी हा शब्द पाळला, हे त्याना भूषणावह होते. गांधीवादी तंत्राच्या कितीतरी पुढे जनता गेली होती, तिने साम्राज्यशाहीला आव्हान दिले, आणि अधिकाराची स्थाने हातात ठेवली. सोलापूरात हे घडले. डॉ. अधिकारी म्हणतात, '' गांधीजींनी पुकारलेला लढा हा क्रांतिकारक नव्हता, तो साम्राज्यविरोधी होता व त्याचा आशय लोकशाही स्वरूपाचा होता ; पण त्याचे तंत्र जनतेच्या उत्स्फूर्त कृतीना मर्यादित ठेवण्याचेच होते. तरीपण त्यामुळे अफाट जनता कार्यप्रवण झाली, आणि तिने राष्ट्रीय क्रांतीची भावना निर्माण केली. त्या लढ्याला आम्ही केलेल्या विरोधामुळे राष्ट्रीय चळवळीपासून आमचा पक्ष दूर गेला इतकेच नव्हे तर आमच्या कामगार चळवळीतही फूट पडली, ...... '' ते पुढे म्हणतात, '' सुधारणावादी गांधीवादी राष्ट्रीय पुढारीपणाविरुद्ध लढण्याच्या आमच्या मार्गाची परिणती, नेहरू, सुभाष बोस आणि समाजवादाकडे घेणाऱ्या डाव्या विचारसरणीच्या गटांवर ' भांडवलदारांचे डावे डावपेच '(Left manouvre of the bourgeoisie) अशी संभावना करण्यात झाली.''[४९] कम्युनिस्टांच्या कार्यक्रमाची मुख्य तत्त्वे मांडणारा जाहिरनामा ' इंप्रेकॉर ' च्या (आंतरराष्ट्रीय पत्रव्यवहाराचे नियतकालिक) नोव्हेंबर-डिसेंबर १९३० च्या अंकात प्रसिद्ध करण्यात

आला. त्यात म्हटले आहे, '' जवाहरलाल नेहरू आणि सुभाष बोस या काँग्रेसमधील डाव्या विचारसरणीच्या नेत्यांना उघडे पाडणे हे प्राथमिक काम समजण्यात आले. '' [५०]

वासाहतिक क्रांतीसंबंधी कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या सहाव्या जागतिक परिषदेने (१९२८) जे सिद्धान्त मांडले त्याबाबत खूपच वाद झाले आहेत. डॉ. अधिकारी यांच्या म्हणण्याप्रमाणे ६ व्या परिषदेचे आदेश ' निश्चितपणे सांप्रदायिक ' (सेक्टेरियन) होते. '' मीरत कटातील आरोपींनी जे राजकीय धोरण स्वीकारले, व त्यांच्या न्यायासनापुढील निवेदनात जे प्रतिबिंबित झाले—त्यांनीही कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या सहाव्या जागतिक परिषदेचेच धोरण मान्य केले होते—तरी ते तितके सांप्रदायिक नव्हते. '' कामगारवर्गाच्या कार्यासंबंधीचे धोरण, '' परतंत्र देशात, परकीय साम्राज्यशाहीपासून राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळविणे हेच मुख्य कार्य असते, स्वातंत्र्याचा लढा हाच लोकशाही प्रस्थापनेचा लढा असतो. म्हणून राष्ट्रीय लढ्यात समरस होण्यानेच स्वतंत्र कामगार चळवळ उभी करणे आणि स्वातंत्र्यलढ्याचे वर्चस्व प्रस्थापित करणे ही कार्ये कामगारवर्ग पुरी करू शकेल. '' या शब्दांत त्यांनी सांगितले. या सहाव्या परिषदेच्या प्रबंधातील उणिवा डॉ. अधिकारी पुढीलप्रमाणे सांगतात. : '' त्या प्रबंधात कामगारवर्गाचा लढा हा राष्ट्रीय क्रांतीत वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी असतो. राष्ट्रीय भांडवलदारवर्गाशी ऐक्य करीत असताना, त्यांचे तडजोडवादी धोरण उघडे पाडणे व त्याविरुद्ध लढणे, राष्ट्रीय क्रांतीचा भाग म्हणून सरंजामशाहीविरोधी लढा उभारणे, कामगार-शेतकरी आघाडी उभारणे आणि अशा रीतीने भांडवलदारवर्गाच्या धरसोडीच्या धोरणाला स्थिर करणे यांची त्यात नीट मांडणी केली नाही. ''[५१]

कॉमिन्टर्नच्या सहाव्या जागतिक परिषदेने स्वीकारलेल्या धोरणाची कार्यवाही म्हणजे भांडवलदारी पक्षाविरुद्ध तसेच शांततेच्या वा अहिंसेच्या मार्गाने समाजवाद प्रस्थापित करणाऱ्यांविरुद्ध लढाच होता.[५२] कम्युनिस्ट चळवळीतील डाव्या सांप्रदायिक विचारसरणीचे पहिले प्रवक्ते एम्. एन्. रॉय होत. उल्यानोव्हस्कीनी म्हटले आहे, '' सुरुवातीच्या काळात भारतीय कम्युनिस्ट चळवळीतील डावी सांप्रदायिक विचारसरणी १९२० च्या आसपास दिसून आली. एम्. एन्. रॉय पहिल्या कम्युनिस्ट गटांतील पुढाऱ्यांपैकी एक होते. त्या काळात राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याच्या अग्रभागी भारताचा राष्ट्रीय भांडवलदार होता; पण रॉय यांनी साम्राज्यविरोधी लढ्यात त्या वर्गाची आवश्यकता नसल्याचे प्रतिपादन केले. ''[५३] कॉमिन्टर्नच्या दुसऱ्या जागतिक परिषदेत रॉय यांच्या सांप्रदायिक आणि चुकीच्या धोरणाला विरोध करताना, खरोखरी क्रांतिकारक आणि साम्राज्यविरोधी असलेल्या लढ्यांना कम्युनिस्टांनी पाठिंबा दिला पाहिजे, असे लेनिन यांनी प्रतिपादन केले आहे.[५४] '' सहाव्या परिषदेने जे धोरण स्वीकारले, त्या परिषदेचे वासाहतिक क्रांतीबाबतच्या धोरणाचे प्रवक्ते ओ. यू. कुसेनिन होते. सोव्हिएट युनियनच्या विसाव्या कम्युनिस्ट पक्ष परिषदेत, वसाहत वा निमवसाहतीत राष्ट्रीय भांडवलदार वर्गाच्या भूमिकेबाबत ' त्या वेळच्या धोरणाला खात्रीपूर्वक सांप्रदायिकतेचा स्पर्श ' होता असे

त्यानी सांगितले.[५५] १९३० च्या कायदेभंगाविषयी सरदेसाई म्हणतात–'' ...... विशेषतः कम्युनिस्ट चळवळीच्या बाल्यावस्थेत तिचे राजकारण आंतरराष्ट्रीय प्रमाणावर अत्यंत केंद्रित असे. त्या परिस्थितीत हिंदुस्थानात काही वेगळे घडू शकले असते का हा वादाचा प्रश्न आहे. ...... विशिष्ट मूलभूत कम्युनिस्ट भूमिकांना धरून कम्युनिस्ट पक्ष राष्ट्रीय चळवळीत आपली भूमिका पार पडू शकला असता, तर पक्षाचे व स्वातंत्र्याच्या चळवळीचेही फार हित झाले असते. त्या परिस्थितीत कॉ. देशपांडे यांच्या कर्तृत्वास अधिक वाव मिळाला असता, व त्याचे अधिक चीज झाले असते असे तीस वर्षांनंतर म्हटल्याशिवाय राहवत नाही.'' *

जेव्हा राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा जोराने प्रगती करीत होता तेव्हा हे (कम्युनिस्ट) तरुण पुढारी राष्ट्रीय पुढारीपणाची ' क्रांतिकारक आणि दगाबाज ' अशी संभावना करीत होते. साम्राज्यविरोधी लढ्याचे प्रतीक म्हणून तिरंगा फडकला, पण त्याच्या जागी लालबावटा रोवण्यात आला. सहकार्याने जवळ नाही. (मुंबई चौपाटी २६ जानेवारी १९३०). दोन वर्षांच्या काळात आयटक दोनदा फोडण्यात आली; रेल्वे, कापडकामगार या उद्योगांतील प्रत्यक्ष कामगार युनियन्सची तीच गत झाली.

डावी पंथप्रवृती अखेर तेथे थांबली नाही, कम्युनिस्ट पक्षाची पुढे दोन शकले झाली, हा मान दुसऱ्या कोणाकडे जात नसून कॉ. रणदिवे यांच्याकडेच जातो. कॉ. एस. व्ही. देशपांडे यांच्या नेतृत्वाखालील मध्यवर्ती समितीत ते अल्पमतात होते, कॉ. रणदिवे यांनी सभात्याग केला, आणि ' वर्कर्स पार्टी ' स्थापन केली. कम्युनिस्ट इंटरनॅशनलकडे वाद नेण्यास त्यांनी विरोध केला, कारण त्यांना त्यांच्याबद्दल ' बौद्धिक तिटकारा ' होता (अधिक तपशिलासाठी ' कम्युनिस्ट पक्षातील दोन ध्रुव ' हा ' सप्तदशी ' या लालजी पेंडसे यांच्या ग्रंथातील लेख वाचावा).

राष्ट्रीय आघाडीबाबत विवेचन करताना कॉ. डांगे म्हणाले, '' ...... आम्ही ही आघाडी बांधली, ती कम्युनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ती पुढारीपणाने मोडली. राष्ट्रीय कॉंग्रेस आणि तिच्या नेतृत्वाखालील लढ्याबाबत डावा सांप्रदायिक दृष्टिकोन निर्माण केला.'' डाव्या पंथप्रवृतीचे स्वरूप गंभीरपणे समजून घेणे, आणि राष्ट्रीय चळवळीत सामील होण्यासाठी उत्साहवर्धक वा जोरदार अशी हाक न देणे, आणि कॉंग्रेस पुढारीपणाबाबत संपूर्णपणे नकारात्मक भूमिका—विशेषतः डाव्या गटाबाबत यामुळे कम्युनिस्ट जवळजवळ अलिप्त राहिले, हे मान्य करायलाच पाहिजे[५६] '' १९२९ मध्ये मीरत कटाच्या अटका झाल्या नसत्या, तर आम्ही कॉंग्रेसने पुकारलेल्या लढ्याबाबत कमी सांप्रदायिक दृष्टिकोन स्वीकारला असता आणि ते चित्र काहीसे निराळे दिसले असते '' [५७] असे कॉ. सरदेसाई म्हणतात हे खरेच आहे, याचा परिणाम असा झाला की, कम्युनिस्ट राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याबाबत काही करीत नाहीत, कॉंग्रेस हीच साम्राज्यशाहीविरोधी लढा लढवीत आहे, अशी कामगारात भावना निर्माण झाली म्हणून ते कॉंग्रेसचे पुढारीपण मानू लागले.

* आमचे मास्तर–कॉ. देशपांडे गौरवग्रंथ, १९६१ पृ. ४६.

काँग्रेसमधील डाव्या गटाने गांधी-आयर्विन कराराला विरोध केला. ' युद्ध तहकुबी ' करावी लागली याचे कारण म्हणजे शेतकऱ्यांची वाढती बंडाळी आणि जोर यांचा आलेला दबाव. काँग्रेसने संपूर्णपणे लोटांगण घातले, सप्टेंबर १९३० मध्ये शांततेची बोलणी फिसकटली, त्यानंतर तडजोडीचे कोणतेही नवे मुद्दे मांडण्यात आले नाहीत. सरकार ' शरण आले, ' त्याने ' शांततेचा बहाणा ' केला, आणि काँग्रेस ही देशात राजकीय शक्ती असल्याची मान्यता दिली. भारतातील शेतीचे अरिष्ट विचारात घेतले तर साम्राज्यवाद्यांना हे करणे भाग होते. शिवाय ब्रिटनमध्येही आर्थिक अरिष्ट आले होतेच, त्यांना जरा श्वास घ्यायला वेळ पाहिजे होता, आणि काँग्रेसने गांधी-आयर्विन करार करून हा वेळ त्यांना दिला.

वसाहतवाद्याविरुद्ध काँग्रेसने कायदेभंगाच्या मोहिमेला प्रारंभ केला होता. कामगार, शेतकरी, मध्यमवर्ग, आणि शहरातील गरीब जनतेने त्यात मोठ्या प्रमाणावर भाग घेतल्यानें त्याला लढाऊ स्वरूप आले होते. '' १९३० मध्ये चितगाव आणि पेशावरमध्ये साम्राज्यशाहीविरोधी बंड उभे राहिले, सोलापूर या मोठ्या औद्योगिक केंद्रात कामगारांनी लढ्याला तोंड फोडले. ब्रिटिश अधिकाऱ्यांना शहराबाहेर हाकलले, क्रांतिकारक स्वराज्याची यंत्रणा उभारली, पोलिसांबरोबर लढा दिला तो रक्तमय झाला, आणि तो कितीतरी दिवस टिकला. ...... या भारतीय जनतेचा स्वातंत्र्यलढा चिरडण्यासाठी वसाहतवाद्यांनी मोठ्या प्रमाणावर दडपशाही केली. या लढ्याचे स्वरूप आणि व्याप्ती यामुळे काँग्रेसचे बहुसंख्य पुढारी भयभीत झाले व ब्रिटिशांकडून काही सवलती मिळवण्यासाठी त्यानी त्यांच्याशी करार केला.'' [५८]

याचवेळी चीनमधील राष्ट्रीय पुढारी डॉ. सन्यत्सेन यांच्याशी ज्या प्रकारचा समेट कम्युनिस्टांनी केला त्याच प्रकारचा एखादा समेटाचा करार राष्ट्रसभेतील पुढाऱ्यांशी करण्याचा प्रयत्न कम्युनिस्ट पक्षाने केला, पण तो राष्ट्रसभेच्या पुढाऱ्यांनी मान्य केला नाही, असे भाई डांगे यानी सह्याद्रीच्या १९३८ च्या समाजवाद विशेषांकात लिहिले आहे.

## समाजवादी विचारांचा उदय

सोशॅलिस्ट (समाजवादी) म्हणवून घेणाऱ्या एका गटाची परिषद मे १७, १९३४ रोजी पाटणा येथे भरली. आचार्य नरेंद्र देव अध्यक्षस्थानी होते. सुमारे शंभर प्रतिनिधी उपस्थित होते. त्या परिषदेत आचार्य नरेंद्र देवाना अध्यक्ष व जयप्रकाश नारायण यांना कार्यवाह म्हणून निवडण्यात आले. अब्दुल बारी, पुरुषोत्तमदास त्रिकमदास, एम्. आर. मसानी, संपूर्णानंद, सी. सी. बानर्जी, आणि एफ्. ए. अन्सारी हे कार्यकारिणीचे सदस्य निवडले गेले.

दुसऱ्याच दिवशी अ. भा. काँ. कमिटीचे अधिवेशन भरणार होते, त्यात अ. भा. काँ. कमिटीवर दबाव आणून समाजवादी कार्यक्रम स्वीकारावयास लावण्यासंबंधी प्रस्ताव संमत करण्यात आला. ' स्वातंत्र्यलढ्याचा पाया विस्तृत करणे, आणि जरी स्वराज्य आले तरी जनतेचे आर्थिक शोषण होणार नाही अशी जनतेला ग्वाही देणे, हा त्याचा आशय होता, घटनासमिती बोलावण्याबाबतचा मुख्य ठराव होता.

मे १८, १९३४ ला अ. भा. कॉं. कमिटीच्या अधिवेशनात समाजवादी गटाचा ठराव ३५ अनुकूल व ८६ प्रतिकूल अशा मतांनी फेटाळला गेला. हा गट कॉंग्रेसमध्ये अधिक प्रबल होण्याचा प्रयत्न करीत होता. ' १९३१ च्या कराची कॉंग्रेसमध्ये संमत झालेला मूलभूत हक्कासंबंधीचा ठराव जनतेला दाखवण्यासाठी, पण उत्साहहीन आणि अपुरा होता. ' कौन्सिलप्रवेशाचा कार्यक्रम म्हणजे घटनात्मक चळवळ करण्याचा निष्फळ व शुष्क मार्ग असल्याचे ' त्या गटाने ठरावात म्हटले आहे. ' कॉंग्रेस वर्किंग कमिटीचा ठराव (पिळणूक करणारांची) मालमत्ता जप्त करावी असे म्हणत नाही, किंवा वर्गयुद्धाचा पुकारा करीत नाही. ..... कारण हे कार्यक्रम अहिंसाविरोधी आहेत.' समाजवादी कार्यक्रम म्हणजे कराची अधिवेशनात मान्य झालेल्या मूलभूत हक्कासंबंधीच्या ठरावात सुधारणाच आहे असे मानण्यात आले; मूलभूत उद्योगांवर राष्ट्राची मालकी मान्य करण्यात आली, पण मालमत्ता जप्त केल्याशिवाय ती मालकी प्रस्थापित होऊ शकणार नाही अशी भूमिका मांडण्यात आली. ' संपत्तीचे उत्पादन, विभाजन आणि विनिमय यांच्या साधनांचे पुरोगामी पद्धतीने समाजीकरण करणे हाच पाटण्याच्या ठरावाचा आशय होता, ..... याचा अर्थ खाजगी मालमत्तेचा विनाश असा नाही. वर्गयुद्धावर विश्वास असणाऱ्या सोशॅलिस्टांना कॉंग्रेसमध्ये पक्ष संघटित करण्यास परवानगी दिल्याने कॉंग्रेसच्या वरिष्ठ पुढाऱ्यानी वर्गयुद्धाला अप्रत्यक्षपणे पाठिंबा दिला असेच झाले.

शंकरराव देव तुरुंगाबाहेर आल्यावर डोके आणि हृदय यांच्यातील द्वंद्व त्यांच्यापुढे उभे राहिले. त्यांचे हृदय गांधीजींकडे होते, पण ते समाजवादी विचाराकडे आकृष्ट झाले होते. आचार्य जावडेकर ' सत्याग्रही समाजवादा ' चा प्रचार करू लागले.

कॉंग्रेसचे अध्यक्ष बाबू राजेंद्र प्रसाद यांनी आपल्या पदाचा राजीनामा दिला, राजीनाम्याच्या पत्रात त्यानी नेहरूंच्या समाजवादाच्या प्रचाराबाबत नापसंती व्यक्त केली. ते म्हणतात– '' ..... कॉंग्रेसने त्याचा (समाजवादाचा) स्वीकार केलेला नाही. म्हणून राष्ट्राच्या हिताच्या व आपल्या स्वातंत्र्यलढ्याच्या दृष्टीने ते अपायकारक आहे; कारण आपण त्याला सर्वाधिक महत्त्व देतो. '' गांधीजींनी मध्यस्थी केली आणि राजेंद्रबाबूंनी राजीनामा परत घेतला.

१९३२ च्या लढ्यात भाग घेतलेले तरुण बंधमुक्त होऊन आले. कॉंग्रेसच्या कार्यक्रमावरील त्यांचा विश्वास उडाला. चळवळीचा भर ओसरल्यानंतर कॉंग्रेस संघटनेमध्ये सनदशीर राजकारणाच्या प्रवृत्ती फोफावू लागल्या (यालाच उद्देशून Parliamentary mentality has come to stay असे गांधीजी म्हणाले होते). अशा परिस्थितीत राष्ट्रीय आंदोलनास नवी दिशा देण्यासाठी, आंदोलनाची उद्दिष्टे स्पष्ट करण्यासाठी व स्वातंत्र्यसंग्रामाच्या साधनांचा पुनर्विचार करण्याच्या उद्देशाने ऑक्टोबर २१ व २२, १९३४ रोजी उत्तर प्रदेशाचे नेते डॉ. संपूर्णानंद यांच्या अध्यक्षतेखाली मुंबई येथे भरलेल्या पहिल्या परिषदेमध्ये कॉंग्रेस सोशॅलिस्ट पार्टीच्या ध्येय-धोरणाबाबत एक त्रोटक मसुदा मंजूर करण्यात आला. '' भारताचे संपूर्ण स्वातंत्र्य हे आमचे उद्दिष्ट असून संपूर्ण स्वातंत्र्याचा अर्थ म्हणजे ब्रिटिश

साम्राज्यापासून भारताचे विमोचन व समाजवादी समाजाची स्थापना हाच आहे '' हे स्पष्ट करण्यात आले. '' सर्व सत्ता श्रमजीवी जनतेच्या हाती, देशाच्या आर्थिक नियोजनाची व नियंत्रणाची जबाबदारी सरकारवर, प्रमुख उद्योगधंद्यांचे राष्ट्रीयीकरण, परदेशी व्यापारावर सरकारचे नियंत्रण, जमीनदारशाही व राजेशाही यांचा विनामोबदला अंत, जमिनीची फेरवाटणी, सहकारी व सामूहिक शेती '' [५९] इत्यादी कार्यक्रमांचा या मसुद्यात समावेश करण्यात आला होता. '' भारतासारख्या मागासलेल्या देशाच्या आर्थिक जीवनाच्या नियोजनाची व नियंत्रणाची जबाबदारी सरकारवर सोपवल्यानंतर हुकुमशाही धोका टाळून आर्थिक नियोजन लोकशाहीनिष्ठ कसे होईल याचे विवेचन यात नव्हते, औद्योगीकरणास आवश्यक असणाऱ्या भांडवलाचा संचय कसा करायचा? प्रमुख धंद्यांचे राष्ट्रीयीकरण झाल्यानंतर त्या उद्योगधंद्यांचा कारभार लोकशाहीप्रधान कसा बनवायाचा, या सर्व समस्यांबाबत स्पष्ट विवेचन कार्यक्रमाच्या मसुद्यात नव्हते. याचे प्रमुख कारण म्हणजे राष्ट्रीय स्वातंत्र्य हाच त्यावेळी निकर्डीचा प्रश्न होता, व त्यामुळे इतर प्रश्नांना गौण स्वरूप प्राप्त झाले होते.'' [६०]

महाराष्ट्रात ' यंग सोशॅलिस्ट लीग ' स्थापन झाली. लीगने स्वातंत्र्यलढ्याच्या सामाजिक व आर्थिक बाजूवर भर दिला, लीगचा प्रचार मुख्यतः दोन स्वरूपात होता : कामगार चळवळीत भाग घेणे व मध्यमवर्गातील बुद्धिमंतात समाजवादाचा प्रचार. त्यांनी मार्क्सवादाचे अभ्यासवर्ग संघटित केले.[६१] महाराष्ट्र काँग्रेस समाजवादी पक्ष स्थापन झाला, अनेक तरुण त्याचे सभासद झाले.

डिसेंबर १८, १९३३ मध्ये नेहरूंनी एक पत्रक प्रसिद्ध केले : '' मूलभूत दृष्टीने विचार करता, जगापुढे कम्युनिझम आणि फॅसिझम यांच्यातून निवड करावी लागेल, असा माझा विश्वास आहे. मी कम्युनिझमच्या बाजूचा आहे. मी फॅसिझमचा तीव्रपणे तिरस्कार करतो. काहीही किंमत देऊन सांप्रतची भांडवलशाही समाजरचना टिकविण्यासाठी योजलेले पाशवी व रानटी उपाय यापेक्षा मी त्याला अधिक किंमत देत नाही ····· मी कम्युनिस्टांचे ध्येय पसंत करतो ····· कम्युनिझमची मूलभूत विचारसरणी आणि इतिहासाची शास्त्रीय मांडणी माझ्या मते विश्वसनीय—बुद्धीला पटणारी आहे. '' [६२]

रशियातील ऑक्टोबर क्रांतीपासून ज्यांनी स्फूर्ती घेतली (समाजवादाचा) प्रचार केला, जनतेत जाऊन काम केले, कामगार चळवळी केल्या व सामाजिक आणि राजकीय दृष्टीने जागृत अशा तरुणांनी सामाजिक सहभाग केला यामुळे समाजवादी विचारसरणी वाढीस लागली. वासाहतिक क्रांतीवर त्यानी केलेले भाष्य, आणि त्यातील त्यांचा सहभाग यांमुळे हा विचार वाढीस लागला. काँग्रेस ही साम्राज्यविरोधी आघाडी होती, नेहरू व बोस हे डाव्या विचारसरणीचे, गांधी-पटेल उजव्या विचारसरणीचे, आणि डाव्या आणि उजव्या विचारसरणीत दुवा म्हणून गांधीजी काम करीत. या विचारप्रवाहाचे पुढारी निःसंशय जवाहरलाल नेहरू होते. ····· त्यांच्या लेखनाने आणि भाषणानी तरुण देशभक्तांची एक पिढी घडविण्यास मदत झाली, त्यांना

समाजवादाची दीक्षा दिली. डाव्या विचारसरणीच्या राष्ट्रवाद्यांमध्ये भारतीय स्वातंत्र्यलढ्याबाबतची आंतरराष्ट्रीय संबंधाबाबतची स्पष्ट जाणीव नेहरूंना होती. कम्युनिस्ट आणि डावे राष्ट्रवादी यांनी केलेल्या परिश्रमामुळे काँग्रेसचा दृष्टिकोन आणि कार्यक्रम आस्ते आस्ते डाव्या आणि मूलगामी मार्गाला लागला. '' [६३]

## राष्ट्रीय भांडवलदारवर्ग

हा वर्ग स्वातंत्र्याच्या चळवळीच्या काळात निर्माण झाल्याचे दिसून येते. या काळात त्याचे आर्थिकदृष्ट्या अस्तित्व आणि विस्तार झाला. भारतीय उद्योगधंद्यांचा विस्तारही या चळवळीच्या विस्ताराशी मिळताजुळता आहे.

ह्या वर्गाचे स्वरूप दुहेरी आहे. एकीकडे साम्राज्यवाद्याशी झगडा आणि दुसरीकडे त्याचे परकीय मक्तेदाराशी असलेले संबंध. तो मिळताजुळता नसतो, आणि सदा दोलायमान असतो. पुष्कळ वेळा जनतेच्या दबावाने तो वर्ग साम्राज्यशाहीविरोधाचे सुसंगत धोरण स्वीकारतो.

देशातील भांडवलशाहीच्या विकासाबरोबर या वर्गाचा उदय झाला; कामगारवर्गाचा उदय झाला, आणि वर्गावर्गातील तणाव वाढीस लागला, अशा परिस्थितीत या वर्गाने गंभीर अशा धरसोडी केल्या, सरंजामशाहीचे अवशेष आणि वसाहतवाद्यांच्या दडपशाहीला विरोध करण्यात सुसंगतपणा राखला नाही. राष्ट्रीय स्वातंत्र्यलढ्याची कक्षा मर्यादित करण्याचा आणि अहिंसेने लढा बंदिस्त करण्याचा प्रयत्न केला.

या वर्गाचे काम दुहेरी असते : जनतेच्या चळवळीच्या ' धोक्या ' विरुद्ध साम्राज्यवाद्यांशी सहकार्य; आणि राष्ट्रीय लढ्यात जनतेचे पुढारीपण, जनतेचे जीवनमान खालावले आहे याची आणि ती जनता पुढे कोणता मार्ग स्वीकारील याची त्यांना जाणीव असते. एक गिरणी मालक अंबालाल साराभाई म्हणतात, '' लोकांची क्रयशक्ती मोठ्या प्रमाणावर कमी झाली आहे. तिची पातळी खाली गेली आहे, हे धोकादायक आहे, भुकेली जनता काहीही करील. ····· लोकांच्या जीवनमानात सुधारणा नसेल आणि कसणाऱ्या शेतकऱ्याला देशात पायगोवा नसेल तर बोल्शेव्हिक प्रचाराला ही भूमी सुपीक दिसून येईल. ''

महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्सचे संस्थापक (१९२८) आणि एक उद्योगपती आणि व्यापारी वालचंद हिराचंद यांनी गांधीजींच्या अटकेनंतर सरकारी पदव्यांचा त्याग केला. या प्रतीकात्मक कृतीमुळे, ' शांतता आणि अहिंसा यांच्या प्रतीकाला ' लोकापासून दूर करून, सरकार देशात अस्थिरता माजविणाऱ्या शक्तीवरील नियंत्रणच दूर करीत आहे. जर सरकारने याबाबत लवकर पावले उचलली नाहीत, तर सरकार सर्व पाठिंबा गमावून बसेल असा जणू इशाराच दिला. यानंतर दहा दिवसांनी मुंबईतील साठ व्यापारी संस्थांचे प्रतिनिधी एकत्र जमले आणि त्यांनी पुरुषोत्तमदास ठाकुरदास आणि हुसेनभाई ए. लालजी या प्रमुख गिरणी मालकांनी गांधीजींना जर गोलमेज परिषदेत घेतले नाही तर गोलमेज परिषदेचा राजीनामा द्यावा तसेच त्यांनी मुंबई

विधिमंडळाचाही राजीनामा द्यावा असेही ठरले. इतर भांडवलदारांनी त्यांचे अनुकरण केले नाही. विठ्ठलभाई पटेल म्हणाले, '' त्यांनी त्यांच्या हितसंबंध रक्षणासाठी हे केले, आणि व्यावहारिकदृष्ट्या भारत ब्रिटनला विकला. त्यांचा राष्ट्रविरोधी आणि भांडवलदारी दृष्टिकोन यावरून दिसून येतो. '' जॉर्ज शूस्टर या अर्थमंत्र्याला पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांनी, गांधीजींना काही सवलती द्या, म्हणजे सत्याग्रह लढा परत घेतील आणि ते लंडनला गोलमेज परिषदेला जातील, असा सल्ला दिला. त्याचा राजीनामा लॉर्ड आयर्विन यांना फलदायी होईल असे त्यांना वाटले. अत्यंत महत्त्वाच्या अशा व्यापारी अरिष्टामध्ये भारताच्या उद्योगधंद्यांचा मुख्य आधार म्हणजे परदेशी मालावरील बहिष्काराची चळवळ होती असे जी. डी. बिर्ला यांनी त्या चळवळीचे स्वागत केले होते. मुंबईच्या सर्व गिरण्या सक्तीने बंद करण्यास लावल्या असत्या, पण त्या काळात बहिष्काराची चळवळ होती. काँग्रेसचे हंगामी अध्यक्ष पटेल म्हणाले, '' काँग्रेसच्या जोरदार प्रचारामुळे काँग्रेसचा बहिष्कार गिरण्यांच्या मालाचे साठे संपविण्यास उपयोगी पडला असेल. '' जे. वाडिया म्हणाले, की या चळवळीने मुंबईची मोठीच सेवा केली आहे.

रजनी पाम दत्त भांडवलदारांचे कारस्थान खालीलप्रमाणे वर्णन करतात :— '' भांडवलदारांचे साम्राज्यशाहीशी असलेले संबंध ठेवण्याच्या आशा या भ्रमनिरास करणाऱ्याच होत्या. तथापि नाखुषीने का होईना त्या सहकारापासून त्यांना लांब जावे लागले, त्यांना पाठिंबा देण्याऱ्या शक्तींना सहकाऱ्यांच्या सहकार्याने काम करून भविष्याकडे पाहणे भाग पडले. ''

अशा परिस्थितीत ब्रिटिश साम्राज्यशाहीशी समझोता करण्याची भारतीय भांडवलदारांची आशा दुरावली, व जनतेच्या साम्राज्यशाही सत्तेला विरोध करण्याचे धोरण तिला अंगीकारावे लागले.

## ओटावा आणि इतर करार

१९२९-३३ च्या आर्थिक अरिष्टामुळे मागील वर्षाची तात्पुरती स्थिरता लयाला गेली. राष्ट्रीय भांडवलदारवर्ग आणि परकी मक्तेदारं यांच्यातील विरोध व्यापार, अर्थ, शेती आणि विशेषतः उद्योग क्षेत्रात दिसून येऊ लागला. १९३०-३२ या काळात जनतेला या अरिष्टाचा भार सहन करावा लागला, त्या लढ्याचे पुढारीपण भांडवलदारांनी घेतले आणि लढा दिला. हे पुढारीपण जसे राष्ट्रीय लढ्याचे पुढारीपण स्वीकारण्यासाठी होते, तसेच साम्राज्यवाद्यांकडून सवलती मिळवण्यासाठी होते. ग्रेट ब्रिटन आणि भारत यांच्यातील आर्थिक बंधने वा ऋण अजमावण्यासाठी, व अभ्यास करण्यासाठी कराची काँग्रेसने (१९३१) एक समिती नेमली, त्या समितीच्या अहवालात म्हटले आहे : '' भारतातील कर्ज म्हणजे राष्ट्रीय कर्ज नव्हे; कारण ते ब्रिटनच्या प्रतिनिधीने केले होते, भारताला त्यावेळी ' घटनेची छायादेखील नव्हती. ' ईस्ट इंडिया कंपनीपासून आतापर्यंत भारताला ११कोटी २० लाख पौंडांचे कर्ज दाखविण्यात आले होते.

भारताच्या नावावर हे कर्ज चुकीने लादण्यात आले होते, ते माफ करणे न्याय्य होते. आयर्लंड जेव्हा स्वतंत्र झाले तेव्हा त्याच्या राष्ट्रीय कर्जाबाबत ब्रिटनने जे उदाहरण घालून दिले तेच भारताला लावावे असे त्या समितीने सुचविले. ऑक्टोबर १९२१ मध्ये भारत सरकारने पैशाच्या वसुलासंबंधी (फिस्कल) एक आयोग नेमला. इब्राहिम रहिमतुल्ला हे त्याचे अध्यक्ष होते. त्या आयोगाने धंद्यांना संरक्षण व कायम स्वरूपाचे टॅरिफ बोर्ड नेमण्याची शिफारस केली. त्याने ' साम्राज्यवाद्यांना अग्रहक्क ' (इंपीरियल प्रेफरन्स) देण्याला विरोध केला, कारण भारताला जबाबदार राज्यपद्धती नव्हती, आणि निवडून दिलेल्या प्रतिनिधीमार्फत आर्थिक धोरण ठरवता येत नव्हते. साम्राज्यवाद्यांना अग्रहक्क म्हणजे साम्राज्य स्वयंपूर्ण करणे. आर्थिक अरिष्टामुळे ब्रिटनला त्याचे पूर्वापार चालत आलेले खुल्या व्यापाराचे धोरण सोडावे लागले (१९३१) आणि १९३२ मध्ये त्याने सरसकट दहा टक्के जकात वाढविली.

या सर्वांचा परिणाम असा झाला की, जुलै १९३२ मध्ये ओटावा येथे साम्राज्यशाही आर्थिक परिषद बोलावणे भाग पडले. मध्यंतरी विधिमंडळाचा सल्ला न घेता मध्यवर्ती सरकारने ओटावा परिषदेसाठी सर अतुल चतर्जी यांच्या नेतृत्वाने एक शिष्टमंडळ नेमले. षण्मुखम चेट्टी आणि अबदुल्ला हरून या मध्यवर्ती विधिमंडळाच्या दोन सदस्यांचा त्यात समावेश केला.

ब्रिटन आणि भारत यांच्यातील व्यापारी करार हे या परिषदेचे फलित होय. भारतातील मालावर सर्वसामान्यतः दहा टक्के जकात माफ, आणि साम्राज्यांतर्गत माल नसेल अशा मालावर दहा टक्के जकातवाढ, तसेच मोटारवाहनावर ७.५ टक्के जकात–अशी या करारात तरतूद करण्यात आली होती. ओटावा परिषदेच्या समाप्तीनंतर एक पुरवणी करार करण्यात आला. ब्रिटनमधील जस्ताचा पातळ थर दिलेले पोलाद, आणि भारताचे ब्रिटनमध्ये जाणारे पोलाद यांनाही या कराराने अग्रहक्क वा पसंती देण्यात आली.

साम्राज्यशाहीला पसंती या धोरणामुळे साम्राज्यशाही नसलेल्या देशाच्या परकी व्यापारावर प्रतिकूल परिणाम झाला. भारताच्या राष्ट्रीय वर्तमानपत्रांनी या कराराला विरोध केला. मध्यवर्ती विधिमंडळात या प्रस्तावाला अनेक उपसूचना सुचविण्यात आल्या. या कराराने फक्त इंग्लंडचा फायदा झाला. दैनंदिन वापराच्या वस्तूंच्या किंमती वाढल्या. या प्रस्तावाच्या बाबत समितीच्या सभासदांमध्येही एकमत नव्हते, व्यापारमंत्र्यांचा हा प्रस्ताव अखेर गृहाने संमत केला. या प्रस्तावावर आधारित असे जकातविषयक विधेयक मध्यवर्ती विधिमंडळाने १५ डिसेंबर १९३२ ला संमत केले. हा करार रद्द करावा अशी उपसूचना जिना यांनी मांडली, पण ती ७० विरुद्ध ६५ नी फेटाळली गेली. उभय बाजूनी जर सहा महिन्यांची नोटीस दिली तर करार रद्द करण्याची तरतूद होती [१३ मे १९३६ ला करार रद्द करण्याची सूचना देण्यात आली, आणि नोव्हेंबर १३, १९३६ ला हा करार रद्द झाला].

दुसरा भारत-ब्रिटन व्यापारी करार १९ जानेवारी १९३५ ला करण्यात आला. ओटावा कराराला हा पूरक होता, आणि ओटावा करार असेपर्यंतच हा अस्तित्वात राहणार होता. नवीन करारातही भारताच्या जकातीबाबतचे संपूर्ण स्वातंत्र्य भारताला होते. ब्रिटनमधील व्यापारी मंडळापुढे (बोर्ड ऑफ ट्रेड) ब्रिटिश आयात कायद्यानुसार आपली बाजू मांडण्याचा भारताला कायद्याने प्रस्थापित केलेला हक्क असल्याचे व्यापारमंत्री भोर यानी मान्य केले.

आर्थिक अरिष्टाला तोंड देण्यासाठी इतर देशाशीही करार करण्यात आले. जपानशी १९३४ मध्ये करार झाला. १९३२ पासून जपानी येनची किंमत कमी झाली, आणि जपानी कापडाने बाजार ओसंडून वाहू लागले. भारतीय कापूस जपानला निर्यात होत होता म्हणून कापूस-उत्पादकांचा फायदाच झाला. मुंबई-लँकेशायर किंवा मोदी-लीज करारावर ८ ऑक्टोबर१९३३ ला सह्या झाल्या. ३१ डिसेंबर १९३५ पर्यंत त्याची कार्यवाही होती.

## सारांश

विसाव्या शतकाचे तिसरे दशक खालील युगप्रवर्तक घटनानी भरलेले दिसून येते :— (१) गांधीजींची असहकारितेची चळवळ, (२) रशियन राज्यक्रांतीचा प्रभाव, (३) डाव्या विचारसरणीचा उदय, (४) अ. भा. ट्रेड युनियन काँग्रेस (आयटक) चा उदय आणि विकास, (५) कम्युनिस्ट गटाचा उदय, (६) राष्ट्रीय आणि वासाहतिक चळवळीवर कम्युनिस्ट इंटरनॅशनलचा प्रभाव, (७) ब्रिटिश कामगार चळवळीची वाढ. यामुळे आमच्या आर्थिक आणि राजकीय विचारसरणीला आकार आला, तिचा आकृतिबंध तयार झाला.

असहकार चळवळीचा पराभव व चौरी-चौऱ्यात हिंसा झाल्याने बारडोलीतील करबंदीचा लढा माघारी घेतल्याने मूलभूत प्रश्न निर्माण झाला : गांधीजींनी स्वीकारलेली विचारसरणी स्वातंत्र्य देईल का ? समाजाच्या पुनर्घटनासाठी तिचा उपयोग होईल का? गांधीजींच्या चळवळीने ज्यांचा भ्रमनिरास झाला असे युवक क्रांतिकारक मार्गाकडे गेले, समाजवादी झाले, आणि ' क्रांति चिरायु होवो ', ' इन्किलाब झिंदाबाद ' अशा घोषणा देऊ लागले. १९३० ची चळवळ सुरू होण्याच्या आधी साम्राज्यवाद्यांनी आक्रमक धोरण स्वीकारून लाहोर आणि मीरत कटाचे खटले उभारले. एम्. जे. देसाई यांनी म्हटल्याप्रमाणे जवाहरलालजींना मीरत कटात गोवण्याचा डाव होता. क्रांतिकारक बुद्धिवाद्यांपासून सामान्य जनतेला दूर ठेवण्याचा हा डाव होता; पण या दोन्ही खटल्यातील तरुणांनी राष्ट्रीय लढ्याला स्फूर्तीच दिली.

कायदेभंग चळवळीच्या पहिल्या अवस्थेतील स्थित्यंतरे दोन भागांत सांगता येतील :

**पहिला कालखंड :** सप्टेंबर १९३०. या कालखंडाचे वैशिष्ट्य म्हणजे काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी पूर्वी ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणे निदर्शने, ग्रामीण जनतेचा खराखुरा लढा टाळून तुरुंगभरती, किंवा ती टाळणे अशक्य असेल तर चळवळीला स्थानिक रूप देऊन किंवा घातपाती कृत्ये करून तिची पीछेहाट केली. ग्रामीण भागापेक्षा नागरी भागात जनतेच्या उत्स्फूर्त उठावाची केंद्रे होती. या कालखंडाच्या अखेरीस शेतकीवरील अरिष्ट आले.

व्यापारीवर्गाने चळवळीला जोरदार पाठिंबा दिला. अहमदाबादच्या गिरणी मालक संघाचे अध्यक्ष म्हणाले, '' गांधीजींशी तडजोड करून त्या धोरणावर आधारलेल्या व मन वळवलेल्या धिटाईच्या धोरणाची व हुशार मुत्सद्देगिरीची जरुरी आहे ''.[६४]

मुंबईच्या कापड व्यापारी संघाने सरकारच्या दडपशाहीचा निषेध म्हणून २६ जुलै १९३० पासून बेमुदत हरताळ घोषित केला. काँग्रेसच्या चळवळीला हा नैतिक आणि भौतिक भांडवलदारी पाठिंबा मिळाला म्हणूनच सप्टेंबरमध्ये शरणागती न पत्करता लढा आणखी पाच महिने पुढे रेटता आला.

**दुसरा कालखंड :** शेवटच्या पाच महिन्यांचा हा खंड. हा कालखंड म्हणजे वाढत जाणारे शेतकऱ्यांचे अरिष्ट. उत्पादनखर्चापेक्षा कापसाची किंमत कमी झाली. ज्यूट आणि गव्हाच्या बाबतीत तेच झाले. शेतकऱ्यांच्या झालेल्या आर्थिक दुरवस्थेमुळे, कायदेभंगाच्या नियंत्रणाचे, विशेषतः ग्रामीण भागातील काम कठीण झाले.

राष्ट्रीय क्रांतिकारक उठावाच्या बाबतीत काँग्रेस आणि आयटक (A.I.T.U.C.) या कालखंडात एकाच विचारांच्या होत्या. कामगार पुढारी हे काँग्रेसचे सदस्य होते, नव्हे–काँग्रेसच्या अत्युच्च समितीवर–अ. भा. काँ. कमिटीवर निवडून गेले होते. काँग्रेस पुढारीपणावर त्यांचा प्रभाव होता. जवाहरलालजी आणि सुभाष बाबू हे तर आयटकचे अध्यक्ष होते. मद्रास येथील अधिवेशनात (१९२७) संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव मांडण्यात या कामगारवर्गीयांचा पुढाकार होता. के. एन्. जोगळेकर आणि निमकर हे करण्यात अग्रणी होते. कामगार शेतकरी पक्षाने समाजवादाचा मार्ग सुकर केला, आणि हा पक्ष काँग्रेसमध्ये डावा पक्ष म्हणून काम करू लागला. या व्यापक संयुक्त आघाडीने संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव घोषित केला. इतकेच नव्हे तर भारताचा स्वातंत्र्यलढा हा साम्राज्यशाहीबरोबर चाललेल्या जागतिक लढ्याचा एक भागच आहे हे त्यानी जनतेला समजावून सांगितले. लढ्याचा हा वैचारिक पाया मोठा चमत्कारच होता.

कराची येथे १९३१ साली झालेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात मूलभूत हक्कासंबंधी झालेल्या ठरावात या विचारसरणीचे प्रतिबिंब दिसून आले. समाजवादी विचारसरणीकडे ही मोठी झेप होती.

दुसरा कालखंड म्हणजे कामगार चळवळीत (आयटक) मध्ये पडलेली फूट. डावी पंथवादी प्रवृत्ती कामगार चळवळीत वाढीस लागली आणि १९३७ साली रेड टी. यू. सी. स्थापन झाली.

१९३२ ते ३४ या कालखंडात दोन महत्त्वाच्या गोष्टी दिसून आल्या : (१) असंघटित कामगार चळवळ आणि (२) काँग्रेसने कायदेभंग चळवळ परत घेतली. १९३२ मध्ये जनतेची कायदेभंगाची चळवळ नव्हती, पण वैयक्तिक सत्याग्रहाची चळवळ होती. त्यामुळे जनतेची लढाऊ चळवळ विनाश पावली. गांधीजींनी हरिजन चळवळीकडे ती शक्ती वळविण्याचा प्रयत्न केला.

या चळवळीनंतर महाराष्ट्र पूर्णपणे काँग्रेसचा झाला. राष्ट्रव्यापी चळवळीच्या योगाने साऱ्या जाती व वर्ग एका समान भूमिकेवर येऊन सर्वांत सहकार्याची भावना वाढीला लागली.

महाराष्ट्रातील ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद आपोआप मागे पडला.

गांधींचे पुढारीपण मानणारात दोन विभाग होते. एक विधायक कार्यक्रमाला वाहून घेणारा—अप्पासाहेब पटवर्धन, बाळूभाई मेहता, अण्णासाहेब सहस्त्रबुद्धे इत्यादिकांचा. प्रचारात्मक व कमिट्यांच्या राजकारणात त्यांना रस नव्हता. दुसरा देव, दास्ताने इत्यादिकांचा. काँग्रेस संघटना मजबूत करण्यावर त्यांचा भर होता. विधायक कार्यक्रमाला पोषक अशी त्यांची भूमिका होती.

देवांची मन:स्थिती चमत्कारिक झाली होती. इतर गांधीवादी तुरुंगातून गांधीवादी म्हणूनच बाहेर आले. देवांची हृदयाची निष्ठा गांधीजींकडे होती. तर डोके समाजवादाकडे ओढले जात होते. तरुणवर्ग समाजवादाकडे ओढला जात होता तो हातातून जाऊ नये असा त्यांचा प्रयत्न होता.

जावडेकर सत्याग्रही समाजवादाचा पुकारा करून आत्मबलावर जोर देऊ लागले.

**वाङ्मयावर प्रभाव**

सोलापूरचे चार हुतात्मे (१२ जानेवारी) आणि लाहोरला फाशी गेलेले भगतसिंग, राजगुरु आणि सुखदेव (२३ मार्च) असे अडीच महिन्याच्या अंतराने सात वीर हुतात्मे झाले. त्यांना उद्देशून प्रा. ना. के. बेहेरे यांनी ' सप्तर्षी ' ही कविता ' चित्रमयजगत् ' मध्ये लिहिली त्याबद्दल त्यांना सरकारी नोकरीला मुकावे लागले.

गिरगाव (मुंबई) तील एक तरुणी म्हणते—

आई मी जाते कांदेवाडीला  
प्रभातफेरी काढायला  
आई मी होते गिरगावात  
झेंडा माझ्या हातात  
आई मी होते काळबादेवीत  
जय तुझा माझ्या तोंडात ॥

तसेच

गांधी महाराजांचा  
नऊ खंडात झाला डंका ।  
नेली लुटून भावलंका ॥

असे गीत शिराळे भागात म्हटले जाई.

' काँग्रेसची शिपाईण ' व ' देशसेविका ' या वरेरकरांच्या नाटिका मुंबईत ठिकठिकाणी झाल्या. जनसामान्यांना चळवळीकडे ओढण्याला त्यांची मदत झाली.

टिळकांचा जनसामान्यावरही एवढा प्रभाव होता की, जात्यावरील ओव्यात त्यांचे नाव गोवले गेले.

जेव्हा एखादे राष्ट्र परकीय सत्तेच्या गुलामगिरीत असते तेव्हा लोकांच्या मनात देशभक्तीची भावना प्रज्वलित करून राजकीय जाणिवेने त्यांची मने प्रक्षुब्ध करणे हेच वाङ्मयाचे प्रयोजन आहे असे शिवरामपंत परांजपे यानी म्हटले आहे. आगरकरांनी बुद्धिप्रामाण्यवाद, स्थित्यंतर-क्षमता आणि व्यक्तिस्वातंत्र्य या तीन तत्त्वांचा प्रचार केला. ' निबंधमाले ' ने देशप्रेमाची स्फूर्ती दिली; ध्येयवाद रुजवला. ह. ना. आपटे, ना. ह. आपटे, हडप, नाथ माधव इत्यादी लेखकांनी ऐतिहासिक कादंबऱ्यांद्वारा इतिहासाला उजाळा देऊन स्फूर्ती दिली.

१९२० नंतरच्या काळात साहित्य हे साधन नसून साध्य आहे. आनंद देणे हेच त्याचे कार्य आहे असे विचार मांडण्यात आले. चिपळूणकरांच्या काळात समाजप्रबोधक राष्ट्रशोधक लेखकांची परंपरा निर्माण झाली, गांधी युगात लेखक मात्र हस्तिदंती मनोऱ्यात रममाण होऊ लागले. मध्यमवर्गाला गांधींचा सत्याग्रह कायदेभंगाचा, बहुजन समाजाच्या चळवळीचा दणका सहन झाला नाही, तो पलायनवादी झाला. ना. सी. फडके हे याचे मोठे उदाहरण म्हणता येईल. वा. म. जोशी यानी क्रांतिवादी चळवळीत कारावास सोसला, पण राष्ट्रीय लढा तीव्र होत असता ते कलावाद आणि आनंदवादाची मांडणी करीत होते. ज्ञान आणि नीती यांनी कलेच्या प्रांगणात लुडबूड करू नये असे त्यांचे मत होते, तरीपण ते गांधीवादाचे कलात्मक प्रचारक झाले. ही भूमिका न. चिं. केळकरांनी भक्कम केली.

' प्रभातफेरी ' हे स्वातंत्र्यलढ्यातील प्रचाराचे मोठे साधन होते. त्यात आनंदराव टेकाडे (आनंद कंद ऐसा । हा हिंद देश माझा), तिवारी, सेनापती बापट यांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. सोलापूरच्या कवि कुंजविहारी यांचा ' मुळशीचा पाळणा ' घराघरातून गायिला जात होता. भा. रा. तांबे, अज्ञातवासी व वि. द. घाटे यांनी त्यांच्या गीतात गांधींचा गौरवच केला आहे. साने गुरुजींनीं गांधींना उद्देशून ' ...... तुमच्या सत्कृत्यानीच मला गीता, श्रुती व स्मृतींचा अर्थ कळला, असे म्हटले आहे.

महात्मा गांधींच्या तत्त्वज्ञानाचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष प्रभाव मराठी कथावाङ्मयावरही पडलेला दिसतो. वामन चोरघडे, श्री. म. माटे, वि. स. खांडेकर, साने गुरुजी, मामा वरेरकर यांच्यासारखे कथालेखक गांधींच्या तत्त्वज्ञानातील व्यापक मानवतावादाच्या भूमिकेमुळे प्रभावित झाले होते. ग्रामोद्धार, हिंदू-मुस्लिम ऐक्य, चारित्र्य-शुद्धी, आदर्श व त्यागी जीवन, खादीप्रसार, दलितोद्धार, मंदिरप्रवेश, स्वातंत्र्यासाठी बलिदान करण्याची मानसिक सिद्धता, व्यापक सहानुभूती–हा गांधींच्या तत्त्वज्ञानाचा गाभाच होता. ' फाटकी वाकळ ' ' मी रामजोशी ' ' पेटते पाणी ' ' सत्तेचे

गुलाम ' ' तुरुंगाच्या दारात ' या वरेरकरांच्या लिखाणात गांधीवादातील विचाराना व विधायक कार्याला प्राधान्य मिळालेले दिसते. मामा इतर लेखकांपेक्षा पुरोगामी होते. ' मुक्तात्मा ' नंतर माडखोलकर प्रतिगामीच बनले. ' शुचिता, मानवता आणि ओजस्विता यांच्या अपूर्व संगमामुळे गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वाची १९२० ते ३० या दशकात माझ्या मनावर पडलेली मोहिनी अजूनही कायम आहे '. वीर वामनराव जोशी यांनी ' रणदुंदुभी ' ' धर्मसिंहासन ' या नाटकातून स्वातंत्र्य, लोकशाही आणि स्वयंनिर्णय यावरच भर दिला. सावरकरांनी गांधीवादाला विरोध करण्यासाठी ' उःशाप ', ' सन्यस्त खड्ग ', ' उत्तरक्रिया ' इत्यादी नाटके लिहिली.

गांधीवादाचा वैचारिक वाङ्मयावर परिणाम झाला. ' मार्क्सवाद ' हा त्या काळात (१९२०-३०) चर्चेचा विषय होता. कॉ. डांगे यांचे लिखाण, कॉ. लालजी पेंडसे यांनी तुरुंग जीवनातून बाहेर आल्यावर ' गुन्हेगार ', ' साहित्य आणि समाजजीवन ' अशी पुस्तके लिहिली. त्यावर मार्क्सवादाचा प्रभाव होता. ' समाजवादाला आध्यात्मिक रूप दिले पाहिजे ' असे जावडेकरांना वाटे. मार्क्सवादाने पुरोगामी साहित्याची अनुकूल पार्श्वभूमी तयार केली. (डॉ. सदा कऱ्हाडे–' भारतीय स्वातंत्र्यलढा आणि मराठी लेखक ' या पुस्तकात तसेच ' इये मराठीचिये नगरी गांधीजी ' या पुस्तकात प्रा. अनंत जगताप यांनी सविस्तरपणे गांधीवाद आणि मराठी वाङ्मय याचा सविस्तर ऊहापोह केला आहे. जिज्ञासूंनी तो अवश्य पाहावा).

## संदर्भ

(१) मीराबेन : ' दि स्पिरिट्स् पिलग्रिमेज ', पृ. १०८.
(२) वसंत नगरकर, ' भारतीय स्वातंत्र्यलढा ', पृ. २७०.
(३) ' यंग इंडिया ' –२०-२-३० ते १०-४-३०.
(४) एस्. गोपाळ, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. ६५.
(५) बी. बी. मिस्त्रा, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. ६३७.
(६) वसंत नगरकर, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. २८१.
(७) Report, G –148/1930.
(८) File 24/1930.
(९) वैदेही, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. १७६.
(१०) एस्. गोपाळ, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. ९७.
(११) मिस्त्रा, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. ३०७.
(१२) *Ibid* , पृ. ३०९.
(१३) डायकोव्ह, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. १२१.
(१४) बाँबे क्रॉनिकल, ५-६-१९३०.
(१५) बाँबे क्रॉनिकल, ५-६-१९३०.
(१६) Bombay Council Speech Vol. XXIX, July 1930, pp. 416-420.
(१७) Manoranjan Jha, Op cit, /3 80
(१८) मराठी मासिक ' रत्नाकर ', १९३१.
(१९) भाषण, २७-१-१९३१.
(२०) टाइम्स ऑफ इंडिया, ८-५-१९३०.
(२१) ताराअली बेग, ' वुइमेन ऑफ इंडिया ' , पृ. १९.
(२२) होरेस अलेक्झांडर ' गांधी थ्रू वेस्टर्न आइज ', पृ. ६४.
(२३) बी. आर. नंदा, संपादक ' From Purdah to Modernity '
(२३-अ) बी. आर. नंदा, संपादक ' From Purdah to Modernity '

(२४) C. D. Movement, Govt. Report, P, 2.

(२५) H. D. Circular letter No. 113, poll, dated 30th January 1930, in File No. 198/1930 Poll.

(२६) C. D. Movement, 1930-34, p. 8.

(२७) C. D. Movement, 1930-34, p. 15.

(२८) C. D. Movement, 1930-34, p. 6.

(२९) C.D. Movement, 1930-34, p. 22.

(३०) H. D. Circular ex-letter No. 1569, dated 12-8-1931.

(३१) H. D. Circular ex-letter No. 1569, p. 25.

(३२) C. D. Movement, pp. 36-38.

(३३) *Ibid,* p. 39.

(३४) Punjabi, p. 94.

(३५) M. Jha, U. S. A. and India, 1930-35, p. 144.

(३६) *Ibid,* p. 14.

(३७) M. Jha, U. S. A. and India, 1930-35, p. 144.

(३८) *Ibid* India, 1930-35, p. 281.

(३९) *Ibid* India, 1930-35, p. 97.

(४०) *Ibid* India, 1930-35, p. 74.

(४१) *Ibid* India, 1930-35, p. 93

(४२) Mohit Sen, Marxist Miscellany, January, 1970.

(४३) *Ibid*

(४४) कॉ. डांगे, भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीचे समालोचन, पृ. १६-१७.

(४५) Mohit Sen, Marxist Miscellany, January, 1970.

(४६) Chinmohan Snehanis, 'Lenin and India', p. 28..

(४७) Dr. Adhikari, 'C. P. I.'s Path to National Regeneration and Socialism', p. 58.

(४८) Dr. Adhikari, ' C. P. I.'s Path to National Regeneration and Socialism ', p. 64.

(४९) Dr. Adhikari, ' C. P. I.'s Path to National Regeneration and Socialism ', p. 65.

(५०) Dr. Adhikari, ' C. P. I.'s Path to National Regeneration and Socialism ', p. 74-78.

(५१) *Ibid,* p.—74-78.

(५२) Guidelines to the History of C. P. I. p. 274.

(५३) R. Ulynovsky, ' National Liberation ' p. 280.

(५४) Lenin and India, p. 287.

(५५) Comintern and the East, p. 434.

(५६) S. A. Dange, Selected Works, Vol. I., p. XVIII.

(५७) The Mahatma, p. 32.

(५८) Outline History of C. I., p. 302-303.

(५९) मधु दंडवते, ' भारतीय समाजवादाची वाटचाल ' पृ. २.

(६०) मधु दंडवते, ' भारतीय समाजवादाची वाटचाल ' पृ. ३.

(६१) ' Maratha ', 7-1-1934.

(६२) Nehru on Socialism, p. 54.

(६३) Mohit Sen, Revolution in India, p. 105.

(६४) The Times of India, 26th July, 1930.

(शा.म.मु.) एच ४१८८ (१,१५५-५-२००२)

# परिशिष्ट १

## मुलाखती

(१) बाळूभाई महेता, धुळे.
(२) प्रेमाबाई कंटक, सासवड.
(३) भाऊसाहेब रानडे, पुणे.
(४) अण्णासाहेब सहस्त्रबुद्धे.
(५) आ. वा. मोडक, गुरुजी (मुळशी).
(६) गो. बा. महाशब्दे, मुंबई.
(७) गं. बा. सरदार, पुणे.
(८) एस. जी. सरदेसाई, मुंबई.
(९) पु. पां. गोखले, कराड.
(१०) व्यंकप्पा रामय्या मडूर, सोलापूर.
(११) एम. डी. विभूते, सोलापूर.
(१२) शंकर विठ्ठल सापे, धुळे.
(१३) प. स. भागवत, भिवंडी.
(१४) शिवाजीराव भावे, धुळे.
(१५) श्री. स. महाजन, पुणे.
(१६) एस. एम. जोशी, पुणे.
(१७) द. कृ. गोसावी, सातारा.
(१८) भाई छन्नूसिंग चंदेले, सोलापूर.
(१९) दा. आ. बर्डे मास्तर, वाटेगांव
(२०) कांतिभाई गुजराथी, धुळे.
(२१) देवकीनंदन नारायण, जळगाव.
(२२) शि. न. कोल्हटकर, मुंबई
(२३) ग. वि. केतकर, पुणे.
(२४) डॉ. कृ. भी. अंत्रोळीकर, सोलापूर.

(२५) द. शं. पोतनीस, नाशिक.

(२६) स. खं. ऊर्फ दादा आळतेकर, कराड.

(२७) दत्तोबा लोहार, बिळाशी.

(२८) बाबा जातेगावकर, पुणे.

(२९) एन. एम. कामटे, पहिले पोलीस कमिशनर.

(३०) सादिक अली, राज्यपाल, महाराष्ट्र.

(३१) मोरारजी देसाई, पंतप्रधान, दिल्ली.

(३२) सोनुसिंग पाटील, गृहराज्यमंत्री, दिल्ली.

(३३) डॉ. ग. श्री. खैर, पुणे.

(३४) ग. म. गोळे, सासवड.

(३५) वामनराव यार्दी, नाशिक.

(३६) वैद्य ल. ब. शिराळकर, पुणे.

(३७) दादा धर्माधिकारी.

(३८) सुशीलाबाई महाजनी (ह. रा. महाजनी यांच्या पत्नी).

(३९) प्रभाकर के. गुप्ते, पनवेल.

(४०) रामदास गवांदे, धुळे.

(४१) सुभानराव पाटील, जळगाव.

(४२) धुंडिराज बाबाजी धामणकर, जळगाव.

(४३) विनायक ना. आपटे, पुणे.

(४४) दयार्णव कोपर्डेकर, सातारा.

(४५) मु. शं. देशपांडे, फलटण.

(४६) र. ग. कराडकर, मुंबई.

(४७) बिडकर, नाशिक.

(४८) द. या. पिंगळे, नाशिक.

(४९) शिरूभाऊ लिमये, पुणे.

(५०) रा. ना. सरनाईक.

(५१) बी. जी. कुलकर्णी, नगर.
(५२) वि. वा. नेने, पुणे.
(५३) गो. पां. खरे, पुणे.
(५४) माधवराव बागल, कोल्हापूर.
(५५) शेख सनाउल्ला, कोल्हापूर.
(५६) माधवराव पार्टे, कोल्हापूर.
(५७) दत्तोबा तांबट, कोल्हापूर.
(५८) विठ्ठल दासो सुखटणकर, पुणे.
(५९) हुल्याळकर एस. के., आगाखान पॅलेस, पुणे.
(६०) ना. वि. कुलकर्णी, पुणे.
(६१) श्री. शं. नवरे, मुंबई.
(६२) शं. न. आगाशे, पुणे.
(६३) र. के. खाडिलकर, पुणे.
(६४) स. के. भावे, पुणे.
(६५) दामुआण्णा एकबोटे, सातारा.
(६६) लक्ष्मीबाई भट, पुणे.
(६७) ना. ग. गोरे, पुणे.
(६८) त्रिं. ना. बेडेकर, पनवेल.
(६९) शं. मो. खांबेटे, गांधी सेवा संघ, पुणे.
(७०) वा. वा. अतीतकर, पुणे.
(७१) भाऊ धर्माधिकारी, पुणे.
(७२) चिं. ग. काशीकर, पुणे.
(७३) भाऊ (रामचंद्र नाना) पाटील, बोरगाव.
(७४) बॅ. रामराव देशमुख.
(७५) शं. र. ऊर्फ मामा दाते, पुणे.
(७६) ग. प्र. प्रधान, पुणे.

(७७) आ. रा. भट, पुणे.
(७८) वसंतराव देवकुळे, पुणे.
(७९) लालजी कुलकर्णी, पुणे.
(८०) आचार्य वि. प्र. लिमये, पुणे.
(८१) ए. जी. भुरके, कोल्हापूर.
(८२) एम. डी. श्रेष्ठी, कोल्हापूर.
(८३) ग. रं. भिडे, कोल्हापूर.
(८४) स. ह. मोडक, मुंबई.
(८५) पु. शं. पतके, पुणे.
(८६) के. ए. कोल्हटकर, मुंबई.
(८७) मालतीबाई बेडेकर, पुणे.
(८८) बा. रं. सुंठणकर, पुणे.
(८९) दौलतराव भिकाजी सोनवणे, बागलाण.
(९०) रघुनाथ गणेश तथा बाबूराव गोखले, कोल्हापूर.
(९१) मालोजीराजे निंबाळकर, फलटण.
(९२) सदूभाऊ गोडबोले, पुणे.
(९३) व्ही. जी. कानेटकर, निवृत्त पोलीस महासंचालक, पुणे.
(९४) एम. डी. पुसाळकर, अमळनेर.
(९५) गं. दे. खानोलकर, मुंबई.
(९६) शिवराम गोविंद दर्शने, औंध.
(९७) श्रीधर विठ्ठल काकिर्डे, कुर्डुवाडी.
(९८) कवि कुंजविहारी, सोलापूर.
(९९) श्री. रा. टिकेकर, मुंबई.

## BIBLIOGRAPHY

( Important references are given at the end of every part. Besides these the following books were referred ).

*Andrews , C. F.* ... The Rise and Growth of the Congress, G. Allan &Unvin, 1938.

*Andrews , C. F.* ... The Indian Problem, Madras, 1923.

*Andrews, C. F.* ... Non-co-operation, 1922.

*Andrews, C. F.* ... India and Britain—a Moral Challenge, London Student Christian Movement Press, 1935.

*A. I. C. C.* ... Developments of the Congress Constitution.

*Attlee, C. R.* ... As It Happened, London, 1954.

*Azad, Abul Kalam* India Wins Freedom, 1959.

*Adhikari, G. M.* ... From Peace Front to People's War. P. P. H., Bombay, 1944.

*Adhikari, G. M.* ... Documents of the History of C. P. I., Vols. I, II, III.

*Ahmad, Muzaffar* ... The C. P. I. and its Formation Abroad, Calcutta, 1962.

*Aga Khan* ... The Memories of the Aga Khan, London, 1954.

*Aggarwal, R. N.* ... National Movement & Constitutional Development of India, Metropolitan Book Co. Pvt. Ltd.

*Alladi, Vaidehi* ... Freedom Movement in India (1850—47). Kalakhishetra Publications, Madras, 1977.

*Banerjee, Surendranath* A Nation in Making, Oxford, 1925.

***Bose, Subhas Chandra*** — The Indian Struggle, 1920-42, Calcutta, 1964.

***Beauchamp, John*** ... Br. Imperialism in India, 1935.

***Buchenon, D. H.*** ... The Development of Capitalist Enterprise in India, 1934.

***Besant, Annie*** ... The Future of Indian Politics, London, 1922.

***Buch, M. A.*** ... Rise & Growth of Indian Liberation, 1937.

***Buch, M. A.*** ... Rise & Growth of Militant Nationalism.

***Banerjee, A. C.*** ... Indian Constitutional Documents, Vol. I & II.

***Brecher, Michael*** ... Nehru, Political Biography, Oxford.

***Bose, Nirmal Kumar*** — Studies in Gandhism, Calcutta, 1947.

***Banaford*** ... History of the Khilafat and N. C. Movements.

***Brown, Judith*** ... Rise of Gandhi, 1915-22

***Brown, Judith*** ... C. D. Movement in India, 1928-34, Cambridge.

***Brailsford, Henry*** ... Rebel India (1931).

***Birla, G. D.*** ... In the Shadow of the Mahatma, 1968.

***Cohn, Barnard S.*** ... Land Control & Social Structure in Indian History, Madison 1969.

***Coupland, Reginald*** — The Indian Problem, 1833-1935.

***Chand, Tara*** ... History of the Freedom movement in India, G.O.I. ,1961.

***Chakravarthi, D. & Bhattacharya C.*** ... Congress in Evolution, Calcutta, 1935.

***Chagla, M. C.*** ... Roses in December (Autobiography). Bharatiya Vidya Bhavan, 1972.

***Chari, A. S. R.*** ... Memories of an Unrepentant Communist.

*Chandra, Bipan & others.* Freedom Struggle.

*Dimitroff* ... The United Front Struggle against Fascism and War, London, 1938.

*Das Durga* ... Sardar Patel's Correspondence, Ahmedabad.

*Dwarkadas, Kanji* ... India's Struggle for Freedom, 1913-1937.

*Dutt, R. P.* ... India Today, P. P. H., 1947.

*Dyakov A. M.* ... The Contemporary History of India.

*Desai, A. R.* ... Social Background of Indian Nationalism, Bombay.

*Deo, Acharya Narendra* Socialism and the National Revolution , Bombay.

*Das, C. R.* ... Freedom though Disobedience, Madras, 1922.

*Das C. R.* ... Speeches, Calcutta, 1927.

*Das M. N.* ... J. Nehru.

*Dasgupta Amar Prasad* Studies in History of British in India. Calcutta University, 1942.

*Dhanagare, D. N.* ... Peasant Movements in India (Oxford).

*Duffett, W. E. & Parkin G. R.* ... India Today—The Background of Indian Nationalism, New York, 1942.

*Ewart J. M. (Ed.)* ... Terrorism in India, 1917-1936.

*Fischer, Louis* ... The Life of M. Gandhi, 2 Vols., B. V. Bhavan, 1965.

*Gopal S.* ... The Viceroyalty of Lord Irwin, 1926-31 (Oxford)

*Gandhi, M. K.* ... My Experiments with Truth, Navjivan.

*Gandhi and the Viceroy* ... A pamphlet, Cambridge, 1926.

*Gorwala, A. D.* ... Report on P. A., 1951.

*Ghose, Sankar* ... Socialism and Communism in India, Allied, 1970.

*Ghose, Sankar* ... The Renaissance to Militant Nationalism in India, Calcutta.

*Ghose, Aurobindo* ... The Doctrine of Passive Resistance, Pondicherry, 1948.

*Ghose, Aurobindo* ... The Renaissance in India, Calcutta, 1946.

*Griffiths, P. J.* ... The British Impact on India, London, MacDonald, 1952.

*Guha, Arun Chandra* First Spark of Revolution, Orient, London, 1971.

*Ghose, Arun & Ghosh, Ranjit* Indian Political Movement, 1919-1977.

*Hunter Committee Report:*

*Hodson, H. V.* ... The Great Divide, London, 1969.

*Hutchinson, L.* ... Conspiracy at Meerut, London, 1935.

*Hasan, M. Ed.* ... Muslims and the Congress.

*Jayakar, M. R.* ... The Story of My Life, 2 Vols, Asia.

*Jhangiani Motilal A.* Jansangh and Swatantra, Bombay, 1967.

*Joseph P.* ... What is wrong with India, Bom. 1937.

*Jayaprakash Narayan* Towards Struggle, 1946.
Why Socialism ?

*Jha, Manoranjan* ... U. S. A. and India.

*Kaye* ... Communism in India, 1924.

*Kaushik, P. D.* ... The Congress Ideology and Programme, 1920-47.

*Karnik V. B.* ... The left Groups in India, Calcutta.
The Indian Trade Unions.

